



# इंग्लंडचा इतिहास.

## चवथे जार्ज व चवथा विल्यम.

(१८३५-१८२०)

ग्रंथमाला

मासिकपुस्तकांत छापलेलें प्रकरण.

# इंग्लंडचा इतिहास.

(१७१५—१८३७)

हा ग्रंथ

रा. रा. नारायण लक्ष्मण फडके, बी. ए.

यांनीं लिहिला

तो

रा. रा. विष्णु गोविंद विजापूरकर, एम्. ए.,

संपादक ग्रंथमाला, यांनीं

कोल्हापूर, 'श्रीसमर्थप्रसाद' छापखान्यांत छापून प्रसिद्ध केला.

१९०५.

किंमत ३८७.

# अनुक्रमणिका.



,
गे.

| प्रकरणें. | पृष्ठें. |
|---|---|

# इंग्लंडचा इतिहास.

## चवथे जार्ज व चवथा विल्यम्.

## प्रकरण पहिलें.

### अॅन राणीचा मृत्यु व पहिल्या जार्जाचें राज्यारोहण.

अॅन राणी ही ता. ८ ... ी १७०२ रोजीं तिसऱ्या विलियमाच्या मागून गादीवर बसलेली हे ... तिच्या अंगीं बुद्धिसामर्थ्य बेताचें होतें, व निश्चयसामर्थ्यहि फारसे ... ें. तिचें खासगी वर्तन शुद्ध असे व तिच्या दरबारांतीलही चाल ... अ... ग्य नव्हती; पण राजकीय बाबतींत तिचें वर्तन निश्चयाचें नसे. ... ा ना त्या कोणत्या तरी एका बाईच्या कह्यांत असे व तिच्या धो ... सदा वागे. जोंपर्यंत डचेस अॅन मार्लबरोचें तिच्यावर वर्च ... तोंपर्यंत ड्यूक आफ मार्लबरो व त्याच्या पक्षाचे लोक ह्यांचें ... रभारांत प्रमुखत्व होतें. पुढें जेव्हां तिचें वर्चस्व कमी होऊन ... म हिचें प्रस्थ माजलें, तेव्हां ड्यूक व त्याचा पक्ष हे हुसकले ... स्थिति होती.

१७१४मध्यें जेव्हां र ... फार बिघडली तेव्हां लोकांस मोठी काळजी उत्पन्न झा ... कारण, लोकांची तिजवर मोठी प्रीति होती हें नव्हे; तर ... सल्यामुळें गादीवर पुढें को ... बसणार व त्यामुळें पुढें ... ा येणार, हेंच होतें. ... मुलें मुळींच झालीं नव्हतीं ... हे; तिचें डेन्मार्कचा राज... जार्ज ह्याशीं लग्न झालेलें अस ... ा १८ किंवा १९ मुलें झालीं ... असें ह्मणतात. पण तीं सर्व ... असतांच निवर्तलीं. ह्मणून ... मागून गादीवर कोण येणार ... ठा प्रश्न होता.

# इंग्लंडचा इतिहास.

## चवथे जार्ज व चवथा विल्यम्.

## प्रकरण पहिलें.

### अॅन राणीचा मृत्यु व पहिल्या जार्जाचें राज्यारोहण.

अॅन राणी ही ता. ८ मार्च १७०२ रोजीं तिसऱ्या विलियमाच्या मागून गादीवर बसलेली होती. तिच्या अंगीं बुद्धिसामर्थ्य बेताचें होतें, व निश्चयसामर्थ्यहि फारसें नव्हतें. तिचें खासगी वर्तन शुद्ध असे व तिच्या दरबारांतीलही चालरीत अयोग्य नव्हती; पण राजकीय बाबतींत तिचें वर्तन निश्चयाचें नसे. ती ह्या ना त्या कोणत्या तरी एका बाईच्या कह्यांत असे व तिच्या धोरणानें ती सदा वागे. जोंपर्यंत डचेस अॅन मार्लबरोचें तिच्यावर वर्चस्व होतें, तोंपर्यंत ड्यूक आफ मार्लबरो व त्याच्या पक्षाचे लोक ह्यांचेंच राज्यकारभारांत प्रमुखत्व होतें. पुढें जेव्हां तिचें वर्चस्व कमी होऊन मिसेस मेशाम हिचें प्रस्थ माजलें, तेव्हां ड्यूक व त्याचा पक्ष हे हुसकले गेले. अशी स्थिति होती.

१७१४मध्यें जेव्हां राणीची प्रकृति फार बिघडली तेव्हां लोकांस मोठी काळजी उत्पन्न झाली. त्याचें कारण, लोकांची तिजवर मोठी प्रीति होती हें नव्हे; तर तिला मूल नसल्यामुळें गादीवर पुढें को[illegible] बसणार व त्यामुळें पुढें काय प्रसंग येणार, हेंच होतें. ति[illegible] मुलें मुलींच झालीं नव्हतीं असें नव्हे; तिचें डेन्मार्कचा राज[illegible] जार्ज ह्याशीं लग्न झालेलें असून तिला १८ किंवा १९ मुलें झालीं [illegible] असें ह्मणतात. पण तीं सर्व लहान असतांच निवर्तलीं. ह्मणून [illegible] मागून गादीवर कोण येणार हा मोठा प्रश्न होता.

१६८८ च्या राज्यक्रान्तीनंतर लवकरच, स्टुअर्ट घराण्यास पुनः गादी प्राप्त होऊं नये एतदर्थ पार्लमेंतानें बंदोबस्त करून ठेविला होता. विलियम व मेरी ह्यांच्या कारकीर्दीच्या पहिल्याच वर्षीं 'बिल आफ राइट्स्' नांवाचें बिल पास करून त्यांत असें ठरविलें होतें कीं, मेरी व विलियम यांच्या पश्चात् गादी प्रथम मेरीच्या मुलांकडे जावी, नंतर तिची बहीण ॲन व तिचीं मुलें ह्यांजकडे जावी, आणि नंतर विलियमनें मेरीच्या पश्चात् दुसरें लग्न करून त्यास त्या लग्नाची संतति झाल्यास त्या संततीकडे जावी. पण मेरीला मूल मुळीं झालेंच नाहीं. पुढें १६९९ त ती मेल्यावर विलियमचीहि प्रकृति बिघडल्यामुळें त्यानें पुनः लग्नच केलें नाहीं, व नंतर १७०२त तो मेला; तेव्हां वरील कायद्याप्रमाणें ॲन राणी गादीवर बसली. तत्पूर्वीं बाळपणांतून निभावून अमळ मोठा झालेला जो डयूक आफ ग्लॉस्टर नामक तिचा मुलगा तोहि अकराव्या वर्षीं निवर्तला. ह्मणून १७०१ त स्टुअर्ट घराण्यांतील पुरुष गादीवर बसूं नयेत असा पक्का बंदोबस्त करण्यासाठीं पार्लमेंतास नवा कायदा पसार करणें भाग पडलें. त्याचें नांव 'आक्ट आफ सेटलमेंट.' त्या कायद्यानें असें ठरलें कीं, दुसऱ्या जेम्सचे मुलगे किंवा इंग्लंदच्या गादीवर हक्क सांगणारे इतर कोणीहि कॅथलिक लोक ह्यांना इंग्लंदची गादी मिळूं नये; आणि त्यावेळीं एकटा राज्य करीत असलेला तिसरा विलियम किंवा त्याच्यामागून गादीवर बसणारी जेम्सची मुलगी ॲन ह्यांस मूल नसल्यास, अगदीं जवळची अशी जी प्राटेस्टंट वारसदारीण इलेक्ट्रेस सोफाया आफ हॅनोव्हर तिजकडे गादीचा हक्क जावा. ॲनच्या मागून गादीवर बसणाऱ्या पहिल्या जार्जची ही आई. इंग्लंदचा राजा पहिला चार्लस ह्याची बहीण व बोहिमियाची राणी जी इलिझाबेथ तिची ती मुलगी असून इलेक्टर आफ हॅनोवर याच्याशीं तिचें लग्न झालेलें होतें. १७१४ च्या जून महिन्यांतच ८४ वर्षांची होऊन निवर्तली. ती आणखी कांहीं दिवस जगती तर कदाचित् स्वतःच इंग्लंदची राणी बनली असती.

तिचा पुत्र इंग्लंदचा भावी राजा जार्ज याचा जन्म १६६० त झालेला असल्यामुळें त्यास त्यावेळीं ५४ वें वर्ष लागलेलें होतें. त्याला इंग्रजी भाषेचा गंधहि नव्हता. त्याला इंग्लिशांच्या रीतीभाती किंवा दंतकथा किंवा इतिहास ह्यांचेंहि बिलकुल ज्ञान नव्हतें. त्याला लहानपणीं शिक्षण बेतांचेंच मिळालेलें होतें. त्याचा बाप त्याच्या शिक्षणाबद्दल मुळींच काळजी करीत नसे. त्यामुळें तो अगदीं स्वच्छंदपूर्वक वागत असे. त्याच्यामध्यें गुण एवढाच होता कीं, तो मुद्दाम होऊन कोणाचें अकल्याण करीत नसे. त्याचें बाविसाव्या वर्षींच प्रिन्सेस सोफाया डोरोथिया आफ झेल नामक राजकन्येशीं लग्न झालेलें होतें, पण तिजवर त्याचें मुळींच प्रेम नव्हतें. त्याचें लक्ष्य इतर स्त्रियांवर असे व विशेषतः कुरूप स्त्रियांवर असे. त्याचें पहिलें प्रियपात्र डचेस आफ केंडल, व नंतरचें कौंटेस आफ डार्लिंग्टन, ह्या दोन्ही बाया बेढब होत्या. त्याला स्वदेशाचें, ह्मणजे हानोव्हरचें, प्रेम मात्र फार असे; पण ही गोष्ट इंग्रजांस आडवण्यासारखी नव्हती. सन १६९८त त्याचा बाप मेल्यामुळें तो तेथील इलेक्टर झाला असून पुढें जेव्हां ॲन राणी आजारी पडली, तेव्हां आतां आपणास इंग्लंदास राजा होऊन जावें लागणार ह्याबद्दल त्यास अमळ काळजीच पडली.

इंग्लंदच्या गादीवर हक्क सांगणारा दुसरा माणूस ह्मटला ह्मणजे दुसऱ्या जेम्साचा मुलगा एडवर्ट स्टुअर्ट हा होय. यासच पुढें ओल्ड प्रिटेंडर ( वृद्ध तोतया ) असें नांव त्याच्या शत्रूंनीं दिलें होतें. हा ॲनं राणीचा सावत्र भाऊ होय. ह्याचा जन्म १६८८त झाला होता. त्यावेळीं इंग्लिश लोक त्याचा बाप दुसरा जेम्स ह्याच्या जुलमी कारभारास कंटाळलेले असल्यामुळें हा त्याचा खरा मुलगा नव्हे, तर कोणा गरीबाचा धरून आणलेला आहे, अशी कंडी कांहींकांनीं पिकविली होती; पण ती अर्थात् अगदीं खोटी होती. तो जन्मल्यानंतर लवकरच त्याची आई फ्रान्सांत पळून गेली व नंतर जेम्सही लवकरच तिच्या मागून तिकडे गेला हें सर्वविश्रुत आहेच. जार्जप्रमाणें हाहि स्त्रियांचा नादी असे, व भाबळेपणानें त्यांस तो कधीं कधीं आपल्या गुप्त मसलतीहि सांगे.

आणि अशा रीतीनें त्याचें काम फिसकटे. यावेळीं त्यास सत्विसावें वर्ष लागलेलें असून त्याचें अद्यापि लग्न झालेलें नव्हतें; पण पुढें लग्न झालें तरी त्याच्या वर्तनांत सांगण्यासारखा फरक पडला नाहीं. आतां येथें इतकें सांगणें इष्ट दिसतें कीं, तो असा होता तरी जर तो प्राटेस्टंट धर्म स्वीकारण्यास कबूल झाला असता तर त्यास इंग्लंदची गादी बहुधा प्राप्त झाली असती. त्याचे अनुयायी, व आक्स्फर्ड आणि बोलिंग्ब्रोक ह्यांसारखे टोरी मुत्सद्दीदेखील, त्यास असा आग्रह करीत होते कीं, तूं निदान प्राटेस्टंट झाल्याचें ढोंग तरी कर, ह्मणजे तुझें काम झालें; पण तो गादीसाठीं असलें नीच कृत्य करण्यास कधींही कबूल झाला नाहीं.

असो. पण ह्या दोन हक्कदारांच्यासंबंधानें स्वत: ॲन राणीचें मत काय होतें बरें? साहजिकरीत्या ह्मटलें ह्मणजे तिचें मत तिच्या भावाला अनुकूल असेंच असावयाचें. आणि तसें असण्यास दुसरें एक असें कारण होतें कीं, तिनें तिचा बाप पदच्युत झाला तेव्हां त्याच्या शत्रूंस जें साहाय्य केलें होतें तें तिच्या मनाला खात होतें. तिला वाटे कीं आपलीं सर्व मुलें गेलीं यास कारण या कृत्याबद्दल ईश्वराचा आपल्यावर कोप हेंच असावें. ह्मणून जर तिला साधलें असतें तर ती कदाचित् आक्ट आफ सेटलमेंटचा कायदा फिरविण्यासदेखील तयार झाली असती. पण ती स्वभावत:च भित्र्या अंत:करणाची होती आणि तिची प्रकृति चांगली नव्हती. पण जर ती आणखी कांहीं वर्षें जगली असती, आणि शिवाय बोलिंगब्रोकसारखे टोरी मुत्सद्दी जर अधिकारारूढ असते, तर इंग्लंदच्या दृष्टीस कदाचित् तिसरा जेम्सही पडला असता.

ह्यावेळीं इंग्लंदांत व्हिग व टोरी हेच दोन मुख्य पक्ष होते. शिवाय पुष्कळ लोक असे होते कीं, ते ह्या किंवा त्या कोणत्याही पक्षास निश्चितरीतीनें मिळालेले नसून, प्रसंगानुसार वागणारे होते. आणि ह्यांखेरीज दुसरे पुष्कळच लोक असे होते कीं ते मुकाट्यानें श्रम करून उदरनिर्वाह करणारे असून त्यांना राजकारण ह्मणजे काय व राजकीय पक्ष ह्मणजे काय ह्याची मुळींच माहिती नव्हती व पर्वाहि नव्हती. व्हिग

आणि टोरी ह्या दोन पक्षांमध्यें केवळ राजकीय मतांच्यासंबंधानेंच भेद होता असें नाहीं, तर एक प्रकारचा स्वभावभेदही होता. कांहीं लोकांच्या मनाचा स्वाभाविकच कल असा असतो कीं, त्यांस राजकीय सत्तेपेक्षां राजकीय स्वातंत्र्य जास्त प्रिय असतें, आणि दुसरे कांहीं लोक असे असतात कीं, त्यांस राजाची सत्ता अगोदर कायम ठेवून मग कायतें व्यक्तीस स्वातंत्र्य द्यावयाचें असें वाटत असतें. ह्मणून सामान्यतः असें ह्मणतां येईल कीं, टोरी लोक सत्तापक्षीय होते आणि व्हिग लोक स्वातंत्र्यपक्षीय होते. ह्याच कल्पना कान्सर्व्हेटिव्ह व लिबरल ह्या दोन शब्दांनीं हल्लीं जास्त चांगल्या व्यक्त होत असतात. मात्र एवढें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं दोन शतकांपूर्वीं ह्या दोन पक्षांचीं जीं विशिष्ट मतें होतीं तींच आतां आहेत असें नाहीं. तर प्रगतीच्या प्रवाहांत ह्या दोन्हीं पक्षांची सुधारणा होत गेल्यामुळें तदनुसार त्यांचीं विशिष्ट मतें बदलत गेलेलीं आहेत. तथापि त्यांच्यांतील वर दर्शविलेला सामान्यभेद कायमच आहे, कारण तो भेद कृत्रिम नसून स्वभावजन्य आहे. असो.

असा ह्या दोन पक्षांमध्यें भेद असल्यामुळें टोरी पक्षाला राजसत्ता आणि सरकारी धर्मसंस्था कायम असावी असें वाटे; आणि व्हिग पक्षाला पार्लमेंटाचें वर्चस्व आणि एक प्रकारचें धर्मस्वातंत्र्य असावें असें वाटे. ह्या वेळापर्यंत तरी टोरी पक्षाची अशी समजूत असे कीं, राजाचा अधिकार हा देवदत्त आहे; आणि व्हिग पक्षाला ह्यावेळींदेखील असें वाटावयास लागलेलें होतें कीं, राजाची सत्ता ही प्रजादत्त आहे. तात्पर्य एका पक्षाला राजा देवानें नेमिलेला ह्मणून वाटे आणि दुसऱ्याला तो वंशपरंपरेनें आलेला असून त्याच्या अधिकाराचें मूळ लोकांची निवड असें वाटे. टोरी लोक रोमन कॅथलिकांचा जितका द्वेष करीत त्यापेक्षांही डिसेंटर लोकांचा ( सरकारी धर्मसंस्थेपासून विभक्त झालेल्या प्राटेस्टंट लोकांचा ) जास्त द्वेष करीत. अन्यपक्षीं, व्हिग लोक सरकारी धर्मसंस्था ही एक दिवाणी राज्यकारभाराची शाखा समजण्यास, आणि डिसेंटर लोकांस पूर्णपणें आणि रोमन कॅथलिकांस कांहीं अंशीं धर्मस्वातंत्र्य

देण्यास तयार होते. ह्मणूनच ॲन राणीच्या कारकीर्दींत हाय् चर्च व लो चर्च, ह्मणजे स्थापित धर्मसंस्थेचे कडक अनुयायी व नरम अनुयायी असे जे दोन तट उत्पन्न झाले, त्यांत टोरी हे पहिल्या तटाचे व व्हिग हे दुसऱ्या तटाचे सहजच अनुयायी बनले. सामान्यतः हल्लींप्रमाणेंच त्यावेळीं टोरीपक्षाचें प्राबल्य खेडेगांवांतून असे आणि व्हिग पक्षाचें शहरांतून असे. त्यावेळीं लंदनशहरांत हल्लींपेक्षां व्हिग पक्षाचें वर्चस्व जास्त असे. कारण, व्यापारी, पेढीवाले आणि धनवान लोक बहुधा व्हिगपक्षीय असत. पुष्कळ लार्ड लोक व बिशप लोक त्याच पक्षाला होते, कारण त्यांच्या नेमणुका तिसऱ्या विलियमानें केलेल्या होत्या. विश्वविद्यालयांमध्यें टोरीपक्षाचें प्राबल्य आक्सफर्ड येथें होतें आणि व्हिगांचें केंब्रिज येथें होतें.

तथापि प्रस्तुत समयीं कोणताहि पक्ष आपलीं मतें अगदीं कडेलोटास नेण्यास तयार नव्हता. १६८८ च्या महाक्रांतीनंतर राज्यकारभाराला जी सामान्य शिस्त लागलेली होती ती दोघांनाहि स्थूल मानानें पसंत होती. आतां टोरी पक्षांत असे कांहीं लोक होतेच कीं, जे जेम्सचें घराणें पुनः गादीवर बसावें ह्मणून पाहिजे तें करण्यास तयार झाले असते. त्यांस जाकोबाईट असें ह्मणत. आणि ते पुढें सरसावते तर बरेच धिम्मे टोरीदेखील कदाचित् त्यांस मिळाले असते; पण सध्या तरी हानोव्हरचें घराणें ॲनमागून राज्याधिरूढ होण्यास ह्मणण्यासारखा अडथळा करण्याइतकें सामर्थ्य त्यांच्या ठायीं नव्हतें.

इकडे व्हिग पक्षाची सरशी होण्यासारखीं ह्या वेळीं त्यांजपाशीं साधनें होतीं. स्टुअर्ट घराण्यांतील राजांनीं कायद्याविरुद्ध व स्थापित धर्माविरुद्ध जें वर्तन केलेलें होतें, त्यावरून इंग्लिश लोकांची सामान्यतः अशी खात्री झालेली होती कीं, व्हिग लोकांचीं धर्मविषयक व राजविषयक स्वातंत्र्यासंबंधानें जीं दोन तीन तत्वें आहेत तीं बरोबर आहेत. ह्मणून बहुपक्ष त्यांच्या बाजूचा होता. असें होतें तरी कारभार आपल्या हातीं रहावा ह्मणून लांच देण्यास, आंतून खटपटी करण्यास, मोह पाडण्यास

आणि भीति घालण्यास ते कमी करीत नसत. तात्पर्य, राष्ट्राच्याच कामासाठीं खरा, पण ते गर्ह्य साधनांचा उपयोग करण्यास तयार होते.
शिवाय, ह्या वेळीं हे दोन पक्ष एकमेकांचा द्वेष अगदीं मनापासून करीत. हल्लीं असें आहे कीं, ह्या दोन पक्षांच्या लोकांमध्यें राजकारणासंबंधानें काय तो मतभेद आहे. पण एरवीं ते एकमेकांशीं स्नेहसंबंधानें रहाण्यास कमी करीत नाहींत. त्यावेळीं तशी स्थिति नसे, तर ह्या दोन पक्षांचे लोक एकमेकांचा खासगी द्वेषहि करीत. त्यामुळें संधि साधल्यास ते एकमेकांस तुरुंगांत पाठविण्यास किंवा स्वर्गास पाठविण्यासहि तयार असत. ह्याचें एक कारण तेव्हांची वेळच तशी होती. घटकेमध्यें माणूस मुख्य प्रधान होत असे किंवा मोठा गुन्हेगार होत असे. ह्यानंतर लवकरच बोलिंग्ब्रोक हद्दपार झाला, आणि वालपोल मुख्य प्रधान झाला; पण कदाचित् कांहीं आकस्मिक गोष्ट घडून ह्याच्या उलटदेखील स्थिति झाली असती.

ह्यावेळीं इंग्लिश लोकांचे डोळे मुख्यत्वेंकरून दोन माणसांवर लागलेले होते. एक डयूक आफ मार्लबरो आणि दुसरा लार्ड बोलिंग्ब्रोक. मार्लबरो हा त्या वेळचा अत्यंत मोठा शिपाई होता. ॲन राणी जेव्हां त्याचा हुद्दा काढून घेऊन त्यास छळण्यास उद्युक्त झाली, तेव्हां त्यानें विदेशगमन केलें होतें; पण ह्यावेळीं तो व्हिगपक्षीय पुढाऱ्यांच्या निमंत्रणावरून हानोव्हरच्या घराण्यास मदत करण्यासाठीं इंग्लंदास यावयास निघालेला होता. तो देखणा, शूर व बुद्धिवान् असा असून प्रारंभापासून त्याला पुढें आणणारे त्याचे मित्र होते. पहिल्यापासून तो दुसऱ्या जेम्सच्या वाड्यांत लागलेला होता. त्याच्यावर जेम्सनें पुष्कळ मेहेरबानी केलेली होती आणि त्यास मोठ्या पदास चढविलेलें होतें. तरी जेम्सवर प्रसंग आला तेव्हां त्यानें त्यास सोडून दिलें आणि तो विलियमास जाऊन मिळाला. तरी आंतून त्याची विलियमाविरुद्ध खटपट चाललीच होती. तात्पर्य, तो विश्वासघातकी होता, दुसरा एक मोठा दुर्गुण त्याजमध्यें असा होता कीं, तो अत्यंत द्रव्यलोभी होता; आणि

ॲनच्या कारकीर्दींत 'वॉर आफ स्पॅनिश सक्सेशन' नामक युद्धांत त्यानें एवढी कीर्ति मिळविल्यावर तो जो अधिकारच्युत झाला, त्यास कारण हा त्याचा द्रव्यलोभच झालेला होता.

लार्ड बोलिंग्ब्रोक हाहि मार्लबरोप्रमाणेंच एका दृष्टीनें मोठा माणूस होता. ह्यावेळीं जरी त्याला नुक्तें ३६ वें वर्ष लागलेलें होतें, तरी आधींच त्यानें पुष्कळ दिवसपर्यंत निरनिराळीं कामें करून त्यांत नांव मिळविलेलें होतें. पण अशा रीतीनें त्याच्या कारकीर्दीस अल्पवयांतच प्रारंभ झालेला असल्यामुळें, आतां अल्पवयांतच तिचा शेवट होण्याची वेळ आलेली होती. तो हल्लीं इंग्लंदचा मुख्य प्रधान असून त्याचा पूर्वींचा साथीदार व प्रतिस्पर्धी जो अर्ल आफ ऑक्सफर्ड त्याला त्यानें अधिकारच्युत केलें होतें. त्याच्या अंगीं बुद्धि, सौंदर्य, विद्वत्ता आणि सदभिरुचि हे गुण होते. कामन्ससभेमध्यें तो पहिल्या प्रतीचा वक्ता होता व त्याच्या बाह्य चालीरीतीहि चांगल्या होत्या; पण एका मोठ्या गोष्टीची त्याच्या ठायीं अगदीं वाण होती. ती कोणती ह्मणाल तर त्याच्या सार्वजनिक वर्तनांत आणखी खाजगी वर्तनांत नीतीचा लवलेशही नसे. शिवाय याबद्दल त्याला लाजहि वाटत नसे, तर उलट तो त्याचा मोठा दिमाख करी. एकादी सुंदर स्त्री दृष्टीस पडल्यास तो मोठ्या महत्वाचेंदेखील राजकीय काम एकीकडे ठेवून तिच्या नादीं लागावयाचा. हीच गोष्ट त्याच्या नाशास अखेरीस कारण झाली.

वर आह्मीं ज्या अर्ल आफ आक्सफर्डचा उल्लेख केला, त्याचें सरदार होण्याच्या पूर्वींचें नांव हार्ले असें होतें; लार्ड बोलिंग्ब्रोकचें पूर्वींचें नांव सेंट जॉन् असें होतें. हार्ले हा बेताचाच बुद्धिवान् होता, आणि बोलिंग्ब्रोकप्रमाणें जरी तो दुराचारी होता तरी तो त्याबद्दल शेखी मिरवीत नसे; तर तो चोरून दुराचरण करी. त्याला खरें बोलणें ह्मणजे कायतें ठाऊकच नसे. बाकी हा दोष त्यावेळीं बहुतेक सर्वच मुत्सद्यामध्यें असे. प्रधानांनीं पार्लमेंटास फसविणें किंवा परराष्ट्राच्या वकी-

ह्मांस इंग्लंदच्या वकीलांनीं फसविणें ह्याचें कोणांसच कांहीं वाटत नसे. खुद्द तिसरा विलियमदेखील खोटें बोलण्यास कमी करीत नसे. मार्लबरो जितके वेळां त्याच्याशीं खोटें बोलला असेल तितके वेळां तो बहुधा त्याच्याशीं खोटें बोललेला होता. हार्ले हा १६८९त पार्लमेंटांत शिरलेला असून १७००त कॉमन्स सभेचा स्पीकर झालेला होता. १७०४त तो मुख्य स्टेटसेक्रेटरी बनला. स्पीकर असलेला माणूस हल्लीं असला हुद्दा क्वचित् पत्करितो. पण तेव्हां असें होत असे. हें काम त्यानें १७०८त सोडिलें, आणि नंतर लवकरच टोरीपक्षाचा तो अग्रणी बनला. नंतर त्यानें सरासरी दोन वर्षांत व्हिग प्रधानमंडळास पदच्युत केलें आणि स्वतः मुख्य प्रधान बनला. पण पुढें वर सांगितल्याप्रमाणें त्यास हुसकून बोलिंग्ब्रोकनें त्याची जागा पटकाविली होती.

ह्याच्यापेक्षां पंधरा वर्षांनीं लहान असा एक दुसरा माणूस ह्यावेळीं हळू हळू पण खात्रीनें पुढें येत होता. ईटन येथील प्रसिद्ध शाळेंत तो बोलिंग्ब्रोकचा सहाध्यायी असून त्याचें नांव रॉबर्ट वालपोल असें होतें. ज्याप्रमाणें बोलिंग्ब्रोक हा पार्लमेंटीय वावदूकांमध्यें पहिला आणि अत्यंत हुषार माणूस होता, त्याप्रमाणें वालपोल हा कॉमन्स सभेंतून वर चढून पुढें मुख्य प्रधान झालेल्या मुत्सद्यांपैकीं पहिला होता. तात्पर्य पदवीनें आणि प्राबल्यानें तो पील आणि ग्लॅडस्टन ह्यांचा पूर्वगामी होता. वर्तन आणि विद्या ह्या गोष्टींत त्यांजमध्यें आणि ह्याच्यामध्यें जमीनअस्मानाचें अंतर होतें. तिसऱ्या विलियमच्या मरणाच्या पूर्वी दोनच वर्षें तो पार्लमेंटांत शिरलेला होता. त्याच वर्षीं त्याचें लग्न झालेलें असून त्याचा बापही त्याच वर्षीं मरून तो त्याच्या इस्टेटीचा मालक झाला. यावेळीं त्यास नुकतें २४वें वर्ष लागलेलें होतें. ह्या सुमारास लार्डच्या सभेचें वर्चस्व कमी व्हावयास लागून कामन्स सभेचें वाढावयास लागलेलें होतें. ह्मणजे प्रधानांनीं कामन्स सभेंतील बहुमताप्रमाणें वागण्यास तयार झालें पाहिजे अशी स्थिति येत चालली होती. ह्या स्थित्यंतरास दुसरा चार्लस गादीवर आला तेव्हांच जरा जरा सुरवात झाली होती. १७०८त वालपोल

युद्धखात्याचा सेक्रेटरी झाला त्यावेळींच हा उत्तम कामगार, हुषार वावदूक आणि मोठा युक्तिवान् माणूस ह्मणून त्याची प्रसिद्धि झालेली होती. यावेळीं तो कॉमन्स सभेचा अग्रणीहि झाला. ह्या सुमारास डा. साशीव्हरेल नामक एका धर्मोपदेशकावर लार्डांपुढें चाललेल्या खटल्यांत ह्यानें पुढारीपण घेतलें होतें; आणि त्यामध्यें व्हिग प्रधानांना अपेश आल्यामुळें त्यांजबरोबर तोहि अधिकारच्युत झालेला होता. त्यास हार्लेनें टोरीमंडळांत प्रधान होण्याविषयीं विचारलें, पण तें त्यानें नाकारिलें. पुढें त्यांनीं त्याजवर युद्धखात्याचा सेक्रेटरी असतां पैशाची अफरातफर केल्याचा आरोप आणून १७१२त कामन्स सभेंतून त्यास हांकलून लावून तुरुंगांत पाठविलें होतें. नंतर त्या सेशनाच्या अखेरीस त्यास सोडून दिलें होतें; आणि आतां ॲन राणी मृत्युपंथास लागली तेव्हां नव्या घराण्याचा एक आधारस्तंभ ह्मणून लोकांचे डोळे त्याजकडे लागलेले होते.

जोनॅथान स्विफ्ट हा जरी केवळ धर्माध्यक्ष असून ग्रंथकारच होता, तरी त्याचीहि गणना ह्यावेळच्या राजकारणी पुरुषांमध्यें करणें जरूर दिसतें. त्यानें टोरीपक्षाची आपल्या राजकीय प्यांफ्लेटांनीं किंवा चुरचुरीत छोट्या लेखांनीं आजपर्यंत बरीच सेवा केली होती व पुढेंहि तो करणार होता. त्यास हल्लीं ४७वें वर्ष लागलेलें असून तो आयर्लंदांतील सेंट प्यॅट्रिक नामक धर्मसंस्थेचा डीन किंवा मुख्य अधिकारी होता. "गलिव्हर्स ट्राव्हल्स" हा त्याचा प्रसिद्ध ग्रंथ अद्यापि व्हावयाचाच होता. बोलिंग्ब्रोक व हार्ले यांचें बिनसलें तेव्हां त्यांचें पुनः जुळवण्याची खटपट यानें केलेली होती; पण ती फुकट गेली. त्याची लेखणी फार तिखट असून त्याचें श्लेषयुक्त लिहिणें फार चुरचुरीत असे. त्याचें ह्या इतिहासांत पुनः नांव यावयाचेंच आहे. ही केवळ प्रस्तावना होय.

टोरी पक्षाकडे जसा स्विफ्ट तसा व्हिगपक्षाकडे ॲडिसन हा ग्रंथकार राजकारणांत पडलेला होता. त्यानें केवळ राजकीय लेखच

लिहिलेले होते असें नाहीं, तर मोठमोठ्या हुद्यांचींहि कामें केलेलीं होतीं. बरेच वेळां आयर्लंदाच्या लार्ड लेफ्टेनंटचा तो सेक्रेटरी झालेला होता आणि पहिल्या जार्जानें इंग्लंदास येण्यापूर्वीं राज्यकारभार पाहण्यासाठीं जे कमिशनर नेमिले होते त्यांचाहि तो सेक्रेटरी होता. तो ह्यावेळीं पार्लमेंताचा सभासद असून अंडर सेक्रेटरी आफ् स्टेट झालेला होता व पुढें लवकरच मुख्य स्टेटसेक्रेटरींपैकीं एक होणार होता. त्याच्या स्पेक्टेटर नामक प्रसिद्ध निबंधमालेचा शेवटचा अंक १७१४च्या शेवटीं प्रसिद्ध झालेला होता. तात्पर्य, ह्यावेळीं ग्रंथकारांस मोठमोठीं राजकीय हुद्यांचीं कामें मिळत असत. असो.

वर सांगितल्याप्रमाणें हार्लेला हुसकून जेव्हां बोलिंग्ब्रोक मुख्य प्रधान झाला, तेव्हां तो स्टुअर्ट घराण्यास परत गादी मिळावी ह्मणून मसलती करूं लागला. तो जाकोबाइट लोकांना मोठमोठ्या हुद्यांवर नेमूं लागला; आणि ड्यूक आफ् आर्मंड यास त्यानें ' सिंक पोर्टस ' नामक इंग्लंदच्या दक्षिण किनाऱ्यावरील पांच मुख्य बंदरांचे वार्डन किंवा मुख्य अधिकारी नेमिलें; अशासाठीं कीं, जेम्स स्टुअर्टनें गादीसाठीं इंग्लंदवर हल्ला करण्याचें मनांत आणिल्यास त्यास साहाय्य करणारा माणूस तेथें असावा. तद्वत्च अर्ल आफ् मार नामक एक जेम्साचा स्नेही होता त्यास त्यानें स्काटलंदचा लार्ड लेफ्टेनंट नेमिलें होतें. त्यांतही त्याचा उद्देश हाच असावा. कारण स्टुअर्ट हे मूळचे स्काटलंदचे राजे असल्यामुळें तेथेंहि त्यांच्या वतीनें व हॅनोवर घराण्याच्या विरुद्ध बंड होण्याचा संभव होता.

अशी तयारी चालली होती तरी स्टुअर्ट घराणें यावें एतदर्थ तो आपलें सर्वस्व खर्च करण्यास तयार नव्हता. तसें असतें तर कदाचित् तें घराणें परत आलेंहि असतें. इकडे व्हिग मुत्सद्दी हॅनोवर घराणें राज्यावर यावें ह्मणून ज्यारीनें खटपट करीत होते. आणि योग्य वेळीं योग्य गोष्ट करण्यास त्यांची तयारी होती. ती गोष्ट त्यांनीं पुढील रीतीनें घडवून आणिली. तारीख ३० जुलई सन १७१४ रोजीं राणी एकदम फार

आजारी पडली. त्या दिवशीं केन्सिग्टन नांवच्या राजवाड्यांत प्रिव्हि-कौन्सिलची सभा भरावयाची होती. हल्लींप्रमाणें तेव्हांहि त्या सभेस ज्या कौन्सिलरांस मुद्दाम निमंत्रण येईल त्यांनींच जावयाचें असें होतें. त्यावेळीं ही सभा ह्मणजे हल्लींच्या क्यॅबिनेटच्या सभेसारखीच असे. ह्मणजे तिला मुख्य मुख्य कौन्सिलरांना निमंत्रण असे. तथापि अनिमंत्रित कौन्सिलरनें तीस जाऊं नये असाहि कायद्याचा प्रतिबंध नसे. यावेळीं टोरी अधिकारारूढ असल्यामुळें बोलिंग्ब्रोक, ड्यूक आफ आर्मंड, ड्यूक आफ श्रूस्बेरी वगैरे टोरी प्रधान हजर होते. पैकीं पहिले दोघे हे जाकोबाइट असून तिसरा हॅनोवर घराण्याला अनुकूल असा होता. पूर्वी व्हिग पक्षाला असून १७१०त टोरीपक्षास जरी तो मिळालेला होता, तथापि स्टुअर्ट घराण्याला तो अनुकूल होण्याचा मुळींच संभव नव्हता. तो फार प्रामाणिक आणि शहाणा मुत्सद्दी होता.

कौन्सिलच्या कामास सुरवात होण्यापूर्वींच दरवाजा उघडला आणि पहातात तों ड्यूक आफ आर्गाइल आणि ड्यूक आफ सामरसेट हे सभागृहामध्यें शिरले. ड्यूक आफ आर्गाइल हा शिपाई, मुत्सद्दी, वक्ता, चतुर आणि आपमतलबी असून स्काटलंदच्या व्हिगांचा तो अग्रणी होता. ड्यूक आफ सामरसेट हा प्रामाणिक, स्वाभिमानी आणि भपका करणारा असा असून तो इंग्लंदच्या व्हिगांचा पुढारी होता ह्या दोघा आगंतुकांनीं ( कारण तेथें हजर असलेल्या बहुतेकांस ते तसेच वाटले असावे ) येऊन असें बोलून दाखविलें कीं, राणीची स्थिति ऐकून आह्मीं आपण न बोलावतांच आपल्यास सल्ला व मदत देण्याकरितां आलों आहों. ड्यूक आफ सामरसेट हा फार मोठ्या पदवीचा पण मोठा गर्विष्ठ माणूस असे. त्याला अक्कल बेताचीच असे; पण तो फार प्रामाणिक असल्यामुळें या प्रसंगाला ठीक होता. ड्यूक आफ आर्गाइलनें वॉर आफ स्पॅनिश-सक्सेशन ह्या युद्धांत नांव मिळविलें असून तो आपल्या वक्तृत्वानें लार्डांच्या सभेस दणाणून टाकीत असे. पण तो अत्यंत आपस्वार्थी असून स्वार्थासाठीं पाहिजे तें करण्यास तयार असे.

हे दोन सरदार शिरलेले पाहून तेथील मंडळी अर्थात् चकित झाली. याचा परिणाम काय होणार हें त्यांच्या लक्ष्यांत एकदम आलें नाहीं. इतक्यांत ड्युक आफ श्रुस्बरीनें उठून असें ह्मटलें ह्मणून ह्मणतात कीं, तुह्मीं आला याबद्दल आह्मीं तुमचे आभारी आहों. आह्मीं तुमची सल्ला-मसलत घेण्यास तयार आहों. त्याप्रमाणें ते कौन्सिलांत येऊन बसले. तेव्हां बोलिंग्ब्रोक आणि आर्मंड यांच्या तोंडचें पाणी पळालें. त्यांना वाटलें कीं, आतां आपला इष्ट हेतु साधण्याचा संभव मुळींच नाहीं; तेव्हां आपण त्या गांवचेच नाहीं असें दाखवावें हें बरें. नंतर सामर-सेट व आर्गाइल यांनीं राणीच्या प्रकृतीच्यासंबंधानें डाक्टरचें मत माग-वून व तें वाचून असें सुचविलें कीं, डचूक आफ श्रुस्बरी यास लार्ड हाय ट्रेझरर नेमण्याविषयीं राणीकडे शिफारस करावी. यास बोलिंग्ब्रोकला आक्षेप घेववेना. तेव्हां त्याप्रमाणें श्रुस्बरी व दुसरे कांहीं सरदार राणी-कडे गेले आणि तिनें त्यांची त्या हुद्यावर नेमणूक पसंत केली, व त्यास आपल्या अधिकाराचा उपयोग लोककल्याणार्थ करण्याची आज्ञा केली.

हल्लीं हा अधिकार एकापेक्षां अधिक प्रधानांमध्यें वांटून दिलेला असतो व त्यांमध्यें फर्स्ट लार्ड आफ धि ट्रेझरी आणि चॅन्सलर आफ धि एक्चिकर हे मुख्य असतात. हल्लीं फर्स्ट लार्ड आफ धि ट्रेझरी हा बहुधा मुख्यप्रधान असतो; ह्मणून तेव्हांचा लार्ड हाय ट्रेझरर हा बहुतेक त्याच दर्जाचा प्रधान असे. तात्पर्य, श्रुस्बरी हा आतां मुख्य प्रधान झाला आणि त्यामुळें प्रॉटेस्टंट राजा गादीवर खचीत येणार अशी खात्री उत्पन्न झाली.

कोणी ह्मणतात श्रुस्बरीचें नांव सुचविलें तें नव्या आगंतुकांनीं नव्हे तर बोलिंग्ब्रोकनेंच होय. हीहि गोष्ट असंभवनीय नाहीं. आपली आतांपर्यंतची मसलत फसली असें पाहून, साधेल तेवढें साधून घ्यावें असा विचार करून बोलिंग्ब्रोकनें तसें केलें असेल.

तें कसेंहि असो, श्रुस्बरीच्या नेमणुकीनें जाकोबाइट राजा येण्याची भीति नाहींशी झाली यांत बिलकुल शंका नाहीं. व्हिग मुत्सद्यांनीं

लंदनच्या आसपास असणाऱ्या सर्व मुत्सद्यांस निमंत्रण केलें आणि त्याच दिवशीं संध्याकाळीं प्रिव्हिकौन्सिलची पुनः सभा भरविली. तीस वृद्ध व्हिग मुत्सद्दी अर्ल आफ सोमर्स हाहि हजर होता. लंदनांत व आसपास लष्कर आणून ठेवावें, ह्मणून कौन्सिलनें हुकूम सोडिला. जाकोबाइट लोक गडबड करावयास लागल्यास त्यांस टावरमध्यें अडकवून टाकण्याची तयारी केली. इकडे मार्लबरो मागें सांगितल्याप्रमाणें इंग्लंदला येण्यास निघालाच होता. तात्पर्य, जार्जाची इंग्लंदचा राजा ह्मणून द्वाही फिरविण्यास राणी मरण्याचीच कायती फुरसत होती.

राणीनें बिचारीनें फार विलंब लाविला नाहीं. ती आगस्ट १ सन १७१४ रोजीं मरण पावली. तेव्हां लागलाच जार्जाच्या नांवाचा जाहिरनामा लागला. हा पाहून बोलिंग्ब्रोकनें व्हिग लोकांना हाणून पाडण्याची नवीच शक्कल काढली. ती अशी कीं, तेच लोक जेम्सला आणण्याविषयीं खटपट करीत आहेत अशी कंडी पिकविली. तात्पर्य, जेम्सचा पक्ष सोडून नव्या राजाकडून स्वहित करून घेण्याचें त्यानें आतां मनांत आणिलें. एक माणूस मात्र जेम्सच्या वतीनें अद्यापि खटपट करण्यास तयार होता. तो कोण ह्मणाल तर राचेस्टरचा बोलका बिशप आटरबरी हा होय. तो बोलिंग्ब्रोककडे गेला, आणि लंदनांत चेरिंगक्रास येथें जेम्सच्या नांवानें द्वाही फिरविण्याचा त्यानें त्यास आग्रह केला. पण अर्थात् आपस्वार्थी बोलिंग्ब्रोकनें त्याचें बिलकुल ऐकिलें नाहीं.

नंतर पार्लमेंट भरलें आणि तारीख ९ आगष्ट रोजीं कामन्स-सभेच्या सभासदांस लार्डाच्या सभेपुढें हजर राहण्याची आज्ञा झाली. तेव्हां लार्ड चॅन्सलर सामर्स ह्यानें दोन्ही सभांस असें कळविलें कीं, जार्जानें नेमिलेल्या कौन्सिलानें तो आपला कायदेशीर राजा होय ह्मणून त्याच्या नांवची द्वाही फिरविली आहे. नंतर मग नव्या राजाकडे राजनिष्ठाप्रदर्शक मानपत्रें पाठविण्याचें ठरविलें आणि कामन्स सभेनें ॲन

राणीस खाजगी खर्चाकरितां जें उत्पन्न लावून दिलेलें होतें, तेंच जार्जाला देण्याचा ठराव केला. ज्या लार्ड चान्सलरानें वरील संभाषण केलें, त्याचा पूर्वेतिहास जरा चमत्कारिक आहे. त्याचें नांव लार्ड हार्कोर्ट हें असून तो टोरीपक्षीय होता. शिवाय तो मनांतून पूर्ण जाकोबाइट असावा. असें असून तोहि आतां जार्जाच्या वतीनें वरील भाषण करण्यास कबूल झाला.

यावेळीं लार्डांच्या सभेंत २७० सभासद असून कामन्स सभेंत ५५८ होते. पैकीं इंग्लंदांतील ५१३ असून बाकीचे ४५ स्कातलंदांतील होते. ते अर्थात् नुक्त्याच ( १७०७त ) पास झालेल्या आक्ट आफ स्कॉटिश युनियन नामक कायद्याच्या अनुरोधानें नेमिलेले होते. आयर्लंदांत यावेळीं स्वतंत्र पार्लमेंट होतें, त्यामुळें तेथले सभासद इकडे मुळींच येत नसत.

ड्यूक आफ मार्लबरो राणी मेली त्याच दिवशीं लंदन येथें येऊन पोहोंचला. लोकांनीं फार उत्साहानें त्याचें आगतस्वागत केलें. पण जार्जानें आपण येईपर्यंत राज्यकारभार चालविण्यासाठीं जे कारभारी नेमिले होते, त्यांमध्यें त्याचें नांव नव्हतें. त्यांत श्रुस्बरी, सामरसेट व आर्गाइल हे ड्यूक, आणि कौपर, हॅलिफाक्स व टौनशेंड हे लार्ड, यांचीं नांवें होतीं. पण मार्लबरो किंवा त्याचा जांवई लार्ड संडर्लंड किंवा वृद्धकपि लार्ड सोमर्स यांचीं नांवें त्यांत बिलकुल नव्हतीं. तथापि पुढें जेव्हां जार्ज इंग्लंदास आला तेव्हां त्यानें ह्या तिघांसही आपल्या मर्जींत घेतलें आणि मार्लबरोला त्याचे पूर्वीचे सर्व हुद्दे पुनः परत दिले; तथापि त्यानें आतां पूर्वीप्रमाणें प्रस्थ चालावयाचें नाहीं असेंही राजानें त्याच्या लक्ष्यांत आणून दिलें.

ता. ५ आगस्ट रोजीं, ह्मणजे राणी मेल्यावर ४ दिवसांनीं, हॅनोवर येथें नवीन नेमिलेला इंग्लिशांचा वकील लार्ड क्लारेंडन हा इंग्लंडच्या नवीन राजास ॲन राणीच्या मृत्यूची वार्ता कळविण्यास गेला. राजास ती ऐकून वाईट वाटल्याचें किंवा आपण राजा झाल्याबद्दल आनंद

झाल्याचें त्याच्या चेहऱ्यावर कांहीं एक चिन्ह दिसलें नाहीं. त्यानें इंग्लंदास निघण्याबद्दलहि घाई केली नाहीं. हॅनोवर येथें राहतां येईल तितके दिवस तो राहिला; आणि तारीख ३१ आगस्ट रोजीं निघून रस्त्यांत विश्रांति घेत घेत ता. १८ सप्टंबर रोजीं ग्रीनीच येथें येऊन पोहोंचला. लंदनला आल्यानंतर त्याची जो जो भेटेल त्याच्याशीं अशी कुरकुर चालली होती कीं, मला आपला देश सोडल्याद्दल कितीतरी वाईट वाटत आहे, आणि इंग्लंद, तेथील लोक व त्यांच्या रीतीभाती ह्या मला कितीतरी नावडतात? सुदैवाची गोष्ट अशी होती कीं, जार्जाला यावेळीं भेटावयास फारच थोडे लोक येत होते. त्याला स्वतः इंग्लिश येत नव्हतें व त्याला भेटावयास जाणारांना जर्मन येत नसे. बरें, त्याच्या कांहीं प्रधानांना फ्रेंचहि येत नव्हतें. सर राबर्ट वालवोल त्याच्याशीं ल्याटिन भाषेंत बोलण्याचीच खटपट करी. जार्जाला पोट फुटेपर्यंत खाण्याची व पिण्याची फार हौस असे. तो वालपोलकडे वरचेवर जेवावयास जाई. तेथें इतकी दारू पिई कीं, डचेस आफ केंडाललादेखील त्याची भिति वाटे व ती त्यास आवरावयासही जाई, आणि त्याबद्दल तिला जर्मन-मध्यें चांगल्या शिव्या मिळत. तात्पर्य, नव्या राजामध्यें रूपाच्या-संबंधानें किंवा गुणांच्यासंबंधानें किंवा रीतीभातीच्यासंबंधानें लोकांचें चित्त वेधेल असें कांहीं नव्हतें. असें असूनही लोकांनीं त्यास मुका-ट्यांनीं राजा मानून कसें घेतलें, ह्याचें प्रथमदर्शनीं मोठें आश्चर्य वाटतें. पण याचें कारण स्टुअर्ट घराण्यांतील राजांचें विलक्षण वर्तन होय. त्या राजांच्या बेकायदेशीर वागण्यास, प्राटेस्टंट धर्म उलटून पाडण्याच्या खटपटीस आणि आपण देवाकडचे राजे आहों अशा दिमाखास, लोक इतके कंटाळले होते कीं, त्यांस धर्मांत व राज्यकारभारांत फारसा हात घालणार नाहीं आणि प्रजेच्या कामांत ढवळाढवळ करणार नाहीं, असा राजा पाहिजे होता; मग तो कोणीही असो आणि कसाही असो. असा राजा त्यांस जार्जाच्या ठिकाणीं सांपडला; ह्मणून ते त्यास मुकाट्यांनीं कबूल झाले. तात्पर्य, इंग्रजाच्या राजनिष्ठेस ह्यावेळीं अंमळ निराळें स्वरूप आलेलें होतें. राजा ह्मटला ह्मणजे तो आपला

वरील देव, त्याच्यासाठीं जीवदेखील द्यावयास तयार व्हावयाचें ही मनोवृत्ति जाऊन, राजा ह्मणजे आपल्या सोईकरितां आपणच उभारिलेलें बाहुलें होय, तेव्हां त्यास योग्य तो मान दिला पाहिजे, त्याच्याशीं योग्य अदबीनें वागलें पाहिजे, अशी मनोवृत्ति उत्पन्न झालेली होती. पहिल्या प्रकारची मनोवृत्ति अद्यापि कांहीं लोकांमध्यें स्टुअर्ट घराण्यांतील पुरुषांसंबंधानें होती, पण हॅनोवरच्या घराण्यांत व्हिक्टोरिया राणीच्या कारकीर्दीपर्यंत तसली मनोवृत्ति उत्पन्न झाल्याचें चिन्ह दिसत नाहीं. व्हिक्टोरिया राणीबद्दल मात्र तशी बुद्धि इंग्लिश लोकांत निःसंशय जागृत झालेली होती व आलीकडे आलीकडे ती फारच वृद्धिंगत झालेली होती.

---

# प्रकरण दुसरें

## जेम्स स्टुअर्ट याचें बंड.

जार्ज राजा गादीवर बसल्यावर टोरी लोकांस खुश करण्याची खटपट त्यानें मुळींच केली नाहीं. टोरी लोकांमध्यें कांहीं असे होते कीं, त्यांना स्टुअर्ट घराणें पुनः गादीवर यावयास पाहिजे होतें; आणि ज्यांचा असा आग्रह नव्हता त्यांच्यांत फारसें पाणी नव्हतें. ह्मणून तो त्यांच्या नादास लागलाच नाहीं. बरें, व्हिग लोकांना प्रधान नेमण्याचा जरी त्यानें निश्चय केला तरी ते जुन्या वजनदार घराण्यांपैकीं नेमावयाचे नाहींत असेंहि त्यानें ठरविलें; तर नुक्तेच उदयास येऊं लागणारे जे होतकरू व्हिग त्यांचें त्यानें आपलें क्यॅबिनेट बनविलें. तात्पर्य, या गोष्टींत त्यानें आपल्या सामान्य अक्कलेचा उपयोग चांगला केला. हें व्यावहारिक ज्ञान हॅनोवर घराण्यांतल्या सगळ्याच माणसांमध्यें दृष्टीस पडतें.

युट्रेच्टच्या तहानें टोरी पक्षांची लोकांत फार नाचक्की झाली होती. कारण ज्या उद्देशानें वॉर आफ् स्पॅनिश सक्सेशन हें युद्ध सुरू केलें होतें तो उद्देश या तहानें मुळींच साध्य झाला नव्हता. त्या युद्धाचा उद्देश असा होता कीं, फ्रान्सांत राज्य करणारें जें बोर्बोन घराणें त्यांतील पुरुषांस स्पेनच्या गादीवर बसूं देऊं नये; अशासाठीं कीं, तसें झाल्यास कदाचित् त्या दोन राज्यांचा पुढें मागें एकच राजा होऊन तो यूरोपांतील इतर राष्ट्रांस भारी होऊन बसेल. तथापि या तहानें हें अनिष्ट कांहीं टळलें नाहीं. कारण चवदाव्या लुईचा नातू फिलिप स्पेनच्या गादीवर तसाच राहिला. शिवाय हा तह इंग्लिश लोकांस न आवडण्याचें कारण असें झालें कीं, त्यानें फ्रेंच राजा जो चवदावा लुई त्याचें नुकसान मुळींच झालें नाहीं. तें त्यांस व्हावयास पाहिजे होतें. कारण दुसरा जेम्स मेल्यावर त्याचा मुलगा जो जेम्स स्टुअर्ट त्यास आपण इंग्लंदचा खरा राजा सम-

जतो असें लुईनें जाहीर केलें होतें, आणि तें तर इंग्लिशांस मुळींच नको होतें. शिवाय टोरी प्रधानांनीं हा तह कसा तरी करण्यासाठीं मार्लबरोस कसें तरी हुसकून लावावें एतदर्थ राणीशीं मिसेस मेशाम नामक एका बाईच्या द्वारा खटपट केली होती, ह्याचाहि लोकांस विशेष राग आला होता. कारण मार्लबरोनें या युद्धांत अनेक मोठमोठाले जय मिळविल्यामुळें तो अत्यंत लोकप्रिय झालेला होता. त्याच्यावर असा आरोप आणिला कीं, ह्यानें फौजेला पावांचा पुरवठा करणाऱ्या कंत्राटदाराकडून बक्षीसें घेतलीं आहेत, आणि परदेशाच्या सैन्याला जो पगार इंग्लंद देत होतें, त्यापैकीं शेंकडा अडीच टक्के ह्यानें कापून घेतले आहेत. ह्यावर मार्लबरोचें असें ह्मणणें पडलें कीं, हें मी सर्व लष्करी अम्मलदारांच्या मामूल वहिवाटीस अनुसरूनच केलें आहे आणि त्या पैशाचा विनियोग सरकारचीं गुप्त रीतीनें कामें करणारांस पगार देण्याच्या कामीं केला आहे. हल्लीं असलें उत्तर कोणी कधीं देणार नाहीं व कोणी कबूलहि करणार नाहीं हें खरें आहे; पण त्यावेळच्या एकंदर चालीरीतीस अनुलक्षून पहातां तें फारसें गैर होतें असें नाहीं. तथापि या आरोपावरून त्याचे सर्व अधिकार ॲन राणीनें काढून घेतले आणि त्यास हद्दपार केलें, हें मागें सांगितलेंच आहे. ही गोष्ट इंग्लिश लोकांस बिलकुल खपली नाहीं. शिवाय टोरींनीं दुसरी एक अशी गोष्ट केली होती कीं, कामन्स सभेप्रमाणें लार्डांच्या सभेंत ह्या तहाला अनुकूल असें मताधिक्य व्हावें आणि व्हिग सरदारांचा न्यूनपक्ष व्हावा एतदर्थ राणीकडून नवे बारा टोरी सरदार त्यांनीं बनविले होते ही गोष्ट राजकीय दृष्ट्या फार महत्वाची होती. कारण तेणेंकरून लार्डांच्या सभेस कामन्स सभेच्याविरुद्ध जातां येत नाहीं असें ठरल्यासारखें झालें होतें; पण हीहि गोष्ट इंग्लिश लोकांस रुचली नाहीं; आणि अशा रीतीनें टोरी प्रधान लोकांमध्यें अगदीं अप्रिय होऊन गेले होते. ह्या सर्व गोष्टी ध्यानांत आणतां जार्ज राजानें केलें तें योग्यच केलें असें ह्मणावें लागतें.

त्यानें लार्ड टौनशेंड यास मुख्य सेक्रेटरी आफ् स्टेट नेमिलें. तेणेंकरून तो मुख्य प्रधानासारखाच झाला. कारण ड्यूक आफ्

श्रूस्बरीनें आपल्या जाग्याचा राजीनामा दिला होता. जेम्स स्टानूहोप यास दुय्यम सेक्रेटरी नेमिलें. वालपोल यास यावेळीं पेमास्टर जनरल ह्या खालच्या प्रतीच्याच हुद्यावर नेमिलें, व त्यास क्यॅबिनेटांत बसण्याचा अधिकार नव्हता. पण पुढें लवकरच तो आपल्या हुशारीमुळें वर चढला. श्रूस्बरीनें राजीनामा दिल्यामुळें लार्ड संडर्लंड यास आयर्लंदचा व्हाइसराय नेमिलें, आणि त्याची लार्ड हाय ट्रेझररची जी जागा ती एका इसमासच न देतां तिचीं कामें अनेक प्रधानांमध्यें वांटून दिलीं. प्रधानमंडलांत वालपोलच्याशिवाय पुढें फार प्रसिद्धीस आलेला माणूस ह्मटला ह्मणजे पुलटेनी हा होता. तो यावेळीं अगदीं तरुण होता; त्यास नुक्तें ३२ वें वर्ष लागलेलें होतें. तो व्हिग घराण्यापैकीं असून त्या पक्षाचा हुशार व धीट प्रतिपादक ह्मणून कामन्स सभेंत त्याची ह्याच्या अगोदरच प्रसिद्धि झालेली होती. लार्ड कौपर यास पुनः लार्ड चान्सलर नेमिलें. ह्या हुद्यावर अॅन राणीच्या वेळीं तो पूर्वीं होताच, आणि त्या नात्यानें साशीव्हेरेलच्या खटल्याच्या वेळीं त्यानें अध्यक्षस्थान स्वीकारिलेलें होतें. ड्यूक आफ् आर्गाइल यास स्काटलंदचा कमान्डर इन् चीफ नेमिलें. आयर्लंदांत सर कान्स्टन्टाइन फिप्स यास तो जाकोबाइट आहे असा संशय आल्यावरून चान्सलरच्या हुद्यावरून काढून टाकिलें; पण चमत्कार असा कीं, त्याला आक्सफर्ड युनिव्हर्सिटीनें नंतर थोड्याच दिवसांनीं एक सन्मानाची पदवी देण्याचें बहुतेकांशीं ऐकमत्यानें ठरविलें. यावरून त्यावेळची युनिव्हर्सिट्यांची स्थिति कशी होती याचें अल्प निदर्शन होतें.

मुख्य प्रधान लार्ड टौनशेंड हा कांहीं विलक्षण सामर्थ्याचा मुत्सद्दी होता असें नाहीं. तो सामान्य प्रतीचा अधिकारी होता. मुत्सद्दीपणाचा धंदा शिकावयास त्यावेळीं ज्या गोष्टी कराव्या लागत त्या त्यानें केलेल्या होत्या; ह्मणजे तो परराष्ट्रांकडे वकील या नात्यानें गेलेला असून येथें त्यानें तह केलेले होते. तो वालपोलचा मेव्हणा होय. ह्यावेळीं त्यांचें बरें होतें; पण पुढें बिघडलें. त्या प्रसंगीं

टौनशेंड यानें फार धिमेपणाचें, सहनशीलतेचें आणि मोठेपणाचें वर्तन केलें. तो प्रामाणिक आणि सभ्य माणूस असून, बोलण्यांत स्पष्ट आणि सामान्य बुद्धिमत्तेचा असा होता.

दुय्यम सेक्रेटरी जेम्स स्टानूहोप, जो पुढें अर्ल स्टानहोप बनला, तो फार निराळ्या प्रतीचा माणूस होता. त्यानें सैन्यामध्यें नांव मिळविलें असून स्पेन व फ्लँडर्स या देशांत त्यानें जय मिळविलेले होते. शिवाय तो मोठा विद्वान् माणूस होता. पण आपण ह्मणूं तसेंच झालें पाहिजे अशा मनाचा तो माणूस होता, ह्मणजे तो गर्विष्ट आणि स्पष्टवक्ता असा होता. तथापि त्याच्यामध्यें एक मोठा गुण हा होता कीं, त्याला द्रव्य-लोभ नसे. हा गुण त्यावेळीं जरा दुर्लभच असे.

यावेळीं एक नवें प्रिव्हिकौन्सिल नेमण्यांत आलें. त्यांत मार्लबरोची नेमणूक झाली. पण त्याशिवाय त्यास प्रधानमंडळांत दुसरा कोणताच हुद्दा दिला नाहीं. तेव्हां ही पोकळ पदवी आपण स्वीकारूं नये असें त्याच्या बायकोनें त्यास सांगितलें, पण तें त्यानें ऐकिलें नाहीं. त्याचा त्याला पुढें पश्चात्ताप झाला. बोलिंग्ब्रोक आणि आक्सफर्ड यांची यापेक्षांहि जास्त मानखंडना झाली. बोलिंग्ब्रोकला त्याच्या सेक्रेटरी आफ स्टेटच्या हुद्या-वरून काढावें असा हुकूम राजानें इंग्लंदास येऊन पोहोंचण्याच्या अगो-दरच सोडिला होता. आक्सफर्डला तर राजाची भेट घेण्याचीहि मारा-मार पडली. आधीं राजा त्यास भेटेना व पुढें भेटला तेव्हां त्याच्याशीं एकहि शब्द बोलेना. आतां त्यांचें प्रत्यक्ष संभाषण होण्याचा संभवच नव्हता हें खरें आहे; कारण राजास इंग्रजी येत नव्हतें आणि यास जर्मन येत नव्हतें. तथापि दुभाष्याच्या द्वाराहि त्यांचें भाषण झालें नाहीं.

फ्रान्सच्या राजाला लढाईचा कंटाळा आला असल्यामुळें त्यानें जार्जास इंग्लंडचा राजा ह्मणून मुकाट्यानें कबूल केलें. राजास राज्या-भिषेक ता० २० आक्टोबर १७१४ रोजीं झाला. त्यावेळीं आक्सफर्ड व बोलिंग्ब्रोक हे दोघेही हजर होते. पूर्वदिवशीं पाऊस पडत होता ह्मणून जाकोबाईटलोक अशी प्रार्थना करीत होते ह्मणून ह्मणतात कीं, असाच

पाऊस पडो आणि राज्याभिषेक समारंभास विघ्न येवो. परंतु तसें कांहीं झालें नाहीं.

नंतर लवकरच प्रस्तुत पार्लमेंट बरखास्त करण्याबद्दल व नवें बोलावण्याबद्दल सरकारानें जाहिरनामा काढिला. नव्या निवडणुकींत व्हिग पक्षास फारच जबरदस्त बहुमत मिळालें. राजा पार्लमेंट उघडण्यास स्वतः आला. मात्र त्याचें भाषण त्याच्या चान्सलरनें वाचिलें, कारण त्यास इंग्रजी येत नव्हतें. त्यांत त्यानें असें बोलून दाखविलें कीं, आपला उद्देश, धर्म व कायदा शाबूत ठेवावयाचे असा आहे. नंतर राजास द्यावयाच्या मानपत्राचा जो मसुदा लार्डांच्या सभेपुढें आला त्यांत असे शब्द घातले होते कीं " ह्या राष्ट्राची अब्रू परत मिळविणें " ह्या शब्दांना बोलिंग्ब्रोकनें आक्षेप घेतला, हें त्याचे पार्लमेंट सभेंतील शेवटचें भाषण होतें. तो ह्मणाला राजास असें सांगणें ह्मणजे ॲनराणीच्या राज्यास दोष देणें आहे; करितां, " ह्या राष्ट्राची अब्रू कायम राखणें " असे शब्द मानपत्रांत घालावे. ही त्याची उपसूचना ३३ला ६६ या बहुमतानें नापसंत झाली.

कामन्स सभेंत मानपत्राचा मसुदा वालपोलनें पुढें आणिला. त्याच्यांत ह्याच्यापेक्षांही जास्त स्पष्ट शब्द होते. कारण त्यांत जेम्स स्टुअर्टनें लोकांस बंडास प्रवृत्त करण्याची खटपट केली होती असें ह्मटलें असून शिवाय असें ह्मटलें होतें कीं, गत कारकीर्दीतील ज्या कृतींवरून अशी खटपट करण्याची त्यास उमेद आली, त्या कृतींची व त्या करणारांची चवकशी करणें हें आमचें ( कामन्स सभेचें ) कर्तव्य आहे. यावरून गतप्रधानांची चवकशी करण्याचें प्रस्तुत प्रधानांचे मनांत आहे असें स्पष्ट झालें. नंतर जो वादविवाद झाला, त्यांत हा प्रधानांचा उद्देश स्टानहोपनें जास्त स्पष्टपणेंच बोलून दाखविला. इतकें झालें तरी बोलिंग्ब्रोकनें निदान बाह्यतः तरी घाबरल्यासारखें मुळींच दाखविलें नाहीं. तो नाटकांना जात होता व संभाषणें करीत होता, आणि प्रधानकीची दगदग गेल्यामुळें आपण सध्यां सुखी आहों अशी शेखी मिरवीत होता.

पण तो पुढें लवकरच एका नोकराचें सोंग घेऊन लंदनांतून पळाला आणि डोव्हर येथें सुखरूप पोंहोचून तेथून क्यॅलेस व तेथून पारीसास गेला आणि जेम्स स्टुअर्ट यास जाऊन मिळाला.

बोलिंग्ब्रोकच्या ह्या पळापळीस मार्लबरो कारण झाला असें दिसतें. बोलिंग्ब्रोकनें ह्या प्रसंगीं त्यास जुन्या स्नेहाची आठवण देऊन काय करूं ह्मणून विचारिलें. तेव्हां मार्लबरोनें त्यास अंतस्थ ह्मणून अशी बातमी सांगितली कीं, तुला फांशी देण्याचें प्रधानांनीं ठरविलें आहे; तेव्हां तूं पळशील तर जगशील. ह्मणून बोलिंग्ब्रोक अशा घाईनें पळाला आणि त्यानें आपल्यावर संशय ओढून घेतला. अशा रीतीनें मार्लबरोनें त्याच्यावर सूड उगवून घेतला. तें कसेंहि असो; पण बोलिंग्ब्रोकच्या ह्या पळण्यानें त्याच्या साथीदारांवर जास्त संकट ओढवलें.

नंतर प्रधानांनीं गतप्रधानांच्या कारस्थानाची चवकशी करण्यासाठीं २१ जणांची एक गुप्त कमिटी नेमिली. त्या कमिटींत अर्थात् सर्व जण व्हिगपक्षीय असून त्यांचा अध्यक्ष वालपोल होता. प्रथम टोरी लोकांस असें वाटलें कीं, या कमिटीपासून कांहींएक निष्पन्न व्हावयाचें नाहीं; पण ही त्यांची चूक त्यांच्या लवकरच लक्ष्यांत आली. कारण तारीख ९ जून १७१५ रोजीं वालपोलनें कामन्स सभेंत उठून असें सांगितलें कीं, मला कमिटीचा रिपोर्ट आपल्यापुढें ठेवावयाचा आहे; पण तसें करण्यापूर्वीं मी कांहीं जणांचीं नांवें वाचीन त्यांस पकडण्याकरितां वारंटें सोडावीं व सभेंतून कोणास बाहेर जाऊं देऊं नये. त्याप्रमाणें बंदोबस्त केल्यावर वालपोलनें प्रायर व हार्ले यांचीं नांवें घेतलीं. तेव्हां त्यांस लागलेंच पकडिलें. पैकीं प्रायर हा कवि असून बोलिंग्ब्रोकचा स्नेही होता. त्याचें युट्रेच्टच्या तहांत अंग असून त्याला त्या कामांत वकील ही पदवी दिलेली होती. तो पारीस येथून नुक्ताच आला होता. हार्ले हा लार्ड आक्सफर्डचा नातेवाईक असून त्याचा त्या तहाशीं गुप्त संबंध होता.

नंतर वालपोलनें कमिटीचा रिपोर्ट वाचला. तो अध्यक्ष या नात्यानें त्यानेंच लिहिला होता. त्यांत युट्रेच्टचा तह करण्याच्या कामीं टोरी प्रधानांनीं नीच साधनांचा उपयोग केला होता हें व्यक्त केलें असून, जेम्स स्टुअर्टशीं त्यांचें कारस्थान चाललें होतें असें मानण्यास काय आधार आहे हेंहि दाखविलें होतें. तथापि ह्या सर्व पुराव्यावरून बोलिंग्ब्रोक व त्याचे साथीदार अपराधी ठरावे अशा प्रकारचा नव्हता. ह्मणून तो ऐकून बोलिंग्ब्रोकनें पळून जाण्यांत मोठी चूक केली असें त्याच्या मित्रांस सहजच वाटलें असावें.

नंतर बोलिंग्ब्रोक, आर्मंड, आक्सफर्ड वगैरे मंडळीवर राजद्रोहाचे खटले करावे, अशा प्रकारच्या सूचना वालपोल इत्यादिकांनीं कामन्स सभेपुढें आणिल्या. पैकीं बोलिंग्ब्रोक व आक्सफर्ड ह्या दोघांविरुद्ध आणिलेल्या सूचना सर्वांनुमतें पसार झाल्या; पण ह्यावरून ते दोषी ठरले असें मुळींच होत नाहीं हें उघडच आहे. आर्मंडविरुद्ध तशी सूचना पास करणें बरेंच कठीण गेलें; तथापि त्यानें फ्रान्सदेशीं पलायन केलें. तेथें तो पुढें ३० वर्षेंपर्यंत होता. बोलिंग्ब्रोक आधीं पळालेला होताच.

अशा रीतीनें दोघां मुख्य आरोपींचा निकाल लागल्यावर बाकी राहिला लार्ड आक्स्फर्ड. त्याच्यावर ता. ९ जुलई १७;९ रोजीं असलेच आरोप आणून त्यास त्याबद्दल टावरमध्यें कोंडून ठेवावें अशी सूचना आणिली. या आरोपांतहि फारसा जीव नव्हता. उदाहरणार्थ, त्याच्यावर एक आरोप असा होता कीं, १७११ सालीं युट्रेच्टचा तह पास करण्याकरितां जे १२ टोरी सरदार नवे बनविले ते बनविण्यांचा अॅन राणीस ह्यानेंच आग्रह केला, व हें त्याचें करणें अगदीं गैर होतें. त्यानें एकंदर आरोपांच्यासंबंधानें असा जबाब दिला कीं, प्रधान या नात्यानें जें कांहीं मी केलें तें राणीच्या हुकमावरून केलें. त्यानें उलटून सभेस असें विचारिलें कीं, राजाच्या प्रत्यक्ष हुकमावरून केलेल्या कृत्यांबद्दल प्रधानांस जर अशा रीतीनें तुह्मी जबाबदार धरूं लागलां तर मग काय होणार नाहीं! अशा रीतीनें

शिक्षा करितां येईल. हल्लीं असा आरोप इंग्लिश प्रधानांवर कोणी सहसा आणणार नाहीं आणि आणल्यास त्यावर असा जबाब कोणी प्रधान सहसा द्यावयाचा नाहीं. असो. तथापि त्याच्या विरुद्ध सूचना पास झालीच आणि त्यास टावरमध्यें पाठविलें. तेथें तो बरींच वर्षें तसाच राहिला. नंतर त्यानें आपली चवकशी व्हावी ह्मणून अर्ज केल्यावरून त्याची लार्डांच्या सभेपुढें चवकशी होऊन तो दोषमुक्त झाला. नंतर त्यानें आपलें आयुष्य पुस्तकांमध्यें घालविलें. तो १७२४त मरण पावला. तेव्हां त्यास वय तीं ६३ वर्षें झालीं होतीं.

बोलिंग्ब्रोकनें फ्रान्सांत गेल्यावर जेम्स स्टुअर्टची नोकरी एकदम पत्करिली नाहीं. कांहीं वेळ तो काय करावें ह्याच विचारांत होता. पण इंग्लंदला परत जाण्यांत कांहींच फायदा नाहीं असें पाहून शेवटीं तो त्याच्या गळ्यांत पडला व त्याचा सेक्रेटरी आफ स्टेट बनला. त्याच्यासारख्या विलक्षण बुद्धीच्या आणि महात्वाकांक्षेच्या माणसास अशा ह्या बुद्धिबळांतील राजाचा प्रधान होणें कसेसेंच वाटलें असेल. मोठमोठीं वक्तृत्वानें भरलेलीं भाषणें करावीं आणि टाळ्यांवर टाळ्या घ्याव्या ही त्याला हौस, तेव्हां त्यास येथें कोंडल्यासारखेंच झालें असावें. शिवाय ह्या सुमारास असें झालें कीं, फ्रान्सचा चवदावा लुई जो प्रसिद्धपणें नाहीं तरी चोरून जेम्स यास मदत करण्यास तयार होता, तोहि या सुमारास निवर्तला. त्याच्या मागून राज्यकारभार पहाणारा जो ड्यूक आफ आर्लीन्स त्यानें जेम्सचा पक्ष पडता आहे असें पाहून त्यास मदत करण्याचें नाकारिलें. तेव्हां बोलिंग्ब्रोकची अगदींच गाळण उडाली. अशा प्रतिकूल वेळींच जेम्सनें इंग्लंदवर स्वारी करण्याचें मनांत आणिलें. ही खटपट त्यास करावयाचीच होती तर अमळ आधीं ह्मणजे ॲन राणी मरावयास टेंकली तेव्हां किंवा अमळ मागून ह्मणजे आणखी कांहीं वर्षांनीं करावयास पाहिजे होती. ही खटपट यशस्वी होण्यास तीन गोष्टी व्हावयास पाहिजे होत्या. एक, जेम्सनें स्काटलंडवर स्वारी करावी; दुसरी, त्याचवेळीं ड्यूक

आफ आर्मंडनें इंग्लंडच्या नैऋत्य भागावर हल्ला करावा, कारण तेथील लोकमत जेम्स यास अनुकूल होतें; आणि तिसरी गोष्ट ही कीं, फ्रान्सानें ह्या कामीं द्रव्य, माणसें आणि हत्यारें यांची मदत करावी. पण यापैकीं दुसऱ्या दोन गोष्टी यावेळीं मुळींच अनुकूल नव्हत्या. कारण फ्रान्साचें तंत्र कसें बिघडलें होतें तें वर सांगितलेंच; आणि ड्यूक आफ आर्मंड हा फ्रान्सांत पळून गेला होता हेंही मागें सांगितलेंच. तेव्हां हें पाहून बोलिंग्ब्रोकनें स्काटलंदांतील जेम्सचा स्नेही जो अर्ल आफ मार त्यास सध्या गडबड करूं नको ह्मणून ताबडतोब कळविलें. पण तो आधींच उठला होता. जेम्सनेंहि आपल्या नशीबाची परीक्षा पहाण्याचाच निश्चय केला. त्यानें बोलिंग्ब्रोकास ह्मटलें कीं, दिवसेंदिवस आपल्या अडचणी वाढत आहेत, सहा महिन्यांपूर्वी स्थिति होती ती आज नाहीं, आणि पुढें कदाचित् आणखी जास्तच वाईट स्थिति होईल तेव्हां आतांच कायतें करून पाहवें. ह्मणून ता. २८ आक्टोबर १७१५ रोजीं वेष बदलून तो निघाला आणि आर्मंड हा नार्मंडीच्या किनाऱ्यावरून निघून इंग्लंदाच्या दक्षिणेस डेव्हनशायर प्रांतांत उतरला. तेथें पाहतो तों बंडाची तयारी त्यास दिसेना. कारण पारीसमध्यें चाललेले यांचे सर्व बेत इंग्लंदमध्यें पारीसमधील इंग्लिशांचा वकील लार्ड स्टेअर याच्याकडून सरकारास ताबडतोब समजत होते. तेव्हां त्यांनीं चांगला बंदोबस्त केला होता. ह्मणून आर्मंड परतला आणि जेम्स ह्यास ब्रिटनीमध्यें गांठून त्यास त्यानें सर्व वर्तमान सांगितलें. तरी तो डंकर्क येथून थोड्याशा बंदुका व पांच सहा अनुयायी यांसह एक लहानशा जहाजांत बसून स्काटलंदकडे निघालाच.

याच्या पूर्वी इंग्लंदांत पुष्कळ ठिकाणीं त्याच्या बतीनें लोकमताचें जणूं काय एकदम आविष्करण झालें होतें व त्यास कांहीं ठिकाणीं दंग्याचेंहि स्वरूप आलें होतें. १० जून हा जो त्याचा जन्म दिवस त्यानिमित्त पुष्कळ ठिकाणीं उत्साह झालेले होते आणि पुष्कळ ठिकाणीं त्यानिमित्त ज्यांनीं दीपोत्साह करण्याचें नाकारिलें,

त्यांच्या घरांच्या खिडक्यांचीं तावदानें फुटलीं होतीं. खुद्द लंदनांत देखील तिसऱ्या विलियमाचे पुतळे करून जाळले होते व तसेंच दुसऱ्या पुष्कळ शहरींहि केलें होतें. ही लोकांच्या मनोवृत्तींची उचल जेम्सच्या वतीनें एका वेळीं इतकी मोठी झाली होती कीं, हाइडपार्कमध्यें बरीच फौज गोळा करून ठेवणें हें बरें असें प्रधानमंडळास वाटलें होतें.

इकडे स्काटलंदांत वर सांगितल्याप्रमाणें दंगा सुरू झालाच होता. तेथें अर्ल आफ मार यानें जेम्सच्या वतीनें शस्त्र उचललें होतें. हा अर्ल फार शूर व बराच हुशार असा माणूस होता. त्यानें ॲन राणीच्या कारकीर्दींत मोठ्या हुद्यांचीं बरींच कामें केलीं होतीं. जार्ज राजानें त्याचा संशय घेऊन त्यास काढून टाकिलें होतें व ह्मणून तो जेम्सच्या पक्षास मिळाला होता.

स्काटलंदच्या पहाडी प्रदेशांतील लोकांस त्यानें ब्रीमार या गांवीं जमा केलें. त्यांच्या साहाय्यानें त्यानें इन्व्हर्नेस हा किल्ला घेतला आणि जेम्सच्या नांवाची द्वाही कित्येक ठिकाणीं फिरली. नंतर त्यानें पर्थ शहर घेतलें. मारचें सैन्य दिवसेंदिवस वाढूं लागलें. प्रथम त्याच्यापाशीं कायतीं मूठभर माणसें होतीं. त्यांची आतां एक लहानशी फौजच बनली आणि अशा रीतीनें टे नदीच्या उत्तरेकडील स्काटलंद प्रदेश त्यानें काबीज करून घेतला.

हें पाहून ड्यूक आफ आर्गाइल यास सरकारी फौजेचा मुख्य नेमिलें; आणि तो १७१५ च्या सप्टंबरच्या १९ तारखेच्या सुमारास स्कॉटलंदांत जाऊन पोंहोचला. तो स्टर्लिंग येथें गेला आणि तेथें कसेबसे १५०० लोक त्यानें गोळा केले; पण त्यास यश येईलसें दिसेना. ग्लासगो, डंफ्रीस वगैरे शहरें शत्रूंच्या हातीं जातात कीं काय, अशी भीति उत्पन्न झाली. स्टर्लिंग येथें खुद्द आर्गाइल हाच वेढला जाण्याचाहि संभव उत्पन्न झाला; पण स्टुअर्टच्या दुर्दैवानें मार यास मोहिनी पडल्यासारखें झालें. त्यानें यावेळीं इंग्लंदावर स्वारी केली असती तरीहि बहुधा

साधलें असतें. कारण तेथें सरकारापाशीं सैन्य फार थोडें होतें; पण तो दिरंगाई करूं लागला आणि कांकूं करूं लागला; आणि जसजसा एकेक दिवस जास्त जाईल तसतसें आर्गाइलचें सैन्य व इंग्लंदांतील सैन्य हीं वाढूं लागलीं. शेवटीं आर्गाइलनें त्याजवर शेरिफ म्यूर येथें हल्ला केला. तेथें सांगण्यासारखा जय कोणत्याच पक्षास मिळाला नाहीं. आर्गाइलचे लोक कदाचित् जास्त मेले. पण त्यानें मारच्या फौजेच्या पुष्कळ बंदुका व निशाणें काबीज करून घेतलीं.

या लढाईनंतर जेम्स स्टुअर्ट स्काटलंदांत येऊन दाखल झाला. पण त्याच्या येण्यानें तेथील लोकांची हुरूप मुळींच वाढली नाहीं. जेम्सचा चेहरा नेहमीं उदास व निराश असा दिसे. शिवाय तो स्वतः जरी धीट होता तरी त्याच्या अंगीं निश्चय नव्हता. त्याच्या तोंडांतून शब्द निघण्याचीदेखील मारामार पडे. तेव्हां अशा माणसाकडे पाहून लोकांस हुरूप कशी यावी ? बरें, त्याला मंत्री भेटले तेहि त्यांतलेच. ते प्रत्येक काम दिरंगाईवर टाकूं लागले. शेवटीं स्काटलंदांतील ते मावळे लोक उतावीळ होऊं लागले. त्यांच्यांतील एका टोळीच्या मुख्यानें असेंदेखील सुचविलें ह्मणतात कीं, ह्याला ह्या मंत्र्यांपासून दूर काढून, लढाईस तयार अशा शूर माणसांत नेऊन सोडा. तसेंच हा राजपुत्र जर समरांगणांत मरण्यास तयार असेल तर याच्याबरोबर मरण्यास दहा हजार लोक स्काटलंदांत तयार आहेत.

इकडे आर्गाइलहि लढण्यास उतावीळ झालेला नव्हता. शेवटीं त्यास तसें करण्याविषयीं इंग्लंदांतून निखालस हुकूम आला. तें समजतांच जेम्सचे मंत्री यांनीं पिच्छेहाट करण्याचा निश्चय केला. तो दिवस ३० जानेवारी १७१६ हा होता. हा दिवस स्टुअर्ट घराण्यास अशुभ होता. कारण १६४९ च्या ३० जानेवारीस पहिला चार्लस यास फांशीं दिलें होतें. त्या दिवशीं ते पर्थ शहराहून परतले व तेव्हांच त्यांच्या एकंदर साहसाची घडी बिघडली. जेम्स फ्रान्सांत परत निघून गेला.

त्याचे अनुयायी तेथच्या तेथें विरघळले. नार्थम्बर्लंड प्रांतांतील कांहीं रोमन क्यॅथलिक लोक दंगा करून उठले. मार्सच्या सैन्यापैकीं कांहीं लोक त्यांच्या मदतीस येत होते त्यांस जाऊन मिळण्याचा त्यांनीं यत्न केला. पण त्यांचा प्रेस्टन येथें पराभव होऊन त्यांस सरकारच्या स्वाधीन व्हावें लागलें. जेम्स स्टुअर्ट ता. ८ फेब्रुवारीला फ्रान्सच्या किनाऱ्यावर सुखरूप उतरला. त्याच्या ह्या एकंदर स्वारीत त्याचे पुरे सहा आठवडेहि खर्च झाले नव्हते.

तो फ्रान्सांत सेंट जर्मेन्स येथील आपल्या वाड्यांत पोहोंचल्यानंतर दुसरे दिवशीं त्याला बोलिंग्ब्रोक येऊन भेटला. त्यानें त्यास या भानगडींत पडूं नको ह्मणून अगोदरच सांगितलें होतें; पण जेम्सनें तें ऐकिलें नव्हतें. तथापि त्यानें यावेळेस त्यास योग्य तो सल्ला दिलाच. त्यानें त्यास असें सुचविलें कीं, तूं आतां फ्रान्सच्या राजाच्या मुलखांत राहूं नको, तो कदाचित् तुला जार्जाच्याहि स्वाधीन करील; करितां येथून तूं लारेन प्रांतांत निघून जा. जेम्सनें हा त्याचा उपदेश मनःपूर्वक स्वीकारण्याचा आव घातला व तेथून जातांना त्यानें त्याच्याशीं मोठ्या सलगीचें भाषण केलें. पण त्याचें पुनः तोंड पहावयाचें नाहीं असा त्यानें निश्चय केला होतासें दिसतें. कारण लवकरच त्यानें त्यास सेक्रेटरी आफ स्टेट या हुद्यावरून दूर केलें. तेव्हां बोलिंग्ब्रोकनें जार्जाची मर्जी सुप्रसन्न करून पुनः लंदनांत आपला प्रवेश व्हावा एतदर्थ लागलीच खटपट आरंभिली.

येथें आह्मी बोलिंग्ब्रोकचा अगदीं शेवटचा निरोप घेतों. कारण तो जरी आणखीं ४० वर्षे जगला तथापि मुत्सद्दी या नात्यानें त्याची कारकीर्द आतांच संपली असें ह्मणण्यास हरकत नाहीं. त्याच्या विलक्षण बुद्धीचा कोणत्याहि राजाच्या पदरीं प्रकाश पडण्याची संधि पुनः केव्हांच आली नाहीं. मध्यम वयांतच मोठ्या मुत्सद्याची कारकीर्द एकदम संपल्याचें अशा प्रकारचें दुसरें उदाहरण इतिहासांत क्वचितच असेल.

इकडे लंदनमध्यें व सर्व इंग्लंदभर जेम्सच्या वतीनें मोठ्या जोराची चळवळ चाललीच होती. सर्वत्र अर्थात् दोन पक्ष होते; जेम्सचे अनुयायी आणि जार्जाचे अनुयायी यांच्यामध्यें रस्त्यांतून भांडणें होत असत व त्यांत बायकांचेंहि अंग असे. ही चळवळ सुरू असतां राजा आणि त्याच्या कुटुंबांतील इतर माणसें ह्यांचें वर्तन फार धिमेपणाचें व शांतवृत्तीचें असे. तीं पाहिजे तिकडे बाहेर फिरावयास भीत नसत. एकदां मूर नांवाचा एक माणूस खुद्द प्रिन्सेस आफ वेल्स हिच्या तोंडावर थुंकला. शेपर्ड नांवाच्या एका माणसास राजाचा खून करण्याचा प्रयत्न केल्याबद्दल फाशीं दिलें. नंतर राजा जास्त सावधगिरीनें वागूं लागला.

जेम्स स्टुअर्टचें बंड मोडल्यावर बंडांत सामील असलेल्या पुष्कळजणांस पकडण्यांत आलें. त्यांत कित्येक मोठमोठे सरदारही होते. त्यांमध्यें लार्ड विड्रिंग्टन, अर्ल आफ् निथिस्डेल, अर्ल आफ् विंटन, अर्ल आफ् कार्नराथ, लार्ड केनमूर, लार्ड नेर्न आणि अर्ल आफ् डर्वेंटवाटर हे प्रमुख होते. ह्यांच्यावर लार्डांच्या सभेपुढें खटले केले व त्यांच्यापैकीं लार्ड विंटन खेरीजकरून बाकी सर्वांनीं आपला अपराध कबूल केला आणि ते जीवदान मागूं लागले. त्यांना माफी मिळावी म्हणून पुष्कळांनीं पुष्कळ प्रकारचे प्रयत्न केले. शेवटीं लार्ड नेर्न, लार्ड कार्नराथ व लार्ड विडिंग्टन यांस फांशीची शिक्षा माफ केली आणि माफीबद्दल जास्त अर्ज येऊं नयेत म्हणून बाकीच्या तिघांस लागलेंच फाशीं देण्याचें ठरविलें. पैकीं लार्ड निथिस्डेल याची त्याच्या बायकोनें मोठ्या युक्तीनें सुटका केली. प्रथम ती जार्जाकडे जाऊन त्याच्या हातापायां पडली पण त्यानें तिचें ऐकिलें नाहीं. तेव्हां तिनें तुरुंगांत जाऊन तेथें आपल्या नवऱ्यास स्त्रीचा वेष देऊन मोठ्या शिताफीनें तुरुंगाबाहेर लावून दिलें, आणि मागून ती निसटली. नंतर व्हेनिसचा वकील लंदनांत होता त्याच्या नोकरास वश करून त्याच्या गाडींतून नोकराचा पोषाख करून तो डोव्हर येथें पळाला व तेथें त्याची बायको त्यास मागून येऊन मिळाली. तेथून ती क्यॅलेस पळाली. मग बाकीच्या दोघांस फाशीं

दिलें. त्यांनीं मरतांना आपण जेम्सलाच खरा राजा ह्मगून समजतों असें धिटाईनें ह्मटलें.

नंतर असलीं बंडें पुनः होऊं नयेत असा बंदोबस्त करण्यासाठीं रोमन क्यॅथलिक लोकांविरुद्ध कडक कायदे केले. शिवाय पार्लमेंटाच्या मुदतींत फेरफार केला. यावेळीं एकदां पार्लमेंट भरलें ह्मगजे तें तीन वर्षें अस्तित्वांत असे. १६४१त असा कायदा पसार केला होता कीं, पार्लमेंट तीन वर्षांतून एकदां तरी भरावें. हा कायदा १६६४त रद्द केला होता. नंतर १६९४त वर सांगितलेला कायदा पसार झाला होता. तेणेंकरून दर तीन तीन वर्षांनीं नवें पार्लमेंट भरलेंच पाहिजे असें ठरलेलें होतें. त्याचा उद्देश असा होता कीं, सभासदांची थोड्या थोड्या अवधीनें निवड झाली ह्मणजे मतदारांस खुश ठेवण्यासाठीं ते आपलीं कामें जबाबदारी नीट ओळखून करतील. पण तसें कांहीं झालें नव्हतें. लांच वगैरे खाण्याचे प्रकार पूर्वींप्रमाणेंच जारीनें सुरू असत. तरी पण ह्यावेळीं जो ह्या कायद्यांत फेरफार केला तो निराळ्या कारणासाठींच केला. त्याचा उद्देश असा होता कीं, असल्या ह्या धामधुमीच्या प्रसंगीं प्रधानांस नव्या निवडणुकी करण्याचा प्रसंग इतक्यांत येऊं नये. ह्मणून असें ठरविलें कीं, सध्याचें पार्लमेंट व ह्यापुढील पार्लमेंटें एकदां निवडलीं ह्मणजे तीं सात वर्षेंपर्यंत अस्तित्वांत राहण्यास हरकत नाहीं; त्याच्या आधीं पार्लमेंट बरखास्त करणें ही राजाच्या व प्रधानांच्या मर्जीची गोष्ट आहे. ह्या बिलास कामन्ससभेंत शिपेन नामक सभासदानें आणि लार्डांच्या सभेंत बिशप आटर्बरी यानें, फार जोरानें विरोध केला. त्यांचें ह्मगणें सध्याच्या तीन वर्षांच्या मुदतीच्या पार्लमेंटानें आपली स्वतःची मुदत सात वर्षांची करणें अगदीं गैर आहे असें होतें. हे दोघेहि निःसीम जाकोबाइट होते. उलटपक्षीं ग्रंथकार स्टील यानें बिलाचें फार जोरानें मंडन केलें व तें शेवटीं इ०स० १७१६ पास झालें. तेंच हल्लीं आहे. मध्यें एकदां १७३४त हा कायदा फिरविण्याबद्दल खटपट झाली होती पण तीस यश आलें नाहीं.

हें बिल पास होतें न होतें इतक्यांत लार्ड सोमर्स निवर्तला. त्याला प्रस्तुत बिल पसंत होतें. त्याला कायतीं ६६ वर्षें होतीं. पण तो रोगांनीं पीडलेला होता. तो फार विद्वान्, प्रामाणिक आणि शूर असा माणूस होता. ॲडिसननें आपल्या स्पेक्टेरचे पहिले पहिले अंक त्यासच अर्पण केले होते. दुसऱ्या जेम्सच्या कारकीर्दींत ७ बिशपांवर जो खटला झाला त्यांत त्याची वकिली ह्यानेंच केलेली होती. तो पहिल्यापासून निःसीम व्हिगपक्षीय होता, आणि त्याच्या अंगीं वक्तृत्वशक्तिहि फार मोठी होती.

---

# प्रकरण तिसरें.

## कांहीं किरकोळ गोष्टी.

जार्ज राजा इंग्लंदांत येऊन कांहीं महिने लोटल्यावर, हॅनोवर येथें पुनः केव्हां जाईन असें त्यास झालें होतें. कारण त्याचें इंग्लंदपेक्षां आपल्या जन्मभूमीवर जास्त प्रेम होतें. इतके दिवस इंग्लंदच्या राजास इंग्लंद सोडण्यास कायद्याची आडकाठी असे; ह्मणून १७१६त तो कायदा रद्द करून टाकिला व नंतर जार्ज हॅनोवर येथें गेला. पण राजास निघतेवेळीं एक मोठी अडचण वाटली, ती हीं कीं, आपल्या गैरहजेरींत इंग्लंदचा राज्यकारभार आपल्या मुलाच्या हातीं देणें त्यास भाग पडलें, आणि मुलाशीं तर त्याचें विळ्याइतकें वाकडें होतें. त्याची अत्यंत द्वेषाचीं माणसें ह्मटलीं ह्मणजे त्याची राणी डोरोथिया व तिचा पक्ष घेऊन भांडणारा तिचा मुलगा प्रिन्स जार्ज. पण निरुपायास्तव त्याला त्यास ( रीजंट ) राजप्रतिनिधि नेमणें भाग पडलें; आणि तो ता. ९ जुलई रोजीं सेक्रेटरी स्टॅनहोप याच्याबरोबर जाऊन ता. १४ नोव्हेंबरला इंग्लंदास परत आला.

१७१६च्या हिंवाळ्यांत सर्व टेम्स नदी बर्फमय होऊन गेली. आणि लंदनच्या लोकांना ती एक मजाच झाली. नदीच्या पात्रावर व्यापाऱ्यांनीं सर्व प्रकारच्या जिनसांचीं दुकानें उघडिलीं. तसेंच बर्फावर काफीगृहें व उपहारगृहेंहि कांहींकांनीं सुरू केलीं. एकीकडे पाहवें तों कुस्त्यांचा आखाडा दृष्टीस पडे आणि दुसरीकडे पहावें तों सगळींच्या सगळीं जनावरें लोक भाजीत आहेत असा देखावा नजरेस येई. बर्फावरून लोक स्केट्स् किंवा लोखंडी जोडे घालून घसरत गाड्यांतून जात किंवा बोटींतूनहि जात. आणि ही सर्व मजा पाहण्यास नदीच्या दोन्ही कांठांनीं लोकांचे थवेच्या थवे जमत.

या वेळेपासून इंग्लंदचा यूरोपांतील इतर राष्ट्रांशीं वरचेवर संबंध येऊं लागला. कारण, हॅनोवरचा राजा तोच आतां इंग्लंदचा राजा झाला

होता. आणि हॅनोवर तर यूरोपच्या अगदीं मध्यभागीं आहे. यावेळीं फ्रान्स, आस्ट्रिया व स्पेन हीं तीन राष्ट्रें यूरोपांत मुख्य होतीं. रशिया नुक्तें उदयास येऊं लागलें होतें. इटाली हा केवळ भूगोलांत एक देश होता. कारण त्याचे लहान लहान तुकडे झालेले असून त्यांजवर लहान लहान राजे किंवा संस्थानिक असत; ते कधीं कधीं राजकीय कामांत पोपच्या धोरणानें वागत आणि कधीं कधीं त्यास एकीकडे गुंडाळून ठेवीत. टर्कीची सत्ता एव्हांच मोडकळीस आली होती व तो देश पुनः कधीं सांवरलाच नाहीं. व्हेनिस येथील लोकसत्ताक राज्यही याचवेळीं बुडावयास लागलें होतें.

स्पेनची स्थिति जरा चमत्कारिक होती. आज पुष्कळ वर्षें तें राष्ट्र अगदीं दुर्बल, खालावलेलें व त्यास कोणी विचारीत नाहीं असें झालेलें होतें. तेव्हां पुष्कळांस वाटलें कीं, तें व्हेनीस व टर्की यांच्याच पंथास लागणार. पण इतक्यांत एकाएकीं त्यानें वर डोकें काढिलें आणि तें सगळ्या यूरोपची शांतता भग्न करण्याची भीति घालूं लागलें. आणि यूरोपची शांतता मोडली कीं, इंग्लंदची मोडलीच. कारण जार्जानें निश्चय केला होता कीं, इंग्लंदापाशीं खर्चावयास पैसे आणि पाठवावयास सैन्य जोंवर आहेत, तोंपर्यंत हॅनोवरला धक्का लागूं नये ह्मणून पाहिजे तें करावयास कमी करावयाचें नाहीं.

यावेळीं फ्रान्स देशाचा कारभार एका विलक्षण माणसाच्या हातीं होता. ड्यूक आफ् आर्लीन्स हा फार दुराचारी होता खरा, पण त्याचें डोकें थंड होतें, त्याची छाती जबर होती आणि नव्या कल्पना ग्रहण करण्याची त्याच्या अंगीं विलक्षण शक्ति होती. शिवाय तो वचनाचा धड होता; त्याच्या वचनावर भरंवसा टाकितां येत असे. त्याचा मुख्य मंत्री डुबाइस आबे, जो पुढें कार्डिनल झाला व मुख्य प्रधानहि झाला, तोहि असाच विलक्षण माणूस होता. तो मूळचा फार गरीब असून त्यानें स्वतःच्याच हुशारीवर धर्मखात्यांत आणि राजकीय खात्यांत हे मोठमोठे हुद्दे मिळविले होते. ही गोष्ट

फार चमत्कारिक आहे कीं, यावेळचे यूरोपांतील तिघेहि महाराजकारणी पुरुष धर्मखात्यापैकीं होते. इंग्लंदांत स्विफ्ट, फ्रान्सांत डुबाइस आणि स्पेनांत आल्बरोनी, ज्याच्याविषयीं आह्मी जास्त उल्लेख करणार आहों. असो.

व्हिग प्रधानांनीं असें धोरण ठेविलें होतें कीं, युट्रेच्टच्या तहाच्या कलमांप्रमाणें वागून साधेल तोंपर्यंत यूरोपांत शांतता कायम ठेवावयाची. परंतु त्या तहानें केलेली व्यवस्था स्पेनदेशास फायदेशीर नव्हती. स्पेनचा नवा राजा जो फिलिप त्यानें फ्रान्सच्या गादीवर बसण्याचा आपला हक्क सोडला असून इतालींतील जे स्पेनचे प्रांत तेहि त्यानें सोडून दिले होते. त्यामुळें फ्रान्सच्या गादीवर बसण्याचा हक्क राजप्रतिनिधि जो ड्यूक आफ् आर्लीन्स, त्याच्याकडे आला होता, आणि इतालींतील स्पॅनिश प्रांत आस्ट्रियाच्या ताब्यांत गेले होते. पण ह्या दोन्ही गोष्टींबद्दल फिलिप यास आतां वाईट वाटूं लागलें होतें, आणि ते दोन्ही हक्क परत मिळावे ह्मणून त्यास हाव सुटली होती. त्याच्या अंगीं जरी मोठेंसें सामर्थ्य नव्हतें तरी त्याचा मुख्य प्रधान जो आल्बरोनी हा मोठा मुत्सद्दी असून धीटही होता. तो गरीबींत वाढलेला होता. त्याचा बाप माळी असे आणि तोहि स्वतः प्रथम एका लहानशा खेड्यांत धर्मोपदेशकाचें काम करीत होता. पण त्यानें प्रथम ड्यूक आफ् पार्मोची मर्जी संपादन करून नंतर पांचवा फिलिप यांची संपादन केली होती. त्यास फिलिपानें १७१९त आपला मुख्य प्रधान केलें आणि पोपनें कार्डिनल ही पदवी दिली. मग त्यानें स्पेनचे गेलेले प्रांत पुनः मिळविण्याकरितां खटपट आरंभिली. पण वास्तविक ह्यामध्यें चूक होती. कारण हे प्रांत देशाबाहेर असल्यामुळें त्यांच्या संरक्षणार्थ स्पेनदेशास मोठें सैन्य ठेवावें लागत असे, आणि इतर राष्ट्रांशीं वारंवार युद्धाचा प्रसंग येई. असो. गेलेले प्रांत परत मिळविण्याचा हेतु मनांत धरून त्यानें इंग्लंदशीं सख्य केलें आणि तेथील व्यापाऱ्यांस स्पेनशीं व्यापार करण्याच्या मोठ्या सवलती दिल्या.

त्यानें स्वीडनचा पराक्रमी राजा जो बारावा चार्लस त्याच्याशींही सख्य केलें होतें. आणि हा राजा टर्कींमध्यें गेला असतां डेन्मार्कनें ब्रेमेन, व्हर्डेन आणि श्लेस्विग हाल्स्टिन हे त्याचे जर्मनींतील प्रांत हिसकावून घेतले होते ही गोष्ट अर्थात् चार्लसच्या मनांत सलत होती. ह्मणून त्यानें १७१४त एकदम स्ट्रालसंड याच्यावर हल्ला केला. तेव्हां डेन्मार्कच्या राजानें घाबरून पहिले दोन प्रांत हॅनोवरचा राजा जार्ज यास देऊन त्याच्याशीं सख्य केलें. हे प्रांत हॅनोवर संस्थानास फार फायद्याचे होते. कारण तेणेंकरून त्यास समुद्राचा मार्ग खुला होत होता. असो.

आल्बेरोनीनें स्वीडनचें सख्य संपादन केल्यावर त्याच्या मदतीनें इतालींतील गेलेले प्रांत परत मिळविण्याची खटपट आरंभिली. त्यानें सार्डिनिया बेट काबीज करून घेतलें आणि सिसिलीवर हल्ला करण्याचा घाट घातला. तेव्हां यूरोपांतील इतर राष्ट्रें घाबरलीं, आणि त्यांपैकीं इंग्लंद, फ्रान्स आणि हालंद ह्या तिघांनीं एकमेकांशीं सख्य केलें. त्यांत त्यांनीं असें ठरविलें कीं, हॅनोवरचें घराणें इंग्लंदांत कायम रहावें आणि फ्रान्सचा बालराजा पंधरावा लुई मेल्यास आर्लीन्सचें घराणें फ्रान्सांत कायम रहावें, व ह्याकरितां ह्या तिघा दोस्तांनीं एकमेकांस मदत करावी. नंतर आस्ट्रियाचा बादशाहा ह्या त्रिकूटांत येऊन मिळाला आणि अशा रीतीनें हें त्रिकूटाचें चौकुट बनलें. इंग्लिशांचीं जहाजें मेसिनाच्या सामुद्रधुनींत शिरलीं आणि त्यांनीं स्पॅनिश जहाजांचा अगदीं पराभव करून टाकिला. तेव्हां आल्बेरोनीनें नवीं जहाजें तयार करून जेम्स स्टुअर्टच्या वतीनें स्काटलंदावर हल्ला करण्याची खटपट केली. पण तीस इलिझाबेथ राणीच्या वेळच्या स्पेनच्या खटपटीपेक्षां जास्त यश आलें नाहीं. त्या आरमाराचा बिस्केच्या उपसागरांत सप्पा उडाला. इकडे फ्रान्सनें स्पेनच्या उत्तर किनाऱ्यावर हल्ला केला. तेव्हां स्पेनच्या राजास आल्बेरोनास अधिकारावरून काढावें लागलें आणि फ्रान्सच्या गादीवरील व इतालींतील प्रांतांवरील आपला हक्क सोडून द्यावा लागला. इकडे १७१८च्या दिसेंबरांत स्वीडनचा पराक्रमी राजा बारावा चार्लस

नार्वेमध्यें फ्रेडरिकशालच्या वेढ्यांत अकस्मात गोळी लागून पडला, आणि अशा रीतीनें हॅनोवरचें आणि ह्मणून इंग्लंदचें दुसरें विघ्न टळलें.

इंग्लंदच्या एवढ्या ह्या घोटाळ्यांत प्रधानमंडळामध्येंही थोडासा घोंटाळा उडाला. संडर्लंद हा फार महत्वाकांक्षी माणूस होता. त्याला त्याचा सध्याचा हुद्दा पुरेसा वाटेना. ह्मणून राजा हॅनोवर येथें चालला असतां त्यानें त्याच्या मनांत असें भरवून दिलें कीं, टौनशेंड, वालपोल वगैरे मंडळी आंतून प्रिन्स आफ वेल्स यास अनुकूल आहेत; करितां आपल्या गैरहजिरींत ते कदाचित् आपल्या विरुद्ध खटपटी करितील. जार्जास हें ह्मणणें खरें वाटून त्यानें टौनशेंडचा अधिकार काढून लार्ड स्टानहोप यास दिला. तेव्हां वालपोलनें आपण होऊनच राजीनामा दिला.

१७१८च्या दिसेंबरच्या तेराव्या तारखेस प्रधानमंडळानें लार्डांच्या सभेपुढें एक बिल आणिलें. त्याचा उद्देश डिसेंटर लोकांवर ॲनच्या कारकीर्दींत घातलेलीं कांहीं बंधनें सैल करावीं व त्यांस इतर प्राटेस्टंटा प्रमाणेंच नोकरीचे वगैरे सर्व हक्क द्यावे हा होता. तेव्हां अर्थात् प्राटेस्टंट धर्मखात्यांतील बिशप, आर्चबिशप, इत्यादि अधिकाऱ्यांनीं बिलाच्या दुसऱ्या वाचनाचेवेळीं त्याचा जोरानें निषेध केला. त्यांत यार्क व क्यांटरबरीचे आर्चबिशप, आणि लंदन, ब्रिस्टल, चेस्टर वगैरे शहरांतील बिशप हजर होते. पण लिंकन, ग्लोस्टर, नॉरिच, पीटरबरो वगैरे ठिकाणच्या बिशपांनीं त्यांस अनुकूल मत प्रदर्शित केलें. शेवटीं २३ दिसेंबराला तें बिल लार्डांच्या सभेंत पास होऊन दुसरे दिवशीं कामन्स सभेकडे गेलें. तेथें वालपोलनें त्यास विरोध केला. तरी तें शेवटीं ता. १० जानेवारी १७१९ रोजीं तेथेंहि पास झालें. नंतर ता. २८ फेब्रुवारी १७१९ रोजीं पीरेज बिल नांवाचें एक नवें बिल लार्डांच्या सभेपुढें प्रधानांनीं आणिलें. त्याचा उद्देश असा होता कीं, हल्लीं देशांत जितके सरदार आहेत त्यांत सहापेक्षां जास्त सरदारांची भर घालण्याचा राजास अधिकार असूं नये. जुन्या सरदारांचा निर्वंश वगैरे होऊन तीं घराणीं बुडाल्यास त्यांच्या ऐवजीं राजानें नवे सरदार

पाहिजे तर बनवावे, पण अगदीं नवे असे सरदार सहापेक्षां जास्त बनवूं नयेत. ह्या बिलांत दुसरी एक सूचना अशी घातली होती कीं, स्काटलंदांतून हल्लीं जे सोळा निवडलेले सरदार येतात, त्यांच्या ऐवजीं २९ वंशपरंपरेचे सरदार यावे. पण हा भाग गौण होता. पहिला भाग विशेष महत्वाचा होता. राजाचे अधिकाराचें अशा रीतीनें नियंत्रण करण्याचें बाह्यतः असें कारण दाखविण्यांत येत होतें कीं, इंग्लंद व स्काटलंद एकत्र झाल्यापासून सरदारांची संख्या फार मोठी झाली आहे तेव्हां ती आणखी वाढविणें रास्त नाहीं. शिवाय या बिलाच्यासंबंधानें असें कळविण्यांत आलें होतें कीं, राजा अशा रीतीनें आपला अधिकार नियंत्रित करून घेण्यास तयार आहे. ह्याचें प्रथम पुष्कळांस आश्चर्य वाटलें, ह्मणून ते त्याबद्दल अंमळ जास्त खोल विचार करूं लागले. तेव्हां बिलाचा खरा हेतु त्यांच्या लक्ष्यांत बरोबर आला; तो असा. युट्रेच्टच्या तहास व्हिग सरदार प्रतिकूल होते आणि त्यांचा लार्डांच्या सभेंत त्यावेळीं बहुपक्ष होता. कामन्स सभेंतील बहुपक्ष तहास अनुकूल होता. तेव्हां त्या पक्षाच्या मताप्रमाणेंच लार्डांचेंहि मत तहास अनुकूल करण्यासाठीं त्यावेळीं बारा नवे सरदार ॲन राणीनें बनविले होते हें वाचकांच्या लक्ष्यांत असेलच. तेव्हां अशी गोष्ट राजास पुनः करतां येऊं नये आणि लार्डांच्या सभेचें महत्व कायम राहवें, हा ह्या बिलाचा खरा उद्देश होता. तेव्हां ह्या बिलावर लोकांत गवगवा होऊन वादविवाद माजला. त्यांत ॲडिसन ह्यानें बिलाचा पक्ष घेतला व स्टीलनें विरुद्ध पक्ष घेतला. त्यामुळें त्या सेशनांत तें बिल मागें घ्यावें लागलें; पण पुढच्या सेशनांत पुनः सभेपुढें आणून तें पास करून घेतलें.

नंतर जेव्हां तें कामन्स सभेपुढें आलें तेव्हां त्यास जोराचा विरोध झाला. त्यांत वालपोलचें प्रमुख अंग होतें. तेथें असा प्रश्न निघाला कीं, एकादें बिल जर लोकांस पसंत असून कामन्स सभेनें पास केलें व नंतर लार्डांच्या सभेनें तें नापसंत केलें, तर त्या ठिकाणीं लोकांच्या

हातीं काय उपाय राहणार? त्यांनीं बंड करावें हाच राहणार. कारण नवे सरदार बनवून लोकमताला अनुकूल असें लार्डांचें मत कर- ण्याचा जो राजाचा अधिकार तो ह्या बिलानें निघून जाणार आणि अशा रीतीनें लार्डांची सभा तिनें मनांत आणिल्यास सर्व राष्ट्र आणि राजा ह्या दोघांसहि एकीकडे गुंडाळून ठेवणार. असा ह्या बिलाचा परिणाम होण्याचा संभव असल्यामुळें तें त्या सभेंत मोठ्या बहुमतानें नापसंत झालें.

१७२०च्या मार्चांत दुसरें एक बिल पास झालें. त्याचा उद्देश आयर्लंदांतील लार्डांच्या सभेला त्या देशांतील कोर्टांचे निकालांत हात घालण्याचा अधिकार नाहीं असें ठरविण्याचा होता. हा कायदा कर- ण्यास असें कारण झालें होतें कीं, शार्लाक आणि आनस्ले ह्या दोघांमध्यें कांहीं मालमत्तेच्यासंबंधानें वाद पडून आयर्लंदांतील कोर्ट आफ एक्स्चि- करनें प्रतिवादीच्या तर्फे निकाल दिला होता. त्यावर वादीनें आयर्लंदांतील लार्डांच्या सभेकडे अपील केलें. त्यांत त्या सभेनें वादीला अनुकूल असा निकाल दिला. तेव्हां प्रतिवादीनें इंग्लंदांतील लार्डांच्या सभेकडे अपील केलें. त्यांनीं कोर्ट आफ एक्स्चिकरनें दिलेला निकाल बरोबर ठरवून प्रतिवादीस तंट्यांतील मालमत्ता मिळावी ह्मणून ठराव केला. पण आयर्लंदांतील लार्डांची सभा आपलेंच ह्मणणें धरून बसली. तेव्हां ह्या वादाचा निकाल करण्यासाठीं वरील बिल पास केलें. तेणेंकरून त्या सभेला अगदीं गौण स्वरूप आलें. वास्तविक पाहिलें तर ह्यापासून आयरिश लोकांस वाईट वाटण्याचें कांहीं एक कारण नव्हतें. कारण आयर्लंदांतलें पार्लमेंत इंग्लंदच्या पार्लमेंताप्रमाणेंच केवळ प्राटेस्टंट लोकांचेंच होतें. त्यांत क्यॅथलिक लोकांना प्रवेश मुळींच नव्हता. तरी केवळ आयरिश पार्लमेंत ह्या नांवावरूनच आयरिश लोकांना ह्मणजे क्यॅथलिक धर्माच्या आयरिश प्रजेला त्या पार्लमेंताबद्दल एकप्रकारचा अभिमान वाटत असे. ह्मणूनच त्यांस ह्या कायद्याचें वाईट वाटलें.

ह्या सुमारास बरेच मोठमोठे लोक निवर्तले. ड्यूक आफ श्रूस्बरी ता० १७ फेब्रुवारी १७१७ रोजीं निवर्तला. पेन्सिलव्हेनिया नामक

अमेरिकेंतील एका प्रसिद्ध वसाहतीचा स्थापक विलियम पेन हा १७१८त निवर्तला. ॲडिसन १७ जून १७१९ रोजीं निवर्तला, तेव्हां त्याचें वय फारसें झालेलें नव्हतें.

यावेळीं इंग्लंदची आंतील व बाहेरील एकंदर स्थिति सामान्यतः बरी दिसत होती. इंग्लंदच्या विरुद्ध झालेले सर्व तट मोडून गेले होते आणि जेम्स स्टुअर्टच्या वतीनेंहि कट व्हावयाचें बंद झालें होतें. इंग्लंद आणि फ्रान्स या दोन राष्ट्रांमध्यें झालेल्या सख्यावरून जेम्सची शेवटची आशा तुटलेली दिसत होती. त्यास आतां फ्रान्सांत थारा नाहींसा झाला होता.

इकडे खुद्द इंग्लंदांतहि एकंदर स्थिति बरी होती. वालपोल, प्रिन्स आफ वेल्सची मर्जी जास्त जास्त संपादन करीत होता, आणि तो आतां त्याचा मुख्य मंत्री बनला होता. त्याच्या सल्ल्यानें प्रिन्स राजास शरण गेला आणि स्टॅनहोपच्या सल्ल्यानें राजानें ती गोष्ट मान्य केली. नंतर वालपोल पुनः राज्यकारभारांत जाऊन मिळाला व पुनः तो सैन्याचा पेमास्टरच झाला. हा हुद्दा लहान असल्यामुळें त्यास क्याबिनेटांत बसण्याचा अधिकार नव्हता. पण त्याला माहीत होतें कीं, आपण लवकरच पुढें येऊं. टौनशेंडहि पुनः प्रधानमंडळांत आला व त्यास प्रेसिडेंट आफ कौन्सिल हा अधिकार दिला. अशा रीतीनें घरीं व बाहेर तंटे मिटलेले दिसूं लागले. यूरोपांतील कोणत्याही राष्ट्राशीं इंग्लंदचें भांडण नव्हतें, आणि स्टुअर्ट घराण्याचीहि भीति नाहींशी झालेली दिसत होती. प्रधानांचीं आपसांतील भांडणें मिटलीं होतीं, आणि राजाचें व त्याच्या मुलाचें जें फार दिवसांचें भांडण तेंहि मिटल्यासारखें दिसत होतें. तेव्हां देशांत शांतता राहून भरभराट होणार असें सहज कोणाहि इंग्रजास वाटलें असतें. पण राष्ट्रांच्या इतिहासांत बहुधा असें दिसून येतें कीं, जेव्हां अगदीं शांतता झाली ह्मणून भास होतो, तेव्हां पुढें लवकरच होणाऱ्या मोठ्या वादळाची ती बहुधा सूचना असते.

---

# प्रकरण चवथें.

## सौथ-सी-बबल.

जॉन लॉ नांवाचा एक स्कॉच गृहस्थ पुष्कळ दिवस फ्रान्सांत जाऊन राहिलेला होता. तो फार हुषार माणूस असून सावकारीच्या व्यापाराचें त्याला चांगलें ज्ञान होतें. त्यानें ह्या सुमारास उत्तर अमेरिकेंतील मिसिसिपी नदीवरील फ्रेंचांच्या वसाहातींशीं व्यापार करण्याकरितां एक कंपनी काढिली. फ्रान्स देशाचें राष्ट्रीय कर्ज त्यानें फेडावें या अटीवर त्यास तेथील सरकारानें त्या वसाहतींशीं व्यापार करण्याचा एकट्यासच सर्व हक्क दिला; ह्मणजे तेथें फ्रान्सांतील इतर कोणीही व्यापाऱ्यानें व्यापार करूं नये असें ठरविलें. हा व्यापार जर त्यानें बेतानें चालविला असता तर त्यांत सगळ्यांसच किफायत झाली असती. पण त्यानें तो बेताबाहेर करण्याचा आव घातला. भागीदारांस ह्या व्यापारापासून फार मोठी किफायत होईल असें त्यानें प्रसिद्ध केलें आणि त्याप्रमाणें त्यांस मोठें व्याज देण्याचें त्यानें आरंभिलें. तेव्हां जो तो मिसिसिपी कंपनीचे भाग विकत घेण्याची खटपट करूं लागला. तेव्हां अर्थात् त्यांची किंमत विलक्षण वाढली; आणि लॉ सगळ्या फ्रान्सचा मोठा चाहता माणूस होऊन बसला. पण हें ढोंग किती दिवस चालणार? अर्थात् त्याचा भ्रमाचा भोंपळा लवकरच फुटला आणि हजारों लोक भिकेस लागले. असो. पण लॉ साहेबानें काढिलेल्या पैसे उत्पन्न करण्याच्या या अजब युक्तीची लाट जेव्हां इंग्लंदांत पसरली, तेव्हां तेथें १७१०त दक्षिण अमेरिकेशीं व्यापार करण्याकरितां 'सौथ-सी-कंपनी' नांवाची एक मंडळी स्थापन झालेली होती तिच्याहि अंगांत वारें भरलें. ह्या कंपनीचें आजपर्यंत बरें चाललें होतें व तिचा व्यापारहि बेताबाताचा होता. पण आतां तिचें डोकें फिरल्यासारखें झालें. तिचे व्यवस्थापक सरकारास असें ह्मणूं लागले कीं, तुह्मीं आह्मास दक्षिण

आफ्रिकेशीं व्यापार करण्याचा सर्व हक्क व दुसऱ्या कांहीं विशेष सवलती देत असल्यास आह्मीं सरकारचें सर्व कर्ज फेडण्याचें आपल्या शिरावर घेतों. त्यावेळीं एस्लाबी हा चॅन्सेलर आफ धि एक्स्चीकर किंवा फडणीस होता. त्याला हें त्यांचें ह्मणणें पसंत पडलें ह्मणून त्यानें त्या कंपनीला तसा अधिकार देण्यासाठीं १७२०त पार्लमेंतापुढें बिल आणिलें. वालपोल हा ह्यावेळीं अधिकारस्थ नव्हता. त्याला ह्या त्यांच्या ह्मणण्याचा पोकळपणा कळून आला; कारण तो फडणिशीच्या कामांत फार हुषार होता. ह्मणून त्यानें लहान लहान पुस्तकें लिहून व पार्लमेंतांत भाषणें करून या बिलाला जबर विरोध केला. हा विषय ता. २२ जानेवारी १७२०रोजीं कामन्स सभेपुढें आला. तेव्हां ब्यांक आफ् इंग्लंद या पेढीच्या व्यवस्थापकांनीं आपणास कांहीं विशेष हक्क मिळाल्यास आपणहि राष्ट्रीय कर्ज अंगावर घेण्यास तयार आहों असा पार्लमेंताकडे अर्ज केला; आणि त्या ब्यांकेच्या हितचिंतक सभासदांनीं, तिचें ह्मणणें कबूल करणें जास्त शहाणपणाचें होईल अशी तिची कामन्स सभेपुढें शिफारस केली. वालपोलचेंहि ह्मणणें तसेंच पडलें. पण एस्लाबीनें सौथ–सी–कंपनीचा पक्ष धरिला आणि त्याचें ह्मणणें सभेस पसंत पडून त्या अर्थाचें बिल त्या सभेंत पास झालें. नंतर तें अर्थात् लार्डांच्या सभेकडे गेलें. तेथें पुष्कळ लार्डांनीं त्याजवर पुष्कळ आक्षेप घेतले आणि त्यापासून राष्ट्राचा फायदा होईल किंवा नाहीं याजबद्दल जबरदस्त शंका प्रदर्शित केली. लार्ड नार्थ व लार्ड ग्रे यांनीं त्याचा फारच निषेध केला. ड्यूक आफ् व्हार्टन असें ह्मणाला कीं, या कंपनीच्या शेअरांची किंमत हल्लीं फार वाढली आहे हें एक मला दुश्चिन्हच दिसतें. लार्ड कौपर ह्मणाला, हें बिल मोठ्या दिमाखानें व टाळ्यांच्या गजरांत पुढें आणिलें जात आहे; पण ह्यांत कांहीं तरी लुच्चेगिरी दिसते व हें बहुधा पुष्कळांच्या नाशास कारण होणार. पण लार्ड संडर्लंड त्याच्या वतीनें बोलला. शेवटीं त्या सभेंतही तें बिल ता० ७ एप्रिल रोजीं बहुमतानें पसार होऊन ता० ११ जून रोजीं त्यास राजाची संमति मिळाली.

या कंपनीस याप्रमाणें पार्लमेंटानें विशेष अधिकार दिल्याचा तत्कालिक परिणाम असा झाला कीं, दुसऱ्या पुष्कळ कंपन्यांकडून पार्लमेंटाकडे असले अनेक अर्ज येऊं लागले. त्यांत निरनिराळ्या कंपन्यांचे निरनिराळे उद्देश असत. त्यांपैकीं कांहींचे संयुक्तिक उद्देश असत व कांहींचे फार विलक्षण असत. सर्वांचा हेतु लोकांकडून कसे तरी पैसे काढावे हा असे.

सौथ–सी–कंपनीला पहिला जो धक्का बसला तो स्वतः त्या कंपनीच्याच हातून बसला. ह्या कंपनीला आश्रय मिळालेला पाहून तसल्या दुसऱ्या पुष्कळ कंपन्या उत्पन्न झाल्या होत्या; त्यांपैकीं एकीवर आपल्या हक्कांचे ती अतिक्रमण करिते अशी ह्या कंपनीनें फिर्याद केली. अर्थात् हिचें मोठमोठ्या अधिकाऱ्यांशीं वजन असल्यामुळें हिच्या ह्मणण्याप्रमाणें त्या फिर्यादीचा निकाल लागला. पण तेणेंकरून असल्या कंपन्यांच्या अव्यवस्थित व्यवहाराकडे लोकांचें लक्ष गेलें आणि स्वतः सौथ–सी–कंपनीचाही व्यवहार कसा काय आहे हेंही लोक तपासून पाहूं लागले. तेव्हां त्यांतही संशयास जागा दिसूं लागली. मग काय विचारता? कंपनीच्या शेअरांची किंमत लागलीच उतरूं लागली. पूर्वीं जशी ह्यांच्या आफिसांत शेअर विकत घेणारांची गर्दी दृष्टीस पडत असे तशी आतां ते किणारांची गर्दी दृष्टीस पडूं लागली. अर्थात् शेअरांची किंमत जी शेंकडोपट वाढलेली होती ती भराभर कमी होऊं लागली. आणि अखेरीस ह्या कंपनीचा अभावाचा भोंपळा फुटला. पुष्कळ लोक व बायाबापड्या भिकेस लागल्या आणि पुष्कळ श्रीमान् व्यापारीही ठार बुडाले. हें पाहून देशांत सर्वत्र गवगवा व अस्वस्थता उत्पन्न झाली. जे जाकोबाइट होते त्यांना वाटलें कीं, येणेंकरून व्हिग प्रधानांची पच्ची होऊन ते अधिकारच्युत होतील आणि टोरी पुनः अधिकारावर येतील. आणि असें झालें ह्मणजे स्टुअर्ट घराण्याच्या वतीनें पुनः चळवळ सुरूं करण्यास ठीक पडेल. याच सुमारास, ह्मणजे ता. ३० नवंबर १७२० रोजीं जेम्स स्टुअर्ट यास चार्लस एडवर्ड ह्मणून एक मुलगा झाला. त्यामुळें जाकोबाइट लोकांस जास्तच उत्तेजन आलें.

अशी गडबड उडाल्यामुळें राजा हॅनोवर येथें गेला होता त्यास तावडतोब परत बोलाविलें; आणि पार्लमेंटाचें सेशन तहकूब करतेसमयीं ता. ८ दिसेंबर १७२० रोजीं जें त्याचें संभाषण झालें त्यांत त्यानें असें बोलून दाखविलें कीं, सौथ सी कंपनी बुडाल्यामुळें सगळ्या राष्ट्राचीच जी पत गेली आहे ती परत मिळविण्याकरितां सर्वजण मनःपूर्वक मदत करितील अशी मला आशा आहे.

वालपोलहि यावेळीं नार्फक प्रांतात हौटन नामक आपल्या खेड्यांतील इस्टेटीवर जाऊन राहिला होता. परंतु लंदनांत काय होत आहे याची तो नेहमीं खबर आणवीत असे. त्यानें सौथ–सी–कंपनीची अशी भंबेरी उडाली हें ऐकून लागलेंच लंदनास प्रयाण केलें. त्यानेंहि सौथ–सी–कंपनीचे भाग विकत घेतलेले होते; पण तो असल्या व्यापाराच्या कामांत फार हुशार असल्यामुळें धोरण पाहून त्यानें ते विकून टाकिले होते. तो पहिल्यापासून या कंपनीला विशेष हक्क देण्याच्या विरुद्ध होता. ह्मणून आतां त्याच्या बोलण्यास विशेष जोर आला व त्याचें वजन विशेष पडूं लागलें.

पुढें कंपनीच्या हिशेबांची विशेष बारकाईनें चवकशी सुरू झाली. तिजवरून फडणीस एस्लाबी, पोस्ट मास्तर जनरल मि. क्राग्स, त्याचा मुलगा सेक्रेटरी आफ् स्टेट जेम्स क्राग्स, आणि तिजोरीवरील एक सेक्रेटरी चार्लस स्टानहोप, एवढ्या प्रधानांचें कंपनींत अंग असून त्यांनीं कंपनीच्या लुच्चेगिरीच्या व्यापारानें आपला पुष्कळ फायदा करून घेतला आहे असें दृष्टीस आलें. तेव्हां एस्लाबीच्या विरुद्ध कामन्स सभेंत सूचना येऊन त्याचा अधिकार काढून घेतला आणि त्यास टावरमध्यें कैद करून पाठविलें. लार्ड स्टानहोप यांचें या कंपनीच्या व्यवहारांत कांहीं एक अंग नव्हतें. तथापि एकंदर प्रधानांवर यावेळीं जे हल्ले झाले, त्यांत याजवरहि हल्ला झाला. त्याबद्दल त्याला अत्यंत राग येऊन त्या झपाट्यांत त्याची एक रक्तवाहिनी फुटली व त्यानें तो दुसरे दिवशीं ह्मणजे ता. ५ फेब्रुवारी

१७२१ रोजीं मरण पावला, नंतर मग लार्ड संडर्लंड याच्या-वरहि असाच आरोप आला व तो खराहि होता. पण पार्लमेंतांत त्याचे पुष्कळ मित्र असल्यामुळें तो निभावला. चार्लस स्टानहोपहि त्याच कारणामुळें बचावला.

नंतर वालपोलनें पैशाच्या कामांत लोकांचा जो अगदीं भरंवसा गेला होता, तो पुनः उत्पन्न करण्याचें काम हातीं घेतलें. सौथ–सी–कंपनीस ज्यांनीं कर्ज दिलें होतें ते अगदींच बुडूं नयेत ह्मणून अशी योजना केली कीं, त्या कंपनीचें जें एकंदर कर्ज होतें त्याच्या तीन वांटण्या केल्या. पैकीं एक भाग ब्यांक आफ इंग्लंद या पेढीच्या माथीं मारिला, दुसरा ईस्ट इंडिया कंपनीच्या माथीं मारिला आणि तिसरा सौथ–सी–कंपनीच्या माथीं मारिला. तो कंपनी-पासून वसूल करण्यासाठीं ज्या डिरेक्टरांनीं लुच्चेगिऱ्या केल्या होत्या, त्यांचीं इस्टेटें जप्त करून टाकिलीं. अशा रीतीनें कंपनीच्या भागी-दारांस शंभर पौंडांस सव्वातेतीस पौंड दिले. ह्या व्यवस्थेनेंहि पुष्कळांस समाधान वाटलें नाहीं. ह्मणून त्यांनीं वालपोलची ही सूचना पास करूं नये ह्मणून पार्लमेंतास पुष्कळ अर्ज केले. परंतु त्याचा कांहीं एक परिणाम न होतां ती कामन्स सभेंत पास झाली. नंतर ता. ७ आगस्ट रोजीं लार्डांकडे तें बिल गेलें व त्यानींहि तें जसेंच्या तसेंच पास केलें.

लार्ड संडर्लंड यास कॉमन्स सभेनें जरी दोषमुक्त ठरविला होता, तरी त्याची त्यासच लाज वाटून त्यानें आपल्या प्रधानकीचा राजीनामा दिला. त्याचा वालपोलच्या मदतीनें जरी बचाव झालेला होता तरी त्यानें वाल-पोलचें नुकसान करण्याची खटपट करण्यास कमी केलें नाहीं. तो जरी अधिकारावरून दूर झाला होता तरी राजाशीं त्याचें चांगलें वजन होतें. ह्मणून त्यानें राजास असें सुचविलें कीं, वालपोलला त्याच्या काम-गिरीबद्दल कायम पोस्टमास्तर जनरल नेमावें. अर्थात् असें झालें ह्मणजे त्याला प्रधानमंडळांत शिरण्याची आशा नको. राजानें त्यास असें

विचारिलें कीं, तूं ही सूचना वालपोल यास विचारून करीत आहेस कीं काय, व तसें असल्यास त्याची तशी इच्छा आहे काय? अर्थात् संडलँड यास दोन्ही प्रश्नांस नाहीं ह्मणून उत्तर द्यावें लागलें; तेव्हां तें प्रकरण तेथेंच मिटलें. संडलँड नंतर लवकरच मरण पावला.

संडलँडपेक्षां फारच मोठा माणूस त्यानंतर लवकरच मरण पावला. त्याचें नांव मार्लबरो. त्याला आज बरेच दिवस पक्षघात झालेला होता. ता. २७ नवंबर १७२१रोजीं लार्डांच्या सभेस तो शेवटचा गेलेला होता. त्याची घोड्यावर किंवा गाडींत बसून हवा खावयास जाण्याची संवय शेवटपर्यंत कायम होती. १७२२च्या प्रारंभीं त्यास पुनः पक्षघाताचा झटका बसला व तोच शेवटचा ठरला. त्यामुळें तो ता. १६ जून रोजीं मरण पावला. त्यावेळीं त्याचें वय ७२ वर्षांचें होतें. त्यास पुत्रसंतान मुळींच नव्हतें ह्मणून त्याची इष्टेट व त्याच्या पदव्या त्याची वडील मुलगी कौंटेस आफ गोडालफिन हिच्या वंशाकडे गेल्या. मोठ्या मुत्सद्दी बापांना मोठे मुत्सद्दी पुत्र झालेले कधीं कधीं दृष्टीस पडतात. पण मोठ्या शिपाई बापांना मोठे शिपाई पुत्र झालेले दृष्टीस पडत नाहींत. आलेक्झांडर, हॅनिबाल, ज्युलियस सीझर, बारावा चार्लस, क्लाइव्ह, फ्रेडरिक, वेलिंग्टन, नेपोलियन, वाशिंग्टन, शिवाजी, यांपैकीं कोणालाही त्याच्या योग्यतेचा पुत्र झाला नाहीं. ड्यूक आफ् मार्लबरोचा प्रेतविधि झाला तेव्हां उपाध्यायाचें काम करण्यास राचेस्टरचा बिशप व वेस्टमिन्स्टरचा डीन आटर्बरी हा होता. मार्लबरोप्रमाणें हाहि एका अर्थी मोठाच माणूस होता; आणि मार्लबरोच्या मागून लवकरच ह्याचीहि धर्माध्यक्षाची कारकीर्द शेवटास जाईल असें त्या वेळीं कोणास वाटलें नव्हतें. पण ता. २४ आगस्ट रोजीं, ह्मणजे मार्लबरोच्या प्रेतविधीनंतर दोनच दिवसांनीं त्यास अंडर सेक्रेटरी आफ स्टेट यानें कैद केलें; आणि त्याच्या घरीं सांपडले तेवढे कागदपत्र जप्त करून त्यांनिशीं त्यास प्रिव्हीकौन्सिलपुढें आणिलें. तेथें त्याचा जबाब घेतला, त्याजवरून राजास पदच्युत करून स्टुअर्ट घराण्यास गादी देण्याच्या कटांत सामील असल्याचा त्याजवर आरोप ठेवून त्यास टावरमध्यें पाठवून दिलें, तेथें तो बरेच दिवस कुंथत राहिल्यानंतर पुढें मग त्याच्या खटल्याची चौकशी झाली.

त्यास कैद केल्यानंतर मग नवें पार्लमेंट उघडतांना राजानें आपल्या भाषणांत असें बोलून दाखविलें कीं, स्टुअर्ट घराण्यास पुनः आणण्याकरितां व मला पदच्युत करण्याकरितां भयंकर गुप्त कट चाललेले आहेत. कटांत सामील असलेल्या लोकांपैकीं कांहींस पकडलेले आहेत व कांहींना पकडावयाचें आहेत. राजाचें असें भाषण झाल्यावर आयर्लंदचा लार्ड लेफ्टेनंट आफ ग्राफ्टन यानें असें बिल आणिलें कीं, हेबिस कार्पस आक्ट ह्या कायद्याची अम्मलबजावणी एक वर्ष तहकूब ठेवण्याची प्रधानांस परवानगी असावी. या बिलाचा उद्देश पाहिजे त्यास संशयावरून चवकशी न करितां एक वर्षपर्यंत तुरुंगांत ठेवितां यावें हा होता. त्यावर लार्डांच्या सभेंत पुष्कळ भवति न भवति होऊन शेवटीं तें बहुमतानें पास झालें. लार्डांनीं त्याच्यावर मुख्य आक्षेप घेतला, तो हा कीं, आजपर्यंत असली परवानगी सहा महिन्यांवर कधीं मागितलेली नव्हती; आज एक वर्षाची परवानगी दिल्यास उद्यां दोन वर्षांची मागूं लागतील.

तारीख १९ आक्टोबर १७२२रोजीं हें बिल वालपोलनें कामन्स सभेपुढें आणिलें. नवीन झालेल्या निवडणुकींत वालपोल याच्या पक्षास मोठें बहुमत मिळून तो अधिकारारूढ होऊन आला होता. ह्मणून तेथें जरी बिलास विरोध झाला, तरी तो लार्डांच्या सभेइतका निकराचा झाला नाहीं, व तें मोठ्या बहुमतानें पास झालें. नंतर १७ तारखेस असें जाहीर केलें कीं, राजद्रोहाच्या आरोपावर डाक्र आटर्बरी, लार्ड नार्थ आणि अर्ल आफ आरनी यांस कैद केलें आहे. नंतर थोड्या दिवसांनीं ड्यूक आफ नार्फकलाही त्याच आरोपावर कैद केलें. नंतर चवकशी केली तींत आटर्बरी खेरीज सर्वांच्या विरुद्ध गुन्ह्याची शाबीती होण्यासारखा पुरावा नसल्यामुळें त्यांस सोडून दिलें; आणि नंतर कटांत सामील असलेल्या कांहीं सामान्य प्रतीच्या माणसांस कैद केलें. तेव्हां आटर्बरी आणि फ्रान्स व इटाली या देशांतील जेम्स स्टुअर्टचें अनुयायी यांच्यामध्यें झालेला ह्मणून पत्रव्यवहार पकडण्यांत आला.

आटर्बरीच्या विरुद्ध कोर्टापुढें खटला चालविण्याच्या ऐवजीं पार्लमेंटापुढें त्यास शिक्षा करण्यासाठीं ह्मणून एक बिल आणिलें. कारण तो एकंदर कटांत सामील होता ही गोष्ट जरी निःसंशय होती, तरी ती कोर्टांत सिद्ध करितां येईल इतका पुरावा सरकारापाशीं नव्हता. हें बिल दोन्ही सभांत पास होऊन आटर्बरीचे सर्व हुद्दे काढून घेतले आणि त्यास जन्मभर हद्दपार केलें. याच सुमारास बोलिंग्ब्रोक हा क्षमा मिळवून इंग्लंदास परत आला होता. त्याची वाटेंत गांठ पडली. त्यास अनुलक्षून आटर्बरीचा मित्र पोप कवि यानें असें ह्मटलें कीं, इंग्लंदास विलक्षण बुद्धीचे दोन माणूस एका कालीं सहन होत नाहींत; ह्मणून ही अशी अदलाबदल केली. पुढें आटर्बरी हद्दपार असतांच १७३१ त मेला, तेव्हां त्याचें प्रेत खासगी रीतीनें आणून वेस्टमिन्स्टर आबे या ठिकाणीं पुरिलें.

---

# प्रकरण पांचवें.

## वालपोलची कारकीर्द

( पहिल्या जार्जच्या मृत्यूपर्यंत ).

यावेळीं वालपोल हा मुख्य प्रधान झाला होता. त्यानें केलेली काम-गिरी ध्यानांत आणून राजा त्यास सरदार बनविण्याच्या विचारांत होता; पण वालपोल त्या गोष्टीस कबूल होईना. त्यास माहित होतें कीं, दिवसें-दिवस लार्डांच्या सभेचें महत्व कमी होऊन कामन्ससभेचें वजन राज्य-कारभारांत वाढावयाचें आहे. तेव्हां आपला अधिकार कायम ठेवण्यास आपल्यास कामन्स सभेंत राहणें जरूर आहे व फायद्याचेंही आहे, ह्मणून त्यानें आपल्या वडील मुलाला ब्यॅरन वालपोल ही पदवी देवविली व आपण मिस्तर वालपोलच राहिला. वालपोलइतकी पुष्कळ वर्षेंपर्यंत मुख्य प्रधानकी दुसऱ्या कोणत्याही मुत्सद्यास भोगावयास सांपडली नाहीं. त्याच्या ह्या लांब कारकीर्दींत सांगण्यासारख्या मोठमोठ्या गोष्टी फारशा झाल्या नाहींत. तथापि या मुदतींत इंग्लंदची शांतपणानें फार भरभराट झाली. त्याच्या अंगीं स्वराष्ट्रीय नीतीप्रमाणेंच परराष्ट्रीय नीती-चेंही धोरण फार शहाणपणाचें होतें. त्याची मोठी महत्वाकांक्षा अशी होती कीं, इंग्लंदास होतां होईल तों परराष्ट्रांशीं लढाई करावयाचा प्रसंग येऊं द्यावयाचा नाहीं. ह्याकरितां त्यानें फ्रान्स व इतर राष्ट्रें यांशीं सख्य करण्याचा क्रम सुरू केला.

युट्रेच्टच्या तहानें इंग्लंदास जिब्राल्टरचा किल्ला व मिनोर्का बेट अशीं स्पेनकडून मिळालीं होतीं. त्याबद्दल स्पेन देशास वाईट वाटत होतें; व तीं परत मिळविण्याची संधि कधीं येईल ह्याची स्पॅनिश लोक वाट पहात होते. ह्यावेळीं आस्ट्रियाचा बादशहा सहावा चार्लस ह्यास पुत्र-संतान नसल्यामुळें त्यानें असें ठरविलें होतें कीं, आपल्या मागें आपलें आस्ट्रिया, हंगारी व बोहिमिया येथील राज्य आपली मुलगी मराया थेरेसा हीस मिळावें. ह्या ठरावास यूरोपांतील इतर राष्ट्रांनीं अद्यापि

आपली संमति किंवा आश्वासन दिलें नव्हतें. ह्मणून स्पेननें आतां त्या बादशहाशीं असें बोलणें सुरू केलें कीं, तुह्मी जर आह्मांस आमचा गमावलेला मुलूख परत मिळविण्याच्या कामीं मदत कराल, तर आह्मींही तुमची व्यवस्था अमलांत आणण्याबद्दल आश्वासन देऊं आणि तुह्मांस आमच्या देशाशीं व्यापार करण्याच्या कांहीं विशेष सवलतीही देऊं. ह्यावेळीं रशियांत पीटर धि ग्रेटची बायको क्यॅथराइन ही राज्य करीत होती. तीही स्पेन व आस्ट्रिया यांच्याशीं गुप्त तह करण्याच्या विचारांत होती. हें जाणून टौनशेंड व वालपोल ह्यांनीं फ्रान्स, हालंद व प्रशिया ह्यांच्याशीं एकमेकांच्या संरक्षणार्थ ह्मणून सख्य केलें. पण प्रशिया त्या सख्यांतून लवकरच निघाला. त्यामुळें स्पेन देशास इतका जोर आला कीं, १७२७ सालीं तेथील राजा फिलिप यानें जिब्राल्टरला वेढा घालण्याची धिट्टाई केली. पण इंग्लंद, फ्रान्स व हालंद ह्यांनीं आपलें सख्य कायम राखिलें. इकडे रशियाची राणी क्यॅथराइन एकाएकीं निवर्तली, आणि चार्लस बादशाह स्पेनसाठीं आपलें फारसें नुकसान करून घेण्यास तयार नसल्यामुळें त्या देशास इंग्लंद व त्याचे दोस्त ह्यांच्याशीं त्यास तह करणें भाग पडलें.

अशा रीतीनें बाहेरची पीडा टाळल्यानंतर वालपोल देशाची अंतःस्थिति सुधारण्याच्या कामास लागला. राष्ट्राची स्थिति सुधारणें, कराच्या ओझ्याची वांटणी बरोबर व न्याय्य रीतीनें करणें आणि तें ओझें होईल तेवढें कमी करणें, हें खऱ्या मुत्सद्याचें अत्यंत महत्वाचें काम होय हें प्रथम त्याच्याच लक्षांत आलें ह्मटलें तरी चालेल. ह्या त्याच्या धोरणामुळें लोकवस्ति वृद्धिंगत व्हावयास लागली. भरभराटीस येणाऱ्या कांहीं नवीन शहरांची त्याच्या कारकीर्दींत दुप्पट लोकसंख्या झाली. शेतीचीहि सुधारणा व्हावयास लागली आणि शेतावर खपणाऱ्या कुळंब्यास पोटभर खावयास मिळूं लागलें. ह्या सर्व गोष्टींना केवळ वालपोलचाच राज्यकारभार कारण होता असें आह्मी ह्मणत नाहीं. पण त्यानें जी सर्वत्र शांतता व शांततेबद्दलची खात्री लोकांच्या मनांत उत्पन्न केली, त्यामुळें राष्ट्राची

भरभराट झाली ह्यांत बिलकुल संशय नाहीं. त्याच्या जमाबंदीच्या पद्धतीमुळें कराचें ओझें हलकें झालें व तें सगळ्या वर्गांवर योग्य रीतीनें वाटलें गेलें, आणि कर गोळा करण्याचें काम फाजील खर्चाशिवाय व श्रमाशिवाय व्हावयास लागलें.

१७२१च्या आक्टोबरच्या १९व्या तारखेस पार्लमेंत उघडतांना राजाचें जें भाषण झालें त्यामध्येंच वालपोल काय करणार ह्या गोष्टीचा उल्लेख केला होता. त्यास अनुलक्षून, इंग्लंदांत तयार होत असून बाहेर देशीं जाणाऱ्या शंभरांहून जास्त वस्तूंवरील निर्यात कर काढून टाकिले; आणि इंग्लंदांत बाहेरून येणाऱ्या सरासरी ४० कच्च्या जिनसांवरील आयात कर काढून टाकिले. कच्चे जिन्नस ह्मणजे ज्यांचे पुढें कारागिरीचे पदार्थ बनावयाचे ते ; उदाहरणार्थ, कापूस, रेशीम इत्यादि. हे अप्रत्यक्ष कर अशा रीतीनें वसूल करण्याच्यासंबंधानें वालपोलचा असा बेत होता कीं, जकात दिल्याशिवाय चोरून माल देशांत आणल्यानें किंवा देशांतून बाहेर नेल्यानें जें नुकसान होतें तें होईल तितकें बंद करावें. त्याचें तत्त्व असें होतें कीं, कारागिरीचे कच्चे पदार्थ आणि खाण्यापिण्याचे वगैरे प्रत्येकाच्या जरूरीचे पदार्थ, यांजवर होतां होईल तों कर बसवूं नये. हेंच धोरण पुढें सर राबर्ट पील व ग्लॅडस्टन ह्यांनीं कायम ठेविलें होतें. अशा रीतीनें इंग्लंदांत अनिर्बंध व्यापाराची पद्धत वालपोलनें सुरू केली.

आतां एका बाजूस पील व ग्लॅडस्टन व दुसऱ्या बाजूस वालपोल ह्यांजमध्यें फरक हा होता कीं, पहिले दोघे चांगली गोष्ट चांगल्या रीतीनें न साधल्यास वाईट रीतीनें करण्यास तयार नसत आणि वालपोल इष्ट कार्य करण्याकरितां पाहिजे त्या मार्गाचें अवलंबन करण्यासही मागें सरणारा नव्हता. त्याला स्वतः पैशाचा लोभ नव्हता ; कारण त्याजपाशीं पुष्कळ पैसा होता. पण आपले इष्ट व योग्य हेतू सिद्धीस नेण्यासाठीं पार्लमेंताच्या सभासदांस लांच वगैरे देण्यास त्याची तयारी असे. त्याच्या कारकीर्दींत पार्लमेंताच्या सभासदांना लांच देण्याची जणूं काय एक प्रकारची शिस्तच ठरून गेली होती.

त्याच्या वेळीं कामन्स सभेचें महत्व फार वाढलें. त्यामुळें जो तो त्या सभेचा सभासद होण्याची खटपट करूं लागला. मग अर्थात् मतदारांस लांच देण्याचा प्रघात सुरू झाला; आणि लांच देऊन बनलेले सभासद लांच खाणें म्हणजे केलेला खर्च भरून काढणें असेंच समजत असत. इकडे वालपोल यास कोणतीहि गोष्ट करावयाची म्हणजे सभेच्या बहुमताशिवाय करतांच येत नसे. म्हणून तो लांच देण्यास तयार असे. हा लांच अनेक स्वरूपांनीं दिला जात असे. कोणाला मोठ्या पगाराच्या जागा दे, कोणाला बिनकामाच्या जागा दे, कोणाला पेनशन दे, तर कोणाला रोख पैसे दे, असा प्रकार चालत असे. कोणी सभासद स्वतः लांच घेण्यास कबूल नसला तर त्याच्या बायकोला लांच देण्याची वालपोलची तयारी असे. सारांश, कोणत्या ना कोणत्या तरी रीतीनें तो सभासदांस वश करून घेई. तो असें म्हणे म्हणून म्हणतात कीं, प्रत्येक माणसाची ठरीव किंमत आहे. याचा अर्थ असा कीं, कोणी कमी लांच दिल्यानें वश होतो, तर कोणी जास्त मागतो; पण लांच घेणारच नाहीं असा कोणी मनुष्य मिळणार नाहीं. आतां असें त्याचें मत असो वा नसो, प्रत्येकास आपल्या कह्यांत आणण्याची त्याची खटपट असे यांत संशय नाहीं. आणि त्याचे हेतू जरी योग्य असत, तथापि ते साध्य करून घेण्याचा क्रम योग्य असे असें म्हणतां येत नाहीं.

दुसरी एक गोष्ट अशी असे कीं, वालपोलच्या वेळीं सर्वत्र शांतता असल्यामुळें माणसांचीं मनें क्षुब्ध होतील असे प्रश्न त्यावेळीं फारसे निघत नसत. असे प्रश्न निघाले म्हणजे बहुतेक माणसें आपापल्या समजाप्रमाणेंच मत देत असतात, लांच देईल त्यासच मत द्यावयाचें असें बहुधा करीत नाहींत; पण अशा प्रश्नांचा वालपोलच्या वेळीं उणेपणा असल्यामुळें त्यास मतें विकत घ्यावयास सांपडत व विकत घ्यावींहि लागत. कारण त्याची प्रतिस्पर्धा करणारे दुसरे मुत्सद्दी यावेळीं होतेच. नाहीं तर त्यांच्याकडे तीं मतें जाण्याचा संभव असे. अशा प्रकारचा एक प्रतिस्पर्धी यावेळीं पुढें पुढें येत होता. त्याचें नांव लार्ड कार्टरेट, जो पुढें

अर्ल आफ ग्रॅनव्हिली या नांवानें प्रसिद्धीस आला. ह्याचें जन्म तारीख २२ एप्रिल १६९० रोजीं झालें असून तो पांच वर्षांचाच असतां त्याचा बाप वारला. तेव्हांपासूनच तो लार्डांच्या सभेचा सभासद झालेला होता. त्यानें ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटींत मोठें नांव मिळविलें असून तो लहानपणापासूनच सार्वजनिक कामांत शिरलेला होता. त्यास जर्मन भाषा चांगली येत असल्यामुळें व अन्य गुणामुळें तो पहिल्यापासूनच पहिल्या जार्जाचा आवडता होता. स्टॅनहोपच्या वशिल्यानें त्यानें परराष्ट्रांशीं व्यवहार करणाऱ्या वकिलांच्या पुढ्यांत लहान मोठीं कामें केलीं होतीं. १७२१ त त्याला फ्रान्स देशांत इंग्लंदचा वकील नेमिलें होतें. पण इतक्यांत क्राग्स मरून सेक्रेटरी आफ् स्टेटची जागा रिकामी झाल्यावर त्याच्या अंगची हुषारी पाहून वालपोलनें ती जागा त्यास दिली. तो फार विद्वान् होता. त्यास जर्मन, फ्रेंच वगैरे पांच सहा परकी भाषा येत होत्या. त्याचें शास्त्रीय ज्ञानहि, त्या काळाकडे नजर देतां विलक्षण होतें. त्याला मागील आणि चालू स्थितीचा इतिहासही चांगला अवगत होता. त्यास राजकीय पद्धतीच्या इतिहासाचें तर वेडच होतें आणि त्यास धर्मसंस्थेचाहि इतिहास चांगलाच माहीत होता. तो मोठा पार्लमेंटीय वावदूक होता. कोणी ह्मणतात वक्ताच होता. तो धीट व निश्चयी होता. त्याला कोणत्याही धोक्याच्या कामाची भीति वाटत नसे. काम फसलें तर तो लाजत नसे किंवा उदास होत नसे. तो दैवाचे प्रसाद घेण्यास व लत्ताप्रहारहि सोसण्यास तयार असे. डिझरायलीसाहेब ह्मणत कीं, सार्वजनिक कारकीर्दींत यश येण्यास बुद्धि मोठी पाहिजे व मनोविकार लहान पाहिजेत. कार्टरेटचें अगदीं तसें होतें. त्याचा कोणाशीं स्नेह नव्हता व कोणाशीं वैरही नव्हतें. त्याला पुस्तकें, मदिरा आणि मदिरानयना यांचा मोठा नाद असे. त्याकाळीं इंग्रज लोकांत दारू पिण्याचें मान हल्लींपेक्षां फारच मोठें असे; अशा काळांतदेखील तो मोठा दारूबाज ह्मणून समजला जात असे.

वालपोल व तत्कालीन इतर मुत्सद्दी यांच्यावर वरचढ करण्यास कार्टरेटच्या अंगीं दुसरा एक मोठा गुण होता, तो हा कीं, त्यास जर्मन

भाषा चांगली बोलतां येत असे. त्यामुळें सहजच राजाचें व त्याचें तासचे तास भाषण चाले. वालपोल यास आपले विचार व आपल्या मसलती हीं वाईटसाईट ल्याटिन भाषेंत व इतर प्रधानांस फ्रेंच भाषेच्या द्वारा राजास समजवावीं लागत. त्यामुळें सहजच राजाची त्याजवर मर्जी असे. कार्टरेट हा सार्वजनिक कामाची शिस्त संडर्लंड व स्टॅनहोप ह्यांच्या हाताखालीं शिकलेला होता. त्यामुळें वालपोल व टौनशेंड ह्यांचे व त्याचे या बाबतींत एक विचार नसत. कार्टरेटचें मुख्य ह्मणणें असें होतें कीं, टोरी लोक आणि हायचर्चमेन ह्यांना सरकारी नोकरींतून वगळण्याचे दिवस आतां गेले. त्यांच्यामध्यें जरा सुधारणाभिमुख टोरी असतील त्यांसच कारभारांत घ्यावें. शिवाय त्याची अशी इच्छा होती कीं, वालपोलनें राज्यकारभारांत आपलें मत घ्यावें, आपणास केवळ कारकुना-प्रमाणें वागवूं नये. वालपोलला तर मनापासून असें वाटे कीं, इंग्लंदचा कारभार कोणत्या धोरणावर चालवावयाचा हें आपल्यालाच तेवढें समजतें. अशी स्थिति असल्यामुळें ह्या दोघांमध्यें एक प्रकारचा कलह नेहमीं चालत असे आणि ह्या कलहांत तेव्हांच्या पद्धतीस अनुसरून कांहीं स्त्रियांचेंहि अंग असे. राजाच्या एका प्रियपात्राचें वालपोलला मोठें पाठ-बळ असे व दुसरीचें कार्टरेटला असे. हॅनोवरसंबंधीं जें राजाच्या मताचें धोरण तें कार्टरेटला संमत असे व त्यामुळें हॅनोवरसाठीं रशियाशीं भांड-ण्यास तो तयार होता. इकडे वालपोल आणि टौनशेंड हे हॅनोवरच्या फायद्यासाठीं इंग्लंद देशाची शांतता मोडण्यास तयार नव्हते. अशी स्थिति असतां कांहीं एका क्षुल्लक कारणावरून कार्टरेटची मसलत फसली व वाल-पोलची साधली. तिचा संबंध फ्रान्स देशांतील इंग्लिश वकीलाकडे होता. कार्टरेटच्या मध्यस्तीनें नेमिलेल्या वकीलाचें फ्रान्सच्या दरबाराशीं जमेना आणि वालपोलनें नेमिलेला जो त्याचा भाऊ होरेस वालपोल याचें जमलें. तेव्हां अर्थात् कार्टरेट राजाच्या मर्जीतून उतरला; परंतु त्याजवर मेहरबानी करून वालपोलनें त्यास आयर्लंदचा लार्ड लेफ्टेनंट नेमिलें.

लार्ड कार्टरेट जेव्हां आयर्लंदांत जाऊन पोहोंचला तेव्हां तेथें एक मोठें राजकीय वादळ उठलें होतें. सर्व आयर्लंदांत व विशेषतः डब्लिन

येथें मोठी चळवळ उडाली होती. तिचा नायक स्विफ्ट हा होता व तिचा विषय "ड्रेपियरचीं पत्रें" हा होता. ती कथा अशीः—आज पुष्कळ वर्षेपर्यंत आयर्लंड देशांत तांब्याचें नाणें कमी होतें. त्यामुळें व्यापाऱ्यांना व धंदेवाल्यांना आपल्या कामकऱ्यांस मजुरी देतांना मोठी पंचाईत पडे. याकरितां संडर्लंदच्या अमदानींत ह्या विषयाकडे सरकारचें लक्ष गेलें आणि त्यांनीं आयर्लंदास तांब्याचें नाणें पुरविण्याबद्दल टेंडरें मागविलीं. त्यांमध्यें विलियम वुड नांवाच्या एका तांब्याच्या व लोखंडाच्या खाणींच्या मालकाचें टेंडर पसंत केलें व त्यास एक लक्ष आठ हजार पौंड किमतीचीं अर्धी पेनी व फार्दिंग हीं नाणीं पाडण्याचा पेटंट दिला. हीं दोन नाणीं इंग्लंदांत चालणाऱ्या नाण्यांपेक्षां जरा कमी वजनाचीं असावीं असें ठरविलें होतें. असें करण्याचें कारण हुंडणावळीचें मान त्या देशांत जरा जास्त होतें हें होय. ही गोष्ट वालपोल व टौनशेंड ह्यांनीं न्यूटनसारख्या महागणित्याच्याच सल्ल्यानें केलेली होती. तेव्हां तींत प्रथमदर्शनीं तरी गैर असें कांहींच नव्हतें. तरी पण आयर्लंदांतील पार्लमेंत व प्रिव्हि कौन्सिल ह्यांस ही गोष्ट बिलकुल पसंत पडली नाहीं. त्यांनीं राजाकडे असा अर्ज पाठविला कीं, हीं वुडचीं नाणीं आयर्लंदांत सुरू केल्यास त्या देशाच्या व्यापारास मोठा धक्का बसणार आहे व तेथील उत्पन्न फार कमी होणार आहे. या अर्जास वालपोलच्या सल्ल्यानें राजानें त्यांचें मन शांत होईल असें सामोपचाराचें उत्तर पाठविलें व तेणेंकरून आयरिश पार्लमेंताची समजूत झाली असावी असाहि संभव दिसूं लागला. पण यासंबंधानें लवकरच अगदीं निराशा झाली.

सामान्य आयरिश लोकांना हें नवें नाणें नापसंत होण्यास दुसरे एक कारण असें झालें होतें कीं, हें कंत्राट आपणास मिळावें ह्मणून वुड यानें राज्याच्या एका प्रिय पात्रास, ह्मणजे डचेस आफ् केंडाल हीस, हें काम फत्ते झाल्यास मोठा लांच देण्याचें अभिवचन दिलें होतें. पण आयरिश पार्लमेंत व आयरिश अधिकारी ह्यांना तें नापसंत होण्यास मुख्य कारण असें झालें होतें कीं, हें कंत्राट देतांना इंग्लिश प्रधानांनीं

त्यांची संमति घेतली नव्हती. शिवाय वुड हा आयरिश लोकांमध्यें अगदीं अप्रिय झालेला होता. तो मग्रूर असून आयरिश लोकांस असें ह्मणे कीं, तुह्मी काय समजतां? वालतोल माझ्या मुठींत आहे; माझीं नाणीं तुह्मीं मुकाट्यांनीं न घेतल्यास मी तीं तुमच्या घशांत कोंबीन. हे सर्व आक्षेप कदाचित् दूर झाले असते; पण इतक्यांत एक नवीच गोष्ट अकस्मात् घडून आली आणि तेणेंकरून सर्व बिन-सलें. एके दिवशीं सकाळीं डब्लिनच्या व्यापाऱ्यांस, उदम्यांस, शेत-ऱ्यांस व इतर धंदेवाल्यांस उद्देशून ह्मणून लिहिलेलें एक पत्र प्रसिद्ध झालें. त्याच्या खालीं एम्. बी. ड्रेपियर अशी सही होती. त्या मध्यें हीं नवीं नाणीं इंग्लंदच्या नाण्यापेक्षां कमी किंमतीचीं असल्यामुळें आयरिश लोकांनीं तीं घेतल्यास त्यांचें कसें नुकसान होणार आहे हें तिखटमीठ लावून उत्तम रीतीनें वर्णिलें होतें. पुढें अशीं दुसरींहि अनेक पत्रें प्रसिद्ध झालीं व त्यांच्यायोगानें आयरिश लोकांमध्यें फारच मोठा गवगवा उडून गेला. हीं पत्रें स्विफ्ट याचीं होतीं.

लार्ड कार्टरेट आयर्लंदांत आला तेव्हां या चळवळीला अगदीं ऊत आलेला होता. त्यानें त्या पत्रांविरुद्ध जाहिरनामा काढिला व तीं लिहि-णारास जो धरून देईल त्याला तीनशें पौंडांचें इनाम देण्याचें प्रसिद्ध केलें. तीं छापणारास धरून एकदम कैद केलें; पण तेथील ग्रँडज्यूरी नामक मोठ्या पंचसभेनें त्यास दोषमुक्त करून सोडून दिलें. लोकांनीं असा जाहिरनामा काढिला कीं, वुडचीं नाणीं जो आयर्लंदांत चालवू पाहील त्यास गुन्हेगार समजलें जाईल. हें पाहून कार्टरेट शुद्धीवर आला व त्यानें प्रधानांस असें कळविलें कीं, वुडचीं नाणीं जुलमानें सुरू केल्यास आयर्लंदांत मोठा दंगा होणार आहे, ह्मणून तीं परत घ्यावीं. त्यावरून प्रधानांनीं वुडला दिलेला पेटंट परत घेतला आणि त्याचें नुक-सान भरून देण्याकरितां ह्मणून त्यास पेनशन दिलें. तें पाहून आय-रिश लोकांस मोठा आनंद झाला व ते स्विफ्टचे मोठे आभारी झाले.

आयर्लंदांतील ही चळवळ निवते न निवते तों स्काटलंदांत एक चळवळ उत्पन्न झाली. इंग्लंदांत माल्ट दारूवर कर असून स्काटलंदांत मुळींच नसे, ह्मणून पार्लमेंटानें असें सुचविलें कीं, तेथें त्या दारूच्या प्रत्येक पिपावर ६ पेन्सांचा कर बसवावा. वालपोल या सूचनेस अनुकूल नव्हता. शेवटीं त्यानें असें सुचविलें कीं, तो कर तीन पेन्सच घ्यावा. ह्यावेळीं लार्ड रॉक्सबर्ग हा स्काटलंदचा सेक्रेटरी आफ् स्टेट होता. तो कार्टरेटचा स्नेही असल्यामुळें त्यानें स्काटलंदांतील माल्टची दारू तयार करणारांस आंतून असें सुचविलें कीं, राजा ह्या करास प्रतिकूल आहे करितां तुह्मी चळवळ केल्यास हा कर बसावयाचा नाहीं. वालपोल यास ती गोष्ट समजतांच त्यानें हॅनोवर येथें राजाबरोबर टौनशेंड गेला होता त्यास ती कळविली व त्याच्या पाठीस लागून राजाकडून लार्ड रॉक्सबर्ग यास राजीनामा द्यावयास लाविलें; आणि अशा रीतीनें वालपोलवरचें एक विघ्न टळलें.

एक प्रधान दुसऱ्या प्रधानाविरुद्ध अशा खटपटी कशा करी ह्याचें हल्लींच्या लोकांस मोठें आश्चर्य वाटेल. पण त्यावेळीं अशी चाल असे कीं, राजा आपलें प्रधानमंडळ बनवितांना मुद्दामच निरनिराळ्या पक्षाचे मुत्सद्दी निवडी; अशासाठीं कीं, अशा रीतीनें सर्व पक्षांनी ऐकमत्यानें वागावें. त्याचा हा असा परिणाम होत असे. हल्लीं कामन्स सभेंत जो पक्ष प्रबल असेल त्याच्या अग्रणीस राजानें बोलावून मुख्य प्रधान नेमावयाचें व बाकीच्या नेमणुका करण्याचें काम त्याच्यावरच संपवावयाचें, ही जी हल्लींची पद्धति ती त्यावेळीं अमलांत आलेली नव्हती. त्यामुळें असें कधीं कधीं होत असे.

ह्या कराच्या कामीं वालपोल यास यश आलेलें पाहून राजा फार खुष झाला व त्यानें त्यास नाईट आफ् धि बाथ ही बहुमानाची पदवी १७२५ त दिली. तेव्हांपासून तो सर राबर्ट वालपोल या नांवानें प्रसिद्ध झाला.

पण एव्हांपासून त्याच्याविरुद्ध कामन्स सभेंत एक फार मोठा व जबरदस्त पक्ष उत्पन्न झाला. या पक्षानें त्यास नको नकोसें करून टाकिलें. या विरुद्ध पक्षाचा पुढारी पुल्टेनी हा होता. हा गृहस्थ एका वेळीं वालपोलचा अगदीं निःसीम भक्त व शिष्य होता. पण वालपोलच्या अंगीं असा एक दोष असे कीं, त्यास आपल्या कारभारांत आपल्या तोडीचे इतर लोक खपत नसत. त्यास असले हुषार लोक वागवूनच घेतां येत नसत. त्याला वाटे कीं, बाकीचे सगळे प्रधान केवळ कारकून असावे. आपण सांगूं तें त्यांनीं मुकाट्यानें ऐकावें. पुल्टेनीला त्यानें सुचविलें कीं, मी तुला पाहिजे तर सरदार बनवितों. पुल्टेनीला माहीत होतें कीं, सरदारी पत्करावयाची ह्मणजे आपल्यास शून्य करून घ्यावयाचें, ह्मणून त्यानें ती पत्करिली नाहीं. तेव्हांपासून तो वालपोलचा द्वेष करूं लागला. पुल्टेनी हा मोठा वक्ता होता व त्याचें वक्तृत्व कामन्स सभेस फारच रुचेल असें होतें. त्याची भाषणपद्धति दिमाखाची, कापून काढणारी व झोंबणारी अशी होती. तो वेळेस पाहिजे त्या विषयावर बोलूं शके. तो कधीं पूर्वी तयारी करून बोलत नसे. तो जन्मतःच पार्लमेंतीय वावदूक होता. त्यानें पुष्कळ विषयांवर पुष्कळ वाचलेलें होतें व तें मनःपूर्वक वाचलेलें होतें. तो विनोदी आणि चतुरस्र बोलणारा होता. तो लिहिणाराहि तसाच होता. ॲनराणीच्या वेळीं जेव्हां वालपोल यास टावरमध्यें पाठविलें होतें, तेव्हां पुल्टेनीनें त्याच्या वतीनें जोराचें भाषण केलेलें होतें. १७१७ त टौनेशेंड व वालपोल यांनीं जेव्हां राजीनामा दिला, तेव्हां त्यानेंही दिला होता. आतां वालपोल जेव्हां पुनः अधिकारारूढ झाला तेव्हां अर्थात् तो आपणास कांहीं मोठें काम सांगेल अशी पुल्टेनी यास सहजच आशा होती. पण ती आशा तृप्त झाली नाहीं व तो वालपोलचा द्वेष करूं लागला. यानंतर त्यानें वालपोलचा सारखा विरोध करण्यास सुरवात केली आणि कामन्स सभेंत वालपोलच्या विरुद्ध पक्ष बनवून त्याचा तो पुढारी झाला. तेव्हांपासून पार्लमेंतांत अधिकाररूढ पक्ष व अधिकारभ्रष्ट पक्ष किंवा विरुद्ध पक्ष, असे दोन पक्ष व त्यांचे दोन ठरीव अग्रणी ही शिस्त सुरू झाली. ती

अद्यापहि कायम आहे. या कामीं पुल्टेनीला कांहीं नव्या धेंडांची मदत होती. राजा आणि प्रिन्स आफ् वेल्स एकमेकांचा द्वेष करीत असत, हें मागें आह्मीं सांगितलेंच आहे. तेव्हां प्रिन्स आफ् वेल्सचें पुल्टेनीला साहाय्य होतें. कामन्स सभेंत जणूं काय दोन पक्षच बनले होते. एक राजाचा पक्ष आणि एक राजपुत्राचा पक्ष. पैकीं राजाच्या पक्षास अर्थात् प्रधान व त्यांचे अनुयायी असून राजपुत्रपक्षास जाकोबाइट नव्हत असे सर्व टोरी आणि वालपोलची नीति पसंत नसलेले किंवा वालपोलवर रुसलेले पुल्टेनी-सारखे व्हिगपक्षीय लोक, हे असत.

वालपोल यास यावेळीं पुल्टेनीपेक्षांहि जास्त भयंकर असा प्रतिस्पर्धी उत्पन्न झाला होता. त्याचें नांव बोलिंग्ब्रोक. त्यास वालपोलच्याच मध्यस्थीनें माफी मिळालेली होती हें आह्मीं मागें सांगितलेंच आहे. त्यानें परत आल्यानंतर आपली पदवी व इस्टेट हीं परत मिळावीं ह्मणून खट-पट चालविली होती. त्या कामींहि वालपोलनेंच त्याच्या वतीनें पार्लमें-तांत भांडून त्या अर्थाचें लार्ड फिंच यांनें आणिलेलें बिल पास करून घेतलें. तरी तेवढ्यानें बोलिंग्ब्रोकची तृप्ति होईना. त्याला आतां अशी हांव सुटली कीं, आपणास पुनः लार्डांच्या सभेंत पूर्ववत् बसूं द्यावें व तेथें आपल्यास आपलें वक्तृत्व फिरून गाजवितां यावें. या गोष्टीस वालपोल कबूल होईना ; पण यांत त्याची चूक होती. कारण असल्या उलाढाली माणसांस तोंडाची वाफ दवडण्याची सवड दिल्यास तीं कमी भयंकर होतात. पण हें वालपोलच्या लक्षांत आलें नाहीं. या बाबतींत तो त्यास अनु-कूल होईना ह्मणून बोलिंग्ब्रोक पुल्टेनीच्या पक्षास जाऊन मिळाला. दोघे हुषार लेखक होते. ह्मणून त्यांनीं क्रॅफ्ट्स्मन नांवाचें एक नवें वर्त-मानपत्र १७२६ सालीं सुरू केलें, व त्यामध्यें वालपोलवर सणसणीत हल्ले सुरू केले. वालपोल हा देशाचा विघातक आहे, तो सार्वजनिक पैशाची लूट करीत असतो, त्याच्या अंगीं प्रामाणिकपणा मुळींच नाहीं व तो पार्लमेंतास लाज आणणारा आहे, अशा प्रकारचीं शेलकीं विशेषणें त्यास या पत्रांत मिळूं लागलीं. हें पत्र त्यावेळीं फार लोकप्रिय झालें

व एका वेळीं त्याचे वर्गणीदार ॲडिसनच्या स्पेक्टेटर पत्रापेक्षांहि जास्त झाले होते.

याच सुमारास लार्ड मॅक्लीसफील्ड याच्यावर कामन्स सभेनें लार्डांच्या सभेपुढें खटला केला. हा मोठा नामांकित न्यायाधीश होता. तो अगदीं लहान दर्जापासून क्रमाक्रमानें चीफ जस्टिस ह्या पदवीस चढलेला होता, आणि यावेळीं तर तो लार्ड चॅन्सलरच्या जाग्यावर होता. आजपर्यंत त्याची प्रामाणिकपणाबद्दल व औदार्याबद्दल मोठी ख्याति होती. त्याच्यावर आतां असा आरोप आणिला कीं, ह्यानें मास्टर्स इन चॅन्सरी ह्या जबाबदारीच्या जागा अडाणी व भिकारी अशा लोकांस पैसे घेऊन दिल्या आहेत. ह्या कामदारांकडे कोर्टांत फिर्याद करणारांच्या आणि विधवांच्या व अज्ञानांच्या मोठमोठ्या रकमा रहात असल्यामुळें ते श्रीमान् व ऐपतवाले असावे लागतात. हा खटला ता. ६ मे १७२६ रोजीं सुरू झाला व ता. २९ मे पर्यंत चालला. लार्ड मॅक्लीसफील्ड याला कांहीं आरोपांवर जबाबच देतां येईना व इतर आरोपांच्यासंबंधानें त्यानें एवढाच जबाब दिला कीं, मी केलें तें पूर्वापार वहिवाटीस अनुसरून केलें. लार्डांच्या सभेनें त्यास ऐकमत्यानें दोषी ठरविलें व त्यास तीस हजार पौंड दंड केला, व तो भरीतोंपर्यंत त्यानें टावरमध्यें रहावें असा ठराव केला. त्याच्या विरुद्ध दुसरीहि अशी एक सूचना लार्डांच्या सभेपुढें आणिली होती कीं, यास पुनः कोणतीहि जागा मिळूं नये किंवा यास पुनः पार्लमेंतांत बसूं देऊं नये. पण ही सूचना पसार झाली नाहीं. यास कारण त्यास राजाश्रय होता हें होय. राजास असा संशय आला कीं, हें सर्व काहूर प्रिन्स आफ् वेल्स यानें उठविलेलें आहे. ह्मणून मॅक्लीसफील्डनें जेव्हां आपली इस्टेट गहाण ठेवून दंडाची भरपाई केली तेव्हां त्यास ते पैसे परत देण्याचें राजानें आपल्या शिरावर घेतलें व त्याप्रमाणें त्यानें हजार पौंडांचा एक हप्ता दिला असेंदेखील ह्मणतात. पण इतक्यांत मॅक्लीसफील्डनें संसारत्याग करून एकांतवास पत्करिला, आणि आपलें बाकीचें आयुष्य शास्त्रीय विषयांचें अध्ययन आणि धार्मिक विषयांचें मनन करण्यांत घालविलें. तो १७३२ सालीं मरण पावला.

जार्ज राजाचा अंत आतां जवळ आला होता. त्यास हल्लीं ६८वें वर्ष होतें; आणि ह्यापेक्षांही जास्त वर्षें जगावें असा त्याचा आयुष्यक्रम नव्हता. खाण्यापिण्याचा अतिरेक आणि पुष्कळ प्रियपात्रें, यांनीं त्याची मूळची मजबूत प्रकृति ढांसळून गेली होती. अलीकडे त्याची प्रकृति अगदीं बिघडलेली होती. पण पुनः एकदां हॅनोवरचें दर्शन घ्यावें असें त्याच्या मनांत आलें. त्याप्रमाणें तो ता. ३ जून १७२७ रोजीं निघाला आणि हालंदपर्यंत सुखरूप गेला. नंतर त्यास एकाएकीं एक प्रकारच्या पक्षघाताचा झटका बसला आणि आपल्या भावाकडे जाऊन पोहोंचण्याच्या पूर्वींच तो त्यांत मरण पावला. त्यावेळीं डचेस आफ् केंडाल हिला फार दुःख झालें, अगर तिनें फार दुःख झाल्याचें दाखविलें ह्मणून ह्मणतात. तिनें आपले केंस तोडिले, निदान बळकट धरून ओढिले, आपली रुंद छाती बडवून घेतली, आणि आतां एकटें कसें रहावें ह्मणून ह्मणूं लागली असें ह्मणतात. तरी पण ती दुःखानें कांहीं मेली नाहीं. पुढें सोळा वर्षें ती जगली.

यापूर्वीं सात महिने, ह्मणजे ता. १३ नवंबर १७२६ रोजीं जार्जाची दुर्दैवी बायको प्रिन्सेस सोफ़ाया जर्मनींत मरण पावली होती. ती आज बत्तीस वर्षें तिकडे कैदेंत होती; आणि हा इकडे पैसे गोळा करीत होता, दारू पीत होता आणि कुरूप बायकांच्या झनानखान्यांत लोळत होता. मी निरपराधी आहे असें शेवटपर्यंत ती याच्या कानींकपाळीं ओरडतच होती; पण यास तिची कधीं दया आली नाहीं.

पहिल्या जार्जाचे अंगीं ह्मणण्यासारखे चांगले गुण फारसे नव्हते. त्याच्या अंगीं एक प्रकारचा प्रामाणिकपणा होता आणि तो मितव्ययी होता. कधी कधीं तो एखादी औदार्याची गोष्ट करीत असे. युनिव्हर्सिटीची सुधारणा करावी असेंहि त्याच्या मनांत कधीं कधीं येत असे. तरी पण त्याला शास्त्र, कला किंवा वाङ्मय ह्यांची बिलकुल पर्वा नसे. त्याचा खरा स्नेह कोणाशीं होता असें दिसत नाहीं. तो आपल्या मुलाचा द्वेष करीत असे आणि आपल्या सुनेला शिव्या देत असे.

तरी पण प्रसंगीं त्याचे गुण दृष्टीस पडत. त्याला जरी दूरदृष्टि नव्हती, तरी स्वच्छदृष्टि होती यांत संशय नाहीं. वालपोलची किंमत ओळखून त्यानें त्यास अधिकार दिला ही लहानसहान गोष्ट नव्हे. त्याच्या कारकीर्दींत इंग्लंदची एकंदरींत भरभराटच झाली. त्याची इंग्लंदवर विशेषशी भक्ति नसून हॅनोवरवर होती हें मागें आह्मी सांगितलेंच आहे. तरी आपल्या लग्नाच्या राणीपेक्षां आपल्या राजकीय राणीशीं, ह्मणजे आंग्लभूमीशीं, त्याचें बर्तन पुष्कळ चांगलें होतें ह्यांत बिल्कुल संशय नाहीं. राज्यकारभाराचें काम आपण स्वतः केव्हां करावें आणि दुसऱ्यांवर केव्हां सोपवावें हें त्याला चांगलें समजत असे; ह्मणूनच त्याचें घराणें इंग्लंदांत कायम झालें. पुढें आपल्या असें नजरेस येणार आहे कीं, ह्या जार्जाइतके वाईट नव्हत अशा राजांनीं इंग्लंदचा राज्यकारभार ह्याच्यापेक्षां फारच वाईट रीतीनें चालविला आहे. तेव्हां त्या मानानें पाहतां हा बरा होता असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

---

## प्रकरण सहावें.

### दुसऱ्या जार्जाच्या कारकीर्दीचीं पहिलीं वर्षें.

पहिला जार्ज ज्या वर्षीं मेला तें वर्ष त्याच्यापेक्षां फारच मोठ्या अशा एका माणसाच्या मृत्यूनें संस्मरणीय झालें आहे. वुडचें नाणें जेव्हां आयर्लंदांत सुरू करावयाचें होतें तेव्हां सर ऐझाक न्यूटन ह्याचें मत घेतलें होतें असें मागें आह्मीं सांगितलेंच आहे. महत्वाच्या सार्वजनिक कामाच्यासंबंधानें तेंच त्याचें शेवटचें घेतलेलें मत होय. तारीख २० मार्च १७२७ रोजीं हा महातत्त्ववेत्ता मरण पावला. त्यानें गुरुत्वाकर्षण-तत्त्व शोधून काढिल्यामुळें त्याचें नांव अजरामर झालें आहे.

दुसऱ्या जार्जाचा जन्म तारीख ३० आक्टोबर १६८३ रोजीं झालेला असल्यामुळें त्यास हल्लीं ४४ वें वर्ष लागलेलें होतें. त्याचें बुद्धिसामर्थ्य त्याच्या बापापेक्षांही कमी होतें. तो कवडीचुंबक व लोभी असून त्याला क्षुल्लक कारणावरून राग येई. त्याचा द्वेष गरम असे. त्याचा स्नेह थंड असे. तो अत्यंत आपलपोट्या होता. राजास शोभणारा असा एकच गुण त्याच्या अंगीं होता तो धैर्य हा होय. त्यानें १७०८ सालीं मार्लबरोच्या हाताखालीं शिपाइगिरीचें काम केलें होतें. शिवाय औडिनार्डच्या लढाईत त्यानें आपल्या अंगचें शौर्य दाखविलें होतें. यानंतर तो डेटिंजेन येथें लढणार होता. यानंतर इंग्लंदच्या राजांपैकीं जातीनें कोणताही राजा स्वतः लढाईस अद्यापि गेलेला नाहीं. त्याला त्याच्या बापाच्या इतकेंदेखील शिक्षण मिळालेलें नव्हतें. त्याला पुस्तकांचा अगदीं तिटकारा असे. त्याच्या अंगीं धर्मश्रद्धाही बेताचीच होती. त्याला लष्करी कामाची मात्र मोठी आवड असे. त्याच्या बापा-प्रमाणेंच त्याला सुरूप किंवा कुरूप प्रियपात्रें गोळा करून त्यांच्या अंगावर लोळत राहण्यांत मोठें सुख वाटे. तो आपल्या बापाचा नेहमीं द्वेष करीत असे. वालपोलच्या मध्यस्थीनें बापलेकांत समेट

झाला ह्मणून मागें सांगितलें आहे, तो अगदीं बरबर होता. वालपोल आज कित्येक वर्षें पहिल्या जार्जाच्या अगदीं विश्वासांतला होता. ह्मणून दुसरा जार्ज आल्याबरोबर त्याचें प्रस्थ अगदीं मोडेल असें सर्वांस वाटत होतें, त्याप्रमाणें प्रथम कांहीं दिवस झालेंही.

पहिला जार्ज मेल्याची वार्ता जेव्हां वालपोल यास कळली, तेव्हां तो ती घेऊन दुसऱ्या जार्जाकडे गेला. त्यावेळीं त्यास गाढ झोंप लागलेली होती व त्यास उठवावयास मोठे प्रयास पडले. त्यास जागें केलें तेव्हां तो रागावला व ह्मणूं लागला कीं, मला मुद्दाम कशास उठवितां? वालपोलनें जेव्हां त्यास त्याचा बाप मेल्याचें कळविलें तेव्हां त्यास तें खरेंच वाटेना व तो पुनः कुशीस वळला. पण वालपोलनें तें कांहीं ऐकिलें नाहीं. आपण आतां इंग्लंदचे दुसरे जार्ज राजे झाला असा तो एकसारखा त्याच्या कानांत ओरडूं लागला. त्याची खात्री व्हावी ह्मणून जर्मनींतून टौनशेंडनें पाठविलेलें पत्र जेव्हां त्याला त्यानें दाखविलें, तेव्हां त्याची खात्री झाली. नंतर प्रिव्हिकौन्सिलपुढें नव्या राजास जी शपथ घ्यावी लागते त्याचा मसुदा कोणास तयार करावयास सांगावयाचा ह्मणून वालपोलनें त्यास विचारिलें. तें काम जार्ज आपणांस सांगेल अशी वालपोल यास आशा होती; पण त्याची निराशा झाली. राजानें "कांप्टनला" ह्मणून ह्मटलें आणि त्यास जा ह्मणून सांगितलें. वालपोलला अर्थात् वाटलें कीं, आपलें वैभव संपलें.

हा कांप्टन सर हेन्री कांप्टन असून १७१५ त तो कामन्स सभेचा स्पीकर निवडला गेला होता. तो पूर्वीपासूनच जार्जाच्या मर्जीतला होता. तो आपला साधारण माणूस होता, आणि त्याच्या अंगीं मुत्सद्याचें सामर्थ्य मुळींच नव्हतें. ह्मणून वालपोल जेव्हां राजाचा निरोप घेऊन त्याच्याकडे आला, तेव्हां तो असें ह्मणाला ह्मणतात कीं, हा मसुदा कसा तयार करावयाचा हें आपल्यास बिलकुल माहित नाहीं, तुह्मींच तो मला तयार करून द्या ह्मणजे मी राजाकडे नेऊन देतों. तेव्हां वालपोलनें तो त्यास करून दिला.

वालपोलला राज्यकारभारांत न घेण्याचा जार्जानें आग्रह कायम ठेविला असता तर त्याच्या कारकीर्दीचा इतिहास निराळ्याच रीतीनें लिहावा लागला असता. राजा इतर देशांच्या भानगडींत सांपडला असता आणि कदाचित् कर्जबाजारी होऊन बसला असता. त्याची बायको जी क्यॅरोलाईन जिला तो ती आपल्या अगदीं हुकुमांत आहे ह्मणून समजे, पण जिनें त्याला आपला खरोखर बंदा गुलाम करून ठेविलें होतें, तिच्या शहाणपणामुळें हें विघ्न टळलें. ही क्यॅरोलाईन राणी मोठी विलक्षण स्त्री होती. ती तरुणपणीं सुंदर दिसे व हल्लींही तिचा चेहरा मोहक होता. ती चांगली शिकलेली होती. ती नेहमीं लिहित वाचीत असे. तिला पुस्तकें, कला, राजकारण आणि तात्त्विक विचार ह्यांचा नाद असे. पण तिच्या सर्व गुणांमध्यें तिला व देशाला अत्यंत महत्वाचा गुण तिच्यांत हा होता कीं, तिला आपल्या नवऱ्यास आपल्या कह्यांत ठेवण्याचें सामर्थ्य होतें. ती त्याच्या मर्जीप्रमाणें वागून व त्याच्या अगदीं हुकुमांत राहिल्यासारखें करून खरोखर त्याला आपल्या हुकुमांत ठेवीत असे. तिच्या खटपटीनें वालपोल अधिकारावर कायम राहिला किंवा पुनः अधिकारारूढ झाला असें ह्मटलें तरी चालेल. राजा लोभी आहे हें तिला माहीत होतें ह्मणून तिनें त्याच्या मनांत असें भरवून दिलें कीं, तूं वालपोलला कायम ठेवशील तर तो तुला पार्लमेंताकडून चांगले पैसे देववील; तितके कांप्टन देणार नाहीं. तें राजास रुचलें आणि कांप्टनचा लवकरच अस्त होऊन वालपोलचा पुनः उदय झाला.

पहिला जार्ज मेल्यावर तारीख १९ जून रोजीं पार्लमेंत भरलें; पण ती बैठक नांवाचीच होती ह्मणून तीं लागलीच बरखास्त होऊन पार्लमेंत पुनः २७ तारखेला भरलें. तेव्हांचा कायदा असा असे कीं, एखादा राजा मेला ह्मणजे त्यानें भरलेलें पार्लमेंत त्याच्या मरणानंतर सहा महिन्यांच्या आंत बरखास्त करावें. नंतर रीतीप्रमाणें राजाचें भाषण झालें. राजास इंग्रजी येत होतें, ह्मणून तें भाषण त्यानें स्वतःच वाचिलें. बाप मेल्याबद्दल मला जितकें दुःख झालें आहे, तितकें तुह्मांलाहि झालें

असेलच असें तो ह्मणाला, आणि तें निःसंशय खरें होतें. कारण दोघांसहि सारखेंच ह्मणजे बहुतेकांशीं शून्य दुःख झालेलें होतें. ह्या भाषणानंतर रीतीप्रमाणें पार्लमेंतानें राजास मानपत्र दिलें. नंतर राजास खाजगी खर्चाकरितां वर्षाची नेमणूक किती करून द्यावयाची याजवर बराच वादविवाद होऊन ती आठ लाख तीस हजार पौंड, ह्मणजे पहिल्या जार्जापेक्षां एक लाख तीस हजार पौंड जास्त असावी, असें ठरलें. या प्रसंगीं शिपेन नांवाच्या एका प्रामाणिक व धीट टोरीनें ही रकम वाढविण्याचें कांहीं कारण नाहीं असें जोरानें प्रतिपादन केलें; पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. पुढें ७ आगष्ट रोजीं हें पार्लमेंत बरखास्त होऊन नव्या निवडणुकी झाल्या.

नवें पार्लमेंत २३ जानेवारी १७२८ रोजीं भरलें. त्यांत वालपोलच्या पक्षाला पूर्वीपेक्षांही जास्त सभासद निवडून आले. कांप्टन यास सरदार बनविलें असल्यामुळें नवा स्पीकर निवडण्याची अवश्यकता उत्पन्न झाली. तदनुसार ऑर्थर ऑन्स्लो या सभासदाची त्या हुद्यावर निवड झाली. ऑन्स्लो हा १६९१ त जन्मला असून १७१९ पासून तो पार्लमेंताचा सभासद होता. नंतर जुलईत त्यास प्रिव्हि कौन्सिलचा सभासद केलें. ह्याच्या अंगीं स्पीकरास लागणारे गुण उत्तम आहेत असें मागून नजरेस आलें, व त्यामुळें स्पीकर ऑन्स्लो या नांवानेंच तो प्रसिद्ध झाला. तो फारच निःपक्षपाती व निस्पृह होता.

पुल्टेनी आणि बोलिंग्ब्रोक ह्यांनीं ऐकमत्य करून वालपोलला विरोध करण्याचा क्रम आरंभिला. त्यांनीं क्रॅफ्ट्स्मन् नांवाचें पत्र काढिलें हें आह्मीं मागें सांगितलेंच आहे. ह्या दोघांशिवाय शिपेन व सर विलियम विंडहॅम हे आणखी त्यास विरोधी होते. पुल्टेनी हा वालपोलवर रुसलेल्या व्हिग लोकांचा अग्रणी होता आणि शिपेन हा जाकोबाइट लोकांचा पुढारी होता. इतर टोरी लोक विंडहॅमच्या धोरणानें चालत असत. पुल्टेनी व त्याचे व्हिग अनुयायी यांनीं "धि पेट्रियट्स" किंवा देशाभिमानी, अशी संज्ञा घेतलेली होती. या देशाभिमानी ह्मणविणाऱ्या टोळींत

पुष्कळ मंडळी तरुण असल्यामुळें वालपोल त्यांस "थि बॉइज" किंवा पोरें ह्मणून ह्मणत असे. १७२९ सालीं प्रधानमंडळावर हल्ला करण्यास पुल्टनी यास चांगली संधि सांपडली. ता० ७ फेब्रुवारी रोजीं प्रधानांनीं अशी सूचना पार्लमेंतापुढें आणिली कीं, हेसियन नामक १२,००० जर्मन सैन्य राजानें आपल्या पदरीं ठेविलें आहे त्याच्या खर्चासाठीं दोन लाख पन्नास हजार पौंडांची मंजुरी मिळावी. पुल्टेनीनें रागानें प्रधानांस असें विचारिलें कीं, तुह्मी जें हें परराष्ट्रीय सैन्य नोकरीस ठेविलें आहे तें काय ह्मणून ? इंग्लिश लोकांचें धैर्य आजच गळलें कीं काय, कीं ते फौजेंत राहत नाहींत ? तो ह्मणाला हे लोक इंग्लंदसाठीं ठेविलेले नाहींत, तर हॅनोवरसाठीं आहेत; आणि असें जर आहे तर इंग्लंदनें त्यांचा खर्च काय ह्मणून द्यावा ? ह्या त्याच्या बोलण्यास विंडहॅमनें दुजोरा दिला. तेव्हां वालपोल यास उत्तर देण्यास उठणें भाग पडलें. त्याच्या भाषणाचा मुख्य आशय असा होता कीं, हेसियन लोकांचें मोठें सैन्य ठेविल्यामुळें आपल्यास युद्ध टाळण्याचें सामर्थ्य आलेलें आहे. तो ह्मणाला आस्ट्रियाचा बादशाह स्पेनच्या मदतीनें लढाईची तयारी करीत होता, तो हें मोठें सैन्य पाहूनच तहास कबूल झाला, एरवीं झाला नसता; इ० इ०. तेव्हां त्याची बाजू सांवरली आणि वरील सूचना मोठ्या बहुमतानें पसार झाली. विरुद्ध पक्षाचें सांत्वन करण्यासाठीं प्रधानांनीं एवढीच प्रतिसूचना कबूल केली कीं, या परकी फौजेनें कपडे वापरावयाचे ते इंग्लंदचे वापरावे, आपल्या देशचे वापरूं नयेत.

या सालीं पुष्कळ इंग्रज व्यापाऱ्यांचे स्पॅनिश लोकांविरुद्ध पार्लमेंताकडे अर्ज येऊं लागले. त्यांचा मुख्य मुद्दा असा होता कीं, आह्मीं अमेरिकेंतील आपल्या वसाहतींशीं व्यापार करीत असतां स्पॅनिश लोक आपल्यास हरकत आणितात व तेणेंकरून आपलें नुकसान होतें, ह्मणून सरकारानें याचा बंदोबस्त करावा. दक्षिण व उत्तर अमेरिका ह्यांचे दरम्यान युकॅटनच्या द्वीपकल्पानजीक क्यॉंपीची नांवाच्या उपसागरांत लागवुड नांवाचें लांकूड तोडण्यासाठीं इंग्लिशांनीं लहान लहान

वसाहती केल्या होत्या. हा व्यापार बंद करण्याचा आपल्यास हक्क आहे असें स्पॅनिश लोक ह्मणत होते. त्यावरून इंग्लंद व स्पेन ह्यांचा तंटा होतो कीं काय अशी शंका उत्पन्न झाली.

पण हीच वेळ पुल्टेनी व त्याचे अनुयायी ह्यानीं वालपोलला त्रास देण्यासाठीं साधून घेतली. वरील अर्जाच्यासंबंधानें लार्डांच्या सभेंत वाद चालला असतां असें दिसून आलें कीं, पहिल्या जार्जानें स्पेनच्या राजास असें लिहिलें होतें कीं, जिब्राल्टरचा किल्ला परत मिळावा अशी जी आपली इच्छा आहे, तीस मी अनुकूल आहें व पार्लेमेंताच्या संमतीनें मी त्या प्रश्नाचा लवकरच निकाल करून घेईन. हें ऐकून इंग्लिश लोकांस मोठा राग आला आणि पेट्रियट लोक प्रधानांस असा दोष देऊं लागले कीं, तुह्मी गतराजास असें लिहिण्याविषयीं सल्ला कसा दिला? नंतर मग दोन्ही सभांत यासंबंधानें पुष्कळ जोराचा वादविवाद होऊन शेवटीं दोघांनीं मिळून राजास मानपत्राच्या रूपानें असा अर्ज केला कीं, स्पेनचा राजा जिब्राल्टर व मिनोर्का यांसंबंधानें आपलें मागणें अगदीं टाकून देईल अशी खटपट आपण करावी. त्याप्रमाणें ता. २९ मार्च १७२९ रोजीं राजानें तसें करितों ह्मणून आश्वासन दिलें तेव्हां तें प्रकरण तितक्यापुरतें मिटलें. प्रधानांनीं स्पेनशीं सेव्हिली येथें इ. स. १७२९मध्यें नवीन तह केला, त्यांत फ्रान्सदेशासही गोंविलें होतें. त्या तहानें अमेरिकेसंबंधी इंग्लंद व स्पेन यांचे तंटे तितक्यापुरते मिटले. स्पेननें जिब्राल्टरसंबंधानें आपलें मागणें, अप्रत्यक्षरीत्या तरी, मागें घेतलें. या एकंदर ओरडींत वालपोलला त्रास देण्यापलीकडे विशेषसा अर्थ नव्हता. जिब्राल्टर व मिनोर्का बेट हीं १७०४च्या सुमारास इंग्लंदनें घेतलीं. पैकीं पहिलें परत देण्याविषयीं आज बरेच दिवस विचार चाललेला होता. खुद्द पेट्रियट लोकांपैकींदेखील कांहीं वालपोलच्या विरुद्ध होण्यापूर्वी या गोष्टीस बहुश: अनुकूल होते. मिनोर्का बेट पुढें एमियेन्सच्या तहानें १८०२ सालीं स्पेनदेशास परत दिलेंच. तेव्हां या ओरडींत काय राहिलें? वालपोलला त्रास द्यावयाचा इतकेंच.

आजपर्यंत वालपोलच्या नांवाबरोबर टौनशेंडच्या नांवाचा उल्लेख आलाच आहे. हा लार्ड असून राज्यकारभारांत आजपर्यंत त्याचें नांवाचें तरी महत्व जास्त होतें. पण आतां वालपोलचें प्रस्थ फार माजत चाललें. क्यॅरोलाईन राणी त्यासच जास्त महत्व देऊं लागली; अर्थात् राजाही त्यासच महत्व देऊं लागला. हें टौनशेंड यास खपेना. तेव्हां ह्या मेव्हण्यामेव्हण्यामध्यें बिनसत चाललें आणि अखेरीस एकदां उघड तंटा झाला. नंतर लार्ड टौनशेंडनें राजीनामा दिला व लार्ड हॅरिंग्टन याची सेक्रेटरी आफ् स्टेट याचे जागीं नेमणूक केली. तेव्हांपासून वालपोलला प्रधानमंडळांत कोणीच प्रतिस्पर्धी राहिला नाहीं.

१७३१ सालीं इंग्लंदच्या न्यायखात्यांत एक महत्वाचा फेरफार घडून आला. आजपर्यंत कोर्टांतून फिर्यादी वगैरे सर्व काम ल्याटिन भाषेच्या द्वारा केलें जात असे. तें आतां इंग्लिश भाषेच्या द्वारानें करावें असें ठरलें. ह्यास पुष्कळ लोकांनीं प्रथम जबर विरोध केला. त्यांचें मुख्य ह्मणणें असें होतें कीं, असें केल्यास ल्याटिन भाषेचा अभ्यास लोक करणार नाहींत व त्यामुळें त्या भाषेमध्यें असलेल्या ग्रंथांतील ज्ञानाच्या फायद्यास इंग्लिश लोक अंतरतील; पण अर्थात् ही भीति अगदीं निष्कारण होती.

१७३२ सालीं अमेरिकेंतील इंग्लिश वसाहतींबद्दल त्या कामावर नेमिलेल्या कमिशनरांनीं आपला रिपोर्ट प्रसिद्ध केला. त्यावरून वसाहतींची त्यावेळची व्यापाराच्या वगैरेसंबंधानें स्थिति कशी होती आणि वसाहती कशासाठीं असाव्या असें तेव्हांच्या इंग्रज लोकांस वाटे, ह्याची चांगली कल्पना आपणास होते. त्यावेळीं ह्या वसाहतींच्या कारभाराचे तीन प्रकार असत. कांहींवर खुद्द गादीचा कारभार चाले. उदाहरणार्थ:—नोव्हास्कोशिया, न्यूहँपशायर, न्यूयार्क, व्हर्जीनिया, बर्मुडा, जमेका इत्यादि. कांहींवर खाजगी मालकांचा ताबा असे. उदाहरणार्थ, पेन्सिल्व्हेनिया व मेरिलंड. कांहींमध्यें मिश्रकारभार असे; ह्मणजे लोक कायदेसभा निवडीत व गादीकडून गव्हरनराची नेमणूक होई. असो. ह्या सर्व

वसाहतींतून कारागिरीचे पदार्थ फारच अल्प उत्पन्न होत असत. कारण इंग्लिश लोकांची इच्छा अशी असे कीं, ह्या वसाहतींनीं स्वतः कोणतेहि कारागिरीचे पदार्थ उत्पन्न न करतां ते इंग्लंदापासून विकतच घ्यावे व अशा रीतीनें इंग्लंदची तुंबडी भरावी. सारांश, वसाहती ह्मणजे इंग्लंदच्या दुभत्या गाई होत; त्यांनीं स्वतः मिळवून खावें व इंग्लंदाकरितां दूध द्यावें, अशी तेव्हांच्या लोकांची कल्पना असे.

वालपोल हा जमाबंदीच्या कामांत मोठा निष्णात होता हें आह्मी मागें सांगितलेंच आहे. तसेंच इंग्लंदच्या कलाकौशल्यास व व्यापारास उत्तेजन येऊन सरकारला कर सुखानें मिळावे, एतदर्थ त्यानें कशा खटपटी चालविल्या होत्या याचेंहि मागें दिग्दर्शन केलेंच आहे. त्याच प्रकारचा कांहीं उद्योग त्यानें यासमयीं आरंभिला होता. त्याच्या उद्योगाचें मुख्य धोरण हें होतें कीं, आयात मालावरील जकात कमी करावी. असें कीं, तेणें करून जकात बुडवून चोरून माल देशांत आणण्याचा मोह व्यापाऱ्यांस पडतो तो कमी व्हावा. आणि अशा रीतीनें सरकारी तिजोरीचें जें नुकसान होईल तें भरून काढण्यासाठीं जिन्नस देशांत येऊन तो गिऱ्हाइकांमध्यें खपूं लागला ह्मणजे त्याच्यावर व देशांत उत्पन्न होणाऱ्या जिनसावर कर बसवावा. ह्याप्रमाणें त्यानें अगोदरच चहा, काफी व चोकोलेट ह्या जिनसांवरील आयात जकात काढून त्यांजवर ही अंतर्जकात बसविली होती. १७३२ सालीं त्यानें मिठावरील कर पुनः सुरू केला. ह्यासाठीं ता. ९ फेब्रुवारी १७३२ रोजीं जें बिल त्यानें पार्लमेंटापुढें आणिलें त्यास दोन्ही सभांत जबर विरोध झाला. वालपोल ह्मणाला, हा कर मी बसवितों ह्याचें कारण तो सर्वांस त्यांच्या त्यांच्या स्थितीप्रमाणें द्यावा लागतो आणि अशा रीतीनें कराचें ओझें सर्वांवर शक्तीप्रमाणें पडतें हें होय. पण ही अर्थात् चूक होती. मीठ श्रीमान् व गरीब यांस बहुधा सारखेंच लागतें. श्रीमान् झाला ह्मणजे तो जास्त मीठ खातो असें नाहीं. तेव्हां ह्या कराचें ओझें सर्वांवर शक्तीच्या मानानें सारखें न पडतां गरीबांवर जास्त पडतें व श्रीमंतांवर कमी पडतें.

ह्मणून पुल्टेनीला वालपोलचा वरील कोटिक्रम ह्मणून पाडण्यास मुळींच श्रम पडले नाहींत. त्यानें त्याचा अगदीं चेंदामेंदा करून टाकिला. तो ह्मणाला प्रत्येक माणसामागें हा कर निदान एक शिलिंग द्यावा लागेल; ह्मणजे चार पांच माणसांच्या गरीब कुटुंबाला वर्षाचे चार पांच शिलिंग द्यावे लागतील; ही रक्कम श्रीमंतास क्षुल्लक वाटते, पण तीच गरीबास फार जड जाते; इत्यादि इत्यादि. सर विलियम विंडहॅमनें दुसरा एक जबर आक्षेप या बिलाविरुद्ध आणिला. तो ह्मणाला, हा कर गोळा करण्याकरितां सरकारास कर वसूल करणारांची एक फौजच ठेवावी लागेल. आणि हे प्रधानांचे मिंदे लोक गांवोगांव पसरलेले असल्यामुळें पार्लमेंताचे सभासद निवडण्याच्या कामीं प्रधानांच्या वतीनें खटपटी करितील आणि अशा रीतीनें लोकस्वातंत्र्यास धक्का बसेल. इतका विरोध झाला तरी शेवटीं कामन्स सभेंत हें बिल पसार झालें, आणि ता. २२ मार्च १७३२ रोजीं लार्डांच्या सभेकडे गेलें. तेथें ता. २७ रोजीं त्या बिलाच्या दुसऱ्या वाचनाच्यावेळीं मोठा कडाक्याचा वादविवाद झाला; आणि नुक्ताच आयर्लंदांतून परत आलेला जो लार्ड कार्टरेट त्यानें त्याजवर प्रतिकूल टीका करण्याच्या कामीं पुल्टेनी व विंडहॅम यांजवरहि ताण केली. पण तेथेंहि तें पास झालें. तथापि या वादविवादावरून लोकांचा असा गैरसमज झाला कीं, करांच्यासंबंधाचें वालपोलचें धोरण सर्वच चुकलेलें आहे.

वालपोलच्या मनांत आज पुष्कळ दिवस एक नवीन गोष्ट घोळत होती. ती ही कीं, तंबाकू व मद्य यांजवरील जकातींत फेरफार करावे. ह्या विषयासंबंधानें तो कांहीं तरी बिल तयार करीत आहे, अशी पुष्कळ दिवस कुणकुण होती. शेवटीं तारीख ७ मार्च १७३३ रोजीं वालपोलनें अशी सूचना आणिली कीं, ह्या दोन जिनसांवरील जकातींच्या संबंधानें मी कांहीं फायदेकारक फेरफार सुचविणार आहें; तर त्याचा विचार करण्याकरितां तारीख १४ रोजीं सगळ्या सभेची कमिटी बसावी. त्याप्रमाणें त्या तारखेस कमिटी भरली आणि वालपोलनें आपली सूचना तिजपुढें ठेविली. तंबाकूच्यासंबंधानें त्याची सूचना अशी होती कीं, त्याजवरील आयात जकात फार कमी करावी व अंतर्जकात वाढवावी.

त्यासाठीं देशांत जिकडे तिकडे तंबाकू सांठवून ठेवण्यासाठीं सरकारी वखारी ठेवाव्या; आणि तेथून देशांत विकण्यासाठीं किंवा बाहेर पाठविण्यासाठीं जे व्यापारी तंबाकू विकत घेतील त्यांजवर अंतर्जकात घ्यावी. तो ह्मणाला, अशा रीतीनें देशांत तंबाकू येण्यास उत्तेजन येईल; आयात जकात न देतां चोरून तंबाकू आणण्याची प्रवृत्ति कमी होईल; करांचें उत्पन्न वाढेल आणि लोकांचा फायदा होईल. ही त्याची सूचना २०९ विरुद्ध २३६ या बहुमतानें पसार झाली. पण त्यावरून विरुद्ध मताचा जोर केवढा आहे हें स्पष्ट दिसून आलें. कारण आजपर्यंत वालपोलला फारच दांडगें बहुमत मिळत असे. तें यावेळीं नाहींसें झालें. ता. १४ एप्रिल रोजीं वरील सूचनेला अनुरूप असें बिल कामन्स सभेपुढें त्यानें आणिलें खरें; पण लोकांनीं जिकडे तिकडे त्याच्या विरुद्ध मोठीच चळवळ आरंभिली. कामन्स सभेच्या गृहासभोंवतीं लोकांच्या झुंडीच्या झुंडी जमूं लागल्या. जे सभासद बिलास अनुकूल होते त्यांस शिव्या व लाथाबुक्याही मिळूं लागल्या. खुद्द वालपोल यासही मार खाण्याचे प्रसंग येऊ लागले. इकडे पेट्रियट लोक व जाकोबाईट लोक हे लोकांना जास्त चिथवीतच होते. ते ह्मणाले, आज हे कर बसवूं दिल्यास उद्यां वालपोल अन्न, वस्त्र वगैरे प्रत्येक चिजेवर कर बसवूं लागेल व सर्वांस मोठा उपद्रव होईल. लोकांस हें सर्व खरें वाटलें व ते जास्तच पिसाळले. तें पाहून ता० ११ एप्रिल रोजीं त्यानें असें जाहीर केलें कीं, मी आपलें बिल परत घेतों. तेव्हां सर्वत्र आनंदच आनंद झाला. लोक देवळांतून घंटा वाजवूं लागले, घरांतून दीपोत्सव करूं लागले, रस्त्यांतून होळ्या पेटवूं लागले आणि आनंदानें ओरडू लागले. सारांश, एखाद्या मोठ्या शत्रूवर जय मिळविला असतां जसा लोकांस आनंद व्हावा तशी यावेळीं स्थिति झाली. पण वालपोलचें तत्त्व बरोबर होतें. हल्लीं करांची रचना त्याच पद्धतीवर झालेली आहे. पण त्यावेळीं लोकांचीं मतें यासंबंधानें फार आकुंचित होतीं. सारांश, वालपोल हा अनिर्बंधव्यापारतत्त्व ओळखीत होता व तेव्हांच्या सामान्य जनांस त्याचा गंधहि नव्हता.

---

# प्रकरण सातवें.

## कौटुंबिक कलह.

मागच्या प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें वालपोलनें आपलें अंतर्जकातीचें किंवा अपकारीचें बिल परत घेतल्यावर ज्यांनीं ज्यांनीं ह्मणून त्यास विरोध केला होता त्यांचा त्यांचा तो समाचार घेऊं लागला. यापैकीं लार्ड चेस्टरफील्ड हा एक होता. ही एक विलक्षण मूर्ति होती. ह्याचा जन्म १६९४ त झालेला असल्यामुळें ह्यावेळीं त्यास ३९ वें वर्ष होतें. तो पुष्कळ देश फिरलेला असून त्यानें पुष्कळ प्रकारचे अनुभव घेतलेले होते. तो मोठा महत्वाकांक्षी आणि धीट असे. आपण दुराचरण करितों असें ह्मणण्यांतच त्यास फुशारकी वाटे. पहिला जार्ज मरून दुसरा गादीवर बसला तेव्हां राजास मानपत्र देण्याची जी लार्डांच्या सभेपुढें सूचना आली ती ह्यानेंच आणिलेली होती. त्यानंतर त्यानें परराष्ट्रांकडील वकिली खात्यांत नोकरी केलेली होती. ह्याबद्दल त्यास मोठी पदवी देऊन राजानें आपल्या खाजगी खात्यांत घेतलें होतें. वालपोलनें त्याची यावेळीं ती नोकरी काढून घेतली. नंतर लार्डांच्या सभेंत आपली बाजू बळकट करण्याकरितां त्यानें आपल्या दोन मित्रांस सरदार बनविलें. अटर्नी जनरल फिलिप यार्क ह्यास लार्ड हार्डविक बनवून चीफ् जस्टिसची जागा दिली आणि सालिसिटर जनरल टाल्बट यास लार्ड टाल्बट बनवून लार्ड चान्सलरची जागा दिली. पैकीं दुसरा पुढें लवकरच मेला आणि पहिला त्याच्या जागीं लार्ड चान्सलर झाला. तो त्या जागेस फारच योग्य होता.

ता. १३ मार्च १७३४ रोजीं विलियम् ब्राम्ली नामक एका सभासदानें कामन्स सभेपुढें असें बिल आणिलें कीं, पार्लमेंताच्या सभासदांच्या निवडणुकीबद्दल सात वर्षांचा जो कायदा आहे तो रद्द करावा आणि यापेक्षां कमी मुदतीनें नवीं पार्लमेंतें भरवावीं. या बिलाचा खरा हेतु

वालपोलला अधिकारावरून दूर करावा हा होता. विरुद्ध पक्षास असें वाटे कीं, पार्लमेंताची आयुर्मर्यादा सात वर्षांची असल्यामुळें वालपोल यास सभासदांस लांच देऊन आपलेसे करून ठेवण्यास चांगलें फावतें; करितां पार्लमेंताची मुदत कमी करावी. या बिलावरील वादविवादांत सर विलियम विंडहॅम याचें भाषण फार झणझणीत झालें. तो वालपोल यास अप्रत्यक्ष रीतीनें फार टोंचून बोलला. त्याच्या बोलण्याचा आशय असा होता :—समजा कीं, एखादा राजा निरनुभवी आहे आणि त्याचा मुख्य प्रधान श्रीमान् असून तो सभासदांस भरपूर लांच देऊन आपलेसे करून घेणारा आहे. तर अशा प्रधानास पाहिजे तें करितां येईल. तो कदाचित् राष्ट्राचें नुकसान करील, व्यापाऱ्यांस लुटील, भलभलते कर बसवील, पाहिजे तें करील. त्यास काढून टाकणें अशक्य होणार. कारण पार्लमेंत पडलें त्याच्या मुठींत. आतां अनुभवी राजा मिळविणें किंवा असल्या माणसास प्रधान होऊं न देणें हें आपल्या स्वाधीनचें नाहीं. पार्लमेंत दीर्घायुषी असल्यामुळें सभासदांस लांच देऊन हळू हळू त्यांस वश करून घेण्याची जी असल्या माणसास संधि सांपडते ती, पार्लमेंत अल्पायुषी करून त्याच्या हातून काढून घेणें आपल्या स्वाधीन आहे; तेवढें तरी आपण करून घेऊंया. या बोलण्याचा अर्थ स्पष्ट होता. तो कोणाच्या चिथावणीवरून हें बोलत आहे हें वालपोलच्या लक्ष्यांत ताबडतोब आलें. त्याला पाठिंबा अर्थात् बोलिंग्ब्रोकचा होता. तो वालपोलचा द्वेष कां करीत होता हें मागें सांगितलेंच आहे. तो आतां वालपोलचा सूड उगवून घेत होता. तो पार्लमेंताचा सभासद नसल्यामुळें त्यास असें दुसऱ्याच्या तोंडानें पाणी प्यावें लागत होतें. वालपोलनें हें सर्व एकदम ताडिलें आणि आपल्या भाषणांत अशीच कल्पना करून बोलिंग्ब्रोक ह्याचीं एकंदर बिंगें अशीं बाहेर काढिलीं कीं, इंग्लिश लोकांस तो अगदीं तिरस्कार्य वाटूं लागला. कारण त्या लोकांस आपल्या देशाविरुद्ध खटपटी करणारा माणूस एरवीं कितीही हुषार असला तरी बिलकुल खपत नसे. त्यामुळें बोलिंग्ब्रोक यास मुकाट्यानें पुनः देशत्याग करावा लागला. याप्रमाणें वालपोल शेवटीं विजयी झाला. याच-

येळीं नव्या निवडणुकी करण्याची वेळ नजीक येऊन ठेपली होती. जुनें पार्लमेंत ता. १६ एप्रिल १७३४ रोजीं बरखास्त केलें. दोन्ही पक्षांनीं मताधिक्य आपल्या बाजूचें करून घेण्याकरितां आपली शिकस्त केली. वालपोलनें केवळ हातानें नव्हे तर जणूं काय पोत्यानें पैसे पेरिले. त्यामध्यें त्यानें आपले खासगी पैसेदेखील खर्चण्यास मागेंपुढें पाहिलें नाहीं. इकडे पेट्रियट लोक वालपोलवर शिव्यांचा वर्षावही भरपूर करीतच होते. पण त्यांस जरी पूर्वींपेक्षां जरा जास्त मतें मिळालीं, तरी एकंदरींत वालपोलचीच सरशी झाली.

नवें पार्लमेंत तारीख १४ जानेवारी १७३५ रोजीं भरलें. आर्थर आनस्लो यासच पुनः स्पीकर निवडिलें. राजाचें भाषण २३ तारखेस झालें. त्यांत परराष्ट्रीय गोष्टींचा सर्व उल्लेख होता. इंग्लंदच्या गृहस्थितीबद्दल किंवा नव्या कायदेकानूंबद्दल एकही शब्द नव्हता. यावेळीं यूरोपांत एक लढाई बरेच दिवस रेंगाळत चालली होती. या लढाईचा पोलंदशीं संबंध होता. तेथील राजा दुसरा ऑगस्टस हा १७३३ च्या फेब्रुवारींत मेला. तेव्हां फ्रान्सचा राजा पंधरावा लुई याला असें वाटलें कीं, आपला सासरा स्टानिस्लास यास त्या गादीवर पुनः बसविण्यास ही संधि बरी आहे. 'पुनः' ह्मणण्याचें कारण पूर्वीं दोनदां हे राजश्री तेथें विराजित झालेले असून दोन्ही वेळां पदच्युत झालेले होते. पोलंदची राज्यव्यवस्था लोकायत्त असून तेथील राजा निवडला जात असे; पण ती व्यवस्था अशी चमत्कारिक होती कीं, तेणेंकरून आणीबाणीच्या प्रसंगीं निवड करणाऱ्या कोणत्याही एका तटास इतरांस सपशेल हाणून पाडितां येत असे, व यामुळें यूरोपांतल्या इतर राजांस पोलंदच्या कारभारांत हात घालण्यास फावत असे; आणि त्यांमध्यें जो बलिष्ठ असेल त्याच्या धोरणानें नव्या राजाची निवड होत असे. असो.

फ्रान्सचा राजा स्टानिस्लासच्या वतीनें खटपट करीत होता हें वर सांगितलेंच आहे. इकडे आस्ट्रिया व रशिया यांची खटपट मृत राजाचा पुत्र ऑगस्टस याच्या वतीनें चालली होती. हा यावेळीं साक्सनीचा

राजा किंवा इलेक्टर होता. ह्मणून फ्रेंच राजानें ऑगस्टस यास जरी पुनः गादीवर विराजमान केलें तरी साक्सन पक्षानें त्यास पोलंदची राजधानी वार्सा येथून पुनः हाकलून देऊन ऑगस्टस याची तिसरा आगस्टस या नांवानें द्वाही फिरविली. हें पाहून फ्रेंच राजानें आस्ट्रि-याचा बादशहा फ्रेडरिक याच्याशीं युद्ध सुरू केलें. दुसऱ्या जेम्साचा दासीपुत्र मार्शल बेरिक यानें ऱ्हाइन नदी ओलांडून केलचा किल्ला सर केला. शिवाय फ्रान्सनें स्पेन व सार्डिनिया यांच्याशीं सख्य केलें होतें. फ्रान्स व स्पेन या देशांतील राजांचें तर १७३३ सालीं गुप्त संगनमत झालेलें होतें; हें पुष्कळ वर्षांतीं मागाहून बाहेर पडलें. त्यास फॅमिली कॉम्पॅक्ट असें ह्मणतात. कारण हे दोन्ही राजे एकाच वंशाचे ह्मणजे बोर्बोन घराण्यांतील होते. बादशहाचा मुख्य सेनापति प्रसिद्ध प्रिन्स युजीन हा होता; पण त्याचें ह्या सैन्यापुढें कांहीं चालेना. तेव्हां बादशाह इंग्लंदजवळ मदत मागूं लागला. राजा व राणी दोघेंहि मदत देण्यास उत्सुक होतीं. कारण जार्जास लढाईची मोठी हौस वाटे. पण वालपोल विरुद्ध होता. त्याचें मत असें होतें कीं, देशांत शांतता राखून जी त्याची भरभराट होते ती लढाईत कधींही होत नाहीं. शिवाय त्यास असें वाटत होतें कीं, पोलंदच्या गादीसंबंधाच्या तंट्यांत इंग्लंदनें शिरण्याचें मोठेंसें प्रयोजन नाहीं. त्यास हें गुप्त संगन-मत झाल्याचें माहीत नसावें. कारण त्या संगनमताचा उद्देश इंग्लंद-पासून जिब्राल्टर परत घ्यावें, इटालीमध्यें लढाई करून बोर्बोन वंशाचा प्रवेश करवावा, इंग्लंदचें होईल तितकें नुकसान करावें, अशा प्रका-रचा होता. पण हें त्यांस माहीत असतें तरी त्यानें आपलें धोरण बदललें असतें असें खात्रीनेंच ह्मणतां येत नाहीं. कसेंहि असो तो युद्धांत शिरला नाहीं. मात्र शिरावयाचें नाहीं असें न ह्मणतां मध्य-स्तीची ह्मणून खटपट करूं लागला; आणि शेवटीं त्यांत त्यास यश आलें. कारण १७३९ त असें ठरलें कीं, ऑगस्टस यास पोलंदचा राजा कबूल करावें, स्टानिस्लास यानें राजा ही पदवी कायम ठेवून लोरेन प्रांतावर राज्य करावें; आणि त्याच्या पश्चात् तो प्रांत फ्रान्सास

मिळावा. १८७० च्या रणानंतर ह्याच प्रांत पुढें जर्मनीस फ्रान्साकडून परत मिळाला! स्पेनचा राजपुत्र डान कॉर्लोस ह्यास सिसिली बेटाचा राजा केला. अशा रीतीनें हा तंटा इंग्लंदास युद्धांत पडावयास न लागतां मिटला.

दुसऱ्या जार्जाचें कुटुंब अंमळ मोठेंच होतें. त्यास दोन मुलगे व पांच मुली होत्या. वडील मुलाचें जन्म १७०७ च्या आरंभींच झालेलें असून त्याचें नांव फ्रेडरिक असें होतें. ह्यास १७२७ त प्रिन्स आफ् वेल्स ही पदवी मिळालेली होती. दुसरा मुलगा आगस्टस, ड्यूक आफ् कम्बर्लंड याचें जन्म १७२१ झालेलें होतें. मुली पांच होत्या. त्यांचीं नांवें ॲन, आमीलिया क्यॅरोलाईन, मेरी व लुइसा अशीं होतीं. वडील पुत्र प्रिन्स आफ् वेल्स हा बाप गादीवर बसल्यावरच इंग्लंदास आलेला होता. त्याला पुस्तकांचा व गायनवादनाचा कांहीं नाद होता असें ह्मणतात. पण इंग्लंदांत आल्यावर त्यानें बापाचा व आजाचा कित्ता गिरविण्यास सुरवात केली. कधीं ह्या स्त्रीकडे तर कधीं त्या स्त्रीकडे तो आपला रुमाल फेंकूं लागला व त्यापैकीं कांहीं स्त्रिया तो मोठ्या उत्सुकतेनें झेलूं लागला. कांहीं लोक असें ह्मणतात कीं, यानें जो हा मार्ग स्वीकारिला तो त्यास आवडत होता ह्मणून नव्हे, तर त्याला वाटे कीं, आपल्यासारख्या योग्यतेच्या माणसानें असें केलेंच पाहिजे ; नाहींतर आपणास कदाचित् कमीपणा येईल.

प्रिन्स फ्रेडरिक इंग्लंदास आल्यावर थोड्याच दिवसांनीं प्रिन्सेस ॲन हिचें लग्न झालें. ती चोवीस वर्षांची होईपर्यंत अविवाहितच राहिली होती. आठ वर्षांपूर्वीं फ्रान्सचा राजा पंधरावा लुई याच्याशीं लग्न करण्याची तीस चांगली संधि आली होती, पण ती साधली नाहीं. कारण तो क्यॅथलिक धर्माचा असल्यामुळें व त्या देशाचाही धर्म तोच असल्यामुळें तिलाही तोच स्वीकारावा लागेल ही गोष्ट तिच्या मागून लक्षांत आली त्यामुळें तो बूट तितकाच राहिला. पुढें मग वर्षेंच्यावर्षें लोटलीं तरी कोणीच वर तिच्या मनास येईना. पुढें तिच्या मनांत प्रिन्स आफ्

आरेंज याच्याशीं लग्न करण्याचें आलें. तोही लग्न करण्यास कबूल होता. तिनें त्यास कधीं पाहिलेंही नव्हतें. तो कुरूप होता. त्यामुळें राजा ह्यासंबंधास तयार नव्हता. पण अॅननें तो कसाहि असला तरी त्यास वरण्याचा आपण निश्चय केला आहे असें सांगितलें. नंतर तो १७३३च्या नवंबरांत इंग्लंदास आला. थोड्या दिवसांतच तो फार आजारी पडला. त्यामुळें लग्नसमारंभ पुढें १७३४च्या मार्चपर्यंत लांबणीवर पडला. या लग्नासाठीं पार्लमेंतानें ८०,००० पौंडांची रकम मंजूर केली होती. नंतर कांहीं काळानें ह्मणजे १७३६च्या एप्रिलांत प्रिन्स फ्रेडरिक याचें ड्यूक आफ् साक्सगोथा ह्याची मुलगी प्रिन्सेस आगस्टा हिच्याशीं लग्न झालें. ही राजकन्या फार गोड स्वभावाची, शिकलेली सवरलेली व सामान्यतः देखणी अशी होती. प्रिन्स आफ् वेल्स यास ती हळू हळू आवडूं लागली व तिच्या सहवासांत त्यास सुख वाटूं लागलें. तरी त्यानें आपलीं प्रियपात्रें कायमच ठेविलीं होतीं. पूर्वीं त्याचें व त्याच्या आईचें बरें होतें; पण पुढें त्यांचें फारच बिनसलें. जार्ज राजा तर मुलाचा द्वेषच करीत होता. पुढें त्याची आईही त्याचा तितकाच द्वेष करूं लागली असें दिसतें.

दुसऱ्या जार्जाला पहिल्या जार्जाइतकेंच हॅनोवरचें वेड होतें. तो तिकडून परतला कीं त्याची तब्बेत लागलीच बिघडत असे. शिवाय नुक्तेंच तेथें त्यास एक नवें प्रियपात्र सांपडलें होतें. तिचें नांव मॅडम वालमोडेन. ही स्त्री विवाहित होती. तरी तिच्यावर राजा विचार न करितां फिदा झाला. नंतर त्यानें तिचें मन आपला नवरा सोडून त्याच्या पदरीं राहण्याकडे वळविलें. हें करण्यास बहुधा त्यास फार प्रयास पडले नसावे, कारण राजाला तिच्या नवऱ्यास एक हजार डालरांपेक्षां जास्त रकम द्यावी लागली असेल असें दिसत नाहीं. नंतर मग त्यांनीं कांहीं दिवस तेथें चैन केली आणि नंतर राजा एकटा इंग्लंदास परत आला. कारण तीस इंग्लंदांस एकदम आणण्याचा त्यास धीर होईना. पण इकडे आल्यावर तो रुसल्यासारखा झाला व बायकोला व मुलांना

विनाकारण शिव्या देऊं लागला. मग त्यास हॅनोवरला परत जाण्याची मोठी हांव सुटली, पण वालपोल त्यास जाऊं देईना. तरी शेवटीं तो गेलाच. आपल्या गैरहजिरींत त्यानें आपल्या राणीस रीजंट (राज्यकर्त्री) नेमिलें. पण राजाचा वाढदिवस नजीकच आला होता. त्या दिवशीं राजानें दूरदेशीं असावें हें राणीस आवडेना. तेव्हां काय करूं ह्मणून तिनें वालपोलास विचारलें. तो ह्मणाला, आपण आतां वयस्क होत चाललां आहां, तेव्हां राजावरचें आपलें वजन जर कायम ठेवावयाचें असेल, तर मॅडम वालमोडेन हिला घेऊन आपण इंग्लंदांस यावें असें राजास लिहावें. ह्या गोष्टीचें तिला फार कठीण वाटलें. तरी शेवटीं ती तसेंहि करण्यास कबूल झाली. एके दिवशीं ती वालपोल यास ह्मणाली कीं, त्या बाईस मी आपल्या तैनातींतील बायांमध्यें आणून ठेविलें तर कसें होईल? वालपोल ह्मणाला, तें बरें दिसणार नाहीं. एखादी बाई अगोदर आपल्या तैनातींत असून मग राजा तिजवर फिदा झाला असता तर गोष्ट निराळी होती. पण राजा जीवर अगोदरच फिदा झाला आहे अशा स्त्रीस आपली दासी करणें शोभणार नाहीं.

इकडे राजपुत्राचे व या दोघांचे तंटे वाढतच चालले होते. राजपुत्र पेट्रियट लोकांस आपल्या मर्जींत घेऊं लागला. जो जो ह्मणून त्याच्या मर्जींतील असेल त्याचें तोंडच पहावयाचें नाहीं असा राजाराणीनें निश्चय केला. राणीच्या तर मनांत एकदां असेंदेखील आलें कीं, हॅनोवरचें राज्य वेगळें करून तें ड्यूक आफ् कंबर्लंड यास द्यावें. इकडे लोकांत राजपुत्रच प्रिय होता. ह्याचें कारण तो राजपुत्र होता राजा नव्हता, याहून दुसरें असेल असें वाटत नाहीं. तो नाटकगृहांत वगैरे गेला कीं, त्यास टाळी मिळावी व तिला आपण जणूं काय पात्रच आहों अशा रीतीनें त्यानें तिचा स्वीकार करावा.

ता. २९ एप्रिल १७३६ रोजीं कामन्स सभेंत एक महत्वाची गोष्ट घडली. ती कोणती ह्मणाल तर ओल्डसेरम ह्या खेड्याचा प्रतिनिधि ह्मणून नुक्ताच निवडून आलेला जो विलियम पिट त्यानें त्या सभेंत पहिल्यानें

भाषण केलें. तो एकदम पुल्टेनीच्या पक्षास जाऊन मिळाला व तो लवकरच उदयास येणार असें धोरण दिसूं लागलें. त्याचें पहिलेंच भाषण फार चांगलें वठलें. पुढें मोठे वक्ते निपजणाऱ्या सभासदांचें पहिलें भाषण क्वचित्च उत्तम वठतें आणि ज्यांचें पहिलें भाषण चांगलें वठतें ते पुढें क्वचित्च मोठे वक्ते होतात. पण ह्याचें उलट झालें.

पिटचा जन्म चांगल्या कुळांत झालेला होता. त्याचा आजा मद्रासचा गव्हर्नर होता. त्यानें तेथून एक मोठा हिरा आणिला होता व तो फ्रान्सच्या राजानें आपल्या मुकुटांत घालण्यासाठीं विकत घेतला होता. पिट हा आपल्या बापाचा वडील मुलगा नव्हता ह्मणून त्याच्या वाट्यास फारशी संपत्ति आलेली नव्हती. तो लष्करांत शिरलेला होता. त्याचा वडील भाऊ थामस हाहि पार्लमेंताचा सभासद होता. विलियम लवकरच प्रधानांचे दोष काढण्याच्या कामांत पुल्टेनीवरहि ताण करूं लागला. तें पाहून वालपोलनें त्याची लष्करांतील जागा काढून घेतली. तेव्हां प्रिन्स आफ् वेल्सनें त्यास आपल्या पदरीं ठेविलें.

यावेळीं जिन नांवाची मादक दारू पिण्याचें व्यसन मध्यम प्रतीच्या इंग्लिश लोकांत फारच वाढलें होतें. ह्मणून १७३६ सालीं सर जोसेफ जेकिल नामक एका सभासदानें असें बिल पुढें आणिलें कीं, ती दारू विकण्याची अगदीं सक्तमनाई करावी किंवा तिजवर फार मोठी जकात बसवून गरीबांस ती फारच महाग पडेल असें करावें. हें बिल प्रधानानीं पुढें आणिलेलें नसल्यामुळें वालपोल त्याच्याविषयीं अगदीं उदासीन होता. शेवटीं तें पास झालें. पण त्यावरून लोक इतके कांहीं दंगे करूं लागले व चोरून ती दारू विकण्याचा असा कांहीं क्रम सुरू झाला कीं, त्या कायद्याची अंमलबजावणी सरकारानें मुकाट्यानें बंद करून टाकिली.

इतक्यांत एडिंबरो शहरीं कांहीं विलक्षण गोष्टी घडून आल्याः—राबर्टसन व विलसन नांवाचे, जकात दिल्याशिवाय माल आणणारे, दोन असामी होते त्यांस पकडिलें व त्यांस देहान्त शिक्षा देण्याचें ठरविलें. पण या

दोघांस धरून नेत असतां त्यांनीं जीवावर उदार होऊन पळून जाण्याचा प्रयत्न केला. विल्सन हा फार मजबूत असल्यामुळें त्यानें दोन शिपायांस दोन हातांनीं पकडिलें व तिसऱ्यास दांतांनीं पकडिलें. तेव्हां राबर्टसन त्यांस हिसका देऊन पळाला आणि गर्दींत नाहींसा झाला. तें पाहून तेथील म्यॅजिस्ट्रेटांनीं विल्सन यास फांशीं देण्यासाठीं मोठी कडेकोट तयारी केली. तो पळून जाऊं नये ह्मणून शहरचे सर्व रखलवालदार पोलीस फांशीं देण्याच्या ठिकाणीं गोळा केले; त्यांचा मुख्य क्यॅपटन पोर्टियस हा होता. हा माणूस रानटी स्वभावाचा व दुराचारी असल्यामुळें लोकांस तो मुळींच आवडत नसे. फांशीच्या ठिकाणीं नेहमींप्रमाणें गांवांतल्या लोकांची मोठी गर्दी जमली. विल्सनशीं पोर्टियस याचें उद्दामपणाचें वर्तन पाहून त्यांस मोठें वाईट वाटलें. कारण त्यानें शौर्यानें आपल्या सोबत्याची सुटका केलेली असल्यामुळें त्याच्याबद्दल लोकांना एक प्रकारची कींव वाटत होती. तथापि विल्सन यास फांशीं देईपर्यंत कोणी कांहीं गडबड केली नाहीं. पण तो फांशीं जातो न जातो इतक्यांत जमलेल्या लोकांच्या मनांत एक प्रकारचें स्फुरण उत्पन्न झाल्यासारखें झालें व त्यांनीं त्यास सोडविण्याकरितां एकदम धांव केली. तो मेलाच होता तथापि त्याचें प्रेतच पोलीसापासून हिसकून घेण्याचा लोकांनीं यत्न चालविला, तेव्हां पोर्टियसचें डोकें फिरल्यासारखें झालें. त्यानें जमलेल्या घोळक्यावर बंदुका सोडण्याचा आपल्या शिपायांस हुकूम केला. असें ह्मणतात कीं, त्यानें स्वतः जवळच्या एका शिपायाची बंदूक हिसकून घेऊन स्वतःच गोळीबार करण्यास प्रारंभ केला आणि एकास ठारहि केलें. तें कसेंहि असो. या झटापटींत जमलेल्या गर्दींपैकीं सहा सात असामी ठार झाले व पुष्कळ लोक जखमी झाले यांत संशय नाहीं. याचा एडिंबरो येथील लोकांस मोठा राग आला. तेव्हां तेथील अधिकाऱ्यांस पोर्टियस याजवर खटला करणें भाग पडलें. त्या खटल्यांत त्याच्यावर खुनाची शाबिती होऊन त्यास फांशीची शिक्षा ठरविली. ती ऐकून एडिंबरोच्या लोकांस अत्यंत आनंद वाटला. पण राजा हॅनोवर येथें गेला असल्यामुळें, लंदनमध्यें यावेळीं क्यॅरो-

लाईन राणी अधिकार चालवीत होती; तीस हें ऐकून बरें वाटलें नाहीं. ती ह्मणाली कीं, पोर्टियस कसें झालें तरी सरकारी काम करीत होता; त्यामध्यें त्याच्या हातून कदाचित् अधिकाराचा अतिक्रम झाला असेल; ह्मणून त्यास त्याबद्दल फांशीं देणें योग्य नाहीं. करितां तिनें ही शिक्षा सहा आठवडे अमलांत आणूं नये ह्मणून एडिंबरो येथें हुकूम पाठविला. हें ऐकून एडिंबरोच्या लोकांस अशी भीति पडली कीं, राणी कदाचित् त्यास अजीबाद सोडून देईल; परंतु तो सुटूं नये अशी तर एडिंबरो येथील लोकांची बळकट इच्छा होती. ह्मणून त्यांनीं ज्या तुरुंगांत त्यास ठेविलें होतें त्यास वेढा घातला. तुरुंगाचा दरवाजा मजबूत होता, तो उघडेना किंवा फुटेना, तेव्हां शेवटीं त्यांनीं त्यास आग लाविली. नंतर तुरुंगांत प्रवेश केला आणि त्यास पकडून त्यांनीं एका रंगाच्या बाम्बूला टांगून त्यास फांशीं दिलें आणि लोक मुकाट्यांनीं आपापल्या घरीं चालते झाले. त्यांनीं दुसऱ्या कोणालाहि किंवा कोणाच्याहि मालमत्तेला कोणत्याहि प्रकारची इजा केली नाहीं. हें वर्तमान ऐकून राणीस अत्यंत राग आला व एडिंबरो शहरच्या लोकांना याबद्दल काय शिक्षा करूं व काय न करूं असें तीस झालें. ह्मणून तिच्या आज्ञेवरून प्रधानांनीं १७३७ च्या एप्रिलांत लार्डांच्या सभेपुढें यासंबंधानें एक बिल आणिलें. त्याचा मतलब असा होता कीं, एडिंबरोचा प्रोव्होस किंवा मुख्य मॅजिस्ट्रेट यास तुरुंगांत टाकावें व त्यास पुनः कोणताहि सरकारी अधिकार देऊं नये; त्या शहराच्या संरक्षणार्थ ठेविलेली फौज काढून टाकावी व त्या शहरच्या नेदरपोर्ट नामक बदंराचे दरवाजे काढून टाकून तें उघडें करावें. या बिलावर अर्थात् मोठ्या कडाक्याचा वादविवाद झाला; त्यांत लार्ड कार्टरेट यानें सरकारची बाजू उचलून धरिली होती व डयूक आफ् आर्गाइल हा एडिंबरोच्या तर्फे भांडत होता. तरी शेवटीं मेच्या ११ तारखेस तें लार्डांच्या सभेंत पास झालें. नंतर तें अर्थात् कामन्स सभेपुढें गेलें. तेथें त्यास इतका जबरदस्त विरोध झाला कीं, एका प्रसंगीं तें अध्यक्षाच्या मतामुळेंच निभावलें; आणि जूनच्या १३ तारखेस जरी तें अखेरीस पास झालें तरी त्याचें स्वरूप आतां अगदीं बदलून गेलें होतें. आतां

इतकेंच ठरलें कीं, एडिंबरो शहरानें दोन हजार पौंड दंड द्यावा आणि विल्सन यास पुनः सरकारी नोकरी देऊं नये. अशा रीतीनें ह्या प्रकरणाचा अखेरीस निकाल लागला.

इकडे राजा व राजपुत्र यांचीं भांडणें सुरू होतींच. राजा आजपर्यंत त्यास वर्षाचें ५० हजार पौंड देत होता. पण आतां राजपुत्र त्याजपाशीं एक लाख पौंड मागूं लागला. यास राजा मुळींच कबूल होईना. तेव्हां हें प्रकरण पार्लमेंतापुढें नेण्याचा प्रिन्स आफ् वेल्सनें बेत केला. तेथें त्यास पेट्रियट पक्ष अनुकूल होता. वालपोल यास हें बरें वाटलें नाहीं. राजाच्या घरांतलि भांडण प्रसिद्धपणें पार्लमेंतापुढें जावें हें अयोग्य होय असें त्याचें मत होतें. ह्मणून या प्रकरणांत कांहीं तडजोड करण्याविषयीं तो राजास विनंति करूं लागला. राजा प्रथम मुळींच कबूल होईना, पण शेवटीं प्रिन्सेस आफ् वेल्स हिला कांहीं स्वतंत्र नेमणूक करून देण्यास तो तयार झाला व राजपुत्रास ती गोष्ट कळविली. पण राजपुत्र त्या गोष्टीस मान्य होण्याच्या ऐवजीं असें ह्मणूं लागला कीं, ही गोष्ट पार्लमेंतापुढें जाणें किंवा न जाणें हें माझ्या स्वाधीन नाहीं. तें ऐकून राजास फारच राग आला व वालपोलनें हें तडजोडीचें प्रकरण उगीच पुढें आणिलें असें समजून त्याच्यावर त्याची इतराजी झाली. इकडे वालपोल यासही आपण या प्रकरणांत कोठले पडलों असें झालें. सरतेशेवटीं ता. २२ फेब्रुवारी १७३७ रोजीं तें प्रकरण कामन्ससभेपुढें आलें. पुल्टेनीनें अशी सूचना सभेपुढें आणिली कीं, राजानें राजपुत्रास एक लाख पौंडांची नेमणूक करून द्यावी. राजा तडजोड करावयास जेव्हां तयार झाला, तेव्हां हें प्रकरण पुढें नेऊं नये असें पुल्टेनीचें मत असतां त्यानेंच ही सूचना सभेपुढें कशी आणिली ह्याचें अमळ आश्चर्य वाटतें. यासंबंधानें मोठा कडाक्याचा वादविवाद झाला. पुल्टेनी व तत्पक्षीय इतर सभासद यांनीं पहिल्या एडवर्ड राजापासून प्रत्येक प्रिन्स आफ् वेल्स यास त्या त्या राजानें कशा मोठ्या नेमणुका दिल्या होत्या तें सविस्तर सांगितलें; आणि जे उलट बोलले त्यांनीही राजपुत्राचे गुण

अमूप असल्यामुळें त्याला नेमणूक द्यावी तेवढी थोडी आहे, पण काय करावें, राज्याचा खर्च मोठा आहे त्यामुळें निरुपाय आहे असें सांगितलें. शेवटीं वालपोलचें भाषण झालें. त्याचाहि आशय असाच होता; पण त्यानें राजा तडजोड करण्यास तयार होता ही गोष्ट जास्त सांगितली. तिचा सभेच्या मनावर मोठा परिणाम झाला. राजा जर तडजोडीस तयार होता, तर राजपुत्रानें त्याचें ऐकावयास पाहिजे होतें असें पुष्कळांस वाटलें. यामुळें ती सूचना नापसंत ठरली. तरी राजपुत्राच्या मित्रांनीं तीच सूचना लार्डांच्या सभेपुढें आणिली. त्या ठिकाणीं लार्ड कार्टरेट आणि लार्ड चेस्टरफील्ड हे राजपुत्राच्या वतीनें बोलणारांमध्यें प्रमुख होते. पण तेथेंही तिचा निकाल तसाच लागला.

याचा परिणाम अर्थात् असा झाला कीं, राजपुत्र राजाचा व राणीचा जास्तच द्वेष करूं लागला. आपण त्यांची पर्वा बाळगीत नाहीं असें मोठ्या दिमाखानें दाखवूं लागला. ही गोष्ट लोकांच्या नजरेस आणून देण्याची त्यास लवकरच उत्तम संधि सांपडली. त्याची बायको यावेळीं गरोदर होती व तिचे महिने बहुतेक भरत आले होते. ती लंदनमध्यें सेंट जेम्सच्या वाड्यांत बाळंत व्हावी असें राजपुत्राच्या मनांत होतें. आपली सून गर्भार असेल ही गोष्ट राणी मुळीं कबूलच करीना. राजा व राणी लंदनपासून कांहीं अंतरावर हॅम्प्टन कोर्ट प्यॅलेसमध्यें रहात होतीं. राजपुत्र आणि त्याची बायको हीहि यावेळीं तेथेंच होतीं. तेव्हां राणीस असा संशय आला कीं, आपल्या बायकोस लंदनला बाळंतपणास न्यावयाची असें ह्मणण्यांत राजपुत्राचा हेतु कोणाचें तरी पोर आणून तेंच आपल्या बायकोस झालें ह्मणून ह्मणावयाचें असा असावा. ह्मणून त्यास तसें करावयास द्यावयाचें नाहीं असा तिनें निश्चय केला. नंतर लवकरच एके दिवशीं प्रिन्सेस आफ् वेलसचे पोटांत दुखूं लागलें. तें राजपुत्रास समजतांच त्यानें तीस एका गाडींत घालून त्याच स्थितींत लंदनमध्यें आणिलें. तेथें ती सेंट जेम्सच्या प्यॅलेसमध्यें लागलीच बाळंत झाली. तेथें तिच्यासाठीं कांहीं एक तयारी केलेली नव्हती. त्यामुळें

प्रथम तिचे बरेच हाल झाले. राणीस ही बातमी समजतांच ती लागलीच मागोमाग धांवत आली व मनांतून जरी तीस अत्यन्त राग आला होता तरी ती यावेळीं कांहीं एक बोलली नाहीं. ह्यावेळीं राजपुत्रास मुलगी झाली. हें वर्तमान राजास समजलें, तेव्हां त्यानें राजपुत्रास हॅम्पटन कोर्ट व सेंट जेम्स या दोनही वाड्यांत येण्याचा प्रतिबंध करून टाकिला. शिवाय परराष्ट्रीय वकीलांस त्यानें असें कळविलें कीं, तुह्मी जर यापुढें राजपुत्रास भेटावयास जाण्याचें बंद कराल तर तेणेंकरून तुह्मी माझा मोठा सन्मान केला असें मी समजेन; आणि सरदार, सरदारणी व प्रिव्हिकौन्सिलचे सभासद ह्यांस त्यानें असा हुकूम सोडिला कीं, ज्या कोणास राजपुत्राच्या दरबारीं जाणें असेल त्यानें आमच्या वाड्यांत पाऊल टाकूं नये.

असें चाललें असतां एक दिवस राणी अत्यंत आजारी असल्याची बातमी आली. तिला आज बरेच दिवस एक भयंकर रोग झालेला होता. पण राजाची आपल्यावरची मर्जी कमी होऊं नये ह्मणून तिनें तो तसाच चोरून ठेविला होता. तो यावेळीं विकोपास गेला; आणि ता० २० नवंबर १७३७ रोजीं ती मरण पावली. ती मेल्यामुळें आपल्यावरची राजाची मर्जी खप्पा होते कीं काय अशी वालपोल यास मोठी काळजी पडली. कारण त्याला आजपर्यंत राणीचाच मोठा आधार होता. तो आतां गेला. तरी पण तसें न होतां वालपोलचा अधिकार कायमच राहिला.

---

# प्रकरण आठवें.

## धर्मविषयक जागृति.

१७३८ सालीं जॉन वेस्ले हा उत्तर अमेरिकेंतील जार्जिया नामक वसाहतींतून लंदनास परत आला. तेथें तो आज दोन वर्षें जाऊन राहिलेला होता. त्यामध्यें त्याचा हेतु असा होता कीं, तेथील इंडियन लोकांस किंवा मूळच्या रहिवाशांस बाटवून ख्रिस्ती बनवावे आणि तेथील ख्रिस्ती वसाहतकारांची स्थिति सुधारावी. त्याला या दोहोंपैकीं एकाहि कामांत फारसें यश आलें नाहीं. वसाहतकार तेथें चैनीनें रहावयास शिकलेले होते. त्यांना याचा साध्या व शुद्ध रहाणीविषयींचा उपदेश मुळींच रुचेना. तसेंच तेथील इंदियन लोक ख्रिस्ती होण्यास कबूल होतना. इंडियन लोकांचा एक नाईक तर त्यास असें ह्मणाला कीं, येथील ख्रिस्ती लोक खोटें बोलतात, दारू पितात आणि पुरुषांना व बायकांना मारितात; तेव्हां आह्मांस असल्या लोकांचा धर्म नको. तेव्हां निराश होऊन जॉन वेस्ले हा इंग्लंदास परत आला यांत नवल नाहीं. जॉन वेस्ले हा फार विलक्षण माणूस होता. त्याचा जन्म १७०३ सालीं लिंकन प्रांतांत एपवर्थ शहरीं झालेला होता. त्याच्या घराण्यापैकीं पुष्कळांनीं धर्मखात्यांतच नोकरी केलेली होती. त्याचा बाप व आजा दोघेही त्याच खात्यांत होते. ह्याचा बाप मोठा कडक स्वभावाचा माणूस होता. तिसऱ्या विलियमाला गादीवर बसण्याचा हक्क आहे असें त्याचें ठाम मत होतें; पण एके दिवशीं बोलतां बोलतां असें बाहेर पडलें कीं, त्याच्या बायकोचें मत या गोष्टीच्यासंबंधानें तितकें ठाम नाहीं. तें ऐकून त्यानें तिच्यापासून वेगळें राहण्याचा निश्चय केला आणि त्याप्रमाणें तो वेगळा राहूं लागला. पुढें वर्षाच्या आंतच विलियमराजा निवर्तल्यामुळें नवराबायको पुनः एकत्र राहूं लागलीं; पण यावरून जॉन वेस्लेचा बाप किती करारी होता तें सहजीं लक्षांत येतें.

मुलाची वृत्ति अगदीं बापाप्रमाणेंच होती. वरील गोष्ट झाल्यानंतरच त्याचा जन्म झाला. बापाचे सगळे गुण त्याच्यामध्यें बरोबर उतरलेले होते. त्याला आणखी भावंडें होतीं. त्यांजपैकीं चार्लस हा पुढें त्याचाच साथीदार बनला. ह्या दोघांचें शिक्षण ऑक्सफर्ड येथें झालेलें होतें. त्या ठिकाणीं त्यांचा धर्मविषयक उत्साह व कडक आचरण यांबद्दल त्यांची प्रख्याति असे. त्यावेळच तेथले दुसरेहि कांहीं मुलगे पुढें यांचेच साथीदार झाले होते. उदाहरणार्थ, जॉर्ज व्हॉइटफील्ड व जेम्स हॅर्वे. ह्या तरुणांनीं ऑक्सफर्ड येथें एक धर्मविषयक सभा स्थापन केली होती. या ठिकाणीं ते आपली धर्मविषयक सुधारणा करण्यासाठीं ह्मणून एकत्र जमत असत. त्यांनीं सर्व प्रकारच्या कर्मणुकींना रजा दिली होती. व्यावहारिक कामासाठीं वगैरे ते इतर विद्यार्थ्यांशीं मुळींच मिसळत नसत. तेव्हां तेथील इतर विद्यार्थी त्यास हंसत व त्यांना नांवें ठेवीत. या थट्टेच्या नांवापैकींच पुढें त्यांनीं एक नांव आपल्यास घेतलें. तें मेथाडिस्ट किंवा शिस्तवार वागणारे हें होय.

वेस्ले व त्याचे मित्र यांच्या डोक्यांत प्रारंभीं किंवा पुढें पुष्कळ दिवसपर्यंत इंग्लिश चर्च किंवा स्थापित धर्मसंस्था सोडून देण्याची कल्पना मुळींच नव्हती. त्यांना एवढें मात्र खचित वाटत होतें कीं, त्या धर्मखात्यांतील लोक आपलें काम करावें तसें करीत नाहींत. त्यांचीं अशी समजूत झाली होती कीं, या लोकांनीं आठवड्यांतून एकदांच देवळांत जाऊन उपदेश करून स्वस्थ बसूं नये, तर ज्यांच्यामध्यें धर्मबुद्धि वसत नसेल त्यांजकडे वारंवार जाऊन त्यांस उपदेश वगैरे करून त्यांच्या मनांत धर्माबद्दलची आस्था उत्पन्न केली पाहिजे. गरीब, दरिद्री, व्यसनाधीन, अशा लोकांमध्यें खपून त्यांस सुधारण्याचा यत्न सरकारी धर्मोपदेशकांनीं केला पाहिजे, पण तो त्यांच्या हातून बहुतेक मुळींच होत नाहीं. तेव्हां या दिशेनें आपण खटपट करावी. पण ते जेव्हां असें करूं लागले तेव्हां आपोआपच त्यांस त्या धर्मसंस्थेतून काढून लाविल्याप्रमाणें झालें. पण जॉन वेस्ले व त्याचे साथीदार यांनीं आपली वृत्ति सोडिली

नाहीं. ते प्रत्येक बुधवारीं व शुक्रवारीं उपवास करीत आणि धर्माकरितां पैसे शिल्लक पडावे ह्मणून कांही दिवस वेस्लेनें हजामासदेखील रजा दिली होती. तुरुंगांतून व दवाखान्यांतून जाऊन तेथील कैद्यांस व रोग्यांस उपदेश करावा असा क्रम त्यांनीं धरिला. वेस्लेचा बाप एपवर्थ येथें रेक्टर किंवा धर्मोपदेशक असून तो आतां वृद्ध होत चालला होता. तेव्हां आपल्या मागें आपल्या मुलानें आपली जागा पत्करावी असें त्याच्या मनांत होतें; पण मुलगा मुळींच ऐकेना. यानंतर तो जार्जिया येथें १७३९ सालीं उपदेश करण्यासाठीं ह्मणून गेला होता; पण तेथें त्याचें न जमल्यामुळें मागें सांगितल्याप्रमाणें तो परत आला. नंतर त्यानें लग्न केलें. पण त्याला बायकोपासून सुख झालें नाहीं. त्याच्याकडे धर्मोपदेशासाठीं इतर बायका येत तें तीस खपेना. तिला त्यांचा संशय येऊं लागला. ह्मणून ती त्याच्यावर रागावूं लागली, त्यास शिव्या देऊं लागली, कधीं कधीं त्यास मारावयासदेखील धांवत असे व कधीं कधीं ती घरांतून निघूनच जात असे. तिला परत बोलावून आणतां आणतां त्यास पुरे पुरे होई. शेवटीं एके दिवशीं जेव्हां ती घरांतून बाहेर पडली, तेव्हां तिनें अशी शपथ घेतली कीं, मी पुनः परत येणार नाहीं. त्यानेंही तीस परत बोलाविलें नाहीं; आणि अशा रीतीनें त्यांची कायमची ताटातूट झाली.

इकडे लोकांस उपदेश करण्याचा व त्यांच्याबरोबर प्रार्थना करण्याचा वेस्लेचा क्रम चालूच होता. व्हाइटफील्ड व चार्लस वेस्ले हेहि तेंच काम करीत असत. चार्लस हा नवीं स्तोत्रें रचीत असे आणि ती सुरावर ह्मणतही असे. त्यांच्या सभांना दिवसेंदिवस जास्त लोक जमूं लागले. त्यांच्यामध्यें धर्मसंबंधानें जास्त जास्त उत्साह दिसूं लागला. जॉन वेस्ले ह्याच्या अंगीं जशी विलक्षण उत्साहबुद्धि दिसत असे तशीच शरीरशक्तिहि असे. कितीहि श्रम झालें तरी तो थकत नसे. कोणतेंहि काम करावयाचें असलें ह्मणजे पाऊस, वारा,

बर्फ यांची तो बिलकुल पर्वा करीत नसे. अशा रीतीनें कांहीं वर्षें लोटल्यानंतर व्हाइटफील्ड व वेस्ले यांजमध्यें मतभेद उत्पन्न झाला. तो काल्व्हिनचें जें दैवविषयक मत त्यासंबंधानें होय. नशीबीं लिहिलें असेल त्याप्रमाणें होतें या मताला वेस्ले विरुद्ध होता आणि व्हाइटफील्ड नव्हता. त्यांनीं त्याजवर पुष्कळ विचार केला, पण त्यांचें मतैक्य होईना. तेव्हांपासून वेस्लेच्या अनुयायांची संख्या जास्तच वाढली. मग तो आपल्या हाताखालीं नवे धर्मोपदेशक नेमूं लागला, ते त्यास धर्मविषयकखात्याच्या बाहेरचे नेमावे लागत असत. कारण धर्मखात्यांतील लोकांचीं व यांचीं सर्वच मतें जमेनात. अशा रीतीनें त्यांचा हा एक नवाच पंथ बनत चालला, आणि तो इंग्लंद व अमेरिका या दोन देशांतील शहरोशहरीं पसरत चालला. त्याच्या हाताखालचे धर्मोपदेशक त्याच्या अगदीं अर्ध्या वचनांत असत. त्यांच्यामध्यें त्यांच्या गुरूचें धैर्य, उत्साह, आत्मत्याग व निष्ठा हीं बऱ्याच प्रमाणावर दृष्टीस पडत. आतां त्यांच्यामध्यें दोष नव्हते असें नाहीं. त्यांच्यापैकीं बरेच धर्मोपदेशक बेताचेच शिकलेले असत. त्यांचे श्रोतेही अर्थात् त्यांच्यापेक्षांहि बहुधा जास्त अशिक्षित असत. कारण त्यांनीं जें हें धर्मोपदेशकाचें काम सुरू केलें होतें तें खाणींतून काम करणारे, शेतांतून खपणारे कुळंबी वगैरे लोकांमध्यें सुरू केलें होतें. नंतर तो या धर्मोपदेशकांस स्वतःच दीक्षा देऊं लागला. तात्पर्य, तो आतां इंग्लंदच्या धर्मखात्यापासून अगदीं विभक्त झाला. तथापि शेवटपर्यंत तो असें ह्मणत असे कीं, तसा माझा कधींहि हेतु नव्हता व अजूनही नाहीं.

सामान्य जनसमूह व वरच्या दर्जाचा लोकसमाज ह्यांमध्यें किती भेद असतो हें या मेथाडिस्ट लोकांच्या चळवळीवरून फार स्पष्ट रीतीनें दिसून येतें. यावेळीं इंग्लंदांत बड्या समाजांत धर्मास मुळींच मान नाहींसा झाला होता. स्वतः राजाचा तर धर्मावर वास्तविक विश्वास मुळींच नव्हता. पुरुषांची इभ्रत किंवा बायकांचें पातिव्रत्य यांजवर जितका

त्याचा अल्प विश्वास असे तितकाच देवावरहि असे. राणीचेंहि सामान्यतः तसेंच असे. मुख्यमुख्य मुत्सद्यांमध्येंहि ह्यासंबंधानें फारशी सुस्थिति नव्हती. आपला अधिकार कायम राखणें, आपल्या मित्राचें कल्याण करणें आणि शत्रूचें नुकसान करणें, ह्यापेक्षां उच्चतर विषयांचा वालपोल बहुधा विचारच करीत नसे. बोलिंग्ब्रोक तर नास्तिकवादीच होता. लार्ड चेस्टरफील्ड ह्या माणसांत धर्मजागृति व्हावयाचा संभवच नव्हता. तात्पर्य, धर्म हा विषय हल्लीं फ्यॅशनच्या बाहेर गेलेला होता. असें असूनहि वेस्लेनें सुरू केलेली चळवळ लोकांमध्यें फारच जलदीनें पसरली. यावरून इंग्लिश लोकांचें अंतःकरण कांहीं बिघडलेलें नव्हतें असें स्पष्ट होतें.

वेस्ले जीवंत होता तोंपर्यंत त्याच्या चळवळीस काय स्वरूप आलें तें इतका वेळ सांगितलें. तो मेल्यानंतर ती चळवळ सारखी पसरतच गेली. हल्लीं यूरोप व अमेरिका ह्या दोन देशांमध्यें तिचा प्रसार सर्वत्र झाला आहे. युनैटेड स्टेट्समध्यें तर ख्रिस्ती धर्माचे जे एकंदर मुख्य पंथ आहेत त्यांपैकीं हा एक पंथ होऊन बसला आहे. त्या पंथामध्येंहि बरेच पोटपंथ झाले आहेत. पण त्यानें मुख्य कार्य केलें तें हें कीं, तेणेंकरून इंग्लंदच्या स्थापित धर्मसंस्थेस जरा लाज वाटून ती कांहीं दिवस जागी झाल्यासारखी दिसूं लागली. दुसरा एक फायदा असा झाला कीं, तिनें लोकांच्या परोपकारवृत्तीस जरासा चेव आणिला. लोकांस शिकवावें व त्यांना सद्गुणी करावें, ह्याकडे लोकांची नजर जास्त लागली.

---

# प्रकरण नववें.

## जेंकिन्सचा कान व इंग्लंदडची अब्रू.

वालपोलला लढाई मुळींच आवडत नव्हती हें मागें सांगितलेंच आहे. लढाई पासून नुकसान कसें होतें हें त्यास चांगलें समजत असे. पण दुर्दैवानें त्याच्या अंगीं दृढनिश्चय नसे. त्याची नेहमीं तडजोड करण्याकडे प्रवृत्ति असे. त्याला शांततेची जरी आवड असे तरी त्याहिपेक्षां अधिकाराची आवड जास्त असे. हें त्याच्या विरुद्ध पक्षाच्या लक्षांत आलेलें नव्हतें. त्यांना वाटे कीं, ह्याला शांतता इतकी आवडते कीं, लढाई करण्याचें जर ह्यास भाग पाडिलें तर हा राजीनामा देण्यास तयार होईल. ह्मणून पेट्रियट लोक एकसारखे त्याच्या मागें लागलेले होते. ते स्पेनशीं लढाई करण्यास त्याला सांगत, त्याचें कारण मागें आलेंच आहे. स्पेनच्या अमेरिकेंत वसाहती होत्या, त्यांना गुलाम पुरविण्याचें काम इंग्रज लोक त्यावेळीं करीत असत. स्पॅनिश लोकांनीं त्यांना अशी सवलत दिली होती कीं, पांचशें टन मालाचें एक गलबत त्यांनीं वर्षांतून एकदां तेथें न्यावें. पण या सवलतीचा इंग्लिश लोक दुरुपयोग करीत असत. ते एक गलबत पुढें व त्याच्या मागें दुसरीं गलबतें लावून ठेवीत आणि त्यांतील माल त्याजवर चढवून तें वरचेवर त्या वसाहतींतून पाठवीत. शिवाय जकात दिल्याशिवायहि चोरून माल पाठवीतच असत. अर्थात् स्पॅनिश सरकारचें नुकसान होऊं लागलें. ह्मणून त्या सरकाराचे कामगार इंग्लिश व्यापाऱ्यांचीं गलबतें पकडून त्यांवरील लोकांना कैद करूं लागले. हें इंग्लिश लोकांस खपेना. तेव्हां स्पेनशीं लढाई करावी ह्मणून पेट्रियट लोक वालपोलच्या कानींकपाळीं ओरडूं लागले. स्पेनची ह्यांत विशेष चूक नाहीं हें त्याला कळत होतें. ह्मणून तो स्पेनशीं तडजोड करण्याची खटपट करीत होता. पेट्रियट लोकांस वालपोलवर हल्ले करण्यास एवढें कारण पुरे होतें. ते ह्मणूं लागले कीं,

इंग्लिश लोकांचे स्पॅनिश लोकांनीं इतके हाल केले आणि इंग्लंदचा इतका अपमान केला तरी ह्याला लाजच नाहीं. ह्याला कशी तरी शांतता ठेवावयाची, मग इंग्लंदची अब्रू गेली तरी हरकत नाहीं. अशा प्रकारचे हल्ले वरचेवर चालत असत. त्यांमध्यें एकदां वालपोल असें बोलून गेला कीं, लढाई करा, लढाई करा, ह्मणून हे लोक ओरड करितात, पण लढाईचें कारण बरोबर असलें ह्मणून नेहमींच जय येतो असें आहे काय? इतकें त्यानें ह्मटलें मात्र; लागलेच पेट्रियट लोक त्याच्यावर तुटून पडले. इंग्लंदला आणि अपजय; हें होईल तरी कसें? विष्णवे नमः! असें ह्मणेल तोच घरभेद्या? असे वालपोलवर लागलेच हल्ले सुरू झाले.

अशा रीतीनें वालपोलच्या व पेट्रियट लोकांच्या वरचेवर झटापटी चालल्या असतां कॅपटन जेंकिन्स नांवाचा एक गृहस्थ आपली तक्रार घेऊन पेट्रियट लोकांस जणूं काय मदत करण्यासाठींच आला. त्यानें तिखटमीठ लावून पुढील आशयाचें आपलें चरित्र रेखाटलें. तो ह्मणाला — मी आपल्या रेबेका नामक जहाजावर बसून जमेका बेटांतून इंग्लंदास येत होतों. तेव्हां स्पॅनिश लोकांनीं वाटेंत हाव्हान्ना येथें माझें गलबत पकडलें, आणि तें ते धुंडाळूं लागले. नंतर त्यांनीं मला टांगिलें आणि मी अर्धमेला झालों तेव्हां मला सोडिलें. शिवाय त्यांनीं माझा डावा कान कापिला, आणि तो माझ्या अंगावर फेंकून मला ह्मणाले हा आपल्या राजाकडे घेऊन जा. तेव्हां मी ह्मणालों, कांहीं चिंता नाहीं, मी मेलों तरी बेहेत्तर! माझे देशबांधव तुमचा समाचार घेतील. मग काय विचारितां, हें वर्तमान ऐकून सभेंत मोठीच चळवळ उडून गेली. इतक्यांत त्यानें त्यांस जास्तच चेव आणण्याकरितां कापिलेला कान खिशांतून काढून त्यांच्यापुढें फेंकिला. तेव्हां स्पॅनिश लोकांनीं ह्याचे हाल केले असतील, ह्याबद्दल त्यावेळेस तरी कोणास काडीभरही संशय राहिला नाहीं. मागून मग कांहींकांस शंका आली कीं, जेंकिन्सचा हा कान स्पॅनिश लोकांनीं कापिला किंवा ह्यानें कांहीं अपराध

केला असल्यामुळें ह्याला एकाद्या इंग्लिश न्यायाधीशानेंच कान कापण्याची सजा दिली होती! कसेंहि असो. त्यावेळीं ह्या त्याच्या नाटकानें पेट्रियटांचें काम झालें.

वालपोलची आतां खात्री झाली कीं, लोकांचीं मनें तृप्त करण्यासाठीं कदाचित् लढाईहि करावी लागेल. तरी पण सामदामानें कार्य होईल तर पहावयाचें, ह्मणून तो खटपट करीत होता. त्याप्रमाणें त्यानें १७३९ सालच्या प्रारंभीं स्पॅनिश लोकांशीं एक तूर्तातूर्त तह किंवा कान्व्हेंशन केला. पण त्यामध्यें इंग्लंदला अमेरिकेशीं व्यापार करण्याची सर्वत्र मोकळीक असावी किंवा नाहीं ह्या महत्वाच्या प्रश्नाचा विचार मुळींच केलेला नव्हता. मोघम इतकेंच ठरलें होतें कीं, इंग्लंदला स्पेननें कांहीं रकम कांहीं मुदतीच्या आंत द्यावी आणि महत्वाच्या प्रश्नांचा विचार करण्यासाठीं दोघांनीं दोन दोन वकील नेमावे. हा हंगामी तह इंग्लिश लोकांस मुळींच पसंत पडला नाहीं. दोनही सभांतून त्याच्या विरुद्ध जरी बहुमत पडलें नाहीं, तरी वजनदार मत पडलें आणि लोकांचा राग वालपोलविरुद्ध व स्पेन-विरुद्ध जास्तच चेतावला. इकडे स्पेनच्या लोकांसहि इंग्लिश लोकांच्या शिव्या ऐकून फार राग आला व तेहि सामदामाच्या गोष्टी कबूल करीनात. कान्व्हेंशनप्रमाणें कबूल केलेले पैसे देण्याचें त्यांनीं कांहीं निमित्त काढून साफ नाकारिलें. तेव्हां मग वालपोलचा निरुपाय होऊन त्यानें १७३९च्या आक्टोबर महिन्यांत स्पेनशीं इंग्लंद युद्ध करणार असें जाहीर केलें. तें ऐकून इंग्लिश लोकांस परमावधीचा आनंद झाला. ते आनंदाच्या आरोळ्या ठोकूं लागले आणि घंटानाद करूं लागले. वालपोलनें हें ऐकून काय ह्मटलें तें सुप्रसिद्धच आहे. तो ह्मणाला " त्यांना आतां घंटा-नाद करूं द्या, पण लवकरच त्यांस शंखनाद करावा लागणार आहे. " स्पेनच्या मदतीस फ्रान्स येईल व आपणास लढाई जड जाईल अशी त्यास भीति होती आणि स्टुअर्ट घराण्यांतले लोक कदाचित् पुनः बंड करितील, असेंहि त्यास स्वप्न पडलें होतें. तें कसेंहि असो; अशा रीतीनें लढाईस रुकार देण्यांत वालपोलनें मोठी चूक केली यांत बिलकुल

शंका नाहीं. लढाई जर त्यास पसंत नव्हती आणि तिजमध्यें जय येईल किंवा नाहीं याबद्दल जर त्यास शंका होती तर त्यानें लोकांचा लढाईसंबंधानें अत्यंत आग्रह पाहून आपल्या अधिकाराचा राजीनामा द्यावयास पाहिजे होता; पण तो अधिकारतृष्णेनें अत्यंत पीडित झाला होता, ह्मणून त्याच्यानें योग्य तें कृत्य करवलें नाहीं.

पुढें युद्ध सुरूं झालें. त्याचें फारसें बारीक वर्णन देण्याचें कारण नाहीं. इंग्लंदला समुद्रावर कांहीं लहानसहान जय मिळाले व त्यांचें लोकांनीं मोठें कौतुक केलें. इंग्लंदच्या आरमाराचे कांहीं ठिकाणीं पराजयही झाले. तसेंच इंग्लिश नौकाधिपतीच्या हातून कांहीं मोठाल्या चुकाही झाल्या. नंतर लवकरच आस्ट्रियाच्या गादीबद्दलची लढाई 'वार आफ् आस्ट्रियन सक्सेशन' सुरूं झाली आणि त्या लढाईत ही लढाई मिसळून गेली. ह्या लढाईस इंग्लंदनें हातभार लाविलाच होता, पण तिचा इंग्लंदच्या इतिहासाशीं फारसा संबंध पोहोंचत नाहीं. तरी पण दुसरा जार्ज ह्या लढाईवर स्वतः गेला होता आणि डेटिंजेनच्या लढाईंत तो रणांगणांत हज़र असून तेथें फ्रेंचांचा पराजय झाला होता. ही गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे.

ही लढाई सरासरी पुढें दहा वर्षांनीं बंद होऊन जेव्हां तह झाला तेव्हां इंग्लंदनें ज्या हेतूनें ती केली होती तो हेतु कांहीं साध्य झाला नाहीं. स्पेननें आपलीं गलबतें धुंडाळूं नये हा जो इंग्लंडचा मुख्य उद्देश त्याबद्दल तहनाम्यांत एक अक्षरदेखील नव्हतें. एडमंड बर्क असें ह्मणतो कीं, ज्या पेट्रियट लोकांच्या ओरडीमुळें ही प्रथम सुरूं झाली होती, त्यांच्याशीं माझें पुढें बोलणें झालें; पण त्यांपैकीं एकानेंदेखील ती योग्य होती असें ह्मटलें नाहीं.

असो. युद्ध सुरू झाल्यावर वालपोल यास असा प्रत्यय येऊं लागला कीं, आपण लढाई सुरू केल्यानें पेट्रियट लोकांचीं तोंडें मुळींच बंद झालीं नाहींत. कोठेंहि इंग्रजाचा पराजय झाला कीं, एकंदर कागद मागवावे, चवकशी करावी किंवा प्रधानांवर गैरविश्वासाबद्दल ठराव

पास करावा अशा सूचना येऊं लागल्या. या हल्ल्यांच्या कामीं लार्डांच्या सभेंत लार्ड कार्टरेट आणि लार्ड चेस्टरफील्ड यांचें, आणि कामन्स सभेंत सॅम्युएल सांडिस याचें, प्रमुखत्व असे. ता. १३ फेब्रुवारीं १७४१ रोजीं तर दोनही सभांतून अशा सूचना आल्या कीं, वालपोळ यास अधिकारावरून काढून टाकण्याबद्दल राजास विनंति करावी. त्या सूचना बहुमतानें नापास झाल्या हें खरें, पण वालपोल या जयानें अंध झाला नाहीं. त्याला माहीत होतें कीं, आतां लवकरच नवें पार्लमेंत भरणार आहे. कारण लोक लढाईत येणाऱ्या अपजयांनीं नाखुष झालेले आहेत, तेव्हां आपली पुढें धडगत दिसत नाहीं, आणि निवडणुकींत तसेंच झालें. वालपोलच्या वतीचे सभासद पूर्वींपेक्षां कमी निवडून आले.

नवें पार्लमेंत ता० १ दिंजबर १७४१ रोजीं भरलें आणि आनस्लो यास पुनः स्पीकर निवडिलें. राजाच्या भाषणांत अर्थात् लढाईचा उल्लेख केलेला होता, पण तो फारसा हुरूप आणण्याजोगा नव्हता. तेव्हां त्याच्यावर जो वादविवाद झाला त्यांत वालपोलवर आणखी भडीमार झालेच. लार्ड चेस्टरफील्ड ह्मणाला, आपलें या लढाईत जें नुकसान झालें आहे तें नवे प्रधान नेमून नवे उपाय योजिल्याशिवाय कधींहि भरून यावयाचें नाहीं. बाकीच्या भाषणाचा रोंख असाच होता. ता. २१ जानेवारी १७४२ रोजीं पुल्टेनीनें अशी सूचना पुढें आणिली कीं, लढाईसंबंधानें जे कागदपत्र प्रधानांनीं आपल्यापुढें ठेविले आहेत त्यांची तपासणी करण्यासाठीं एक कमिटी नेमावी. ह्या सूचनेस २९० अनुकूल मतें पडलीं, व २९३ काय तीं प्रतिकूल पडलीं. ह्मणजे वालपोलच्या अंगावर आलेली ही घोरपड तीनच मतांनीं काय ती निभावली. यावरून वालपोलचें वजन किती कमी झालें होतें हें स्पष्ट दिसतें. तेव्हां पेट्रियट लोक आनंदानें टिऱ्या पिटूं लागले यांत नवल नाहीं. वालपोलची प्रकृति या व अन्य कारणांनीं आतां बिघडूं लागली. त्याची प्रकृति फार मजबूत होती; पण ती आतां नाजूक झाली. त्याचा मुलगा होरेस वालपोल यानें या गोष्टीचें फार हृदयद्रावक वर्णन केलें

आहे. तो ह्मणतो, " पूर्वीं माझ्या बापाला उशीवर डोकें टेंकल्याबरोबर झोंप लागत असे. मच्छरदाणी खालीं ओढल्याबरोबर तो घोरूं लागत असे; पण हल्लीं त्यास एक तासभरदेखील सारखी झोंप लागत नाहीं. पूर्वीं माझा बाप जेवावयास बसला ह्मणजे आपण प्रधान आहों, ह्याचें त्यास विस्मरण होत असे. पण हल्लीं तो एक शब्दही न बोलतां डोळे कोठें तरी एके ठिकाणीं लावून तासच्या तास स्तब्ध बसतो." ही स्थिति पाहून त्याच्या पुष्कळ मित्रांनीं तूं आतां ही प्रधानकी सोडून दे, असा त्यास उपदेश केला; पण तो प्रधानकीस तसाच चिकटून राहिला, इतकेंच नव्हे तर आपणास अधिकारावरून निघावयास लागूं नये ह्मणून नव्या खटपटी करूं लागला. त्यानें राजास असेंदेखील सुचविलें कीं, प्रिन्स आफ् वेल्स आपणास विरोध करण्याचें जर सोडून देईल तर त्यास आपण ५० हजारांची जास्त नेमणूक करून द्यावी. पण प्रिन्स आफ् वेल्स नेमणूक वाढवून घेऊन स्वस्थ बसण्यास कबूल होईना. पुढें त्याचे सांथीदारहि त्यास सोडूं लागले. न्यूकॅसलचा ड्यूक त्याच्या विरुद्ध मसलती करूं लागला. असें ह्मणतात कीं, त्याच्या अत्यंत विश्वासांतील जो लार्ड हार्वे तोहि त्याच्यापासून दूरदूर राहूं लागला. त्याच्या शत्रूंना तर जास्तच जोर आला. ते ह्मणूं लागले कीं, ह्याला केवळ अधिकारावरून काढून उपयोगाचें नाहीं, तर त्याच्यावर लार्डांच्या सभेपुढें खटलादेखील केला पाहिजे. तेव्हां त्याच्या मित्रांनीं या कारणास्तव तरी राजीनामा दे ह्मणून त्यास पुनः विनंति केली; पण त्यानें ऐकिलें नाहीं. शेवटीं त्यास तो मार्ग पत्करावा लागलाच. चिपन्हॅम नामक एका गांवांतील निवडणुकीसंबंधानें एक प्रश्न पार्लमेंटापुढें येऊन त्यांत वालपोलचा सोळा मतांनीं पराभव झाला. तेव्हां त्याला राजीनामा देणें भाग पडलें. ही गोष्ट ता. २ फेब्रुवारी १७४२ रोजीं घडली. अशा रीतीनें ज्या कारकीर्दीस ता. ४ एप्रिल १७२१ रोजीं सुरवात झाली होती तिची ह्या तारखेस समाप्ति झाली. पुढें त्यास राजानें सरदार बनवून अर्ल आफ् आर्फर्ड ही पदवी दिली. पण तो इतिहासांत नेहमीं राबर्ट वालपोल या नांवानेंच प्रसिद्ध आहे.

वास्तविक म्हटलें म्हणजे यावेळीं पुल्टेनी मुख्य प्रधान व्हावयाचा, कारण कामन्ससभेंतील विरुद्ध पक्षाचा तोच अग्रणी होता. पण आपण वालपोलवर जे हल्ले करितों ते स्वार्थबुद्धीनें करीत नाहीं, असें दाखविण्या-साठीं कांहीं वर्षांपूर्वीं त्यानें असें म्हटलें होतें कीं, मी कधीं प्रधानकी पतकरणार नाहीं. याची त्यास आतां आठवण झाली व तो आपला निश्चय फिरवीना. तेव्हां मग वालपोलच्या सल्ल्यावरून राजानें लार्ड विल्मिंग्टन नामक एका अप्रसिद्ध सरदाराची मुख्य प्रधानाच्या जागीं नेमणूक केली. लार्ड कार्टरेटच्या मनांत आपण ती जागा पटकावावी असें होतें. पण पुल्टेनीचें असें मत पडलें कीं, तो सेक्रेटरी आफ् स्टेट या जाग्यास म्हणजे सध्याच्या फारेन सेक्रेटरीच्या जाग्यासच फार योग्य आहे. तसेच न्यूकॅसलही सेक्रेटरी ऑफ स्टेटच राहिला. यावेळीं असले दोन सेक्रेटरी असत. हेनरी पेलहॅम हा पेमास्टरच्याच जाग्यावर राहिला आणि लार्ड हार्डविक लार्ड चॅन्सलर राहिला. ज्या सॅम्युएल सांडिसनें वालपोलविरुद्ध सूचना पुढें आणिली होती त्यास त्याची फड-णिशीची जागा दिली. पुल्टेनीस अर्ल आफ बाथ ही पदवी देऊन सरदार बनविलें तेव्हां त्याची कारकीर्द संपलीच म्हणावयाची. कारण हल्लींप्रमाणें तेव्हांहि पुढें यावयास माणसास कामन्स सभेंतच राहणें जरूर असे.

वालपोलवर खटला करण्यासाठीं पुष्कळ खटपटी झाल्या. त्याच्या कार-भागाची चवकशी करण्याकरितां गुप्त कमिट्या नेमाव्या म्हणून सूचना आल्या. त्याचा कनिष्ठ पुत्र होरेस वालपोल यानें आपल्या बापाच्या वतीनें पार्लमेंतांत पहिलें भाषण केलें. सरतेशेवटीं एक गुप्त कमिटी नेमिलीच; आणि तिचे बहुतेक सभासद जरी त्याचे शत्रूंकीं होते तरी त्यांच्यानें त्याचे फारसे दोष काढवले नाहींत. कांहीं प्रसंगीं सरकारी पैशाचा खर्च त्यानें जरासा सढळ हातानें केल्याचें मात्र दिसून आलें. यांपैकीं कांहीं पैशाचा विनियोग लांच देण्याच्या कामींहि झालेला असेल. पण ही गोष्ट आजपर्यंत प्रत्येक प्रधानानें केलेली होती, तेव्हां तिकडे कोणी फारसें लक्ष्य दिलें नाहीं.

वालपोलचें व राजाचें अद्याप बरेंच सूत जमलेलें होतें. जार्ज त्याचा सल्ला खाजगी रीतीनें घेत असे. राजा कधीं कधीं मध्यरात्रीसच

त्यास निरोप पाठवी. असाच एक निरोप अप्रत्यक्ष रीत्या त्याच्या मरणास कारण झाला. त्याला आधींचाच एक रोग जडलेला होता, तो रात्रीच्या एका प्रवासानें वाढला; मग तो अफू घेऊं लागला. पण अशा रीतीनें त्याची प्रकृति अशक्त होऊं लागली. सरतेशेवटीं ता० १८ मार्च १७४५ रोजीं तो लंदन येथें मरण पावला. अखेरचीं वर्षे त्यास फारशीं सुखाचीं गेलीं नसावीं. कारण त्याला राज्यकारभाराशियाय दुसऱ्या कोणत्याहि गोष्टीचा नाद नव्हता. त्यामुळें त्याला कार्टरेटप्रमाणें लेखनवाचनांत आपल्यास रममाण करून घेतां येत नसे. तात्पर्य, वालपोल कामन्स सभेंतून निघाला त्या दिवशीं त्याचें आयुष्य संपलें ह्मणावयाचें. पुढें सर्व शून्य झालें. तो मेला तेव्हां त्यास केवळ ६९ वें वर्ष लागलेलें होतें. ज्या हॅनोवर घराण्याची स्थापना बळकट करण्याच्या कामीं त्यानें आपलें सर्व आयुष्य खर्चिलें होतें, त्यांतील एका राजाच्या प्रीत्यर्थ त्यानें तें गमवावें हें योग्यच होतें. त्याच्या अंगीं दोष पुष्कळ होते, सद्गुण कदाचित् थोडेच असतील. पण एकमोठा सद्गुण त्याच्या अंगीं खचीत होता. तो हा कीं तो आपल्या देशाच्या हितास वाहिलेला होता. तो मोठा मुत्सद्दी होता व बहुतेकांशीं मोठा माणूसहि होता. त्याच्या दीर्घ कारकीर्दींतील अत्यंत महत्वाच्या ज्या दोन गोष्टी त्या दोन्हींच्यासंबंधानें त्याच्या नीतीचें धोरण बरोबर होतें. एक त्याचें एक्साइस बिल व दुसरी त्याची स्पॅनिश लढाईस प्रतिकूलता. ह्या दोन्ही प्रसंगीं जरी त्यास आपलें ह्मणणें मागें घ्यावें लागलें, तरी पुढें त्याच्याच प्रतिस्पर्ध्यांस, त्याचें ह्मणणें बरोबर होतें हें प्रांजलपणें कबूल करावें लागलें.

वालपोलच्या मरणाच्या जरी अगोदर इंग्लिश वाग्देवीच्या आकाशांतील बहुतेक पहिल्या प्रतीचा एक तारा गळून पडला. पोपकवि ता० ३० मे १७४४ रोजीं निवर्तला. तो मरणाची वाटच पाहत होता. तो जन्माचा अत्यंत अशक्त असे. तो ठेंगू होता आणि कुरूपहि होता. मरतेसमयीं त्याचें वय ५६ वर्षांचें होतें. त्याचें होमरच्या इलियडचें भाषान्तर प्रसिद्धच आहे.

---

# प्रकरण दहावें.

## १७४५ चें बंड.

स्टुअर्ट घराण्याच्या वतीनें मोठें बंड झाल्यास आतां तीस वर्षें होऊन गेलीं होतीं. जे स्कॉटिश लोक जेम्स स्टुअर्टच्या निशाणासभोंवतीं त्यावेळीं जमले होते त्यांना त्याची आतां केवळ स्मृति मात्र राहिली होती. हीं तीस वर्षें जेम्सनें कधीं ह्या राजाचा आश्रय धर, कधीं त्या राजाचा घर, अशा रीतीनें दुःखानें व संकटानें काढिलीं होतीं. त्यास वृद्ध तोतया किंवा ' ओल्ड प्रिटेंडर ' ह्मणत हें मागें सांगितलेंच आहे. ह्यावेळीं त्याचा मुलगा प्रिन्स चार्लस हा बंडवाला होऊन पुढें आला. ह्मणून त्यास तरुण तोतया किंवा ' यंग प्रिटेंडर ' असें नांव इतिहासांत दिलेलें आहे. ह्याचा जन्म रोमशहरीं १७२० सालीं झालेला होता. जेम्सच्या वेळीं हा दुसऱ्या जेम्सचा खरा मुलगा किंवा खोटा मुलगा अशाबद्दल जसा संशय आला होता तसा येऊं नये ह्मणून यावेळीं ह्याच्या बापानें तेथें मोठा थाटमाट केला होता. हा राजपुत्र घोड्यावर बसून जाण्यांत व शिकार करण्यांत मोठा चतुर होता. त्यास इंग्रजीप्रमाणें फ्रेंच, स्पॅनिश व इतालियन ह्या भाषा चांगल्या बोलतां येत असत. बाकी त्याचें शिक्षण बेताचेंच होतें. त्यास लहानपणापासूनच प्रिन्स ऑफ् वेल्स ह्मणून ह्मणत असत व तो आजपर्यंत एक दोन लढायांवरहि गेलेला होता. ह्मणून त्याच्या मनांत इंग्लंदचें आपलें गेलेलें राज्य पुनः मिळवावें असे विचार सहजच आज पुष्कळ दिवस घोळत होते.

स्वाऱ्या करण्याचे बरेच वेळां बेत केल्यानंतर आणि एका स्वारीचें अगदीं ओंफस झाल्यानंतर शेवटीं १७४५ च्या उन्हाळ्यांत प्रिन्स चार्लस हा फ्रान्सच्या किनाऱ्यावरून इंग्लंदवर स्वारी करण्यास निघाला. तेव्हां त्याच्याजवळ कायतीं दोन जहाजें होतीं. त्याचे मरे व इतर स्कॉटिश

स्नेही ह्यांचें त्यास नेहमीं असें सांगणें असें कीं, तुला पैसे व माणसें ह्याचें बरेंच साहाय्य असल्याशिवाय तूं ह्या भानगडींत पडण्यांत कांहीं अर्थ नाहीं. एक वेळ त्यास फ्रेंच राजा पंधरावा लुई आपणास मदत करील अशी आशा होती; पण ती आतां अगदीं गेली होती. तरी त्यानें स्वतःच्या मणगटाच्या जोरावर आपलें गेलेलें राज्य पुनः मिळविण्याचा यत्न करण्याचा निश्चय केला. यावेळीं त्याच्याजवळ खरोखरच कायतीं मूठभर माणसें होतीं, आणि पैसे मूठभरदेखील नव्हते. बरें, हीं दोन जहाजें जीं त्यानें मिळविलीं होतीं तीं फ्रेंच राजाच्या साहाय्याशिवाय मिळविलीं होतीं इतकेंच नाहीं, तर त्याच्या संमतीशिवाय किंवा माहितीशिवायहि मिळविलीं होतीं. पैकीं एका जहाजाची एका इंग्लिश जहाजाशीं समुद्रांत गांठ पडून ते जाया झालें. तेव्हां ता. २ आगस्ट रोजीं ह्याचें जहाज एकटेंच स्काटलंदांत जाऊन पोंहोचलें. त्याच्याजवळ कायतीं सात माणसें होतीं. पण त्याच्या अंगीं लोकांचीं मनें वळवून घेण्यासारखे बरेच गुण होते. तो देखणा होता; त्याच्या रीतीभाती मोहक होत्या; तो बोलका होता आणि डोंगराळ प्रदेशांतील डोंगरी लोकांची जी गॅलिक भाषा ती तो बोलावयास शिकला होता. तेथील निरनिराळ्या डोंगरदऱ्यांतून राहणाऱ्या लोकांचे निरनिराळे क्लॅन्स किंवा टोळ्या बनलेल्या असत; आणि प्रत्येक टोळीचा एकेक मुख्य असे. त्यांपैकीं बऱ्याच टोळ्यांच्या मुख्यांस ह्यानें तेथें गेल्यावर लवकरच आपल्या मोहक गुणांनीं वश करून घेतलें. कांहीं टोळीवाले ह्यास वश झाले नाहींत. ते व्हिग घराण्यालाच चिकटून राहिले. तथापि ह्याला आशा उत्पन्न होईल इतके लोक यास येऊन मिळाले. शिवाय इंग्लिशांच्या एक दोन लहान तुकड्यांबरोबर ह्याच्या लोकांची स्पीन्स ब्रिज नामक ठिकाणीं जी लहानशी चकमक उडाली तींत ह्याच्या टोळीवाल्यांचा जय झाला. अशा रीतानें पहिला शकून तर चांगला झाला. ह्मणून त्यानें आपल्या नांवाचा जाहीरनामा काढून तो सर्व उत्तर स्काटलंदांत फिरविला. ह्या जाहीरनाम्यांत त्यानें असें ह्मटलें होतें कीं, मी आपल्या बापाचा रीजंट किंवा प्रतिनिधि ह्मणून येथें आलों आहे; तो तुमचा कायदेशीर राजा आहे;

तेव्हां सर्वांनीं जबरीनें राज्य घेणारा जो जार्ज त्याला सोडून मला येऊन मिळावें, जे कोणी मिळणार नाहींत त्यांस बंडवाले समजलें जाईल इत्यादि. अशी तयारी केल्यानंतर ता. १९ आगस्ट रोजीं त्यानें आपलें निशाण ग्लेफिनान नामक दरींत प्रसिद्धपणें उभारिलें. जेम्स स्टुअर्टच्यावेळीं जसा अपशकून झाला होता तसा ह्यावेळीं मुळींच झाला नाहीं. उलट, हा समारंभ पाहण्यास मागच्या चकमकींत पकडलेले कांहीं इंग्रज कैदी हजर होते; आणि त्याच्यासाठीं जीव देण्यास तयार असे पुष्कळ टोळीवाले हजर होते. तात्पर्य सुरवात बरी झाली होती.

ह्या राजपुत्रानें जेव्हां ही स्वारी केली तेव्हांची स्कॉटलंदची स्थिति त्यास अनुकूल अशी होती. हल्लींच्या इंग्लिश लोकांना मध्यआफ्रिकेची जितकी माहिती असते तितकी त्यावेळच्या इंग्रजांना स्कॉटलंदाची किंवा निदान त्यांच्यांतील हायलँडाची ह्मणजे उंचवस्याच्या प्रदेशाची नसे. त्या प्रदेशांतील डोंगरी लोक शुद्ध रानटी होते आणि ते जरी नांवाचे इंग्लंदच्या ताब्यांत होते तरी वास्तविक स्वतंत्रच होते. ते आपल्या नायकांचा मात्र हुकूम शिरसावंद्य मानित असत. शिवाय १७१९ च्या बंडानंतर जरी त्यांचीं शस्त्रें काढून घेतलीं होतीं तरी ते निःशस्त्र झाले नव्हते. कारण त्या वेळीं मॅकेज, क्यँबेल्स्, सदर्लंड्स्, इत्यादि राजनिष्ठ टोळ्यांनीं जरी आपलीं चालणारीं शस्त्रें इंग्रज सेनापतीच्या स्वाधीन केलीं होतीं, तरी इतर टोळ्यांना स्टुअर्ट घराणें कदाचित् पुनः गादीवर येईल अशी अशा व इच्छा असल्यामुळें, त्यांनीं मोडकीं तोडकीं तेवढीं शस्त्रें सरकारच्या स्वाधीन केलीं, आणि चांगल्या तलवारी, बंदुका आणि कुऱ्हाडी, योग्य कालीं उपयोग करण्याकरितां, सुरक्षित ठिकाणीं लपवून ठेविल्या होत्या. तो काल आतां आला होता. तात्पर्य, १७१६ च्या निःशस्त्र करण्याच्या कायद्याचा परिणाम इतकाच झाला कीं, सरकारला अनुकूल अशा ज्या टोळ्या त्या निःशस्त्र झाल्या होत्या; आणि प्रिन्स चार्लसला अनुकूल अशा ज्या टोळ्या होत्या त्या पूर्वींसारख्याच सशस्त्र होत्या. चार्लस यास दुसरी एक

अनुकूल गोष्ट यावेळीं अशी होती कीं, एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं बातमी पोहोंचण्यास फार वेळ लागत असे. त्यामुळें चार्लेस स्कॉटलंदांत येऊन त्याला अनेक टोळ्यांचे लोक जाऊन मिळततोंपर्यंत ती बातमीच लंदनमध्यें पोहोंचली नाहीं. आणखी कांहीं लहानसहान गोष्टी चार्लसला अनुकूल होत्या. ड्यूक आफ् न्यूकॅसल मुख्य प्रधान असून तो लोकप्रिय नव्हता. तद्वत्च इंग्लंदचें परकीय राष्ट्रांशीं युद्ध चाललेलें असून त्यांत फान्देनाय येथें इंग्लिशांचा नुक्ताच पराजय झाला होता. शिवाय स्काटलंदावर पाठविण्यास इंग्लंदपाशीं फारशी फौज नव्हती. तेथील सेनापति सर जान कोप ह्याच्यांत अगदीं दम नव्हता. ह्याचा परिणाम असा झाला कीं, प्रिन्स चार्लेस सेनापति कोप यास झुकांडी देऊन पर्थ शहरांत शिरला आणि तेथून एडिंबरोवर आला. त्यास फारसा प्रयास न पडतां तें शहर तारीख १७ सप्टंबर १७४५ रोजीं त्यानें हस्तगत करून घेतलें. इकडे सर जान कोप हा डनबार येथें फौज गोळा करीत होता व त्याचा एडिंबरोवर चालून येण्याचा बेत होता; पण त्यानें या कामीं दिरंगाई चालविली होती. इतक्यांत प्रिन्स चार्लेस स्वतःच त्याच्यावर चालून आला. तारीख २१ रोजीं प्रेस्टनपॅन्स या मुक्कामीं त्यानें कोपच्या सैन्याचा पांच मिनिटांत पूर्ण पराभव करून टाकिला. ह्या लढाईत कोपचें बहुतेक पायदळ कापलें गेलें आणि घोडेस्वार पळाले ह्मणूनच बचावले. त्याच्या बाजूस काय ते ३० हायलंडर्स पडले व ७० जखमी झाले. त्याला शत्रूच्या तोफा, खाण्यापिण्याचें सामान आणि बरेंचसें द्रव्यहि सांपडलें. ह्या लढाईस जाकोबाइट लोक ग्लाड्स्म्यूरची लढाई ह्मणतात; कारण, तेथें लढाई होईल असें एका जुन्या ग्रंथांत भविष्य केलेलें होतें; पण वास्तविकरीत्या तें खेडें संग्रामभूमिपासून चांगलें एका मैलावर आहे. ह्या प्रसंगीं व ह्याच्यापुढें चार्लेसच्या स्वाधीन जे इंग्रज झाले त्यांस त्यानें योग्य रीतीनें वागविलें. इंग्लिश लोक ह्याच्या शिपायांस ते हातीं लागले असतां बंडवाले ह्मणून वागवीत असतां, ह्मणजे त्यांस ठार मारीत असतां, ह्यानें तसें केलें नाहीं, ही गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे.

इकडे इंग्लंदमध्यें त्याचा पाडाव करण्याची तयारी चाललीच होती. सैन्यें गोळा होत होतीं; राजा हॅनोवरहून परत आला होता; आणि फ्लॅंडर्समधील बहुतेक सैन्य परत बोलाविलें. हें पाहून चार्लसनें इंग्लंदवरच एकदम चालून जाण्याचा निश्चय केला. त्याप्रमाणें तो निघून म्यँचेस्टर येथें येऊन दाखल झाला. तोंपर्यंत त्यास कोठेंहि अडथळा झाला नाहीं. ता. ४ दिजंबर रोजीं तो डार्बी येथें येऊन पोहोंचला. हें ठिकाण लंदनहून कायतें १२० मैलांवर आहे. इतका जवळ तो आला; पण ह्या ठिकाणीं त्याच्या मंत्र्यास काय मोहिनी पडली ती नकळे, त्यांनीं त्यास तेथून परत जाण्याबद्दल सल्ला दिला; आणि त्याहूनही विलक्षण गोष्ट ही कीं, त्यानें तो ऐकिला. ह्यावेळीं त्यास अनुकूल गोष्टी पुष्कळ होत्या. तो इंग्लंदच्या अगदीं मध्यभागीं आलेला होता; तेथून राजधानी जवळ होती; त्याचें सैन्य तो ह्मणेल तें करण्यास तयार होतें; असें असूनही त्यानें परतण्याचा निश्चय केला व त्याप्रमाणें तो परतलाही. आतां हें खरें आहे कीं, त्यास अनुकूल असणाऱ्या सर्वच गोष्टी त्यास माहित असण्याचा संभव नव्हता. उदाहरणार्थ, लंदनमधले हॅनोवर घराण्याचे हितचिंतक किती घाबरून गेले होते हें त्यास समजण्याचा मार्ग नव्हता. तद्वतच भितरा असा जो ड्यूक आफ् न्यूकॅसल ह्याच्या मनांत त्याच्या पक्षास जाऊन मिळावें असे विचार येत होते हेंही त्यास कळण्याचें साधन नव्हतें. राजा आपली किमतीची सर्व चीजवस्त जहाजांतून भरून ठेवित होता. अशासाठीं कीं, चार्लस इकडून आला कीं, आपण तिकडून पलायन करावें, हें त्यास ठाऊक नव्हतें. लंदनमधील त्याचे हितचिंतक किती आनंदभरित झाले होते ह्याचा त्यास अंदाज नव्हता. आपणावर कोणताही राजा असला तरी सारखाच अशी तटस्थ वृत्ति धारण करणारे इंग्लदांत त्यावेळीं किती लोक होते हें त्याच्या ध्यानांत येण्यासारखें नव्हतें. तथापि तो जर जाणूनबुजून अशक्य गोष्ट करून पाहण्यासच आलेला होता, तर त्यानें त्यास ठाऊक असलेल्या गोष्टींचा तरी फायदा घेऊन लंदनवर चालून यावयास पाहिजे होतें; पण त्यानें तसें कांहीं केलें

नाहीं. त्यानें जर तसें केलें असतें तर त्यास यश येण्याचा बराच संभव होता. निदान कांहीं दिवस तरी तो गादीवर खचीत बसता. शिवाय असें कीं पुढें त्याचे हाल हाल होऊन तो मेला त्यापेक्षां लढाईंत मरता तर किती उत्तम झालें असतें! पण त्याच्या सल्लामसलतगारांनीं त्यास जसें सांगितलें कीं, आपल्या मागें ३० हजार फौज लागलेली आहे, त्यामुळें आपणास यश येण्याचा संभवच नाहीं; बरें, आपण जर स्कॉटलंदांत परत गेलों तर आपल्याला ज्यास्त कुमक मिळून कदाचित् आपण पुनः विजयी होऊं, निदान आपल्याला स्कॉटलंदचें तरी राज्य करावयास सांपडेल. ही त्यांची सल्लामसलत त्यास अखेरीस पसंत पडली. कांहीं मिळविण्यासाठीं ह्मणून त्यानें समुद्र ओलांडिला होता तें संपादण्याची आलेली अत्युत्तम संधि त्यानें अशा रीतीनें गमाविली. नंतर त्याचें सैन्य मागें परतलें. रस्त्यांत त्यांनीं एक दोन लहानसहान जय मिळविले हें खरें; तथापि पुढें त्याची दशादशाच झाली. उदाहरणार्थ, क्लिफ्टन मुक्कामीं इ० स० १७४५ मध्यें त्यांनीं कंबर्लंडाच्या सैन्याचा चांगलाच पराभव केला. स्काटलंदांत शिरल्यावर फाल्कर्क मुक्कामीं जनरल हॉलीच्या सैन्याची चार्लसच्या सैन्यानें इ० स० १७४६ मध्यें दाणादाण उडवून दिली; पण कलोडेन येथें कंबर्लंडशीं जो संग्राम झाला त्यांत त्याचा पूर्ण पराजय झाला ( १७४६ ). त्यास मुख्य कारण असें झालें कीं, रणांगणांत म्यॅकडोनाल्ड ह्या टोळीच्या लोकांना डाव्या बाजूस उभें केलें होतें त्याचा त्यांस फार राग आला. कारण, त्यांच्या मतें आपणास उजव्या बाजूस उभें करावें असें होतें. ह्मणून ही टोळी मुळींच लढली नाहीं. इकडे म्यॅकिंटाश ही टोळी जीवावर उदार होऊन लढतच होती. पण तिला कंबर्लंडाच्या सैन्यापुढें यश आलें नाहीं. ड्यूक आफ् पर्थ ह्या सेनापतीनें म्यॅकडोनाल्ड लोकांची ह्या आणीबाणीच्या प्रसंगीं मदत करण्याबद्दल फार विनवणी केली; परंतु त्यांनीं प्रथम एक गोळीबार केल्यावर जें मौन धरिलें तें आपले देशबांधव धडाधड मरताहेत व आपला आतां खचित पराजय होणार हें पाहूनहि सोडिलें नाहीं. तेव्हां मग काय विचारितां? थोडक्याच वेळांत चार्लसच्या सैन्याची

अगदीं दाणादाण होऊन गेली. एकंदर सैन्याचा तिसरा हिस्सा लोक समरांगणांत मरून पडले व बाकीचे सैरावैरा पळूं लागले. कंबर्लंदाच्या हातीं त्यांचें सर्व सामानसुमान, तोफखाना व दोन हजारांहून जास्त बंदुका त्याच्या सैन्यास आयत्या सांपडल्या. ह्या प्रसंगीं कंबर्लंदानें फारच निर्दयपणाचें वर्तन केलें. पळणाऱ्या सैन्याचा त्यानें एकसारखा पाठलाग केला व जे लोक हातीं लागले त्याचे त्यानें जीव घेतले. समरांगणांत जे जखमी होऊन पडले होते त्यांची त्यानें दोन दिवस मुळींच दाद घेतली नाहीं आणि तिसऱ्या दिवशीं निर्दयपणें त्यांची कत्तल उडविली. नंतर तो (हायलॅंड्स्मध्यें) स्काटलंदाच्या डोंगरांमध्यें शिरला आणि तेथेंहि त्यानें असाच क्रूर प्रकार आरंभिला. त्याचें सैन्यहि त्याच्यासारखेंच क्रूर होतें असें दिसतें. कारण ते एवढ्याशा संशयावरून तेथील लोकांस फांशीं देऊं लागले, बायकांची अब्रू घेऊं लागले, त्यांच्यावर जुलूम करूं लागले आणि त्यांस ठारहि मारूं लागले. त्या निर्दयांनीं मुलांसहि ठार करण्यास सोडिलें नाहीं.

जे स्काटिश सरदार चार्लस यास ह्या बंडांत सामील झाले होते त्यांस व त्यांच्या साह्यकाऱ्यांस पकडून शिक्षा देण्याचा क्रम सुरू झाला. त्यांमध्यें लार्ड बाल्मेरीनो, लार्ड क्रोमार्टि, लार्ड लोव्हाट आणि चार्लस रॅटक्लिफ हे मुख्य होते. ह्या सर्वांस फांशीं दिलें. आणखीहि बऱ्याच कमी दर्जाच्या बंडवाल्यांस तीच शिक्षा मिळाली. कांहींनीं त्या राजपुत्राचा विश्वासघात करून आपलीं डोकीं बचाविलीं. पुष्कळांस गुलाम करून वसाहतींतील उंसाच्या वगैरे लागवडीवर पाठवून दिलें. कांहींनीं सरकारी जहाजांवर खलाशांची नोकरी करण्याचें कबूल केल्यावरून त्यांस माफी दिली; कांहींना मागून अजीबाद माफी दिली; आणि थोडेसे अजीबाद सुटले. कांहींजण पळून जातां जातां मेले. उदाहरणार्थ, कलोडेनच्या लढाईनंतर ड्यूक आफ् पर्थ हा फ्रान्सांत पळून जात होता, तो जहाजावरच आटोपला.

स्काटलंदांत पुनः असलें बंड उद्भवूं नये ह्मणून अत्यन्त कडक उपायांची योजना केली. इ० स० १७१५ च्या बंडानंतर निरनिराळ्या टोळ्यांना

निःशस्त्र करण्याची अर्धवट खटपट झालेलीच होती; ती आतां पुरी करून टाकिली. ह्या टोळ्यांच्या नायकांना आजपर्यंत वंशपरंपरा दिवाणी फौजदारी वगैरे इतके अधिकार होते कीं, वस्तुतः ते आपापल्या टोळीचे राजेच असत. ते अधिकार आतां सर्व काढून घेतले व सरकारानें नेमिलेल्या शेरिफ, न्यायाधीश वगैरे अधिकाऱ्यांकडून त्यांना आपल्या तंट्यांचा निकाल करून घेणें भाग पाडिलें. किल्ट ( हायलंदर लोकांचें घागऱ्याचें नेसण्याचें वस्त्र, हें जें त्या लोकांचें राष्ट्रीय परिधान तें कोणी वापरूं नये, वापरणाऱ्यास मोठी शिक्षा होईल असाहि हुकूम सोडिला; मात्र पुढें पुढें ह्या हुकमाची बजावणी तितक्या सक्तीनें केली नाहीं. ट्वीड नदीच्या उत्तरेकडील प्रत्येक खाजगी शाळेच्या प्रत्येक शिक्षकास हॅनोवरच्या घराण्याशीं मी राजनिष्ठेनें वागेन अशी शपथ घेण्यास व ती शपथ नोंदण्यास लाविलें. हायलँडर लोकांची जी दंगेखोर अशी स्वाभाविक वृत्ति आणि उत्तम लढवय्येपणा त्याचा त्यांचीच कित्येक रेजिमेंटें बनवून सरकारानें उपयोग करून घेतला. हें बंड मोडल्यापासून स्कॉटलंदच्या भरभराटीस सुरवात झाली. एकंदरींत बंड मोडून स्कॉटलंदांत शांततेची पुनः स्थापना करण्याकरितां सरकारानें निदान प्रथम प्रथम तरी स्वीकारिलेली पद्धति जरी दोषार्ह होती, तरी कलोडेन येथें स्टुअर्ट घराणें जर विजयी झालें असतें तर त्या देशाचा जितका फायदा झाला असता त्यापेक्षां तें पराजित झाल्यानें जास्त झाला.

कलोडेनच्या पराजयानंतर राजपुत्र चार्लस पळाला. त्यास इंग्लिश सैन्याच्या कचाट्यांत पुनः सांपडूं नये एतदर्थ फारच कष्ट सोसावे लागले व फारच युक्त्या लढवाव्या लागल्या. ह्या कामीं त्यास पुष्कळ स्कॉटिश लोकांनीं (पुरुष व बायका दोघांनीं) फारच साहाय्य केलें व त्यामुळेंच तो निभावला. त्यांमध्यें फ्लोरा म्यॅकडोनाल्ड हिचें नांव इतिहासप्रसिद्ध आहे. तिनें त्याच्यावर फारच प्रेम व भक्ति व्यक्त केली. अखेरीस इ० स० १७४६च्या आक्टोबर महिन्यांत तो एका फ्रेंच जहाजावर बसून फ्रान्सांत ब्रिटनीमध्यें जाऊन पोहोंचला. पुढचा त्याचा इतिहास फार दुःखकारक

झाला. तो सर्व सांगत बसण्याचें प्रयोजन दिसत नाहीं. थोडक्यांत इतकेंच सांगावयाचें कीं, त्याला पुढें फ्रान्सांतून हद्दपार केल्यामुळें तो इटालींत गेला आणि तेथें मद्यपान वगैरे व्यसनांत पडून ता. ३० किंवा ३१ जानेवारी १७८८ रोजीं मरण पावला. तो निपुत्रिक होता, तेव्हां स्टुअर्ट घराणें इंग्लंदावर पुनः राज्य करण्यास येण्याचा शेवटचा आशातंतु त्याच्याबरोबरच लयास गेला.

१७४९ च्या वादळी वर्षाच्या वादळी आक्टोबरांत एक मोठा माणूस अत्यन्त उद्वेगकारक अशा परिस्थितींत हें जग सोडून गेला. इकडे इंग्लंद व स्काटलंद अनुक्रमें बंडाच्या विरुद्ध व वतीनें झगडत असतां तिकडे आयर्लंदांत त्या काळचा अत्यन्त जाडा ग्रंथकार जोनॅथन स्विफ्ट हा निवर्तला. मरणापूर्वीं तो पुष्कळ दिवस दुःखानें पीडलेला होता. बहुतेक वेडाच बनलेला होता. कधीं कधीं तर त्यास त्या रोगाच्या फारच भयंकर लहरी येत असत. पण अखेरीस त्यास शांतपणें मरण आलें. तो जो एकदां झोंपी गेला तो पुनः उठलाच नाहीं. त्यावेळीं त्यास ७७ वें वर्ष लागलेलें होतें. त्यास डब्लिन येथें सेंट प्यॅट्रिकच्या देवळामध्यें पुरलें. त्याच्या थडग्यापासून थोड्याशाच अंतरावर ज्या स्टेलेचें त्याजवर इतकें निःसीम प्रेम होतें तिचें थडगें आहे. तात्पर्य जीवंतपणीं ती जशी आपल्या नवऱ्याच्या पायाजवळ सदा असे तशीच मृतावस्थेंतहि त्याच्या पायाशींच आहे. तिनें जितक्या निःसीम रतीनें आपणास स्विफ्ट यास वाहून घेतलें होतें तितकें कोणाही स्त्रीनें पुरुषाला क्वचितच वाहून घेतलेलें असेल. तीहि त्याच्यासारखीच विलक्षण तऱ्हेची बुद्धिमान् स्त्री होती. ती त्याच्या अगोदर मेली. तेव्हांपासून तो मरेतोंपर्यंत अविवाहितच राहिला होता.

---

# प्रकरण अकरावें.

## मोठ्या पिटचा उदय.

मागील प्रकरणांत वर्णिलेल्या बंडामुळें इंग्लंदास यूरोपांतून कांहीं सैन्य परत आणावें लागलें होतें. इ० स० १७४६ सालीं फ्रेंचांस बरेंच जय मिळून आस्ट्रियन नेदर्लँद्स् हा भाग त्यांच्या ताब्यांत आला होता; आणि इ०स० १७४७च्या उन्हाळ्यांत त्यांचा सेनापति मार्शल सॅक्स, जो आधींच फान्टेनायच्या लढाईंत विजयी झालेला होता, त्यानें हालंडांत लोफेल्ड मुक्कामीं इंग्लिश, डच व आस्ट्रियन ह्या तीन राष्ट्रांच्या एकत्र झालेल्या सैन्यांवर जय मिळविला. त्यांत कंबर्लँदाचा पराभव झाल्यामुळें फ्रान्सांतील व इंग्लंदांतील जाकोबाइट लोकांस मोठा अनंद झाला होता. पण लौकरच हें सर्व पारडें फिरलें, आणि फ्रान्सासही इंग्लंदाप्रमाणेंच ही लढाई नकोशी झाली.

इकडे हे सर्व घोंटाळे चालले असतां इंग्लंदच्या राजकीय स्थितींत विलक्षण फरक होत चालला होता. अद्यापि मध्यमप्रतीचे बहुतेक लोक आणि सर्वच गरीब लोक ह्यांचा जरी राज्यकारभाराशीं प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष संबंध बहुतेक मुळींच नव्हता, तरी ह्या वेळीं ओघ त्या दिशेला फिरणार अशीं चिन्हें दिसूं लागलीं होतीं. लार्डांची सभा मुख्य कारभार करण्याची बंद झाली होती, आणि ती सत्ता जरी अद्यापि कामन्स सभेच्या हातीं प्रत्यक्ष आलेली नव्हती तरी त्या सभेचें महत्व लार्डांच्या सभेपेक्षां बरेंच वाढलेलें होतें. असो.

नवव्या प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें वालपोलच्या मागून मुख्य प्रधान झालेला विलमिंग्टन हा इ. स. १७४३च्या जुलईंत निवर्तला. तेव्हां मुख्य प्रधान कोणास करावें हा मोठा प्रश्न उत्पन्न झाला. कार्टरेटच्या मनांत लार्ड बाथ यास त्या जागीं नेमावें असें होतें; पण वालपोल हा अद्यापि जीवंत असून त्याचें राजावर बरेंच वजन होतें, आणि तो हेन्री पेलहॅम

व त्याचा भाऊ ड्यूक आफ् न्यूकॅसल ह्यांच्या बाजूचा होता. शिवाय हे दोघे बंधू मोठे संपत्तिमान् असून वजनदारहि होते. त्यामुळें पेट्रियट-पक्षाचें ह्मणजे कार्टरेट व पुल्टेनी इत्यादिकांचें कांहींएक न चालून हेन्री पेलहॅम हा मुख्य प्रधान बनला. या वेळेपासून कार्टरेटचें वजन कायमचें कमी झालें. तेव्हां त्यानें कंटाळून इ० स० १७४४च्या नवंबरांत आपल्या परराष्ट्रीय प्रधानकीचा राजीनामा दिला. याच सुमारास त्याची आई वारल्यामुळें त्याच्या घराण्यांतील सरदारकी त्याजकडे येऊन तो अर्ल ग्रॅनव्हिली बनला होता व त्यामुळें अर्थात् कामन्स सभेंतून निघून त्यास लार्डांच्या सभेचा सभासद व्हावें लागलें होतें.

इ० स० १७४६च्या फेब्रुवारींत इकडे जाकोबाइट बंड अगदीं भरांत आलें असतां असें झालें कीं, पिट यास प्रधानमंडळांत घ्यावें असें पेलहॅम बंधूंच्या मनांत आलें; पण राजाला पिट अगदीं आवडत नव्हता, ह्मणून त्यानें त्याचें बोलणें साफ नाकारिलें इतकेंच नव्हे, तर तो लार्ड ग्रॅन-व्हिली व लार्ड बाथ यांस अधिकारापन्न करण्याची खटपट करूं लागला. तें पाहून पेलहॅम बंधूंनीं लागलाच राजीनामा दिला. कारण आपल्या-वांचून राजाचें अगदीं अडेल हें त्यांस पक्कें माहीत होतें, आणि त्याप्रमाणेंच झालें. कारण सर्वच प्रधानांनीं राजीनामे दिल्यामुळें कार्टरेट यास अगदीं नवें प्रधानमंडळ बनवितां येईना, आणि तिकडे स्कॉटलंदांत चार्लस स्टुअर्ट यास कदाचित् जय येतो कीं काय अशी शंका उत्पन्न झाली. इकडे राजास कोणी प्रधान नाहींसे झाले. तेव्हां त्याचा निरुपाय होऊन राजास पेलहॅम बंधूंस ते ह्मणतील त्या अटींवर परत बोलावणें भाग पडलें.

कार्टरेटच्या मद्यपानव्यसनावरून आणि बुद्धिमत्तेच्या तोऱ्यांत पाहिजे तसा कारभार करण्याच्या अहंकारावरून विलमिंग्टनच्या प्रधान मंडळास जसें " झिंगलेलें " प्रधानमंडळ ह्मणून नांव प्राप्त झालें होतें, तसें पेलहॅम बंधूंनीं प्रत्येक पक्षाचा माणूस आपल्या प्रधानकींत घेतल्यामुळें त्यांच्या प्रधानमंडळास रुंद पायावर रचलेलें प्रधानमंडळ असें टोपणनांव

मिळालें. ह्या दोन बंधूंमध्यें हेन्री पेलहॅम हा विशेष हुषार माणूस होता. त्यानें पाहिलें कीं, पेट्रियटपक्ष जेव्हां वालपोल यास हाकलून अधिकारारूढ झाला तेव्हां त्यानें वालपोलची नीति बदलली असें नाहीं; तर तीच चालू ठेविली. तात्पर्य, कोणीहि प्रधान असले तरी सारखेंच. ह्मणून सर्व पक्षांतील प्रधान नेमून सर्वांस संतुष्ट करावें आणि राजा व आपण ह्या दोघांनीं मिळून राज्यकारभार चालवावा असा विचार करून त्यानें प्रधानमंडळांत सर्व पक्षांतील लोक घेतले होते. ह्याच मुद्यावर त्यानें लार्ड चेस्टरफील्ड यास प्रानधमंडळांत घेऊन त्यास आयर्लंदचा व्हाइसराय नेमिलें ( १७४५ ). तत्पूर्वीं तो हालंदांत इंग्लिशांचा वकील ह्मणून होता. त्यानें सर्वांच्या अजमासाविरुद्ध आयर्लंदाचा कारभार फारच उत्तम रीतीनें चालविला. त्यावेळीं तेथील क्यॅथलिक लोकांविरुद्ध फार कडक कायदे केलेले होते. ते कायदे अगदीं अन्यायाचे असून त्यांपासून तेथील गरीब क्यॅथलिक प्रजेस फारच पीडा होत असे. पण इंग्लिश व आयरिश दोनही पार्लमेंतांत ( आयर्लंदांत त्यावेळीं स्वतंत्र पार्लमेंत असे. ) सर्व सभासद प्राटेस्टंटच असल्यामुळें ते कायदे रद्द होण्याचा संभव मुळींच नव्हता. ह्मणून त्यानें त्या भरीस मुळींच न पडतां ते अमलांतच आणावयाचे नाहींत असा निश्चय केला. आयर्लंदांत त्यावेळीं दुसरी एक वाईट गोष्ट अशी होती कीं, तेथील एकंदर कारभारीमंडळ ज्यास " डब्लिन कासल " असें ह्मणतात तें फार बिघडलेलें असे. ते सर्व प्राटेस्टंट असून लांच वगैरे खाऊन पाहिजे तसा कारभार चालवीत असत आणि अर्थात्च लोकांना त्रास देत. त्यांतहि त्यानें सुधारणा केली. त्यानें साधतील तिकडे नव्या शाळा स्थापन केल्या. तद्वतच नवे नवे व्यापार व नवे नवे धंदे ह्यांसहि त्यानें उत्तेजन दिलें. त्यामुळें तेथील प्रजेचा त्याजवर विश्वास बसूं लागला. त्यांच्या असें प्रत्ययास येऊं लागलें कीं, कायदे जरी फिरले नाहींत तरी कारभार फिरला आहे, आणि तेणेकरून आपल्यास सुख होत आहे. त्यामुळें ते त्यास देव मानूं लागले. तात्पर्य, त्याच्या पूर्व इतिहासाकडे पाहतां त्यानें ह्या अमदानींत लोकांस आश्चर्यानें तोंडांत बोटें घालावयास लाविलें.

आतां हा त्याचा कारभार आयर्लंदांतील प्राटेस्टंट जमीनदारांस वगैरे पसंत पडला नाहीं हें सांगावयास नकोच. पण तेथील पांचषष्ठांश प्रजा क्यॅथलिक आहे हें ध्यानांत आणिलें ह्मणजे त्यांच्या पसंती नापसंतीची किती किंमत करावयाची हें ताबडतोब लक्षांत येईल. पण कर्मधर्म संयोगानें असें झालें कीं, त्याचा त्या जाग्यावर फार दिवस टिकाव लागला नाहीं. प्रधानमंडळानें त्यास लवकरच परत बोलाविलें, याचें काय कारण असेल तें असो; आणि त्यास एक स्टेट सेक्रेटरीची जागा दिली. नंतर आयर्लंदांत सर्व मनु पुनः बदलून सर्व क्रम पूर्ववत् सुरू झाला हें सांगणें नलगेच. असो.

ह्याप्रमाणें हेन्री पेलहॅम पुनः अधिकारारूढ झाल्यावर त्यानें पिट यास प्रधानमंडळांत घेतलें हें उघडच आहे. त्यानें त्यास सैन्याचा पेमास्टर नेमिलें. हा हुद्दा फारसा मोठा नव्हता, तथापि तेथेंहि पिटनें आपलें सामर्थ्य दाखविण्यास कमी केलें नाहीं. राजा त्याचा द्वेष अद्यापि करीतच होता. पण काय करतो? पिटचें प्रस्थ दिवसेंदिवस जास्तच माजत चाललें. तो लवकरच मुख्य प्रधान होणार असा रंग दिसूं लागला. हेन्री फॉक्स नांवाचा दुसरा एक मोठा हुषार माणूस या वेळीं कारभारी, वावदूक आणि गुप्त कारस्थानी ह्मणून पुढें येत होता; मरे ह्मणून दुसरा एक गृहस्थ मोठा वकील ह्मणून पुढें येत होता; आणि लिटलटन नांवाचा तिसरा एक गृहस्थ राजकारण आणि ग्रंथकर्तृत्व यांच्यामध्यें घालमेल्या घालीत होता. इकडे चेस्टरफील्डनें नोकरी सोडून दिली. कारण त्याच्या मनांत फ्रान्सशीं तह करण्याचें होतें आणि इतर प्रधानांच्या मनांत तह करण्याचें नव्हतें. पुढें तो सार्वजनिक कामांत क्वचित्च बोलत असे. राजा त्याला ड्यूक करीत होता, पण ती पदवी त्यानें नाकारिली. इ० स० १७५१ सालीं त्यानें इंग्रजी पंचांगाच्या सुधारणे संबंधानें पार्लमेंतांत भाषण केलें, तें फराच उत्तम वठलें. तें त्यानें त्या वेळचे मोठे गणिती ब्रॅडले आणि लार्ड म्यॅक्लिसफील्ड यांच्या मदतीनें तयार केलें होतें. या वेळीं या पंचांगशुद्धीमुळें चालू महि-

त्याची तारीख ११ दिवस मागें आणिली होती. त्याचें कारण गरीब लोकांस न समजून त्यांस असें वाटलें कीं, सरकार व पार्लमेंत आमचे ११ दिवस फुकट खात आहेत ह्मणून त्यांनीं बराच गवगवा केला. पुढें कित्येक वर्षांनीं ब्रॉडले जेव्हां भयंकर आजार होऊन मरणोन्मुख झाला तेव्हां अडाणी लोक असें ह्मणूं लागले कीं, हें अपवित्र कृत्य करण्यामध्यें त्याचें अंग असल्याबद्दल देव त्यास शिक्षा करीत आहे. यूरोपांत पहिली पंचांगशुद्धि ख्रिस्ती शकापूर्वीं ज्यूलियस सीझर या रोमन बादशहानें केली होती. पण पुढें पुष्कळ शतकांनीं असें आढळून आलें कीं, त्यावेळच्या गणितामुळें प्रत्येक वर्ष असावें त्यापेक्षां अकरा मिनिटांनीं लहान होत आहे. ह्मणून इ० स० १५७२ सालीं पोप ग्रेगरी यानें ती चूक शुद्ध केली नवें पंचांग इटाली, स्पेन आणि पोर्तुगाल या देशांत प्रथम सुरू केलें. नंतर मग कांहीं काळानें ही सुधारणा फ्रान्स व जर्मनी या राष्ट्रांनीं स्वीकारिली. पुढें इ० स० १७०० सालीं डेन्मार्क व स्वीडन याराष्ट्रांनींही स्वीकारिली इ० स० १७५१ सालीं वर सांगितल्याप्रमाणें इंग्लंद जागें झालें.

असो. अशा रीतीनें चेस्टरफील्ड एकांतवासांत गेला होता व लार्ड ग्रॅनव्हिलीचीहि तीच स्थिति झाली होती. तात्पर्य, जुने लोक मागें पडून नवे लोक आतां पुढें आले होते. वालपोलचें युग आतां संपलें होतें आणि चॅथमच्या युगास सुरवात होण्याचा समय नजीक आला होता.

याच सालच्या ( १७५१ ) प्रारंभीं राजाच्या कुटुंबांतील भांडणांचें एक कारण नष्ट झालें. प्रिन्स आफ् वेल्स, फ्रेडरिक, हा मरून गेला. त्यास ग्रंथकर्तृत्वाचा अल्पस्वल्प नाद असे. बाकी त्याच्यामध्यें सांगण्यासारखें कांहींएक नव्हतें. तो मेल्यामुळें अर्थात् त्याचा वडील मुलगा प्रिन्स जार्ज हा गादीचा वारस बनला. त्याचा जन्म १७३८ सालीं झालेला असल्यामुळें त्यास नुकतेंच तेरावें वर्ष लागलेलें होतें. हा सातोळाच जन्मास आलेला असून इतका अशक्त होता कीं, तो जगेल अशी कोणासही आशा नव्हती; पण त्यास दाई फार भक्कम व निरोगी

मिळाल्यामुळें तो निभावला. तिसरा जार्ज या नांवानें इंग्लंडच्या गादीवर बसून त्यानें पुष्कळ वर्षें राज्यकारभार केला. ह्याच वर्षाच्या अखेरीस बोलिंग्ब्रोक मरण पावला. त्याचे अत्यन्त निकट मित्र आणि अत्यन्त हाडवैरी शत्रू दोघेही त्याच्या अगोदरच मरून गेलेले होते. मरणसमयीं त्याचें वय ७७ वर्षांचें होतें.

दुसऱ्या जार्जाच्या कारकीर्दींत मोठ्याशा सुधारणा झालेल्या नव्हत्या. पण ह्या सुमारास एक सांगण्यासारखी सुधारणा झाली. ती ही कीं, लार्ड चॅन्सेलर, लार्ड हार्डविक यानें लग्नाच्या कायद्यांत इ. स. १७५३ सालीं जी सुधारणा केली ती होय. तेणेंकरून पाहिजे त्यानें उपाध्या होऊन पाहिजे त्या स्त्रीपुरुषांचें त्यांच्या इच्छेनें किंवा त्यांपैकीं एकाच्या इच्छे-विरुद्धही लग्न लावून द्यावें व तें कायदेशीर समजलें जावें, ही दुष्ट चाल बंद झाली. पुढें कित्येक वर्षें इंग्लंदांत अगदीं स्वास्थ्य होतें. इंग्लंदच्या लढाया चालल्या होत्या; पण त्या एशिया व अमेरिका ह्या दोन खंडांत होय. हिंदुस्थानांत ह्याच्या अगोदरच फ्रेंच व इंग्लिश यांचीं प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष रीतीनें भांडणें सुरू होऊन १७४८ सालीं एलाशापेलच्या तहानें यूरोपांत जरी तीं बंद पडलीं होतीं तरी हिंदुस्थानांत चालूच होतीं. त्यांत शेवटीं इंग्लिशांचा जय होऊन त्यांची सत्ता मद्रास इलाख्यांत कशी स्थापन झाली व पुढें बंगाल्यांतहि प्लासीच्या लढाईनें त्यांचें वर्चस्व कसें स्थापिलें गेलें, ह्या गोष्टी आपणा एतद्देशीयांस चांगल्या विश्रुत आहेतच. तेव्हां अमेरिकेंत काय झालें हें मात्र पाहणें आहे. त्याचा आतां विचार करूं.

जान व सिबेस्टयन केबो यांनीं १५ व्या शतकाच्या शेवटीं कानडा देश शोधून काढल्यापासून तो आपला आहे असें फ्रेंच लोक ह्मणत आले होते. त्यांनीं त्या देशांत १६०८ सालीं प्रथम कायमची वसाहत केली, आणि क्विबेक शहराची स्थापना केली. हा देश इंग्लिशांनीं इं. स. १६२९ त त्यांच्यापासून घेतला; पण इ. स. १६३२ सालीं तो त्यांस परत

घ[illegible]ा लागला. त्यानंतर आतां सव्वाशतकानें पुनः त्यांजमध्यें त्याबद्दल तंटा उत्पन्न झाला. या वेळीं उत्तर अमेरिकेंतील फ्रेंचांच्या वसाहतींत कानडा व लुसियाना अशीं नांवें होतीं. त्या वेळीं अशी समजूत असे का, ज्याच्या ताब्यांत एकादा समुद्रकिनारा असेल त्यानें एका समुद्रापासून दुसऱ्या समुद्रापर्यंतचा आंतील सर्व मुलूख आपला समजावा. खुद्द फ्रान्सांत या वेळीं जशी राजाची अनियंत्रित सत्ता होती तशीच या वसाहतींतूनही होती. ह्मणून तेथील गव्हर्नरांना इतर बाबतींत जरी पूर्ण स्वातंत्र्य असे, तरी तेथील लोकांच्या सुखवृद्धीसाठीं एकादां नवा कायदा करण्याचा अधिकार त्यांस मुळींच नसे. इंग्रजांच्या वसाहतींची स्थिति ह्याहून फार भिन्न होती. पूर्वीं जेव्हां इंग्लंदांत धर्मसंबंधी छळ असे, तेव्हां तो टाळण्याकरितां हे लोक तिकडे गेलेले असल्यामुळें ते पाणीदार व शूर असत. ते स्वतःचा राज्यकारभार पाहण्याची व तो आपल्या स्वाधीन करा असें ह्मणण्याची त्यांच्यामध्यें योग्यता आलेली होती.

असो. अमेरिका खंडांत ह्या दोन राष्ट्रांमध्यें भांडणाचा समय येतां येतां अखेरीस इ. स. १७९३ मध्यें हें प्रकरण अगदीं बेतावर आलें. कारण त्यावेळीं त्या दोघांची गांठ ओहिओ नदीवर पडली. इंग्रजांची त्या नदीवर जी वसाहत होती तिजवर फ्रेंच शिपायांनीं हल्ला केला, तेव्हां तेथलि मुख्यानें फ्रेंच सेनापतीकडे आपला एक वकील पाठविला. तो कोण ह्मणाल तर जार्ज वाशिंगटन होय. फ्रेंच सेनापतीनें उत्तर दिलें कीं, आमचा निश्चय तुह्मास ह्या नदीवरून हांकून लावण्याचा आहे. तेव्हां अर्थात् लढाई जुंपली. पुढच्या वर्षीं वाशिंग्टननें लेफ्टेनंट कर्नल या नात्यानें तेथें एक लहानसें सैन्य घेऊन जाऊन फ्रेंचावर पहिली गोळी सोडिली. यामुळें काय काय परिणाम झाले ते पहा. अमेरिकेंतील फ्रेंच वसाहतींचा पाडाव, युनैटेड स्टेट्सच्या स्वतंत्र लोकसत्ताकाची स्थापना आणि फ्रान्सांतील मोठी राज्यक्रान्ति, हीं सर्व या पहिल्या गोळीबारापासून क्रमशः उद्भवलीं असें दाखवितां येण्यासारखें आहे.

अमेरिकेंतील आपल्या वसाहती जास्त विस्तृत कराव्या अशी फ्रान्सास यावेळीं फार हांव सुटलेली होती. त्या राष्ट्राचा उद्देश असा होता कीं, साधल्यास मिसिसिपी व ओहिओ ह्या दोन्ही दऱ्या आपल्याशा कराव्या; पण त्यामुळें इंग्लिशांच्या व्यापारास अडथळा येण्याचा संभव होता. ह्मणून इ० स० १७५४ सालीं फ्रेंचांनीं ओहिओ दरीचें रक्षण करण्यासाठीं ह्मणून जेव्हां फोर्ट डुकिन नांवाचा किल्ला बांधिला, तेव्हां इंग्लिशांचा सेनापति ब्रॅडाक यानें त्याजवर हल्ला केला; पण तो जरी जात्या शूर होता तरी त्याच्यांत युक्ति नव्हती; त्यामुळें तो पराजय पावला व त्यास मोठी जखम होऊन तिनें पुढें तो मरण पावला. तो त्यावेळीं असें ह्मणाला कीं, 'पुढच्या वेळीं जास्त सावधगिरी करीन' अर्थात् तसें करण्यास तो जगला नाहीं हें खरें; पण त्याचा जो हा पाणीदारपणा तो त्याच्या सर्वच राष्ट्रांत होता, व त्यामुळेंच ते अखेरीस विजयी झाले. इंग्लिश लोक अर्थात् ह्या गोष्टीचा सूड घेण्याची वाट पाहत होते; त्यानंतर कित्येक वर्षें आलीं व गेलीं; शेवटीं त्या गोष्टीची वेळ येऊन ठेपली, व ती करणारीं माणसेंहि निपजलीं. इ० स० १७५९ सालीं इंग्लिशांनीं एका मोठ्या स्वारीचा बेत केला, व त्यांत असें ठरविलें कीं, आह्मर्स्ट सेनापतीनें लेक जार्ज, लेक टिकोन्डेरोगा इत्यादि सरोवरांकडून यावें, जानसन व प्रिडो या सेनापतींनीं आंटेरिओ सरोवर व मांट्रील शहर इकडून यावें आणि भावी विजेता जेम्स वुल्फ यानें सेंट लारेन्स नदींतून यावें, आणि तिघांनीं मिळून कानडाची राजधानी जी क्विबेक नगरी तिजवर एकदम हल्ला करावा; पण पहिलीं दोन सैन्यें वेळेवर आलीं नाहींत आणि त्यामुळें वुल्फ यास त्या शहरावर एकट्यानेंच हल्ला करावा लागला. आडमिरल सांडर्स याचीं लढाऊ गलबतें आणि याचें सात हजार सैन्य एवढ्यानिशीं तो लारेन्स नदींतून वर गेला, आणि क्विबेकपासून सरासरी आठ मैलांवर सेंट लारेन्स नामक बेट आहे तेथें त्यानें तळ दिला. पण क्विबेक शहर उंचवट्यावर असल्यमुळें तेथें पोहोंचावें कसें हा त्यास मोठा विचार पडला. शेवटीं मॅकलॉक नांवाचा एक शिपाई तेथें कैदी होऊन जाऊन आलेला होता, त्यानें त्या उंचवट्यावर (त्यास

आब्राहामचा उंचवटा असें नांव आहे. ) चढून जाण्याचा एक गुप्त मार्ग सांगितला. त्याप्रमाणें त्याचें सैन्य रात्रीच्या काळोखांतून होड्यांतून तेथपर्यंत मुकाट्यानें जाऊन त्या मार्गानें वर चढलें, व उजाडण्याच्या अगोदर वरच्या सपाटीवर जाऊन पोहोंचलें. नंतर फ्रेंच सैन्य जागें झालें व लढाईच्या तयारीस लागलें. त्यांचा सेनापति मांटकाम हा होता. दहा वाजतां लढाईस सुरवात झाली. ती फार वेळ टिकली नाहीं. काय असेल तें असो. फ्रेंचांचें सैन्य जरी इंग्लिशांच्या सरासरी दुप्पट होतें तरी त्याच्यानें पाव तासहि टिकाव धरवला नाहीं. मांटकाम समरांगणांतच मृत होऊन पडला, आणि वुल्फ यास फार भयंकर जखम झाली. तितक्यांत त्यानें "ते पळतात" ह्मणून ऐकिलें. 'कोण'? ह्मणून त्यानें विचारिलें; आणि 'फ्रेंच' असें समजतांच, "ईश्वराचे उपकार आहेत, मी आतां सुखानें मरतों" असें ह्मणून त्यानें प्राण सोडिला (१७५९). असें त्यास उत्तम मरण आलें. त्यास ग्रीनिच येथें इंग्लंदांत आणून पुरिलें. अशा रीतीनें किबेक सर झाल्यावर बाकीचा कानडा प्रांत जिंकून घेण्यास इंग्लिशांस फारसे प्रयास पडले नाहींत.

इ. स. १७५३ च्या प्रारंभीं बिशप बर्क्ले मरण पावल्यामुळें वाङ्मय आणि तत्त्वज्ञान या दोन विद्यांचें मोठें नुकसान झालें. त्याचा जन्म इ. स. १६८४ सालीं आयर्लंदांत झालेला होता. तो आपल्या वयाच्या पंधराव्या वर्षींच डब्लिन येथील ट्रिनिटी कालेजमध्यें गेला व तेथें अभ्यास करण्यांत, विचार करण्यांत व मोठाल्या तत्वज्ञानविषयक कल्पना बसविण्यांत त्यानें तेरा वर्षें घालविलीं. तेथें त्याची फार कीर्ति झाली. इ. स. १७१३ त तो लंदन येथें आला. या ठिकाणीं त्याचा देशबांधव स्विफ्ट याची व त्याची ओळख झाली. स्विफ्टनें त्यास चांगला आश्रय दिला इतकेंच नव्हे तर मुत्सद्दीमंडळ व विद्वन्मंडळ यांमध्यें त्याची ओळख करून दिली. ॲडिसन, बोलिंग्ब्रोक, स्टील, हार्टले, गे, आर्बर्थनाट, पोप इत्यादि शेलक्या मंडळींशीं त्याचा परिचय झाला होता. नंतर त्यानें कांहीं वर्षें इटालींत काढिलीं. इ. स. १७२० त, सौथ सी बबलच्या ऐन गर्दींत तो इंग्लं-

द्वांत परत आला. तेथून लवकरच तो परत आयर्लंदांत गेला तेथें अकस्मात् विलक्षण रीतीनें त्यावर मोठी द्रव्यवृष्टि झाली. हेस्टर व्हानहामृग ह्मणून एक स्त्री स्विफ्टची अगदीं दास बनलेली होती, पण त्यानें तिला झिडकारिलें होतें ह्मणून मरणसमयीं तिनें आपलें मृत्युपत्र फिरवून आपली इस्टेट स्विफ्ट यास न देतां बर्क्ले यास द्यावी अशी व्यवस्था करून ठेविली. हे पैसे घेऊन तो अमेरिकेंत बर्मुडा येथें गेला व तेथें त्यानें अमेरिकेंतील रानटी लोकांस ख्रिस्ती धर्माची दीक्षा देण्याचे कामीं त्या द्रव्याचा विनियोग केला. या कामीं त्यास बोलिंग्ब्रोक, वालपोल आणि पहिला जार्ज, असल्या धर्मलंड किंवा घट्ट अंतःकरणाच्या माणसांनींहि साहाय्य केलें. पण ब्रिटिश सरकारानें देऊं केलेली रक्कम त्यास न मिळाल्यामुळें इ. स. १७३१त तो इंग्लंदास परत आला. इ. स. १७३४त तो आयर्लंदांत जाऊन तेथें त्यानें क्लाइनचा बिशप या हुद्यावर १८ वर्षें काढिलीं. नंतर इ. स. १७५२ त ऑक्सफर्ड शहरीं तो आला व तेथें पुढच्या वर्षींच शांततेनें मरण पावला. तो मोठा सद्गुणी व गोड माणूस होता.

इ० स० १७५४त हेन्री पेलहॅम मरण पावला. तेव्हां त्याचा भाऊ ड्यूक आफ् न्यूकॅसल मुख्य प्रधान झाला. हेन्री फॉक्स लष्करी सेक्रेटरी झाला. पिट सैन्याचा पेमास्टर जनरल झाला. आणि पुढें लार्ड मॅन्सफील्ड ह्मणून उदयास आलेला मरे हा अटर्नी जनरल झाला. हें प्रधानमंडळ फार दिवस टिकलें नाहीं. कारण न्यूकॅसलमध्यें एवढें जोखमाचें काम करण्याचें सामर्थ्य मुळींच नव्हतें. शिवाय यावेळीं यूरोपांत 'सप्तवर्षीय युद्ध' नांवाच्या युद्धाची मोठी धामधूम सुरू झालेली होती ती त्यास झेपेना. त्यांतील एक गोष्ट येथें नमूद करण्यासारखी आहे. हें युद्ध चाललें असतां भूमध्यसमुद्रांतील इंग्लिशांचें मिनोर्का बेट फ्रेंचांनीं घेतलें. तें परत घेण्यासाठीं इंग्लिश सरकारानें आडमिरल बिंग याची योजना केली. पण तेथें फ्रेंचांचें फार मोठें आरमार असल्यामुळें त्यानें त्यांच्याशीं एक लहानशीच लढाई करून

परत मोर्चा फिरविला. याबद्दल त्याची चवकशी होऊन, तो गुन्हेगार ठरून त्यास तोफेच्या तोंडीं दिलें (१७५७). त्यास देहान्त शिक्षा देऊं नये ह्मणून पिटनें फार मध्यस्ती करून पाहिली. पण राजानें त्याचें बिलकुल ऐकिलें नाहीं. यासंबंधानें जनसमज असा झाला कीं, बिंगची चवकशी करण्यापूर्वींच त्यास देहान्त शिक्षा देण्याचें न्यूकॅसलनें ठरविलें होतें. त्यामुळें तो अप्रिय झाला. अर्थात् त्यास मुख्यप्रधानकीचा राजीनामा देणें भाग पडलें. नंतर कांहीं वेळ एक कोडबोळें प्रधानमंडळ बनून ड्यूक आफ् डेव्हनशायर हा त्याचा पुढारी झाला. त्यांत पिट होताच. पण राजाला हें प्रधानमंडळ फार दिवस खपलें नाहीं. त्यानें त्यास एक दिवस एकाएकीं अधिकारच्युत केलें. नंतर मग आणखी एक नवें कोडबोळें तयार झालें. त्यांत न्यूकॅसल व पिट हे असून हेन्री फॉक्स सैन्याचा पेमास्टर झाला. पिटकडे आतां कामन्स सभेचें अग्रणीत्व आलें. तेव्हां त्यानें प्रशियाचा बादशहा फ्रेडरिक धि ग्रेट याच्याशीं सख्य करून सप्तवर्षीय युद्धास असें कांहीं स्वरूप आणून दिलें कीं, इंग्लंद जिकडे तिकडे विजयी होऊं लागलें. तेव्हां तो अर्थात् अत्यन्त लोकप्रिय झाला. पण तो जितका स्वदेशाभिमानी होता तितकाच स्वाभिमानीहि होता. लोकमत जोपर्यंत आपल्या बाजूस आहे तोंपर्यंत राजाचीहि पर्वा करावयाची नाहीं असा त्याचा बाणा असे; व तो त्यानें शेवटपर्यंत कायम राखिला. शिवाय तो मोठा प्रामाणिक होता. त्यामुळेंहि त्याची कीर्ति वाढली. असें ह्मणतात कीं, न्यूकॅसल व पिट यांनीं कामाची अशी वांटणी करून घेतली होती कीं, पिटनें लढाई संभाळावी; लांच वगैरे देऊन कामन्स सभेचें बहुमत आपल्या बाजूस कायम ठेवण्याचें काम न्यूकॅसलनें संभाळावें! लांचलुचपतीच्या त्या युगांत तो अत्यंत शुद्ध होता.

जार्ज राजाच्या कारकीर्दीच्या अखेरच्या अखेरच्या वर्षांत कांहीं नामांकित ग्रंथ प्रसिद्ध झाले, पण त्याबद्दल राजाला स्वतः फारसें बरेंवाईट वाटलें असेल असा संभव दिसत नाहीं. इ. स. १७५५ त

डा. जानसन याचा प्रसिद्ध इंग्रजी कोश प्रसिद्ध झाला. तो त्यानें एकट्यानें तयार केला होता. इ. स. १७५९ त स्टर्न या नामांकित ग्रंथकाराच्या ' ट्रिस्ट्रामशांडी ' नामक प्रसिद्ध कादंबरीचे पहिला व दुसरा असे दोन भाग प्रसिद्ध झाले. डा. जानसनबद्दल पुढें आपल्यास जास्त बोलावयाचें आहे. स्टर्नबद्दल येथेंच दोन शब्द सांगतों. वरील ग्रंथ प्रसिद्ध करण्यापूर्वी बरींच वर्षे तो धर्मोपदेशकाचा धंदा करीत होता; पण त्याची कोणास विशेष माहिती नव्हती. ती या ग्रंथानें एकाएकी झालीं; व त्यामुळें तो जेव्हां पुढें लवकरच लंदनास आला तेव्हां श्रीमान्, विद्वान्, कुलीन आणि चतुरस्त्र वगैरे सर्वच लोक त्याचें देव्हारें करूं लागले. ही स्थिति ८ वर्षे चालली आणि नंतर तो इ. स. १७६८ त एकाएकी मरण पावला. त्याचें खासगी वर्तन असावें तसें नव्हतें.

अशा गोष्टी एकीकडे चालल्या असतां दुसरीकडे राजा एकाएकीं निवर्तला. तारीख २५ आक्टोबर १७६० रोजीं तो नेहमींप्रमाणें पहाटेस उठला, चोकोलेट प्याला आणि फिरावयास जावयाचें ह्मणून बोलला. इतक्यांत त्याचा नोकर कांहीं कामानिमित्त खोलीबाहेर पडला तों त्यास खोलींत कोणी कण्हल्यासारखा व पडल्यासारखा भास झाला. तो परतून आंत जाऊन पाहतो तों राजा बेहोष होऊन पडलेला त्याच्या दृष्टीस पडला. तेव्हां तो घाबरून त्याची मुलगी प्रिन्सेस ॲमीलिया इच्याकडे धांवत गेला. ती जरा बहिरी होती. तिच्या ध्यानांत प्रथम त्याच्या ह्मणण्याचा बरोबर अर्थ येईना. शेवटीं ती धांवत आली व त्याच्यावर ओणवली; पण त्याच्या अगोदरच सर्व कारभार आटोपला होता. नंतर रुंद तोंडाची व छातीची त्याची प्रिया कौंटेस आफ् वालमोडेन हीस बोलावून आणिलें. तिच्या त्या सौंदर्यास (! ) राजा जीवंतपणीं इतका फिदा झालेला असल्यामुळें तीस पाहून तो कदाचित् पुनः जीव धरील असें वाटलें! पण फुकट. राजाच्या नाड्या बंद होऊन इतका काळ लोटला होता कीं, जगांतील सगळ्या लठ्ठ व तोंडास रंग फांसलेल्या स्त्रिया तेथें

आणिल्या असत्या तरी तो जीवंत होण्याचा मुळींच संभव नव्हता. खरोखरच त्याच्या कुटुंबांतील कांहीं निकट माणसें आणि त्याच्यावरच लट्ठ होणाऱ्या वालमोडेनच्या कौंटेससारख्या कांहीं बाया, हीं खेरीज-करून इतरांस ह्याच्या मरणाबद्दल वाईट वाटावें असा त्याच्या ठिकाणीं कोणताच गुण नव्हता. तो हट्टी होता, क्षुद्र मनाचा होता, आपलपोट्या होता, फाजील खादाड होता, पिदाड होता व इंद्रियसुखलोलुप होता. त्याच्यांत गुण पहावयाचा तर एवढाच होता कीं, तो होता त्यापेक्षां वाईट नव्हता! तरी पण त्याच्याबद्दल अश्रू ढाळणारे कमी निघाले असें नाहीं. जे नीच स्तुतिपाठक प्रिन्स फ्रेडरिक मेला ह्मणून रडले किंवा रडण्याचा आव घालते झाले, तेच नीच लोक किंवा त्यांच्याच जातीचे दुसरे ह्यांनीं हा मेला तेव्हां अश्रू ढाळण्यास कमी केलें नाहीं. पण बहुतेक इंग्रज लोकांस तो मेला किंवा जगला ह्याची सारखीच प्रतिष्ठा होती. ह्याच्या मरणाची वार्ता ऐकून त्यांनीं मनांत एवढीच गांठ बांधिली कीं, हॅनोवरचा इलेक्टर असलेला दुसरा जार्ज जाऊन त्याच्या ऐवजीं हॅनोवरचा इलेक्टर असलेला तिसरा जार्ज आपल्या देशाच्या गादीवर आलेला आहे. दुसऱ्या जार्जाला जितके उत्तम प्रधान मिळाले तितके दुसऱ्या थोडक्याच राजांस तत्पूर्वीं मिळालेले असतील. तो गादीवर बसला तेव्हां वालपोलसारखा खंदा प्रधान त्याचा कारभार हाका-वयास हजर होता, आणि तो मेला तेव्हां पिटसारखा भव्य मुत्सदी तेंच काम करण्यास तत्पर होता. तात्पर्य, तो गुणवान् नसला तरी भाग्यवान् होता. मरणसमयीं त्यास ७७ वें वर्ष पुरें होत आलेलें होतें.

---

# प्रकरण बारावें.

## तिसरा जार्ज व लार्ड ब्यूट.

आज शेंचाळीस वर्षे इंग्लंदवर जर्मन वंशांतील राजे राज्य करीत होते. हॅनोवरचा इलेक्टर असलेला एक जार्ज जाऊन त्याच्या ऐवजीं हॅनोवरचाच इलेक्टर असलेला दुसरा जार्ज येऊन गेलेला होता. पण पिता जार्ज व पुत्र जार्ज दोघांनाहि इंग्लंदपेक्षां हॅनोवरचा ओढा जास्त होता. त्या दोघांपैकीं प्रत्येकाविरुद्ध स्टुअर्ट घराण्यांतील कोणी तरी राजपुत्रानें बंड उभारलेलें होतें. पहिल्या जार्जाविरुद्ध दुसऱ्या जेम्सचा पुत्र जेम्स फ्रान्सिस एडवर्ड यानें, आणि दुसऱ्या जार्जाविरुद्ध त्याच राजाचा पौत्र प्रिन्स चार्लस एडवर्ड यानें त्या दोघांनाहि त्यांचे शत्रू प्रिटेंडर किंवा तोतये ह्मणून ह्मणत असत; पण जेम्स एडवर्ड आपल्यास तिसरा जेम्स ह्मणवी व त्याचा मुलगा आपल्यास त्याचा प्रतिनिधि ह्मणवी. असो. पण दुसऱ्या जार्जाचा नातू तिसरा जार्ज ह्याची स्थिति ह्याहून फार भिन्न होती. तो इंग्लिश राजपुत्र असून इंग्लिशमनहि होता. त्याचा जन्म इंग्लंदांत झालेला होता इतकेंच नव्हे, तर त्याच्या बापाचाहि जन्म इंग्लंदांतच झालेला होता, त्याला हॅनोवरचा इलेक्टर ही पदवी जरी वंशपरंपरेनें आलेली होती, तरी तिच्यांत कांहीं जीव नव्हता. त्याचा ओढा तिकडे मुळींच नव्हता. शिवाय, जे थोडेबहुत जाकोबाइट लोक जीवंत अद्यापि राहिलेले होते, त्यांच्यांत त्याच्याविरुद्ध बंड करण्याचें सामर्थ्य मुळींच राहिलेलें नव्हतें व जागाहि राहिलेली नव्हती. अशा रीतीनें त्यास त्याच्या आजापेक्षां व पणजापेक्षां एकंदर परिस्थिति जास्त अनुकूल होती. आजाच्या मरणाची वार्ता प्रथम तिसऱ्या जार्जास समजली ती खुद्द पिटच्या तोंडून समजली. त्यास तो फार आजारी असल्याचें अगोदर समजलें होतें, ह्मणून तो लंदनकडे यावयास निघालाहि होता. वाटेंत त्यास पिटची गाडी भेटली तेव्हां पिटनें गादी प्राप्त झाल्याबद्दल त्याचें अभिनंदन करून त्याच्या मागोमाग आपली गाडी परत फिरविली. राजा व प्रधान ह्यांच्या-

मध्यें जेवढें जमीन अस्मानाचें अंतर होतें तितकें दुसऱ्या थोड्याच राजा मध्यें असेल. पिटनें आपल्या अकलेनें इंग्लंदची सत्ता पुष्कळ वाढविली होती व हा राजा आपल्या मुर्खपणानें ती लवकर कमी करणार होता. मंदधीला तैलधींचा जसा मत्सर सहज वाटत असतो तसा जार्जाला पिटबद्दल वाटत होता. पिटसारख्या प्रजाजनानें इंग्लंदला मोठेपण आणून देतां आलें व राजाला तें आणून देतां येईना ह्मणून त्यास पहिल्यापासून वाईट वाटत होतें. असो. गाड्या लंदनकडे चालल्या असतां राजाच्या मनांत काय विचार उचंबळत होते हें सांगणें कठीण आहे; पण असा तर्क करण्यास कांहीं हरकत दिसत नाहीं कीं, आजा दुसरा जार्ज मेल्याबद्दल त्यास विशेषसें वाईट वाटलें नसावें. तसेंच पिटच्या त्रासांतूनहि लवकरच आपण आपणास मोकळे करून घेऊं असे तो आपल्या मनांत मांडे खात असावा. "जार्जा, खरा राजा हो," असें त्याची आई त्यास वारंवार ह्मणत असे; त्याप्रमाणें करावयाचें असा त्याचाहि निश्चय होता.

गादीवर बसतेसमयीं जार्जास २३ वें वर्ष लागलेलें होतें. त्याची शरीरसंपत्ति चांगली असून त्याचा चेहरा उमदा होता. त्याची दृष्टि तीक्ष्ण व मनोवेधक होती. आणि त्याचें तोंड निश्चयी व भरदार होतें. तो उंच असून सशक्त असे. दरबारांतील पुष्कळ स्त्रियांस तो फार देखणा वाटे व त्याचें लक्ष आपल्याकडे वेधून घेण्यास त्या पुष्कळ खटपट करीत; पण तो मात्र त्यांच्याकडे बहुधा ढुंकुनदेखील पहात नसे. त्याचा भाऊ एडवर्ड याचा स्वभाव निराळा होता. त्याचा चेहरा भावाप्रमाणेंच बऱ्यापैकीं असून शिवाय तो स्त्रियांची प्रसन्नता संपादन करण्यास फार उत्सुक असे; पण तो गादीचा वारस नसल्यामुळें त्या त्याच्याकडे मुळींच लक्ष्य देत नसत. जार्ज गादीवर बसला तेव्हां त्याचा आजा व पणजा यांच्यापेक्षां जास्त लोकप्रिय होण्यास पुष्कळ गोष्टी त्यास जास्त अनुकूल होत्या. तो जन्मतः इंग्रज होता; त्यास इंग्रजी बोलतां येत होतें; आणि त्यास इंग्रजी रीतीभाती मनापासून

आवडत असून आपण सर्वांशीं इंग्रजांप्रमाणें वागावयाचें असें त्यास मनापासून वाटत असे. इंग्लंदांत आजापणजाप्रमाणें जनानखाना स्थापण्याची त्यास मुळींच इच्छा नव्हती. त्याच्या पदरीं जर्मन वारयोषिता मुळींच नव्हत्या. लड्ठ स्त्रियांची त्याला बिलकुल इच्छा नव्हती. त्याची आपल्या आईवर पूर्ण भक्ति होती, कदाचित् वाजवी-पेक्षांही फाजील होती; पण त्याबद्दल इंग्रजांस वाईट वाटण्यासारखें कांहीं नव्हतें. शिवाय भरतारुण्यांतहि त्याचें वर्तन निर्मळ असून तो आपल्या बायकोशीं व मुलांशीं सप्रेम रीतीनें वागत असे. त्याच्या मनाचें सामान्य स्वरूप इंग्लंदांतील गांवठ्यावर राहणाऱ्या छोट्याशा जमीनदाराच्या तऱ्हेवर होतें. सारांश खराखुरा राजा होण्याची जर त्यास हांव सुटलेली नसती तर त्याची कारकीर्द बहुधा चांगली व यशस्वी झाली असती.

जार्जाची कारकीर्द अयशस्वी होण्यास कर्मधर्मसंयोगानें दुसरें एक कारण झालेलें होतें. लार्ड ब्यूट नांवाचा एक खालावलेला स्कॉच जमीनदार होता. त्याची व जार्जाचा बाप प्रिन्स फ्रेडरिक याची कांहीं आकस्मिक कारणावरून प्रथम ओळख पटली होती व नंतर मैत्री जमलेली होती. तो त्यावेळीं छत्तीस वर्षांचा असून उंच व देखणा असे. त्याचा स्वभाव चौकस असून त्याची बुद्धि तीव्र असे. तो चांगला शिकलेला असून त्याचें वाचनहि पुष्कळ असे. शिवाय त्याच्या रीतीभाती आणि बोलण्याचालण्याची ढब हीं फार मनोवेधक असत. तेणेकरून फ्रेडरिकचें मन सहजच त्याच्याकडे वळलें, व त्यानें त्यास लार्ड आफ् धि बेडचेंबर ( जनानखान्यावरील सरदार ) बनवून त्याला गरीबाचा श्रीमान् आणि अप्रसिद्धाचा सुप्रसिद्ध केलें. पुढें दोन वर्षांनीं फ्रेडरिक मेला; तरी ब्यूटचें नुकसान झालें नाहीं. कारण त्या मुदतींत त्यानें फ्रेडरिकच्या बायकोवर व तिच्या मुलावर ( जार्जावर ) आपला पगडा बसविला होता. त्यावेळच्या निंदाप्रिय लोकांमध्यें अशी कुजबुज असे कीं, फ्रेडरिकच्या पत्नीवर जें हें ब्यूटचें वजन पडलेलें होतें तें केवळ

मानसिक नव्हतें; आणि ही गोष्ट खरी मानणारे अद्यापिहि कांहीं लोक दृष्टीस पडतात. पण या समजांत सत्यांश किती आहे हें समजण्यास मुळींच मार्ग नाहीं; व तो बहुधा खोटा असावा. कारण, ब्यूटचें त्याच्या स्वतःच्या पत्नीवर उघड उघड प्रेम असे. पण ही जनवार्ता खरी असो वा खोटी असो, तेणेकरून जार्जाची आई लोकांना अप्रिय झाली होती ह्यांत मात्र बिलकुल शंका नाहीं. ब्यूटचा सहवास जार्जास लहानपणापासून झालेला होता. त्यामुळें त्याचें राजकीयविषयक शिक्षण आणि विचारधोरण ब्यूटनें लावून दिलेल्या वळणाप्रमाणें बनलें होतें. याचा परिणाम पुढें फार भयंकर झाला. बाप मेल्यापासून आज दहा वर्षें तो त्याच्या कह्यांत राहिलेला होता. जार्ज गादीवर बसल्यावर प्रथम वर्षभर तो त्यास खाजगी रीतीनेंच सल्लामसलत देत असे; पण इ० स० १७६१ सालीं प्रथम तो सेक्रेटरी आफ् स्टेट झाला आणि नंतर लवकरच मुख्य प्रधान बनला. त्या जागेवर जरी तो फार दिवस राहिला नाहीं तरी त्या मुदतींत त्यानें आपणास लोकांमध्यें अत्यंत अप्रिय करून घेतलें.

जार्जाच्या मनांत रिचमंडच्या ड्यूकाची मुलगी सारा लेनाक्स हिच्याशीं लग्न करावयाचें होतें. पण तसें झाल्यास राजाशीं आपलें वजन कमी होईल ह्या भीतीनें त्याच्या आईनें व ब्यूटनें तें लग्न जमूं दिलें नाहीं. पुढें त्याचें लग्न जर्मनींतील एक छोटेसें संस्थान मेक्लेंबर्ग स्ट्रेलिट्झ् येथील ड्यूक फ्रेडरिक याची दुसरी मुलगी चार्लोटी सोफाया हिच्याशीं झालें. ती स्वरूपानें अगदीं सामान्यच होती; पण त्या वेळच्या मानानें बरीच सुशिक्षित होती. तिला फ्रेंच व इतालियन ह्या भाषा येत असून थोडथोडें इंग्रजीहि येत होतें. शिवाय तिला चित्रें काढतां, नाचतां व वाजवितां येत असे. तिला थोडेंसें शास्त्रीय ज्ञानहि होतें; आणि ह्या सर्वांहूनही विशेष गोष्ट ही कीं, तिचा स्वभाव सात्विक, सानुकंप आणि समजूतदार असा होता.

जार्ज गादीवर बसल्यानंतर राजा ह्मणून त्यानें जी पहिली कृति केली तिच्यांत अंमळ वैषम्य दृग्गोचर झालें. ता. १८ नवंबर १७६० रोजीं पार्लमेंत उघडते वेळीं त्यानें जें भाषण केलें त्यांतलि पहिले शब्द असे होते. "ह्या देशांतच माझें जन्म व शिक्षण झालेलें असल्यामुळें ब्रिटन या नांवाचा मला मोठा अभिमान वाटतो." या भाषणानें कांहीं लोकांस राग येण्यास असें कारण झालें कीं, ते दुसऱ्या जार्जाचे अभिमानी होते. त्यांस असें वाटलें कीं, आपला जन्म इंग्लंदांत झाला आहे असें ह्मणण्यांत त्या बाबतींत आजापेक्षां आपण लोकप्रियतेला जास्त पात्र आहों असें दर्शविण्याचा, व अशा रीतीनें अप्रत्यक्षरीत्या आजाचा उपमर्द करण्याचा, ह्याचा हेतु असावा. दुसऱ्या कांहींकांस त्यानें आपणास 'इंग्रज' न ह्मणतां 'ब्रिटन' ह्मणवून घेतलें ह्यांतच कांहीं गोम आहे असें वाटलें. त्यांस वाटलें कीं, हा सगळा ब्यूटचा प्रभाव आहे; व तसा तो बहुधा होता; कारण ब्यूट इंग्रज नसून स्कॉच होता; तेव्हां त्यास ब्रिटन हा सामान्य शब्द जास्त बरा वाटला असावा. ह्या शब्दाचा ड्यूक ऑफ् न्यूकॅसल यास विशेष राग आला व त्या गोष्टीचा राजास द्यावयाच्या मानपत्रांत उल्लेख करावा असेंहि त्याच्या मनांत आलें; पण तसें त्यानें केलें नाहीं.

जार्ज गादीवर बसला तेव्हां राज्याचा सर्व कारभार व्हिगपक्षाच्या ताब्यांत होता. टोरीपक्षांतील कोणाच्याही हातीं कांहीं एक सत्ता नव्हती. आज पन्नास वर्षें ते अधिकारच्युत झालेले होते. ह्यास कारण त्यांनीं जाकोबाइट लोकांचा, ह्मणजे दुसरा जेम्स व त्यांचे वंशज ह्यांचा, पक्ष घेतला होता हें होय. बरें, व्हिगपक्षानें इतकीं वर्षें जो सारखा अधिकार चालविला त्याचें एक कारण ते पैसे देऊन पार्लमेंताचे सभासद वश करून घेत हें होय. वालपोलनें लांच देऊन सभासद वश करून घेण्याचें जणूकाय शास्त्रच बनविलें होतें व त्याचा कित्ता त्याच्या मागून झालेल्या व्हिग प्रधानांनीं कमजास्त मानानें गिरविला होता. तात्पर्य, जार्जानें स्वतः कारभार पाहण्याचा व व्हिगपक्षाचा

अधिकार कमी करण्याचा जो निश्चय केला होता, तो अगदींच वावगा होता असें नाहीं. त्यांत वावगें इतकेंच होतें कीं, त्यास तें काम झेंपण्याची अक्कल नव्हती. ह्या वेळीं लार्डांच्या सभेंतील व्हिगपक्षाचा अग्रणी ड्यूक ऑफ् न्यूकॅसल हा होता व कामन्स सभेंतलि अग्रणी विलियम पिट हा होता. दोघेहि आपापल्यापरी तिजोरीला मोठा चट्टा लावीत होते. न्यूकॅसल सभासदांस भरपूर लांच देऊन आणि पिट लढायांच्या कामीं अतोनात खर्च करून. ब्यूट्चा निश्चय झाला होता कीं, कसेंहि करून पिटला खालीं आणावयाचा. ब्यूटचा निश्चय झाला ह्मणजे अर्थात् राजाचा झालाच. अशा रीतीनें पिटवर मोठें कड्याळ आलें. पिट ब्यूटचा तिरस्कार करीत असे इतकेंच नाहीं तर त्याचें स्वपक्षियांशींदेखील अमळ उद्दामपणाचेंच वर्तन असे; त्यामुळें तेहि त्याच्यावर विषेश खुष नसत. राजाला तर स्वतःचा अधिकार गाजविण्याची हांव सुटलेली होतीच. अशारीतीनें कौन्सिलांत पिटविरुद्ध एक प्रबळ पक्ष उत्पन्न झाला आणि सप्तवर्षीय युद्धाच्या बाबतींत त्यांचा यांचा मतभेद होऊन पिट अधिकारच्युत झाला, आणि त्याच्या ठिकाणीं ब्यूट अधिकारारूढ झाला. ती कथा अशी :—

ह्यावेळीं फ्रान्स व इंग्लंद ह्यांच्यामध्यें लढाई सुरू असून सर्वत्र व विशेषतः अमेरिकेंत इंग्रज विजयी झाले होते हें वाचकांच्या लक्ष्यांत असेलच. तेव्हां ब्यूट व त्याचे साथीदार हेन्री फॉक्स, जार्ज ग्रेनव्हिली, लार्ड हार्डविक आणि ड्यूक आफ् बेडफर्ड असें ह्मणूं लागले कीं, फ्रान्स जर अशा रीतीनें नम्र होऊन आपल्याशीं तह करूं पाहत आहे, तर आपण पुढें लढाई कशास चालवा? इकडे पिट व त्याचे मेव्हणे जेम्स ग्रेनव्हिली व लार्ड टेंपल हे विरुद्ध पक्षाचे होते. फ्रान्स व स्पेन येथील राजे दोघेहि बोर्बन वंशीय असून त्यांनीं "फॅमिली कांपॅक्ट" (कौटुंबिक संगनमत) ह्मणून एक गुप्त तह केला आहे हें पिट यास कळलेलें होतें. ह्मणून फ्रान्सशीं लढाई बंद न करतां उलट स्पेनशींहि एकदम सुरू करावी असें त्याच्यामनांत होतें. पण कौन्सिलांत बहुमत त्याच्या विरुद्ध पडलें. तेव्हां त्यानें एकदम राजीनामा दिला.

वर्षप्रारंभीं जार्जास राज्याभिषेक झाला त्यावेळीं त्याच्या मुकुटांतील एक हिरा अकस्मात् गळून पडला होता. भाविक लोक हा अपशकुनच झाला ह्मणून समजत होते. त्यांस आतां असें वाटलें कीं, पिटची ही जी अधिकारच्युति झाली त्याचेंच तें पूर्व चिन्ह होतें. पिटला ह्याबद्दल वाईट वाटूं नये ह्मणून बाह्यात्कारी राजानें पुष्कळ खटपटी केल्या; त्यास सरदार बनवितों ह्मणून सांगितलें. अर्थात् असें केल्यानें आपली लोकप्रियता कमी होईल असें जाणून त्यानें तें कबूल न करितां आपल्या बायकोसाठीं मात्र ब्यॅरोनेटसी किंवा छोटीसरदारी घेण्याचें कबूल केलें, व तीन पिढ्यांपर्यंत ३,००० पौंडांचें पेन्शन स्वतः घेण्यास तो कबूल झाला. ह्यांत त्यानें कांहींच वावगें केलें नाहीं. कारण तो जसा लांच देण्या घेण्यापासून अगदीं अलिप्त होता, तसाच श्रीमंतीपासूनहि अगदीं अलिप्त होता. त्याच्या हातांतून वॉर सेक्रेटरी या नात्यानें लाखों पौंड खेळत होते; पण त्यांतील एकहि शिलिंग त्याच्या बोटांस कधीं चिकटून राहिलेला नव्हता. त्यामुळें त्याच्या अधिकारच्युतीनंतर जेव्हां त्याजवर ब्यूटच्या सांगण्यावरून किंवा पसंतीनें वर्तमानपत्रांतून वगैरे हल्ले सुरू झाले, तेव्हां तो जास्तच लोकप्रिय झाला आणि ब्यूट व त्याचे स्कॉच साथीदार ह्यांच्या थट्टा जास्त होऊं लागल्या. ब्यूटचें पिटलाच काढून समाधान झालें नाहीं, तर त्यानें न्यूकॅसललाहि खालीं ओढिलें. त्याच्या मनांत आपण एकट्यानें राज्य करावें असें होतें. पण त्याच्यांत अक्कल नव्हती. ह्मणून त्यानें पिटचा जरी अधिकार मिळविला तरी त्यास त्याची लोकप्रियता मिळवितां आली नाहीं. सर राबर्ट वालपोलचा मुलगा प्रसिद्ध पत्रलेखक होरेस वालपोल तारीख २० जून १७६२ रोजीं लिहितो कीं, 'माझा बाप वीस वर्षांत जितका लोकांचा नावडता झाला नव्हता, तितका ब्यूट वीस दिवसांत झाला आहे.' त्यास बाहेर जातांना बॉडिगार्ड घेऊन जावें लागूं लागलें. त्याच्यावर वर्तमानपत्रांतून जसजसे हल्ले जास्त होऊं लागले, तसतसा तो जास्तच चिडूं लागला, आणि जुन्या कारभारीमंडळांतील प्रत्येक व्हिग काढून टाकून त्याच्या-

ऐवजीं आपला कोणी तरी स्तुतिपाठक टोरी माणूस चिकटवूं लागला. पुढें त्यानें न्यूकॅसलचेंच लांचाचें व्रत सुरू केलें. जे टोरी लोक व्हिग लोकांप्रमाणें आपण कधीं लांच देणार किंवा घेणार नाहीं ह्मणून आज चाळीस वर्षें नाकानें कांदे सोलीत होते, तेच मुकाट्यानें त्या कामांत तरबेजपणा दाखवूं लागले. दुकानांतून जसा इतर जिनसांचा उघड उघड क्रयविक्रय व्हावा तसा पेमास्टराच्या आफिसांत सभासदांच्या व्होटांचा क्रयविक्रय होऊं लागला. या कारणामुळें आणि फ्रान्साशीं केलेला तह लोकांस पसंत नसल्यामुळें ब्यूटचें प्रधानमंडळ लवकरच डळमळूं लागलें. तेव्हां मग तें खालीं येण्यास थोडेंच कारण पुरें होतें व तें लवकरच उत्पन्न झालें. तें असें :—

तिजोरीचें उत्पन्न वाढविण्यासाठीं प्रधानांनीं सायडर दारूवर नांवाचा कर बसविण्याचें मनांत आणिलें. तेव्हां त्यांच्याविरुद्ध ती दारू उत्पन्न करणारांनीं जोराचा विरोध सुरू केला आणि पिट, हार्डविक, टेंपल इत्यादिकांनीं हा कर फार अन्यायाचा होईल असें प्रतिपादन सुरू केलें. जार्ज ग्रेनव्हिली मात्र बिलास अनुकूल होता. शेवटीं तें बिल पास झालें. तें जोरानें अमलांत आणण्याचा ब्यूटनें निश्चय केला. तेव्हां लोकांचा विरोध जास्तच माजला आणि शेवटीं ब्यूटनें गांगरून जाऊन ता. ८ एप्रिल १७६३ रोजीं आपल्या मुख्य प्रधानकीच्या जागेचा राजीनामा दिला.

ब्यूट बरोबर ज्यांनीं राजीनामे दिले त्यांमध्यें हेन्री फॉक्स हा होता. हा फार हुषार माणूस होता. प्रामाणिकपणानें वागता तर तो मोठ्या योग्यतेस चढला असता. पण त्यानें आपलें सर्व सामर्थ्य विलक्षण संपत्ति गोळा करण्यांत खर्च केलें, आणि तो आतां लार्ड हालंड बनून लार्डांच्या सभेंत गेला. त्याला पुढें चार्लस जेम्स फॉक्ससारखा विलक्षण कर्ता पुत्र झाला, ह्यावरूनच त्याची इतिहासांत विशेष किंमत समजली जाते. ब्यूटनें जरी मुख्य प्रधानकी सोडिली तरी त्यानें आंतून सूत्रधारीपणा चालविलाच होता; आणि राजाला आतां जी कारभारी मंडळी मिळाली ती बहुतेक

त्याच नमुन्याची होती. त्यांचें खाजगी वर्तन आणि सार्वजनिक वर्तन दोन्ही अत्यंत गर्ह्य असत. दारू पिण्याचें व्यसन त्यावेळीं बहुतेक लोकांमध्यें फारच असे; पण त्यांमध्येंहि ह्या कारभारीमंडळाचा नंबर बहुतेक सर्वांत वर असे. स्त्रियांच्यासंबंधानें त्यांच्या वागणुकीची तीच ओरड होती. राजा स्वतः वर्तनानें चोख असे; पण त्याला ही मंत्री मंडळी असली भेटल्यामुळें त्याच्या कारकीर्दीच्या ह्या पहिल्या भागास इतका काळिमा आला. ह्यावेळच्या ह्या मुत्सद्यांपैकीं दुर्गुणांच्या बाबतींत पहिला नंबर कोणास द्यावा हें ठरविणें कठीण आहे; पण कदाचित् तो मान ड्यूक आफ् ग्राफ्टन ह्यास देणें वाजवी होईल. ह्याचें वय ह्यावेळीं केवळ पंचवीस वर्षांचें होतें व तो पुढें पन्नास वर्षें जगला. तो सार्वजनिक कामास अगदीं अयोग्य होता. त्याचें खाजगी वर्तन अगदीं शुद्ध होतें. शिवाय, त्याच्या अंगीं सुस्वरूपाचाहि गुण नव्हता. त्याच्या चालीरीती जितक्या ओंगळ होत्या तितकाच त्याचा चेहराहि ओंगळ असे. ह्या मंडळींपैकीं रिग्बी हा खाजगी वर्तनानें इतका वाईट नव्हता; पण सार्वजनिक पैशाची लूट करण्याच्या कामीं त्याचा हात कोणाच्यानें धरवत नसे. तो एका बनयाचा मुलगा होता. त्याच्या बापानें सौथ सी कंपनीच्या सट्ट्यांत खूप पैसे मिळविलेले असल्यामुळें त्यानें आपल्या मुलाला चांगलें शिक्षण दिलें होतें इतकेंच नव्हे तर त्याच्याकरवीं यूरोपचा प्रवासही करविला होता; पण तो जो तेथून परत आला तो तीन दुर्गुण घेऊन आला — जुगार, मद्यपान आणि लांच खाणें. ह्या गुणांमुळें किंवा दुर्गुणांमुळें ड्यूक आफ् बेडफर्डला तो फार आवडला व त्यामुळेंच तो अगदीं भिकेस लागण्यापासून निभावला. स्वतः ड्यूक आफ् बेडफर्ड वर्तनानें रिग्बीइतकाच अग्राह्य होता. त्यास हल्लीं पन्नासावें वर्ष लागलेलें होतें. त्यानें आजपर्यंत मोठमोठ्या हुद्यांचीं पुष्कळ कामें केलेलीं होतीं, पण एकाहि कामांत त्यानें आपलें नांव केलेलें नव्हतें. त्यास आणखी अकरा वर्षें जगावयाचें होतें; पण त्यांत त्याला जुगाऱ्या व लाचलुचपत्या ह्यांखेरीज दुसऱ्या कोणत्याहि पदव्या मिळाल्या नाहींत.

आतां त्यावेळचे सगळेच मुत्सद्दी ह्या नमुन्याचे होते असें नाहीं. कांहीं त्यांच्याहून भिन्न प्रकारचे होते. उदाहरणार्थ, लार्ड ग्रॅनव्हिली हा हल्लीं सत्तर वर्षांचा झालेला असून त्यानें आजपर्यंत तीन राजे पाहिलेले होते, तरी त्याच्या चवथ्या राजाच्या ह्या अमदानींत, तो साधा कार्टरेट असतां जे सद्गुण व दुर्गुण वसत होते, तेच अद्यापि कायम होते. त्यानें ब्यूटच्या हाताखालीं जागा पत्करिली होती. पण ब्यूट निघण्याच्या पूर्वींच तो मरून गेला (जानेवारी १७६३). त्याचें सार्वजनिक वक्तृत्व फार उंच प्रतीचें असे. त्याचें खाजगी संभाषण फार गोड असे. तो स्वतः फार शिकलेला असून इतर शिकलेल्यांची तो मोठी मानमान्यता ठेवी व त्यांस आश्रय देई. पण त्याला स्वतःच्या मतांचा जितका अभिमान तितकाच इतरांच्या मतांचा तिरस्कार वाटे. तथापि सार्वजनिक कामांत लाच खाणें ह्मणजे कांहींच नव्हे, अशी समज असणाऱ्या त्या युगांत तो प्रामाणिक असे. तो जेव्हां आयर्लंदाचा गव्हरनर जनरल होता तेव्हां त्यानें स्विफ्ट खुष होईल अशा रीतीनें कारभार चालविलेला होता.

ज्यावेळीं राजाचें मंत्रिमंडळ अशा ह्या नमुन्याचें होतें, त्यावेळीं त्याचा मुख्य नोकर व अत्यंत राजनिष्ठ असा प्रजाजन वृद्ध झालेला होता. त्यानें दरबारचें किंवा मंत्रिसभेचें कधीं दर्शन घेतलेलें नव्हतें; तरी लार्डांची सगळी सभा आणि अर्धी कामन्स सभा ह्यांजपेक्षां त्यानें गादीची व गादीच्या मालकाची जास्त कामगिरी बजाविलेली होती. तिसरा जार्ज जन्मास येण्याच्यापूर्वीं बरींच वर्षें पोरांनीं बहुतेकांशीं सोडून दिलेली शाळा टाकून देऊन एक पंतोजी पोट भरण्यासाठीं लंदनास आलेला होता. जार्ज गादीवर बसला तोंपर्यंत त्यास संपत्ति प्राप्त झालेली नव्हती; (ती त्यास कधींच प्राप्त झाली नाहीं.) पण सत्कीर्ति प्राप्त झालेली होती; आणि जेथें जेथें इंग्रजी भाषा बोलण्यांत किंवा इंग्रजी पुस्तक वाचण्यांत येत असेल तेथें तेथें त्याचें नांव सर्वविश्रुत झालेलें आढळतें. तो कोण ह्मणाल तर सॅम्युएल जान्सन. स्टाफर्ड प्रांतांत लिचफील्ड

मुक्कामीं इ. स. १७०९ च्या सप्टेंबरच्या आठव्या तारखेस जॉन्सनचा जन्म झालेला होता. त्याचा बाप पुस्तकविक्या असून तो पुस्तकें वाचण्याचा इतका नादी होता कीं, त्यास तीं विकण्याचा धंदा साधत नसे. पण त्याचा मुलगा अनेक शाळांतून बरेंचसें शिकून वयाच्या १६ व्या वर्षी जेव्हां घरीं परत आला, तेव्हां त्यास त्याच्या त्या पुस्तकांनीं वांकलेल्या दुकानाच्या फळ्या पाहून इंद्रभुवनांत पडल्यासारखें झालें. नंतर दोन वर्षें त्यानें त्या पुस्तकांचा पाहिजे तसा वाचून फन्ना उडविला. त्याचें डोकें मोठें व शरीर जसें धिप्पाड असे, तसेंच त्याचें स्मृतिसामर्थ्यहि जंगीच असे. त्यानें रुचेल तें वाचावें, पण वाचलें तें कधीं विसरूं नये. अशा रीतीनें त्यानें आपलें डोकें अनेक प्रकारच्या ज्ञानानें पूर्णपणें कोंबून टाकिलें होतें. अध्ययनाविषयींचा हा त्याचा जबर उत्साह त्याच्या अगदीं वृद्धावस्थेपर्यंत कायम होता. त्याच्या मेंदूंतील शिकण्याच्या उत्कट इच्छेची ज्योत कधींच मंदावली नाहीं. आपल्या बुद्धीचें ग्रहणसामर्थ्य कितपत कायम राहिलें आहे हें पाहण्याकरितां तो गृहस्थ ह्मातारपणीं डच भाषा शिकूं लागला, तेव्हांहि तिचें पाणी अगदीं लखलखीत असल्याचें त्यास आढळून आलें. ह्या विलक्षण गृहस्थ तारुण्याच्या ऐन भरांत असा कांहीं वागत असे कीं, बेकनप्रमाणें जणूं काय एकंदर ज्ञान हाच त्यानें आपला विषय करून ठेविला आहे. त्या काळच्या त्या रुंद पानाच्या पुस्तकावर ओथंबलेल्या जानसनास आपल्या पोटांत पोटभर अन्न गेलेलें नाहीं किंवा आपल्या अंगावर अंगभर वस्त्र नाहीं, ह्याचें स्मरण होत नसे. नंतर कर्मधर्मसंयोगानें त्याची गति आक्सफर्डमधील पेंब्रोक नामक कॉलेजांत झाली. तेथें त्यानें पैशाच्य गरीबींत पण मानीपणाच्या श्रीमंतींत दोन वर्षें कशीं तरी काढिलीं. एकदां त्याचे जोडे अगदीं फाटलेले पाहून व त्यांस आतां जास्त ठिगळें लावण्याची सोय राहिलेली नाहीं हें लक्ष्यांत येऊन, त्याच्या एका साहाध्यायास त्याची दया आली व त्यानें त्याच्या खोलीबाहेर जोड्यांचा एक नवा जोड आणून ठेविला. पण जॉनसन इतका मानी होता कीं, त्यानें तें रागानें फेंकून दिलें. अशा रीतीनें कशींबशीं त्यानें दोन वर्षें कॉलेजांत

काढिलीं. तेवढ्यांत त्यानें कॉलेजमध्यें अवश्य असल्यापेक्षां आणखी पुष्कळ अध्ययन करून लिचफील्डचा रस्ता पुनः सुधारिला. तितक्यांत त्याचा बाप वारला. व तेणेंकरून त्याच्या गरीबींत व एकटेपणांत जास्तच भर पडली. तेव्हां पोटासाठीं, लिहिण्यास, शिकविण्यास, भाषान्तर करण्यास, पाहिजे तें करण्यास तो तयार झाला. या सुमारास तो एका विलक्षण बाईवर फिदा झाला. ती त्याच्यापेक्षां वीस वर्षांहून जास्त वडील होती, विलक्षण रीतीची लठ्ठ होती, विलक्षण रीतीनें तोंडास रंग फांसणारी होती, विलक्षण तऱ्हेची सोंगाडी होती आणि विलक्षण तऱ्हेची वेडगळ होती; तरी तिला पाहून तो मोहित झाला व त्यानें तिच्याशीं लग्न लाविलें. तिच्यापाशीं थोडेसे पैसे होते. त्या पैशाच्या जोरावर त्यानें एक लहानशी शाळा काढिली; पण त्याच्या शाळेंत पोरेंच येईनात. कांहीं थोडींशीं आलीं, त्यांत डेव्हिड ग्यॅरिक हा एक होता. ह्या गुरुशिष्यांचा तेव्हां जो स्नेह जमला तो मरेपर्यंत कायम राहिला. गुरुशिष्यांनीं समागमें लंदनांत जाऊन नशीबाची पारख करण्याचा निश्चय केला. एकानें ग्रंथलेखनाचा धंदा पत्करिला व दुसऱ्यानें नटाचा धंदा पत्करिला. एक पुष्कळ वर्षें अगदीं गरीबींत राहिला व दुसरा एकदम भाग्यास व कीर्तीस चढला. एकास लंदनांतील भिकार चाळींतील पोटमाळ्यांवरून अर्धवस्त्र व अर्धपोटीं वर्षेंच्या वर्षें कंठावीं लागलीं व दुसरा थोडक्या काळांत श्रीमंतांचा मित्र आणि मोठ्यांचा लाडका बनून गेला. आतां ग्यॅरिक ह्यास जी श्रीमंती व कीर्ति प्राप्त झाली तीस तो योग्यच होता; पण जॉनसन यास गरीबीचे जे धरमधक्के खावे लागले, ज्या उपासमरी सोसाव्या लागल्या व जो कुगृहवास पत्करावा लागला, त्यास मात्र तो अगदीं योग्य नव्हता. तथापि त्यानें आपला लेखनाचा धंदा तसाच नेटानें चालविला. तरी पण त्याच्या ग्रंथांपेक्षांदेखील त्याच्या राहणीनेंच तो आपल्या समकालीनांस जास्त सन्माननीय वाटे; व आम्हासही वाटतो. त्याचें रासेलस, त्याचा रँब्लर, त्याचीं कविचरित्रें व त्याची डिक्शनरी हीं तर सर्वप्रसिद्ध व सर्वप्रिय आहेतच; पण त्याची ती साधी व मानी राहणी, त्याचें

तें ज्ञानप्रचुर व चातुर्ययुक्त संभाषण, हीं त्यांच्यापेक्षांहि जास्त लोकप्रिय होतीं व आहेत. शिवाय त्याचें बाह्यांग व बाह्य वर्तन जरी खडखडीत व दांडगें असें दिसे, तरी त्याचें अंतरंग व अंतःकरण फार शुद्ध व कोमळ असे. त्याच्या उदारपणाच्या व कोमळ मनाच्या पुष्कळ गोष्टी सांगतात; पण त्यांपैकीं एक गोष्ट फारच हृदयद्रावक आहे. एकदां असें झालें कीं, हा व ह्याचा मित्र बर्क हे दोघे रस्त्यानें चालले असतां एक अगदीं गरीबीस आलेली, थकलेली, भुकेलेली व निराश्रित, अशी पण्यांगना रस्त्यावर थंडीनें कुडकुडत पडलेली त्याच्या दृष्टीस पडली. तिला रात्रीची रात्र ठेवून घेण्यापुरती बर्कच्या बिऱ्हांडांत जागा होती, पण तेथें तिला उचलून नेण्याची त्याला ताकद नव्हती. जॉन्सनच्या बिऱ्हाडांत अशी जागा नव्हती. कारण, त्याच्या आप्तांनीं व आश्रितांनीं त्याची सर्व जागा नेहमींच व्यापलेली असे; पण त्याच्याजवळ राक्षसाची शक्ति होती; व त्या दरिद्री पापिणीस खांद्यावर घालून बर्कच्या बिऱ्हाडीं नेण्याच्या कामीं त्यानें ती खर्चहि केली. नंतर पुष्कळ वर्षांनीं, अन्नविहीन, गृहविहीन व मित्रविहीन अशा दुसऱ्या एका बहुतेक मरावयास टेंकलेल्या वाग्देवीच्या भक्तास दुसऱ्या एका पण्यांगनेनें आपल्या घरीं नेलें व त्याची मोठ्या ममतेनें शुश्रूषा केली. ग्रंथकाराचें नांव डिक्किन्सी व बाईचें नांव ॲन. ॲननें अशा रतीनें डिक्किन्सीला जें साहाय्य केलें तेणेंकरून तिच्याच धंदेबहिणीला वाग्देवीच्या व दयादेवीच्या ह्या दोन भक्तांनीं हें जें साहाय्य केलें होतें त्याचेंच जणूं काय तिनें ऋण फेडिलें असें मानण्यास हरकत नाहीं. हळूहळू पण खात्रीपूर्वक जॉनसनची कीर्ति पसरत चालली. रात्रीचे दिवस करून मोठ्या प्रयासानें तयार केलेल्या जंगी शब्दकोशानें त्यास प्रसिद्धीस आणिलें. नंतर त्याचे मोठमोठाले व उत्तम लोक स्नेही बनूं लागले. लार्ड चेस्टरफील्डच्या मनामध्यें त्याचा स्नेह संपादन करून डिक्शनरी आपणास अर्पण करून घेण्याची हांव सुटली; पण जॉनसननें त्यास दाद दिली नाहीं. कारण प्रथम जॉनसन लंदनांत आला तेव्हां ह्यानें त्यास दाद दिली नव्हती. असो नंतर मग जॉनसननें एक क्लब स्थापन केला, बर्क, रेनोल्डस, ग्यॅरिक, गोल्डस्मिथ वगैरे नामांकित

ग्रंथकार, वक्ते, चित्रकार वगैरे या क्लबाचे सभासद झाले. तेव्हांचीं त्याचीं भाषणें बहुतेक जशींच्या तशींच टिपून ठेवण्यास आपल्या सर्वांच्या सुदैवानें जेम्स बासवेल ह्मणून एक निःसीम भक्त निघाला. तेणेंकरून इंग्रजी भाषेस व ती समजणारांच्या मनोरंजनास व ज्ञानास एक अमूल्य भर पडलेली आहे. "बासवेलकृत जॉनसनचें चरित्र" ह्या नमुन्याचे, ग्रंथपरिप्लुत अशा इंग्रजी भाषेंतहि, चरित्रलेख फारच अल्प आहेत. सारांश, ह्या ग्रंथानें बासवेलनें जसें जॉनसनास तसें आपणासहि अमर करून ठेविलें आहे. ह्यावरून जार्ज राजा गादीवर बसला त्यावेळीं त्याच्या कारकीर्दीस कांहीं तरी भूषण आणण्यास जॉनसनसारखा गृहस्थ जीवंत होता. तो पुढें आणखी चोवीस वर्षें जगला, ह्या गोष्टीचें महत्व वाचकांच्या लक्ष्यांत सहज येण्यासारखें आहे.

---

# प्रकरण तेरावें.

## विल्क्सप्रकरण.

जॉन विल्क्स हा एका दारू तयार करणाराचा मुलगा होता. त्यास लहानपणीं इंग्लंदांत व बाहेर चांगलें शिक्षण मिळालेलें होतें. तरुणपणीं त्यानें यूरोपांतील बऱ्याच देशांतून प्रवास केलेला होता. तेथून परत आल्यावर त्यानें बापाच्या आग्रहावरून एका फार श्रीमान् परंतु त्याच्यापेक्षां दहा वर्षांनीं मोठ्या ( तो त्यावेळीं बेवीस वर्षांचा होता ) अशा स्त्रीशीं लग्न केलें होतें. अर्थात् हें लग्न त्यास सुखावह झालें नाहीं. अखेरीस तीं दोघें विभक्त झालीं व जन्मभर विभक्तच राहिलीं. विल्क्सला हें पाहिजेच होतें. तेणेंकरून त्यास स्वतःचा व बायकोकडून मिळालेला पैसा पाहिजे तसा खर्च करण्यास पूर्ण मोकळीक सांपडली. त्यानें त्यापैकीं पंधरा हजार पौंड खर्च करून कसातरी पार्लमेंतांत प्रवेश करून घेतला. त्याला बहुधा अशी अशा असावी कीं, पार्लमेंटाचा सभासद झालों ह्मणजे हा खर्च भरून काढतां येईल. पण तें त्यास साधलें नाहीं. त्याला पैशाची जास्त ओढ होऊं लागली. ह्यास कारण तो लार्ड सँडविच, सर फ्रॅन्सिस डॉशवूड व टॉमस पॉटर अशा हलकट व चैनी लोकांच्या संगतीस लागला हें होतें. डॉशवूड हा ह्यावेळीं फडणिशीच्या कामावर होता आणि लार्ड सँडविच हा आरमारावरील मुख्य प्रधान होता. ह्यावरून ह्यावेळीं मोठमोठे प्रधानदेखील कोणत्या दर्जाचे लोक असत हें चांगलें लक्षांत येतें. असो. पण विल्क्स ह्या लोकांपेक्षां फारच हुशार व चतुर माणूस होता, ह्मणून केवळ दुर्गुणसाम्यामुळें जमलेला त्यांचा याचा स्नेह फार दिवस टिकला नाहीं.

विल्क्स जरी पार्लमेंताचा सभासद झाला तरी तेथें तो फारसा पुढें आला नाहीं. प्रथम जें त्यानें आपलें नांव केलें तें पार्लमेंता बाहेरच केलें. लार्ड ब्यूट लोकांचा नावडता झाला, ह्या गोष्टीमुळेंच ह्यास लोकांचा आव-

डता होण्याची संधि सांपडली. राजानें व ब्यूटनें मिळून मागच्या प्रकरणांत सांगितलेला जो तह केला तो लोकांस अगदीं रुचला नाहीं. त्यामुळें लोकांचीं मनें फार क्षुब्ध झालीं व सामान्य लोकांच्या बोलण्यांतला तो विषय होऊन बसला. तेव्हां आपल्या कृतीचें मंडन करण्यासाठीं ह्मणून ब्यूटनें " ब्रिटन " व " ऑडिटर " अशीं दोन वर्तमानपत्रें काढविलीं. तीं चालविण्याचें काम प्रसिद्ध कादंबरीकार स्मॉलेट आणि अप्रसिद्ध नाटककार मर्फी यांच्याकडे संपविलें. यावेळीं सरकारच्याविरुद्ध टीका करणारें मुख्य पत्र ह्मटलें ह्मणजे " मॉनिटर " हें होतें. तें १७५५ त निघालेलें असून त्याचा एडिटर किंवा संपादक जॉन एन्टिन्क नांवाचा एक गृहस्थ होता. तें पत्र साप्ताहिक असून दर शनिवारीं प्रसिद्ध होत असे. त्यांत वर्तमान वगैरे कांहीं नसून चालू राजकीय प्रश्नांच्यासंबंधानें काय ती चर्चा असे. याच्याशीं सामना करण्यासाठीं ह्मणून वरील दोन पत्रें ब्यूटनें निर्माण केलेलीं होतीं.

विल्क्सचें पार्लमेंतांत विशेषसें जमलें नाहीं हें वर सांगितलेंच. तेव्हां तो सरकारांत एकादी मोठी नोकरी मिळावी ह्मणून खटपट करूं लागला. त्यानें कान्स्टान्टिनोपल येथील इंग्लिश वकिलाची नोकरी मिळावी ह्मणून खटपट केली, पण त्यास ती मिळूं दिली नाहीं. नंतर तो नुक्त्याच जिंकलेल्या किबेक प्रांताचा गव्हरनर जनरल होण्याची खटपट करूं लागला; तीहि खटपट व्यर्थ गेली. तेव्हां त्याची अशी समजूत झाली कीं, ब्यूट आपल्या आड आला असला पाहिजे. ह्मणून ती गोष्ट ध्यानांत धरून त्यानें सरकाराविरुद्ध 'नॉर्थ ब्रिटन' नांवाचें नवें वर्तमानपत्र काढिलें. तो फार हुशार माणूस असल्यामूळें तें मॉनिटरपेक्षांहि जास्त चांगलें व जास्त झणझणीत निघूं लागलें. हें वर्तमानपत्र चालविण्याच्या कामीं विल्क्स यास चर्चिल नांवाच्या एका धर्मोपदेशकाची चांगली मदत मिळाली होती. तो नांवाचा धर्मोपदेशक होता. या दोघांची प्रथम १७६२ त गांठ पडली. थोड्या अवधींतच विल्क्सनें त्यास गुंगवून टाकिलें. विल्क्सच्या अंगांत हा गुण होता कीं, कोणाचा

त्याच्याशीं निकट संबंध झाला कीं, त्याला त्याची मोहनी पडत असे. ह्या दोघांनीं नार्थब्रिटन पत्रांत वाटेल त्याच्यावर यथेष्ट हल्ले करावे. विल्क्स गद्यामध्यें लोकांच्या थट्टा करीत असे. आणि चार्चिल पद्यामध्यें करीत असे. चर्चिलही विल्क्सप्रमाणें बायकोपासून विभक्त झालेला होता, आणि धर्मोपदेशकाच्या जाग्यावर त्यानें लाथ मारिलेली होती. तो शरीरानें फार बळकट असे व थट्टा केलेला मनुष्य आपल्यावर कदाचित् हल्ला करील ह्मणून हातांत एक जंगी सोटा घेऊन तो नेहमीं फिरत असे. ही जोडी जशी ब्यूटवर हल्ले करण्यास मागें पुढें पहात नसे तशी इतरांवरहि तुटून पडण्यास मागें पुढें पहात नसे. उदाहरणार्थ, वृद्ध ग्रंथकार डा जॉनसन यानें जेव्हां ब्यूटनें ह्मणजे, तिसऱ्या जार्जानें, दिलेलें पेनशन पत्करिलें तेव्हां पेनशन व पेनशन घेणारा ह्या शब्दांचीं जीं प्रसिद्ध निंदात्मक लक्षणें जॉनसनें आपल्या कोशांत दिलीं होतीं त्यांस हरताळ लावण्यास सांगण्यास ह्यांनीं कमी केलें नाहीं.

ह्या कारणामुळें तें पत्र फार लोकप्रिय झालें. आणि त्याच्यापुढें राजपक्षीय पत्रें, ऑडिटर व ब्रिटन यांस हातच टेंकावे लागले. पहिलें ता. ८ फेब्रुवारी १७६३ रोजीं लयास गेलें व दुसऱ्यानें मागून चारच दिवसांनीं तोच पंथ स्वीकारिला. नंतर मग प्रत्येक आठवड्यास नार्थ ब्रिटनचे प्रधानमंडळावर व त्यांच्या कृतीवर जास्त जास्त कडक असे हल्ले अगदीं अगदीं उघड येऊं लागले. त्यांत कधीं कधीं राजाचें नांवही पुढें येत असे; पण त्या पत्राच्या पंचेचाळीसाव्या अंकांत जो हल्ला आला त्यामुळेंच तें ऐतिहासिक प्रसिद्धीस चढलें. ती कथा अशीः—

लार्ड ब्यूटनें राजीनामा दिल्यावर जेव्हां जार्ज ग्रेनव्हिली मुख्य प्रधान झाला, तेव्हां नवीन कारभार कसा काय चालतो हें पाहण्यासाठीं आपल्या पत्राचा नवीन अंक काढण्याचें विल्क्सनें मुद्दाम लांबणीवर टाकिलें. त्यास हें पहावयाचें होतें कीं, ब्यूटचा हात कारभारांतून अगदींच निघतो किंवा हा पडद्यामागें उभा राहून पुनः पूर्ववत् नव्या प्रधानांचीं कळसूत्री बाहुलीं चालवितो. त्याचा बेत असा होता कीं, तशी स्थिति दृष्टीस

पडल्यास पुनः आपला पूर्वक्रम सुरू करावयाचा. इतक्यांत पार्लमेंताच्या सभेपुढें राजाचें नव्या सेशनाच्या आरंभीं जें संभाषण व्हावयाचें होतें त्याची नकल त्याच्या हातीं पिटचा मेव्हणा टेंपल ह्याच्या येथें हे तिघे बोलत असतां पडली, व तेणेंकरून त्याची निराशा होऊन त्यानें तो पंचेचाळीसाव्या अंकांतील प्रसिद्ध लेख खरडला. हा अंक पूर्वींच्या अंकांपेक्षां विशेष कडक होता असें नाहीं; कदाचित् कमीच कडक होता. त्यांत प्रत्यक्ष राजावर हल्ला केलेला नसून केवळ त्याच्या प्रधानांवर केलेला होता. त्यांत प्रारंभीं असें स्पष्ट ह्मटलें होतें कीं, राजाच्या संभाषणाबद्दल प्रधान जबाबदार असतात. अशी प्रस्तावना करून नंतर असें ह्मटलें होतें कीं, प्रस्तुतचे संभाषणांत राजास जास्त फसविण्याचा यत्न केलेला आहे किंवा राष्ट्रास जास्त फसविण्याचा यत्न केला आहे हें सांगणें कठीण आहे. पुढें असें प्रतिपादन केलें होतें कीं, अशा सद्गुणी राजाच्या तोंडीं असल्या घाणेरड्या करांच्या व इतर कृतींच्या संबंधानें प्रधानांनीं असले उद्गार घालावे ही गोष्ट प्रत्येक स्वराष्ट्रभक्तास शोचनीय वाटली पाहिजे. सारांश, ह्या लेखाची भाषासरणी फाजील कडक नव्हती आणि त्याचा मतलबही गैर नव्हता. पण ह्यावेळीं राजाच्या मनांत आपल्या अधिकाराबद्दलची नवी कल्पना अगदीं ताजी होती. आपल्या कृतीला कोणी यत्किंचितही दोष दिला तरी तो रागानें वेडा होत असे. आज पुष्कळ दिवस राजाच्या मनांत ह्या स्पष्टवक्त्या वर्तमानपत्रकाराबद्दल द्वेष वसत होता आणि त्याच्या प्रधानांच्या मनांत त्याच्याबद्दल भीति होती. प्रधांनाना वाटलें कीं, हा समय ह्यास हाणून पाडण्यास फार उत्तम आहे. तेव्हां मग काय विचारतां? राजानें हा लेख वाचून त्याबद्दल आपले अभिप्राय देण्याचा आपल्या कायदेपंडितांस हुकूम केला. आणि राजास कसा अभिप्राय पाहिजे हें जाणून त्यांनीं असें मत दिलें कीं, हा लेख अगदीं राजद्रोहात्मक असून लोकांस बंडास प्रवृत्त करण्यास लावणारा अशा तऱ्हेचा आहे. गैरवर्तन ह्या सदराखालीं कायद्यानें शिक्षा करण्यासारखा हा अपराध आहे. मग काय विचारतां? प्रधानांनींही ताबडतोब आणि अविचारानें या सल्ल्याचा

फायदा घेण्याचा बेत केला. त्यांनीं नार्थ ब्रिटन पत्राच्या संपादकांस, छापणारांस आणि प्रकाशकांस पकडण्याकरितां ( या लोकांचीं नांवें न घालतां ) मोघम वारंट सोडिलें. छापणारा व प्रकाशक ह्यांना पकडून लार्ड हॅलिफॅाक्स व लार्ड इग्रिमांट ह्यांच्यापुढें आणतांच त्यांनीं चर्चिल व विल्क्स हे संपादक ह्मणून नांवें सांगितलीं. तेव्हां अर्थात् विल्क्स ह्यास पकडलें. त्याला पकडण्यास त्याच्या घरीं स्टेटसेक्रेटरीचे कामगार गेले. इतक्यांत कर्मधर्मसंयोगानें त्याच्या घरीं चर्चिल आला. विल्क्सला माहीत होतें कीं, हा चर्चिल आहे हें जर कामगारास समजलें तर ते त्यालाही पकडण्यास कमी करणार नाहींत; आणि आपल्याप्रमाणें तो पार्लमेंताचा सभासद नसल्यामुळें त्याला आपणास पकडण्याचा तुह्मास अधिकार नाहीं असें त्यांना सांगतां येणार नाहीं. ह्मणून त्यानें एकदम त्यास पुसलें, “ कसें काय टामसन साहेब! बरें आहेना! तुमचें कुटुंब कसें काय आहे ? ” चर्चिलनें लागलेंच तें ताडिलें, आणि ठीक आहे असें ह्मणून तो तेथून निसटला. तावडतोब घराकडे जाऊन त्यानें आपले कागदपत्रांचा बंदोबस्त केला आणि तो जो फरारी झाला तो पुनः सांपडला नाहीं. पण ह्यावेळींहि त्यानें प्रताप गाजविण्यास कमी केलें नाहीं. तो जो पळाला तो एका पाथरवटाच्या पोरीस घेऊन पळाला. ती ह्याच्यावर अगदीं फिदा झालेली होती. पण पहिली बायको असल्यामुळें ह्यास तिच्याशीं लग्न करतां येईना. तेव्हां दोघांस पश्चात्ताप होऊन ती आपल्या बापाकडे रहावयास परत आली; पण बाप तिला येऊं देईना. तेव्हां ती पुनः त्याजकडे गेली. तो मरेपर्यंत ती त्याच्यापाशीं राहिली. मरतेवेळीं त्यानें लग्नाच्या बायकोस व प्रीतीच्या बायकोस दोघींसहि वर्षासनें देऊन ठेविलीं. चमत्कार सांगावयाचा हा कीं दुसरीपेक्षां पहिलीस जास्त वर्षासन देऊन ठेविलें. इकडे विल्क्स यास इग्रिमांट व हॅलिफॅाक्स यांजपुढें घेऊन गेले. तो अगदीं शांतपणें तेथें गेला; पण आपण पार्लमेंताचा सभासद असल्यामुळें आपणास पकडण्याचा तुह्मांस अधिकार नाहीं हें त्याचें ह्मणणें कायम होतेंच. ह्मणून तो त्यांच्या सवालांस मुळींच जाब देईना. तसेंच नार्थ ब्रिटनच्या ४५ व्या अंकाचें संपा-

दकत्वहि कबूल करीना. तो मोठ्या धिट्टाईनें असेंहि ह्मणूं लागला कीं, राजावर माझी जितकी निष्ठा आहे, तितकीच त्याच्या मंत्र्यांबद्दल मला ओकारी आहे; आणि त्यानें असें स्पष्ट सांगितलें कीं, पार्लमेंत सुरू झाल्याबरोबर आपण हा प्रश्न त्या सभेपुढें आणणार. तेव्हां त्या लार्ड-द्वयानें त्याची टावरच्या तुरुंगांत रवानगी केली आणि त्याच्या घरावर जप्ती नेऊन त्याचे सर्व कागदपत्र अडकवून टाकिले. ह्या मूर्खपणाच्या अरेरावीचा परिणाम असा झाला कीं, ज्या लोकांचा त्याच्याशीं आजपर्यंत कांहींएक संबंध नव्हता असे लोकदेखील मंत्र्यांच्या ह्या गैर कायदेशीर वर्तनाच्यासंबंधानें त्याच्या वतीनें बोलूं लागले. विल्क्सनें आपल्या मित्रांकरवीं हेबियस कॉर्पस ॲक्टाखालीं 'कोर्ट ऑफ् कॉमन प्लीज' ह्या कोर्टाकडून समन्स काढिलें, आणि विल्क्स यास हजर करण्याकरितां स्टेट सेक्रेटरीच्या कामगारांवर तें बजाविलें; पण त्यावेळीं तो त्यांच्या ताब्यांत नव्हता. ह्मणून त्यास एक आठवडा टॉवरमध्येंच काढावा लागला. नंतर त्यास कोर्टापुढें हजर केलें; तेव्हां प्रट मुख्य न्यायाधीशानें तो पार्लमेंताचा सभासद आहे ह्या मुद्यावरच त्यास लागलेंच सोडून दिलें.

विल्क्स सुटला हें पाहून त्याच्या पक्षाच्या लोकांस जसा सर्वत्र आनंद झाला, तसेंच त्याच्या शत्रूंस वाईट वाटलें व रागहि आला. मग त्यांनीं त्यास त्रास देण्यासाठीं आणखी पुष्कळ खटपटी केल्या. तसें करितांना त्यांच्या हातून जास्त चुका झाल्या. पण विल्क्स मुळींच घाबरला नाहीं. त्यानें त्यांची बिलकुल पर्वा केली नाहीं. तो उलट जास्तच धिट्टाईनें व उद्धटपणानेंहि वागूं लागला. नार्थ ब्रिटनमधील आपले सर्व लेख एकत्र करून त्यानें एक पुस्तक छापिलें व त्यांवर टीपा देऊन असें सिद्ध करून दाखविलें कीं, राजाच्या भाषणाबद्दल त्याचे प्रधानांसच जबाबदार धरिलें पाहिजे. शिवाय त्यानें लार्ड हॅलिफॉक्स व अंडर सेक्रेटरी मि. वूड यांजवर गैर कायदेशीर रीतीनें आपणास कैद केल्याबद्दल व मोघम वारंट दिल्याबद्दल फिर्यादी केल्या. या फिर्यादींत त्याला १००० पौंड नुकसान भरून मिळालें. यानंतर विल्क्सवर

जास्तच हल्ले सुरू झाले. राजा, त्याचे प्रधान व दोघांचेहि खुषमस्करे, विल्क्स ह्यास देववेल तितका त्रास देऊं लागले. बकिंह्याम प्रांतांतील मिलिशिया फौजेचा तो कर्नल होता, त्या जाग्यावरून त्यास हाकलून लावण्याचा राजानें हुकूम केला. त्या प्रांताचा लार्ड लेफ्टेनंट लार्ड टेंपल हा होता. तो हुकूम कळवितांना त्यानें त्याच्या वर्तनाबद्दल फार स्तुति केली. त्याबरोबर राजानें लार्ड टेंपल यास त्या हुद्यावरून काढून टाकिलें इतकेंच नव्हे तर प्रिव्ही कौन्सिलरच्या यादींतूनही त्याचें नांव कमी केलें. डाक्टर जॉनसन यासदेखील विल्क्सचा इतका राग आला कीं, तो ह्मणाला मी जर राजा असतों तर माझा व माझ्या प्रधानांचा इतका अपमान केल्याबद्दल विल्क्स ह्यास पाण्यांत बुडविण्यासाठीं मी अर्धा डझन हुजरे पाठवून दिले असते. पार्लमेंतांत तर त्याला शत्रू फारच झाले. पार्लमेंत उघडल्याबरोबर विल्क्सनें आपली हकीकत सभासदांपुढें मांडण्याचा यत्न केला; पण त्याच्या अगोदरच लार्ड ग्रेनव्हिली राजाचा निरोप घेऊन सभेपुढें आला होता. त्याचा परिणाम असा झाला कीं, सभेनें नार्थ ब्रिटन पत्राचा ४९वा अंक राजद्रोही आहे असें ठरवून तो अंक सरकारी मांगाच्या हस्तें जाळण्याचा हुकूम सोडिला.

इकडे विल्क्स यानें एक खाजगी छापखाना घालून त्यामध्यें "स्त्रियांवर निबंध" ह्मणून धर्मविरुद्ध व नीतिविरुद्ध एक पुस्तक छापिलें होतें. तें त्यानें अगदीं खाजगी रीतीनें छापिलेलें असून त्याच्या प्रती विक्रीस मुळींच नव्हत्या. सारांश, खाजगीनीतिदृष्टय़ा जरी तें गैर होतें, तरी सार्वजनिकनीतिदृष्टय़ा त्यानें अपराध केलेला नव्हता. तरी तें त्याच्या शत्रूंनीं ह्यावेळीं त्याच्या इतर कागदपत्रांबरोबर पकडून लार्डांच्या सभेपुढें नेलें. लार्ड सांडविचसारख्या नीतीच्या पुतळ्यांनीं त्याच्यावर खरमरीत टीका केली, व तें पुस्तक छापल्याबद्दलच त्यानें त्याची सैतानाशीं तुलना केली. अशी सैतानाशीं तुलना केल्यांत सैतानाचा कमीपणा केल्यासारखें होणार ह्मणून तसें केल्याबद्दल सैतानाची

त्यानें माफी मागितली. तो व त्याचे इतर निबंध हे घाणेरडे, निंदात्मक आणि पार्लमेंताच्या विशेष हक्कांचा भंग करणारे आहेत, असें ठरविलें. धर्मनिंदा केल्याबद्दल विल्क्सवर फिर्याद करावी असें राजास विनंतिपत्र त्यानें पाठविलें. ह्या नव्या हल्ल्यास तोंड देण्यास विल्क्स ह्यावेळीं समर्थ नव्हता. कारण, दुसऱ्या एका असल्याच कुत्सित हल्ल्यास तो ह्यावेळीं बळी पडलेला होता. कारण, ह्याप्रमाणें सरकारचे मिंदे वरच्या सभेंत त्याची अब्रू घेण्याचा यत्न करीत असतां खालच्या सभेंतील एक मिंदा त्याचा जीवच घेण्याचा यत्न करीत होता. त्याचें नांव मार्टिन असें होतें. त्याच्यावर आठ महिन्यांपूर्वीं नार्थब्रिटन पत्रांत हल्ला आलेला असून त्याचा सूड उगविण्याचा त्यानें आतां निश्चय केला होता; पण तत्पूर्वीं त्यानें चोरून पिस्तुलाचा नेम धरण्याचा अभ्यास केला होता, व तो आपणास साधतो असें पाहून तारीख १९ नवंबर १७६३ रोजीं जो सभेंत वादविवाद झाला त्याप्रसंगीं त्यानें तो हल्ला करणारा मनुष्य ‘ नामर्द व दुष्टबुद्धीचा हरामखोर ’ आहे असें ह्मणून टाकिलें. त्याबरोबर विल्क्सनें मी तो हल्ला केला होता, ह्मणून धिटाईनें सांगितलें. त्याबरोबर मार्टिननें त्यास द्वंद्वयुद्धास पाचारण केलें. हें पाचारण पूर्वीं तयारी करून मुद्दाम केलेलें असल्यामुळें नीचपणाचें होतें. तें विल्क्सनें कबूल केलें. हाइडपार्कच्या मैदानांत त्यांचे व विल्क्स याचे दोन हात झाले. त्यांत विल्क्स यास मोठी जखम झाली व रक्तबंबाळ होऊन तो खालीं पडला. तरी त्यावेळींहि त्यानें आपली काळजी सोडून मार्टिनला जखम वगैरे लागली नाहींना ह्मणून विचारपूस सुरू केली. त्यास तो नीच माणूस अगदींच पात्र नव्हता.

इकडे विल्क्स अशा रीतीनें मरावयास घातला असतां तिकडे दोन्ही पक्षांच्या लोकांचीं मनें जास्तच क्षुब्ध होत चाललीं. आपला प्रतिपक्षी दुर्बल होऊन पडला आहे ह्याचें प्रधानमंडळास कांहींच वाटलें नाहीं. त्यास कामन्स सभेंतून हांकून लाविलें; मिलिशियामधून त्यास हुसकून दिलेंच होतें. नार्थ ब्रिटन पत्र सरकारी मांगाकडून जाळण्याचा हुकूम झाला होता

ह्मणून मागें सांगितलें; पण लोकांनीं त्यांस तसें करूं दिलें नाहीं. चवताळून जाऊन लोकांनीं शेरीफ व त्याचे कामगार ह्यांच्या हातून तो अंक काढून घेतला आणि त्याच्या ऐवजीं एक बूट व एक झगा यांस प्रसिद्धपणें आग लावून दिली. लार्ड ब्यूट आणि राजाची आई यांचें सूत जमलेलें आहे असा जो लोकसमज व त्याबद्दलचा जो त्यांच्या राग त्याचें तें निदर्शक होतें. तात्पर्य, राजाची व प्रधानांची ही करणी लोकांस कितपत रुचत होती हें ह्यावरून स्पष्ट कळण्यासारखें होतें. पण तें अशा राजास व अशा प्रधानांस कसें कळावें? एकीकडे प्रधान पुनः हल्ला करण्याइतका विल्क्स बरा केव्हां होतो हें पहाण्याकरितां त्याच्याकडे राजवैद्य रोजच्या रोज पाठवीत असत. दुसरीकडे डब्लिन, लंदन वगैरे शहरांतील म्युनिसिपालिट्या त्यास आपापल्या शहराचें स्वातंत्र्य ( " Freedom of the city " ह्मणून एक अत्यन्त मोठा मान ) अर्पण करीत होत्या. एकीकडे विल्क्स हा अत्यन्त दुःखकारक रीतीनें पारीस येथें आपल्या मुलीकडे हळूहळू चालला असतां दुसरीकडे एक्झीटर शहरीं लोकांनीं क्षुब्ध होऊन ब्यूटचा पुतळा फांसावर चढविला आणि सरकारी अम्मलदारांस न जुमानतां तेथें एक पंधरवडापर्यंत तसाच लोंबत ठेविला. एकीकडे विल्क्स हा हद्दपार होऊन आपल्या शत्रूंच्या तडाक्यांतून आपलें स्वातंत्र्य व आपला प्रत्यक्ष जीव ह्यांचें संरक्षण परदेशांत करीत असतां, दुसरीकडे रेनोल्डसनें तयार केलेली त्याची तसबीर गिल्डहालसारख्या प्रसिद्ध ठिकाणीं लोकांनीं टांगून दिली इतकेंच नव्हे तर त्या तसबिरीवर " कायदेशीर रीतीनें इंग्रजांच्या स्वातंत्र्याचें मनःपूर्वक प्रतिपादन करणारा " असें सन्मानपूर्वक लिहून ठेविलें.

विल्क्स बरेच दिवस परदेशीं राहिला हें त्यानें बरेंच केलें. कारण त्यानें इंग्लंदांतील आपलें कर्तव्य बजाविलें होतें. " कोर्ट आफ् कामन प्लीज " ह्या कोर्टांत त्याच्या खटल्यासंबंधानें प्रॅट साहेबानें केलेले ठराव आणि गिल्डहाल येथील कोर्टानें दिलेले निकाल, ह्यांच्यायोगानें इंग्रजांचें कायमचें हित झालेलें होतें. ह्मणून " स्त्रियांवरील निबंधा " चें

कर्तृत्व शाबीद करण्यासाठीं तो आपल्या शत्रूंच्या हातीं जाऊन पडला नाहीं, ह्यांत त्यानें कांहीं गैर केलें नाहीं. पण त्याच्या शत्रूंनीं त्याच्या गैरहजरीचा होईल तेवढा फायदा घेण्यास कमी केलें नाहीं. "किंग्स् बेंच" ह्या कोर्टानें त्यास ४५वा अंक पुनः छापल्याबद्दल आणि "स्त्रियांवरील निबंध" लिहिल्याबद्दल दोषी ठरविलें आणि तो शिक्षा घेण्यास एकदम हजर झाला नाहीं ह्मणून कोर्टाच्या अपमानाबद्दल त्यास राजरक्षणबाह्य (outlaw) करून टाकिलें. तेव्हां ह्या शहाण्या प्रधानमंडळास असें वाटलें कीं, विल्क्सचा आतां कायमचा निकाल लागला व तो आपल्यास पुनः त्रास देऊं शकणार नाहीं. पण त्यांच्या हें लक्षांत आलें नाहीं, किंवा आलें असल्यास त्यांस त्याचें इंगित कळलें नाहीं, कीं, सर्व देशभर कलालांच्या दुकानांवरील पाट्यांवरही विल्क्सचा मुखवटा चमकूं लागला आहे. सारांश विल्क्स ह्मणजे लोकांच्या स्वातंत्र्याचा कट्टा अभिमानी असा सर्वत्र जनसमज झाला आहे ह्या गोष्टीकडे प्रधानांनीं योग्य लक्ष पुरविलें नाहीं. त्यांना वाटलें कीं, विल्क्स हद्दपार आहे, व तेथेंच तो मरण्याचा संभव आहे, एवढी गोष्ट आपल्यास बेफिकीर राहण्यास बस्स आहे. इकडे विल्क्स परदेशीं राहून एका राजधानींतून दुसऱ्या राजधानींत अशा रीतीनें भटकतच होता, आणि जाईल तिकडे नवे मित्र व नवे चहाते जोडीतच होता. तो एकंदर चार वर्षें इंग्लंदाबाहेर होता. तेवढ्या मुदतींत त्याचा एक अत्यन्त मोठा शत्रू आणि एक अत्यन्त प्रसिद्ध मित्र असे दोन गृहस्थ गमावले. ता. २६ आक्टोबर १७६४ रोजीं होगार्थ हा प्रसिद्ध चित्रकार निवर्तला. त्यानें विल्क्स हा प्रॅट साहेबापुढें उभा राहिलां असतां त्याचें थट्टेचें चित्र काढिलें होतें आणि तेव्हांपासून विल्क्स व चर्चिल यांनीं त्याजवर नार्थ ब्रिटन पत्रांत सारखे हल्ले सुरू केले होते. ही गोष्ट त्याच्या मनांस फार लागून त्यानेंच तो मरण पावला असें ह्मणतात. अशा मोठ्या माणसाच्या कारकीर्दीचा अशा हलकट तंट्यामध्यें शेवट व्हावा ही गोष्ट फार शोचनीय होय. होगार्थच्या मागून थोडक्याच दिवसांनीं चर्चिल निवर्तला. विल्क्सवर त्याची पूर्ण भक्ति असल्यामुळें तो त्यास परदेशीं जाऊन मिळाला होता. त्याची

त्याची बलोन मुक्कामीं गांठ पडली आणि तेथेंच ताप येऊन तो निवर्तला. विल्क्सनें आपलीं काव्यें एकत्र करून टीपा देऊन छापावीं अशी चार्चिलची फार इच्छा होती, व त्याप्रमाणें विल्क्सनें नेपल्स मुक्कामीं आपल्यास कोंडून घेऊन आपल्या मृत मित्राची इच्छा पुरी करण्याचा कित्येक दिवस यत्नहि करून पाहिला. पण तेव्हांची त्याची स्थिति व सभोंवतालची स्थिति हीं दोनही त्यास प्रतिकूल होतीं व त्यामुळें ती गोष्ट तितकीच राहिली.

असो. सध्या हें विल्क्सप्रकरण इतकेंच पुरें करून, तितक्यांत दुसरें एक त्याच्यापेक्षांहि जास्त महत्वाचें प्रकरण उपस्थित झालें त्याचा विचार करूं.

---

# प्रकरण चवदावें.

## अमेरिकेंतील वसाहती.

विल्क्स हद्दपार झालेला असल्यामुळें प्रधानांना त्याची भीति नाहींशी झाली होती. त्यास शिक्षा केल्याबद्दल राजास मोठा आनंद झाला व अभिमानहि वाटत होता. व्हिग लोकांचें वर्चस्व मोडून टाकल्याबद्दलहि तो असाच अभिमान बाळगीत होता. त्याला वाटलें कीं, आतां आपणास विरोध करणारा कोणी राहिला नाहीं. पण असे तो मनांत मांडे खात आहे इतक्यांत त्याचा मुख्य प्रधानच त्यास जबर विरोध करीत आहे असें आढळून आलें.

ब्यूटनें जेव्हां भीतीनें किंवा निराशेनें राजीनामा दिला तेव्हां त्यास वाटलें होतें कीं, ग्रेनव्हिल यास मुख्य प्रधान केला ह्मणजे त्याचें बाहुलें आपणास पडद्यामागून पाहिजे तसें नाचवितां येईल. पण हा त्याचा अजमास अगदीं चुकला. ग्रेनव्हिल हा उदासीन वृत्तीचा आणि आकुंचित बुद्धीचा माणूस असल्यामुळें मुख्य प्रधानकीस अगदीं अयोग्य होंते. शिवाय तो फार हट्टी असे. त्यामुळें तो अधिकारारूढ होऊन दोन वर्षें झालीं नाहींत तोंच राजा पिट इतकाच त्याचा ( अत्यन्त ) द्वेष करूं लागला. ग्रेनव्हिल हा कायद्याच्या कामांत व सामान्य व्यवहारांत फार वाकबगार असे; पण त्याच्यांत युक्ति ह्मणून बिलकुल नसे. ह्मणून तो राजास त्याच्या कर्तव्यांच्या वगैरे संबंधानें लांब लांब व्याख्यानें देऊन त्रासवून सोडी. राजाची महत्वाकांक्षा त्यास नोकराप्रमाणें वागविण्याची असे, आणि ग्रेनव्हिल हा आपण त्याचा जणूं काय धनीच आहे अशा नात्यानें त्यास उपदेश करूं लागे. इतक्यांत १७६९ सालीं डोकें फिरून तो आजारी पडला. हें दुखणें त्यास शेवटपर्यंत मधून मधून जाचीतच असे. असो. पण ह्यावेळीं जेव्हां तो आजारांतून उठला तेव्हां पुढें आपला पुत्र वयांत येई तोंपर्यंत असेंच दुखणें पुनः आल्यास

घोंटाळा पडूं नये ह्मणून राजाच्या आजारांत कारभार कोणी पहावयाचा हें ठरविण्यासाठीं ग्रेनव्हिलनें एक रजिन्सीबिल पुढें आणिलें. त्यामध्यें जीं नांवें सुचविलीं होतीं त्यांतून जसें ब्यूटचें ( राजमातेच्या प्रियकराचें ) नांव गाळिलें होतें तसेंच राजमातेचेंहि गाळिलें होतें. राजमातेस वगळण्याचें ग्रेनव्हिलनें असें कारण दाखविलें होतें कीं, तिचें नांव कामन्स सभेस पसंत पडणार नाहीं. राजासही हें कारण योग्य वाटल्यावरून तो या गोष्टीस कबूल झाला होता. पण बिल जेव्हां सभेपुढें नेलें तेव्हां सभेनेंच तिचें नांव बिलांत घालण्याचें सुचविलें. तेव्हां अर्थात् राजास ग्रेनव्हिलचा जास्तच संताप आला व त्यास एकदम दूर करण्याचें त्यानें मनांत आणिलें. तेव्हांच्या व हल्लींच्या स्थितींत ह्यागोष्टीच्यासंबंधानें फार अंतर आहे. हल्लीं राजास एकादा प्रधान आवडत नसला तरी कामन्स सभेंत जर त्यास बहुमताचें पाठबळ असेल तर त्यास काढण्याची राजास छाती होत नाहीं. तेव्हां तसें नसे. असो. ग्रेनव्हिलीस घालवून दिल्यावर पिटनें प्रधानकी पत्करावी ह्मणून कंबर्लंदाच्या द्वारें राजानें त्यास पुष्कळ आग्रह करून पाहिला; पण पिट त्यावेळीं आजारी असल्यामुळें आणि ब्यूटचा दीर्घद्वेषी टेंपल ह्याचा उलट आग्रह पडल्यामुळें त्यानें ती नाकारिली. तेव्हां राजाचा निरुपाय होऊन त्यास ग्रेनव्हिललाच अधिकारावर ठेवणें भाग पडलें. पण तेणेंकरून त्यांचा एकमेकांच्या संबंधाचा हट्टीपणा अर्थात् कमी झाला नाहीं. इतक्यांत असें एक प्रकरण उद्भवलें कीं, त्यामध्यें दोघांसहि हट्टास पेटण्यास जास्तच जागा सांपडली. तें प्रकरण असें.

उत्तर अमेरिकेंत अटलांटिक महासागराच्या कांठीं इंग्लिशांच्या अनेक वसाहती स्थापन झालेल्या होत्या, वगैरे गोष्टी वाचकांस माहीत आहेतच. सुमारे दोन शतकांवर मेहनत करून, दुःखें व हाल सोसून, तेथलि मूळचे रहिवाशी व युरोपांतील इतर देशचे वसाहतकार ह्यांशीं झगडून इंग्लिश लोकांनीं त्या वसाहती नांवारुपास आणिलेल्या होत्या. त्यांच्यायोगानें इंग्लंदची संपत्ति, इंग्लंदची अब्रू आणि इंग्लंदचें सामर्थ्य

हीं सर्वच वृद्धिंगत झालेलीं होतीं. त्या मिळविण्यासाठीं कित्येक इंग्रजांनीं जरी आपले जीव खर्ची घातलेले होते तरी एकंदरींत इंग्लंदास त्या स्वस्तांतच पडलेल्या होत्या. तेव्हां त्यांचें ममत्व कमी होईल किंवा त्यांचा आश्रय नाहींसा होईल अशाप्रकारचें एकादें कृत्य करावयास सिद्ध होणें किती वेडेपणाचें काम होईल हें न समजणारा एकादा राजा किंवा राजमंत्री कसा निपजावा हें समजणें अमळ कठीण पडतें. तथापि यावेळीं तसा राजा गादीवर होता आणि या कामीं उत्तेजन देणारा मंत्रीही त्यास मिळाला होता ही गोष्ट निर्विवाद आहे.

ह्या अमेरिकन वसाहतींतील लोक कणखर, उद्योगी, नियमित रीतीनें राहणारे आणि हातराखून खर्च करणारे असे बहुधा असत. ते मूळचे प्यूरिटन असून, त्यांचीं मतें व व्यवहार हीं अद्यापि त्याच धोरणावर बहुतेक असत. त्यांस अत्यंत गरीबी व अत्यन्त श्रीमंती हीं दोन्हीहि माहीत नसत. ते लोक शेतीचा धंदा करणारे असून आपलीं शेतें आपणच नांगरीत, स्वतःच्या कष्टानें उत्पन्न केलेल्याच जिनसांवर निर्वाह करीत आणि स्वतःच्या श्रमानें विणलेलीं वस्त्रें वापरीत. त्यांची वसति त्यावेळीं फार पातळ असून त्यांचीं शहरें व खेडीं दूरदूर पसरलेलीं असत, व ते लांकडी इमारतींतून राहत. तेथील मूळचें इंदियन लोक केव्हां हल्ला करतील ह्याचा नेम नसल्यामुळें तीं घरें ते मजबूत रीतीनें बांधीत. ह्या खेड्यापाड्यांतून प्यूरिटन काळच्या ह्मणजे क्रामवेलच्या वेळच्याच जुन्या न्यायदानपद्धती अमलांत असत. खोडा, बिडी, मानखोडा वगैरे रानटी शिक्षेचीं साधनें त्यांच्यांत अद्यापि दृष्टीस पडत. सारांश, जाडेंभरडें अन्न खाणें, अंग मोडून मेहनत करणें आणि मनापासून ईश्वरास भिऊन वागणें, ह्या गोष्टी त्यांच्यांत अद्यापि वसत होत्या. सभ्य व पापभीरु लोकांसच कलालांचा धंदा करण्याची त्यांच्यांत परवानगी असे, आणि जे फार दारू पिऊन मत्त होतील त्यांस पुनः दारू पिऊं नये ह्मणून त्यांची नांवें अशा दुकानांतून कागदावर लिहून चिकटवून ठेवीत. कनेक्टिकट प्रांतांत वीस वर्षांच्या आंतील मुलास

डाक्टराच्या परवानगीविना तंबाकू ओढण्याची मनाई असे, व इतरांस तरी दिवसांतून एकदां ओढण्याची परवानगी असे. तसेंच इमारती लांकडी असल्यामुळें कोणत्याहि इमारतीपासून दहा मैलांच्या आंत तो ओढण्याची मनाई असे. या वसाहतींतील मुख्य शहर जें बोस्टन तेथील स्थिति अंमळ निराळी असे. तेथील लोक खेड्यापाड्यांतील लोकांपेक्षां अम्मळ जास्त चैनी असत. त्यांची रहाणी थोडी जास्त संकीर्ण असे. तथापि बोस्टनमध्येंदेखील इंग्लंदपेक्षां एकंदरींत लोकांच्या रीतीभातींत जास्त साधेपणा दिसत असे. न्यूयॉर्क प्रांतांत अंमळ जास्त श्रीमंती दृष्टीस पडे; आणि दक्षिणेकडील वसाहतींतून एकंदरींत दिमाखही अंमळ जास्त असे. तेथील लोकांस इंग्लंदांतील लोकांप्रमाणें घोडे, कुत्रीं, शर्यती, पारधी, नाच, गाणें वगैरेचा शोक असे. दक्षिणेंतील मुख्य शहर चार्लस्टन असे व तेथील शहरांत त्याचा नंबर तिसरा लागे. पहिलें बोस्टन व दुसरें न्यूयार्क. शेवटचें व चवथें शहर ह्मटलें ह्मणजे फिलाडेल्फिया हें असे. या शहरांतील इमारती मोठाल्या असून त्या दगड व विटा ह्यांनीं बांधलेल्या असत आणि त्यांत बागा वगैरे पुष्कळ असत. सारांश, फिलाडेल्फिया येथील लोकांस अभिमान वाटण्यासारखें त्यांचें शहर असे. तेथें एका वसाहतींतून दुसऱ्या वसाहतींत, किंवा एका शहरांतून दुसऱ्या शहरास जाण्याचीं साधनें चांगलीं नसत. पण इंग्लंदांत तरी ह्यासंबंधानें सरासरी तशीच स्थिति त्यावेळीं असे. काळी आणि गोरी—नीग्रो व यूरोपियन—सगळी वस्ती सरासरी वीस लाख असे. सर्व लोक सुखी, शांतिवत्सल आणि कसून काम करणारे ( लढवय्ये लढाईचें काम करण्यांत, इतर कामांत ) असून राजनिष्ठ राहण्यास अगदीं राजी असत, आणि त्यांस राजनिष्ठ ठेवावे अशा योग्यतेचे ते असत. सारांश, त्यांचा राजा व त्याचे प्रधान ह्यांनीं त्यांची माहिती करून घेऊन त्यांच्या कलानुरूप त्यांस वागवावें अशा प्रकारचे ते असत. ते जातीचे इंग्रजच आहेत हें ओळखून जर राजानें त्यांच्याशीं वर्तन केलें असतें, तर सर्व गोष्टी सुस्थित राहिल्या असत्या; पण राजा जरी ब्रिटन ह्या नांवाचा मोठा अभिमानी होता, तरी ब्रिटन ह्या नांवाखालीं वसाहतकारहि

येतात हें त्याच्या लक्ष्यांत नव्हतेसें दिसतें. ह्या वसाहतींच्यासंबंधानें राजानें जी वृत्ति धारण केली ती काय ह्मणून केली हें सांगणें कठीण आहे. इंग्लंदची अन्न व संपत्ति हीं दोन्हीं वाढविण्यास त्या कारणीभत झालेल्या होत्या हें वर सांगितलेंच आहे. शिवाय नुकेंच जें युद्ध होऊन गेलें होतें त्यामुळें दोन मोठ्या शत्रूंपासून त्यांची मुक्तताही झालेली होती. एक फ्रेंच लोक आणि दुसरे तेथील तांबडे इंदियन लोक. आतां न्यूफौंडलंडजवळच्या थोडक्याशा मासेमाऱ्या गांवढ्यांशिवाय फ्रेंचांची उत्तर अमेरिकेंत तीळभर जमिन राहिलेली नव्हती. आणि फ्रेंचांच्या पराजयानंतर पान्टियाक नामक इंदियन सरदारानें इतर सर्व सरदारांस जमवून इंग्लिशांवर हल्ला करण्याचा जो गुप्त कट रचला होता, त्याचा दोन वर्षें सारखें रण माजून अगदीं निकाल लागलेला होता. कारण त्याचा त्यांत पराभव होऊन तो मारलाहि गेल्यामुळें तो तट अजीबाद मोडला होता आणि ह्या सर्व गोष्टींस कारण इंग्लिदची मदत हें झालेलें होतें. तात्पर्य, इंग्लंद व वसाहती ह्यांजमध्यें जर मतभेद असेल तर तो मोडण्यास योग्य असा हा समय होता. राजा जर दूरदृष्टि असता व त्यास जर दूरदृष्टि प्रधानांचा सल्ला मिळता तर यावेळीं दोन्ही लोकांचा समेट झाला असता. फार कशाला? जार्जपेक्षां अमळ कमी हट्टी असा जर दुसरा एकादा राजा ह्यावेळीं गादीवर असता, आणि ग्रेनव्हिल व त्याचे साथीदार ह्यांच्यापेक्षां अमळ कमी दुराग्रही असे जर प्रधान ह्यावेळीं अधिकारावर असते, तरीदेखील दोन्ही बाजूंनीं पुढें जी गोष्ट निकरावर गेली ती टळली असती. वास्तविक ह्मटलें ह्मणजे इंग्लंदांतील लोक आणि हे वसाहतकार ह्या दोघांची जात एक, भाषा एक आणि सुखदुःखेंही एक, असें असल्यामुळें त्यांचा स्नेहसंबंधच असावयाचा; पण वास्तविक तशी स्थिति नव्हती. वसाहतकार जातीचे इंग्रज असून प्यूरिटन पंथाचे असल्यामुळें त्यांना दुसऱ्यांचा अंमल, मग तो इंग्लंदांतल्या इंग्रजाचाही असेना, बिलकुल खपत नव्हता. इकडे इंग्लंदानें त्या वसाहती इंग्रजांच्या हस्तपराक्रमानें स्थापिलेल्या आणि त्यांच्या रक्तसेचनानें वाढविलेल्या असल्यामुळें, त्या

इंग्लंदचाच एक भाग आहे असें त्यांस वाटे; तेव्हां त्यांनीं स्वतंत्रतेच्या लांब लांब गोष्टी सांगाव्या हें इंग्लंदास बिलकुल खपेना. इंग्लंदास वाटे कीं हा त्यांचा शुद्ध कृतघ्नपणा आहे. दोन्ही पक्षांतील पुढाऱ्यां-मधील ह्या समजुती मोडून टाकून दोघांसही ताळ्यावर आणण्यास राजा चांगला पाहिजे होता. निदान तिसऱ्या जार्जाहून निराळा पाहिजे होता. पण असले विचार लांबवून काय उपयोग? वस्तुस्थिति वर सांगितल्यासारखी होती.

वसाहतींचा कारभार चालविण्याचीहि तेव्हांची पद्धति सदोष असे. ती १६७५ त स्थापिलेली होती. ह्मणजे असें केलेलें होतें कीं,प्रत्येक वसाहतीचा कारभार पाहण्यास एकेक गव्हरनर नेमिलेला असून तो इंग्लंदांतून पाठवीत. ह्या गव्हरनरांवर देखरेख करण्यास " लार्ड्स् ऑफ् ट्रेड " ह्मणून एक प्रिव्ही कौन्सिलची कमिटी असे. गव्हरनरांनीं वसाहतींतील व्यापारविषयक व इतर गोष्टींच्यासंबंधानें ह्या कमिटीस लांब लांब रिपोर्ट करावे अशी चाल असे. आणि गव्हरनर ह्या ठराविक रिपोर्टांशिवाय कधीं कधीं लांबलचक अशीं खाजगी पत्रेंहि त्या लार्डांस पाठवीत. त्यांत वसाहतकार दांडगे, असंतोषी, गव्हरनरांचा अपमान करणारे आणि इंग्लंदविरुद्ध बंड करण्यास उत्सुक असे आहेत, अशा त्यांस शिव्या दिलेल्या असत. ह्याच बातम्यांवर अर्थात् प्रधानही अवलंबून असल्यामुळें त्यांचींही मनें वसाहतकाराविरुद्ध कलुषित झालेलीं असत. तेव्हां त्यांच्या मनानें असें घेतलेलें होतें कीं, सर्व वसाहतींस एकाच्या अमलाखालीं आणून त्यांच्यांतील सैन्य तेवढें वाढवावें आणि त्यांचा स्वतःसाठीं कायदे करण्याचा जो अधिकार आहे तो कमी करावा. वसाहतकारांच्या इंग्लंदविरुद्ध बऱ्याच तक्रारी होत्या. त्यांना ह्या विला-यती गव्हर्नरांचा जुलूम सहन होत नसे. गुन्हेगारांस जबरीनें काळे-पाण्यावर पाठवीत हें त्यांस खपत नसे. गुलामांचा प्रवेश आपल्या प्रांतांत होऊं नये ह्मणून त्यांनीं केलेले कायदे इंग्लंदनें रद्द केलेले होते. अशा त्यांच्या तक्रारी होत्या. शिवाय, आपल्या फायद्यासाठीं ह्मणून

इंग्लंदनें वसाहतकारांच्या व्यापाराला बरींच बंधनें घातलेलीं होतीं तीं त्यांस कबूल नव्हतीं. इंग्लंदनें असें ठरविलें होतें कीं, वसाहतींशीं जो व्यापार करावयाचा तो एक इंग्लंदच्या अथवा वसाहतकारांच्या गलबतांतूनच झाला पाहिजे. येणेंकरून इतर सर्व लोकांस व तेव्हांचे मुख्य व्यापारी जे डच लोक त्यांस, ह्या वसाहतींशीं व्यापार करण्यास प्रतिबंध होत असे. साखर, तंबाकू, कापूस, लोकर, नीळ, सुंठ आणि रंगाचीं लांकडें हे जिन्नस इंग्लंद व इंग्लंदच्या वसाहती ह्यांखेरीज इतरत्र पाठविण्याची वसाहतकारांस परवानगी नसे. यूरोपांत मिळणारा सर्व माल वसाहतकारांनीं इंग्लंदांत खरेदी करावा आणि इंग्लिश गलबतांतून आपल्या देशीं न्यावा, अशी त्यांजवर सक्ती असे. इंग्लंदांत जो कळाकुसरीचा जिन्नस तयार होत असेल तो आपल्या देशीं उत्पन्न करण्याची वसाहतकारांस मना असे. शिवाय, वसाहतीवसाहतीमधील व्यापाराला देखील अशींच विलक्षण बंधनें घातलेलीं होतीं. या सगळ्यांचा उद्देश किंवा निदान परिणाम तो व्यापार बसावा असा असे किंवा होत असे. सारांश, ह्यांपैकीं कांहीं कायदे इंग्लिशांनीं इंग्लिशांसाठींच केलेले आहेत असें मुळींच दिसत नसे, तर जणूं काय एकाद्या टर्किश अंमलदारानेंच केलेले आहेत असा भास होई. उदाहरणार्थ, मेन नामक वसाहतींतील जंगलासंबंधानें असा कायदा असे कीं, जमिनीपासून एक फूट उंचीवर दोन फुटांहून अधिक घेराचें असलेलें लांकूड सरकारी आरमाराला डोलकाठी करण्याव्यतिरिक्त इतर कामासाठीं कधीं तोडूं नये. अशा प्रकारचे हे कायदे कडक असल्यामुळें ते मोडण्याचा वसाहतकारांस अर्थात् अत्यंत मोह उत्पन्न होई. इतर देशांतून उघड रीतीनें माल आणण्याची मनाई असल्यामुळें वसाहतकार तो चोरून आणीत; आणि त्यांच्या देशाचा किनारा मोठा असल्यामुळें त्यांस तें सहज साधे. इ० स० १७३३ च्या साखरेच्या कायद्यानें फ्रेंचांच्या ‘ वेस्ट इंडीज ’ नामक बेटांतून साखर व गूळ हे जिन्नस मोठी जकात भरल्याविना आणण्याची जेव्हां मनाई झाली, तेव्हां ह्या दोहोंपासून उत्पन्न होणारी जी ‘ रम ’ दारू तिचा व्यापार करून लठ्ठ होणाऱ्या न्यूइंग्लंद

वसाहतकारांना मोठी पंचाईत पडली. काय करावें? मरावें किंवा कायदा मोडावा? अर्थात् कायदा गैर असल्यामुळें त्यांनीं तो मोडण्यास सुरवात केली. अशा रीतीनें जकात बुडवून व्यापार सुरू झाला, व सर्व तंत्र पूर्ववत् चाललें. पण ह्यांचा व्यापार अशा कायद्यांनीं घशांत टाकूं पाहणाऱ्या विलायतच्या इंग्रजव्यापाऱ्यांस हें कसें खपावें? ते तक्रारी करूं लागले. लढाई चालू होती तों तिकडे कोणीं विशेष लक्ष दिलें नाहीं. पण आतां ती बंद झाली असल्यामुळें आणि असा राजा व असे प्रधान जुळल्यामुळें, वरील स्थिति बदलूं लागली. ग्रेनव्हिल-प्रधानमंडळानें असा ठराव केला कीं, व्यापारविषयक वरील कायदे सक्तीनें अमलांत आणून, जकात दिल्याशिवाय चोरून माल आणण्याची जी चाल ती अगदीं बंद करून टाकावयाची. त्यांनीं दुसरा असा ठराव केला कीं, अमेरिकेंत बंदोबस्त करण्याकरितां दहा हजार फौज कायमची नेऊन ठेवावयाची; आणि तिसरा ठराव असा केला कीं, ह्या फौजेचा तिसरा हिस्सा खर्च इंग्लंदांतूनच कर बसवून वसाहतकारांपासून वसूल करावयाचा. पण कोणत्याही गोष्टीबद्दल ठराव करणें आणि तो अमलांत आणणें ह्या दोन गोष्टी अगदीं निराळ्या आहेत. वसाहत-कारांना ह्या तिन्ही ठरावांबद्दल राग आला आणि त्यांनीं तिहींसही प्रतिरोध केला. आतां व्यापारविषयक कायद्यांना विरोध करणें ही गोष्ट केवळ कायद्याच्या दृष्टीनें गैर होती असें जरी मानिलें, तरी नवीन फौज लादून घेण्यास नाखुष असणें ह्यांत कांहीं गैर नव्हतें; आणि नवीन करास होईल तितका प्रतिरोध करणें हें तर स्वतंत्रतेच्या आणि स्वदेशाभिमानाच्या प्रत्येक दृष्टीनें अगदीं न्याय्यच होतें.

इंग्लिश सरकारानें व्यापाराचे कायदे कडक रीतीनें अमलांत आणण्यास प्रथम सुरवात केली. ग्रेनव्हिलनें आपल्या आकुंचित मनांत असा निश्चय केला कीं, इंग्लंदच्या मुख्य कारखानदारांच्या फायद्यासाठीं वसाहतकारांनीं इंग्लंदशींच व्यापार करावा ह्या हेतूनें केलेले जे कायदे ते सक्तीनें अमलांत आणावयाचे; ह्मणजे स्पॅनिश अमेरिका आणि

वेस्ट इंडीज येथून चोरून येणारा माल बंद करावयाचा. ही गोष्ट अमलांत आणण्यासाठीं त्यांनीं एक प्रकारचीं "सर्च वारंटें" (झाडा घेण्याचे हुकूम) तयार केलीं. तीं जरी कायदेशीर असलीं तरी अशा धर्तीवर बनविलेलीं होतीं कीं, स्वाभिमानी लोकांस तीं तुच्छ करण्याचाच मोह उत्पन्न व्हावा. तीं पाहून एका स्वाभिमानी माणसानें तर प्रत्यक्ष विरोध सुरू केला. जेम्स ओटिस ह्मणून एक नामांकित सरकारी वकील होता, त्यानें मदतीचे हुकूम (Writs of Assistance) ह्यांचा प्रसिद्ध रीतीनें निषेध करतां यावा ह्मणून आपल्या जाग्याचा राजीनामा दिला. ह्या हुकुमांना प्रतिरोध करण्यामध्यें ओटिसची निवळ कायद्याच्या दृष्टीनें चूक असेल; पण स्वदेशहित व तें साध्य करण्यासंबंधानें नीतीच्या दृष्टीनें त्याचें करणें बरोबरच होतें. ओटिसचें वय ३६ वर्षांचें होतें, आणि तो हार्वार्ड नामक प्रसिद्ध युनिव्हर्सिटीचा ग्रॅजुएट असून, वकिलीच्या कामांत मोठा वाकबगार होता. त्याच्या एका संभाषणानें तो अप्रसिद्धाचा सुप्रसिद्ध झाला, आणि इंग्लंदच्या जुलमाविरुद्ध वसाहतींच्या हक्कांचें रक्षण करणारांपैकीं एक अग्रणी होऊन बसला. त्याच्या भाषणाचें एका दुसऱ्या तरुणानें टिप्पण करून घेतलें, आणि त्याचें तें वक्तृत्व ऐकून तो इतका भाळला कीं, ह्या हुकमांना आपणहि विरोध करावयाचा असा त्यानें निश्चय केला. तो कोण ह्मणाल तर जॉन ॲडॅम्स हा होय. तो ह्मणतो:—ह्यावेळीं आणि ह्या ठिकाणींच (अमेरिकेचें) स्वातंत्र्य ह्या मुलाचा जन्म झाला. त्या जंगी श्रोतृसमाजापैकीं प्रत्येकजण माझ्यासारखाच ह्या मदतीच्या हुकुमांविरुद्ध शस्त्र उचलण्यास तयार होत्साता निघून गेला असेल असें मला वाटतें. यावेळीं (१७६३) जॉन ॲडॅम्स ह्मणजे मोठा प्रसिद्ध माणूस होता असें नाहीं. तो त्यावेळीं केवळ एक होतकरू वकील असून गरिबी व संकटें ह्यांच्याशीं झगडून मानास व अब्रूस चढलेला होता. हा फार उंच नसून त्याची शरीरकाठी फार बळकट होती. तो हट्टी, लालबुंद, रागीट, छोटा अदमी बऱ्याच गरिबींतून क्रमाक्रमानें वर चढला होता. पुढें जी त्याची महत्कीर्ति व त्याचें नांव होऊन पुढें पुष्कळ

पिढ्यांपर्यंत चालू रहावयाचें होतें, त्याचें त्यास अगोदर जणूं काय स्वप्नच पडलेलें होतें. अमेरिकेच्यासंबंधानें राजाच्या डोक्यांत जें मोठें वेड भरलें होतें आणि त्याला ज्या प्रधानांनीं दुबळेपणानें प्रोत्साहन दिलें, किंवा नीचपणा पत्करून विरोध केला नाहीं, त्यांनीं जर थोडासा विचार केला असता तर त्यांस अमेरिकन लोकांमध्यें जॉन ॲडॅम्ससारखे व त्याच्यावरहि ताण करणारे पुष्कळ सुपुत्र आहेत हें माहित असतें तर आपण असें करणें ह्मणजे केवढा धोका अंगावर ओढून घेत आहों, हें त्यांच्या ध्यानांत आलें असतें. पण प्रधानमंडळाला ॲडॅम्सची मुळींच माहिती नव्हती. ओटिसची थोडीशी माहिती होती ती अशी कीं, तो एक बंडखोर व फाजील असा सरकारी नोकर आहे. ह्मणून, ओटिसनें जेव्हां वरील संभाषण केलें तेव्हां अमेरिकेच्या स्वातंत्र्याचा जन्म झाला, असें ॲडॅम्स ह्यास वाटतें हें जर त्यांच्या कानावर गेलें असतें, तर ते केवळ खदखदां हंसले असते.

नवीन फौजेच्यासंबंधानेंहि वसाहतकारांचें मत असेंच प्रतिकूल होतें. ते ह्मणूं लागले कीं, फ्रेंच लोकांचें जेव्हां येथें वर्चस्व होतें आणि इंदियन लोकांचें बंड जेव्हां मोडलेलें नव्हतें, तेव्हां अशी संरक्षक फौज येथें आणून ठेविली असती तर कदाचित् सयुक्तिक झालें असतें; पण आतां तिची मुळींच जरूर नाहीं; इतकेंच नव्हे तर तिजपासून उलट आह्मास भीति आहे. कारण प्रसंगीं सरकार तिचा उपयोग आमच्या स्वातंत्र्याचें संरक्षण करण्याच्या कामीं करणार नाहीं, तर उलट त्याचें संकोचन करण्याच्या कामीं करील. बरें, ह्या फौजेच्या खर्चापैकीं एक तृतीयांश खर्च इंग्लिश पार्लमेंताकडून कर बसवून वसाहतकारांपासून काढावयाचा हा विचार तर ह्याच्यापेक्षांहि जास्त विरोधजनक होता व झाला. दोन पिढ्यांवर जास्त वर्षांपूर्वीच मॅसॅच्युसेट्स् आणि न्यूयॉर्क ह्या दोन वसाहतींनीं इंग्लंदास स्पष्ट रीतीनें असें कळविलें होतें कीं, आह्मावर कर बसविण्याचा विलायत सरकारास मुळींच हक्क नाहीं. कारण तेथील पार्लमेंतांत वसाहतींचे प्रतिनिधी नाहींत व तेव्हांच्या परिस्थितींत

असण्याची सोयच नव्हती. प्रतिनिधींविना कर बसविण्याचा हक्क असूं नये ही गोष्ट इंग्लंदच्यासंबंधानें जितकी प्रिय होती, तितकीच अमेरिकन लोकांना अमेरिकेच्यासंबंधानें होती. पैशाची चणचण उडाली असतां आजपर्यंत पुष्कळ प्रधानमंडळांनीं भरभराटींत असलेल्या अमेरिकन वसाहतींवर कर बसविण्याचा विचार मनांत आणिला होता, पण तो अमलांत आणण्याचें ग्रेनव्हिलच्या नशिबीं लिहिलेलें होतें आणि तदनुसार त्यानें आपला स्टांप ॲक्ट नांवाचा कायदा पुढें आणिला ( १७६५ ).

इंग्लंदांत ह्या कायद्याविरुद्ध जाणारे विचारवंत असे मुत्सदी नव्हते असें नाहीं. प्रधानांचें हें एकंदर धोरण पाहून विस्मित होणारे कांहीं मुत्सदी इंग्लंडमध्यें होतेच. ह्या कायद्यास विरोध करण्याचा अमेरिकन लोकांनीं निश्चय केलेला पाहून ते त्यांची पाठच थेपटूं लागले. ते ह्मणूं लागले कीं, वसाहतकारांच्या स्वतःच्या विहिरींतून पाणी असतां केवळ मातृभूमीस संतुष्ट करण्यासाठीं त्यांनीं तहानेनें मरावें अशी आशा करणें योग्य होणार नाहीं. आणि त्यांच्या हेंहि लक्षांत आलें कीं, विलायत सरकार जे तडाके वसाहतकारांना ह्मणून देत आहे, ते शेवटीं त्या सरकारासच परत लागल्याशिवाय राहणार नाहींत. तात्पर्य, स्टांप ॲक्ट अमलांत आणण्याचा विचार झालेला ऐकून ह्या विचारवंत मुत्सद्यांस ओटिस व ॲडॅम्स ह्यांच्यापेक्षां कमी वाईट वाटलें नाहीं. ता. १० जानेवारी १७६५ रोजीं पार्लमेंत उघडतेसमयीं राजाचें संभाषण झालें, त्यावरून राजा व राजमंत्री ह्यांची ह्या विषयासंबंधानें मनःस्थिति काय होती हें स्पष्ट दिसतें. त्यांत असें ह्मटलें होतें कीं, विलायत सरकारचा कायदे करण्याचा जो अधिकार आहे तो योग्य रीतीनें मानिला जावा, ह्या कामीं पार्लमेंत शहाणपणा व दृढनिश्चय व्यक्त करील असा मला भरंवसा आहे. तात्पर्य, प्रधानांस असें वाटत होतें कीं, आपण दृढनिश्चय दाखविला ह्मणजे वसाहतकारांचा विरोध नष्ट होणार आहे. ह्या भरंवशावर त्यांनीं स्टांप ॲक्टाचें बिल पार्लमेंतापुढें आणून, त्याजवर वादविवाद करून तें पास करूनहि घेतलें (ता. २२ मार्च १७६५). आतां हा कर देण्यास अमेरिकन लोक जर पात्र

असते तर हा कर ह्मणजे गैर किंवा फाजील कडक होता असें नाहीं. पण तो कर ज्यांचे प्रतिनिधी पार्लमेंतांत नाहींत त्यांजवर बसावयाचा हें जें त्याच्या बुडाशीं असणारें तत्त्व तें अगदीं गैर होतें व त्यासाठींच अमेरिकन लोक इतके भांडत होते.

तेव्हां अमेरिकेंतील वसाहतीवर वसाहती, मोठ्या शहरावर मोठीं शहरें, तसेंच मोठ्या माणसावर मोठीं माणसें या सर्वांकडून जोराचे विरोध येऊन थडकूं लागले. त्यांत बोस्टन शहरानें पहिला नंबर मारिला. बोस्टनचा अत्यन्त नामांकित रहिवाशी, बोस्टनचा अत्यन्त संमाननीय पुत्र ह्यानें जो उद्गार प्रथम काढिला तोच उद्गार केवळ त्याच्या शहरांतून किंवा त्याच्या वसाहतींतूनच पुढें निघाला असें नाहीं, तर सर्व वसाहतींतूनच निघाला. पुढें दहा वर्षांनीं साम्युएल ॲडॅम्सचें नांव सगळ्या इंग्लंदांत सुप्रसिद्ध झालें, सुद्विष्ट झालें आणि सुसन्मानितही झालें. राज्यक्रान्तीचीं साधनें ह्मणून सृष्टिदेवता कधीं कधीं कांहीं माणसें मुद्दाम तयार करीत असते; त्यांपैकीं साम्युएल ॲडॅम्स हा एक होता. तो आपल्या ४३ वर्षांच्या अमदानींत पुष्कळ गोष्टी शिकलेला होता. चूप बसण्यापासून फायदा, माणसांविषयीं अनुभव, जग सुधारण्याची इच्छा, आणि आपली वेळ येईपर्यंत स्वस्थ बसणें, वगैरे गोष्टींत तो पूर्ण वाकबगार झाला होता. तो ह्याच्या अगोदर कांहीं पिढ्या जर जन्मास आला असता तर क्रामवेलचा उजवा हात बनला असता, आणि हाम्पडेनचें मन मोहून टाकता. तारुण्यावस्थेंत प्रवेश करितांना जेव्हां त्यानें हार्वार्ड कालेजांतून एम्. ए. ची पदवी घेतली तेव्हांच त्यानें धडधडीत लोकसत्ताक व्यवस्थेविषयीं आपली पूर्ण आवड व्यक्त केली होती. तेव्हांच त्यानें एका निबंधांत असें स्पष्ट प्रतिपादन केलें होतें कीं, राष्ट्राचा अधिपति जर अन्याय करील तर त्याच्याविरुद्ध एकोपा करून उठण्याचा राष्ट्रांतील लोकांस पूर्ण हक्क आहे. सारांश, चार्लस स्टुअर्ट ( पहिला चार्लस राजा ) ह्याला निश्चयानें विरोध करण्यास तेव्हांचे स्वदेशभक्त पिम आणि व्हेन हे जितके तयार होते तितकाच हा

वेडावांकडा पोषाक करणारा, गंभीर चेहऱ्याचा निश्चयी माणूस, जार्ज राजास विरोध करण्यास तयार होता. एकदां त्यानें व्यापारांत शिरून पाहिलें होतें, पण त्यांत त्यास फारसें यश आलें नाहीं. कारण, व्यापार-धंद्यापेक्षां जास्त महत्वाच्या कामासाठीं त्यास ईश्वरानें निर्माण केलेलें होतें असें दिसतें. सार्वजनिक कामास योग्य असें स्वाभाविक शील त्याच्या अंगीं असून त्यासंबंधाचें शिक्षणही त्यानें घेतलें होतें. योग्य वेळ आली तेव्हां ह्याची तयारीच दिसून आली. बोस्टनचे रहिवाशी जेव्हां स्टांप अॅक्टाविरुद्ध आपलें मत नमूद करण्यासाठीं जमले तेव्हां, ब्रिटिश पार्लमेंतास ब्रिटिश वसाहतींवर कर लादण्याचा हक्क नाहीं अशा अर्थाचा जो पहिला ठराव सभेपुढें आला, तो साम्युएल अॅडॅम्सनें आणिला.

स्टांप आक्टाविरुद्ध ओरड करण्याच्या कामीं ह्याप्रमाणें वसाहतींतील मॅसॅचुसेट्स् परगण्यानें जर अग्रणीत्व पत्करिलें, तर त्याचें अनुकरण करण्यास आणि आपणामध्येंहि असेच स्वदेशाभिमानी सुपुत्र आहेत हें सिद्ध करून दाखविण्यास इतर वसाहती लागल्याच पुढें सरसावल्या. व्हर्जिनिया परगण्यानें मॅसॅचुसेट्सूप्रमाणेंच जोरानें आणि रागानें आपला विरोध प्रदर्शित केला. येथील पार्लमेंतांत एकाच संभाषणानें प्यॅट्रिक हेन्री हा सुप्रसिद्ध झाला होता. तो ह्यावेळीं तरुण असून त्यानें ह्यापूर्वीं पुष्कळ गोष्टी करून पाहिल्या होत्या. शेवटीं जेव्हां त्यानें वकिलीचा धंदा पत्करिला तेव्हांच त्याच्या विलक्षण बुद्धिमत्तेचें व वक्तृत्वाचें चीज होऊं लागलें. साम्युएल अॅडॅम्सप्रमाणें तोही गंभीर मुद्रेचा असून पोषाकाच्या कामांत निष्काळजी असे. तो उंच व किडकिडीत असे आणि त्याच्या चेहऱ्यावर विचार व वक्तृत्व ह्याचीं चिन्हें स्पष्ट दिसत होतीं. त्यास हल्लीं २९ वें वर्ष लागलेलें होतें. स्टांप अॅक्टावर जेव्हां वादविवाद झाला तेव्हां त्यास पुढें येण्यास चांगली संधि सांपडली. जेव्हां तो आपल्या हट्टी राजास उद्देशून बोलूं लागला तेव्हां त्याच्या विचारशक्तीवर त्वेषाची वरचढ होऊं लागून तो राजास भीति घालण्याच्या बेतांत आला. तो ह्मणाला " सीझरास ब्रूटस योग्य भेटला,

चार्लसास क्रामवेल भेटला; " आणि " तिसऱ्या जार्जास—" असें तो ह्मणत होता इतक्यांत त्याच्या श्रोत्यांमध्यें जे राजपक्षीय होते त्यांनीं राजद्रोह! राजद्रोह! ह्मणून एकच ओरडा केला. तो कमी होईतोंपर्यंत-तो अगदीं स्तब्ध राहिला. कांहीं वेळ गेल्यानंतर तो मुकाट्यानें ह्मणाला, तेव्हां हीं उदाहरणें पाहून तिसऱ्या जार्जानें जागें व्हावें. हा जर राजद्रोह असेल तर माझें काय वाटेल ते करा." हे शब्द राजद्रोहात्मक नव्हते पण ते राज्यक्रांत्यात्मक होते. तेणेंकरून प्यॅट्रिक हेन्रीचें नांव सर्व अमेरिकेंत आणि इंग्लंदांतही प्रसिद्धीस आलें. वसाहतकारांच्या दृष्टीनें तो मोठा वीर व महात्मा बनला; आणि राजाच्या व राजपक्षीयांच्या दृष्टीनें तो बंडवाला बनला.

अशा रीतीनें मॅसॅचुसेट्स्‌नें घालून दिलेल्या उदाहरणावर व्हर्जिनियानें जर ताण केली, तर आतां मॅसचुसेट्स्‌नें व्हार्जिनियावर परत ताण केली. आपल्या रहिवाशांवर कर बसविण्याचा आपणा एकट्यासच अधिकार आहे असें जर व्हर्जिनियानें प्यॅट्रिक हेन्रीच्या सुचवणीवरून प्रसिद्धपणें ह्मटलें, तर सर्वांसच उत्पन्न झालेली जी ही भीति तिजबद्दल सर्वांनीं एक मतानें विचार करण्याकरितां सर्व वसाहतींतील पार्लमेंताचे प्रतिनिधींची जेम्स ओटिसच्या सूचनेवरून मॅसॅचुसेट्स्‌नें कांग्रेस बोलाविली. ही १७६५च्या नवंबरांत न्यूयॉर्क येथें भरली. त्यांत मॅसॅचुसेट्स्, सौथ (दक्षिण) क्यॅरोलिना, पेनसिल्हेनिया, ऱ्होड आयलंद, कॅनेकटिकट, डिलावेअर, मेरिलंड, न्यू जरसे आणि न्यू यॉर्क अशा नऊ वसाहतींचे प्रतिनिधी होते. ह्या कांग्रेसनें आपलीं दुःखें दाखविणारे आणि आपले हक्क प्रतिपादणारे असे, भाषेनें सौम्य आणि निश्चितपणानें कडक, असे कित्येक ठराव पासार केले.

अमेरिकेंत स्टांप ॲक्टाविरुध्द जो विरोध झाला तो केवळ वक्तृत्वमय संभाषणें किंवा शिस्तीनुरूप ठराव एवढ्याच रूपानें होऊन राहिला नाहीं. अमेरिकनलोकांनीं आपला निश्चय शब्दाप्रमाणें कृतींनींहि व्यक्त करून दाखविला. वसाहतीमागून वसाहतींत दंगे उद्भवूं लागले. त्यापैकीं सर्वांत पुष्कळ व सर्वांत भयंकर दंगे मॅसॅचुसेट्स्‌मध्यें झाले. अधिकाऱ्यांविरुद्ध

बंड करण्याच्या कामीं बोस्टननें झेंडा रोंविला. तेथले दोन अधिकारी लोकांना विशेष अप्रिय झालेले होते. नवीन स्टांपावरील कर गोळा करणारा आंड्रयू आलिव्हर आणि चीफ जस्टिस हचिन्सन हे होत. लोकांनीं आलिव्हरचा पुतळा करून जाळला व त्याचें सर्व घर धुंडाळिलें. नंतर हचिन्सनच्या घराचाहि तसाच समाचार घेतला. ते दोघेहि कांहीं दुखापतीशिवाय निसटले; पण त्यांची सर्व चीजबस्त त्यांच्या फुटलेल्या खिडक्यांतून रस्त्यावर येऊन पडली. अशा या वादळी दिवसांत स्टांप ऑफिसराची जागा पत्करणें मोठ्या धोक्याचें काम होऊन बसलें. पुष्कळ स्टांप आफिसरांनीं निरुपाय होऊन राजीनामे देऊन टाकिले. नवीन कायदा केवळ निर्जीव बनावा ह्मणजे त्याचा उपयोगच होऊं नये ह्या हेतूनें वसाहतकारांनीं असा निश्चय केला कीं, हा कायदा अमलांत असे तोंपर्यंत कोर्टांत फिर्याद न्यावयाचीच नाहीं. सर्व तंटे खाजगी रीतीनें तोडावयाचे. अशा निश्चयी लोकांशीं वागावयाचें ह्मणजे दोन गोष्टींपैकीं एक करणें जरूर होतें:—एक त्यांचें ह्मणणें ऐकावयाचें किंवा दुसरें त्यांचा संहार उडवावयाचा. ह्यापैकीं दुसरी गोष्ट करून पाहण्याचें ग्रेन्व्हिलीनें कदाचित् मनांत आणिलें असतें; पण ह्या सुमारास तोच स्वतः हुसकला गेला.

---

# प्रकरण पंधरावें.

## एडमंड बर्क व बेंजामिन फ्रांकलिन.

इकडे जार्ज व ग्रेनव्हिल ह्यांच्यामधील तेढा वाढतच चालला होता. निदान राजास तरी त्याची ओकारी यावयास लागली होती. तेव्हां कसेंहि करून त्यास काढण्याचा त्यानें निश्चय केला. पुनः कंबर्लंदास पिट-कडे आर्जवें करण्यास पाठविलें. पिटनें टेंपलच्या आग्रहावरून त्यास पुनः निराश करून परत पाठविलें. तेव्हां राजा अगदीं निराश झाला. इतक्यांत कंबर्लंदनें त्यास एक नवीन युक्ति सुचविली आणि राजानें निदा-नीचा प्रसंग पाहून ती कबूल केली. कंबर्लंद ह्मणाला, पिट आणि जुने व्हिग जर कबूल होत नाहींत तर नवे व्हिग आणि राकिंगहॅम यांस बोलावून कां पाहत नाहींस? राजास ती गोष्ट पसंत पडली आणि त्यानें त्यांस बोलाविलें व त्यांनीं तें कबूलही केलें. हे नवे व्हिग ह्मटले ह्मणजे मोठे विचारवंत, मनःपूर्वक काम करणारे, मोठ्या मनाचे आणि प्रामाणिक लोक होते. जुन्या व्हिग लोकांची ठराविक अशी नीति कांहींच नाहीं असें पाहून ते त्यांजपासून वेगळे झालेले होते. त्यांचा अग्रणी लार्ड राकिंगहॅम मोठासा मुत्सद्दी होता असें नाहीं; पण त्याची स्वदेशभक्ति, उत्सुकता आणि वर्तनाची ऋजुता हीं पहिल्या प्रतीचीं होतीं. दोन वर्षांपूर्वी (१७६३) लार्डब्यूटची राजनीति त्यास पसंत न पडल्यामुळें त्यानें "लार्ड आफ् बेडचेम्बर" हा आपला लहानसाच हुद्दा सोडून दिला होता. अशा रीतीनें त्यानें आपला पाणीदारपणा व्यक्त केला होता.

हें प्रधानमंडळ मोठेंसें मजबूद झालें असें नाहीं. या प्रधानमंडळांत ड्यूक आफ् न्यूकॅसल लार्ड प्रिव्हीसील झाला. लार्ड कान्वे व लार्ड ग्रॅफ्टन हे दोन दोन खात्यांचे सेक्रेटरी झाले. ग्रेनव्हिलला दूर करण्यासाठीं राजानें ह्याच्यापेक्षांहि दुर्बल प्रधानमंडळ कबूल केलें असतें. शिवाय दुसरी गोष्ट अशी कीं, हें प्रधानमंडळ दुसऱ्या कशाकरितां जरी फारसें

प्रसिद्ध नसलें तरी त्यानें एडमंड बर्कसारख्या खऱ्या गुणी माणसाची किंमत ओळखून त्यास पुढें आणिलें, एवढ्या एका गोष्टीवरूनच तें लोकादरास पात्र झालें पाहिजे.

पुष्कळ वेळां असें आढळून येतें कीं, एकाद्या राष्ट्राचा इतिहास म्हणजे त्या राष्ट्रांतील कांहीं प्रसिद्ध माणसांचा इतिहास असतो. मोठाल्या प्रसंगीं मोठाले अग्रणी उत्पन्न होतात, आणि त्या त्या वेळची जी कांहीं विशिष्ट विचारसरणी असेल तिचें उत्तम मूळ स्वरूप किंवा प्रतिबिंब त्यांच्या ठिकाणीं दृग्गोचर होत असतें. वालपोलचें चरित्र म्हणजे त्याच्या वेळच्याच इंग्लंदाचें चरित्र होय; कारण पार्लमेंतीय राज्यपद्धतीवर राजाचें वर्चस्व जें कदाचित् स्थापिलें जावयाचें होतें त्यापासून त्या पद्धतीस मुक्त करण्यासाठीं जी एकंदर चळवळ झाली तिच्याशीं त्याचा अत्यंत निकट संबंध होता. तद्वत्च चॅथमचें चरित्र, पिटचें चरित्र, फॉक्सचें चरित्र, हीं त्यांच्या त्यांच्या वेळच्या इंग्लंदच्या इतिहासाचींच सारभूत आहेत. पण कांहीं माणसांच्या ठिकाणीं एकंदर मनुष्यजातीबद्दलचें प्रेम इतकें जबर असतें, आणि तिच्या सुधारणेबद्दलची उत्सुकता इतकी उत्कट असते कीं, त्यांच्या त्यांच्या काळच्या इतिहासाचें प्रतिबिंब त्यांच्या ठिकाणीं विशेषच दृष्टीस पडतें. म्हणजे, त्यांच्या त्यांच्या वेळचे जे उत्तम वर्तनक्रम असतील, जे उत्तम विचार असतील, जे उत्तम हेतू असतील आणि ज्या उत्तम वासना व महत्वाकांक्षा असतील त्यांचे ते मूर्तिमंत पुतळेच असतात. ही गोष्ट बर्कच्यासंबंधानें जितकी खरी आहे, तितकी दुसऱ्या कोणाच्याचसंबंधानें नसेल. अठराव्या शतकाच्या शेवटच्या तीस पसतीस वर्षांचा जो इंग्लंदचा इतिहास आहे तो बऱ्याच अंशीं एडमंड बर्कच्या कारकीर्दीचाच इतिहास होय असें म्हटल्यास बहुधा अतिशयोक्ति होणार नाहीं. बर्कची महत्वाची राजकीय कारकीर्द सुरू झाली तेव्हांपासून तों तिचा शेवट होईतोंपर्यंत त्याच्या नांवाचा प्रत्येक महत्वाच्या गोष्टीशीं संबंध असलेला आढळून येतो, आणि इंग्लिश लोकांचें हिताहित व इंग्लिश लोकांची राज्यव्यवस्थासरणी ह्यांच्यासंबंधानें प्रत्येक प्रश्नाची त्यानें ही किंवा ती

बाजू प्रतिपादिलेली दृष्टोत्पत्तीस येते. आतां या काळचीं जीं इतर सार्वजनिक माणसें होतीं, त्यांपैकीं बऱ्याच माणसांच्यासंबंधानें, असेंच विधान करितां येईल हें खरें आहे; पण बर्कचा त्या काळावर जितका प्रभाव पडला होता, तितका दुसऱ्या कोणाचाच पडला नसेल. अमेरिकन वसाहतींचें बंड आणि फ्रान्सांतील राज्यक्रान्ति ह्या ज्या त्या शतकांतील अत्यंत महत्वाच्या गोष्टी त्यांच्याशीं त्याच्या नांवाचा संबंध अत्यंत निकट जुळलेला आहे. विल्कूस प्रकरण आणि वॉरन हेस्टिंग्सवरचा खटला ह्या ज्या त्या शतकांतील वरच्या मानानें साधारण कमी महत्वाच्या गोष्टी त्यांच्याशींहि त्याच्या नांवाचा संबंध तितकाच निकट आहे. नैतिक गोष्टींच्यासंबंधानें जें शेक्सपियरचें महत्व तेंच राजकीय गोष्टींच्यासंबंधानें बर्कचें महत्व, असें जें पुढें पुष्कळ वर्षांनीं ग्रनव्हिल यानें ह्मटलें त्यांत पुष्कळ तथ्यांश आहे.* इ० स० १७६९ च्या दिजंबरांत बर्क जेव्हां पार्लमेंतांत शिरला तेव्हांच त्याच्या राजकीय कारकीर्दीस सुरुवात झाली. तत्पूर्वींच्या त्याच्या कारकीर्दींत सांगण्यासारखी मोठीशी गोष्ट घडलेली नव्हती. त्याचा जन्म नक्की कोठें झाला व कधीं झाला हेंहि निश्चयानें माहीत नाहीं. सगळ्यांत विश्वसनीय ह्मणून जी माहिती मिळते तिजवरून तो डब्लिन मुक्कामीं ता० २२ जानेवारी १७२९ रोजीं जन्मला असावा असें दिसतें. त्याचा बाप, तो व कुटुंबांतील इतर माणसें जरी प्रॉटेस्टंट पंथानुयायी होतीं तरी त्याची आई सात्विक रोमन कॅथलिक धर्माची होती. यामुळेंच त्याला त्या धर्माचा कळवळा विशेष असे असें वाटतें. बर्कला जें अत्यंत उत्तम शिक्षण मिळालें तें यॉर्क प्रांतांतील आब्राहम शाकल्टन ह्मणून एक क्वेकरपंथीय शिक्षक होता, त्याच्या हाताखालींच त्याच्या वयाच्या बारा ते चवदा या वर्षांच्या दरम्यान मिळालें. पुढें बर्क वरचेवर असें ह्मणत असे कीं, मला जगांत जें कांहीं प्राप्त झालें आहे तें त्या दोन वर्षांमधील आब्राहाम शाकल्टनच्या शिक्षणावरून आणि उदाहरणावरून प्राप्त झालेलें आहे. ह्या गुरूबद्दलची त्याची पूज्यबुद्धि, तो इ० स० १७७१ सालीं मेला तोंपर्यंत कायम

* बर्कचें विस्तृत चरित्र ग्रंथमालेंतून प्रसिद्ध झालें आहे.

होती. तसेंच तो त्याचा मुलगा रिचर्ड ह्याच्यावरहि फार प्रीति करीत असे. बर्क इ. स. १७४३ ते १७४८ पर्यंत डब्लिनमधील ट्रिनिटी कॉलेजमध्यें असतां त्याच्या मनाची वाढ कशी होत गेली हें त्या अमदानींत त्यानें रिचर्डला लिहिलेल्या पत्रांवरून चांगलें व्यक्त होतें. बापाबरोबर भांडण झाल्यामुळें आणि मनांत कायद्याचा अभ्यास करण्याचें असल्यामुळें इ० स० १७५० च्या आरंभीं बर्क लंदनमध्यें आला. तेव्हांपासून पुढील नऊ वर्षांची त्याच्याबद्दलची कांहींच माहिती उपलब्ध नाहीं. एवढेंच समजतें कीं, तो त्या मुदतींत कायद्याचा अभ्यास करीत होता, पण कायद्यापेक्षां वाङ्मयाकडेच त्याचें लक्ष विशेष होतें. हें पाहून त्याच्या बापाच्या मनांत त्याच्याबद्दल जास्त वैषम्य उत्पन्न झालें, ह्मणून त्यानें त्याची तैनात अगदीं कमी करून टाकिली. तेव्हां निरुपाय होऊन तो निर्वाहाकरितां लेखकाच्या धंद्यांत शिरला. त्यामध्यें त्यास प्रथम बराच झगडा करावा लागला.

इ. स. १७५६ सालीं त्यानें मिस न्यूजंट नांवाच्या एका रोमन कॅथलिक स्त्रीशीं लग्न केलें. कॅथलिक धर्माबद्दल त्यास आस्था वाटण्यास हें दुसरें एक निकट कारण झालें. याच वर्षी तो ग्रंथकार ह्मणून प्रथम जगापुढें आला. "नैसर्गिक समाजाचें मंडन" (Vindiction of Natural Society) व "सुंदर आणि उदात्त यांजवर निबंध" (Essay on the Sublime and the Beautiful) हे दोन लेख त्यानें प्रसिद्ध केले. ह्यांतील पहिला लेख वाचून "एकसंभाषणी" हॅमिल्टन ह्मणून पार्लमेंतांत एकच उत्तम संभाषण केलेला गृहस्थ होता त्याचें याच्याकडे लक्ष गेलें. लार्ड हॅलिफॉक्सचा सेक्रेटरी होऊन तो इ. स. १७५९ मध्यें जेव्हां आयर्लंडांत गेला तेव्हां त्यानें यास आपल्या बरोबर तेथें नेलें. तेथें तो त्याजबरोबर दोन वर्षें होता, तितक्या मुदतींत तेव्हांच्या आयरिश प्रश्नांची त्यानें अत्यंत बारीक रीतीनें माहिती मिळविली. नंतर हॅमिल्टन त्यास ३०० पौंड वर्षासन देऊन नेहमीं आपलेंच काम करावयास सांगूं लागला. बर्कनें त्याजपाशीं ग्रंथकर्तृत्वाचें आपलें

आवडतें काम करण्यास कांहीं फुरसत मागितली; पण तो आपस्वार्थी गृहस्थ त्यास कबूल होईना. तेव्हां यानें त्याची नोकरी अजीबाद सोडून दिली, आणि आपली स्वतंत्रता व गरिबी ह्यामध्यें पुनः येऊन पडला. पुढें लवकरच दुसऱ्या एका जास्त गुणग्राही गृहस्थानें त्यास हातीं धरलें. तो अर्थात् लार्ड राकिंगहॅम हा होय. लार्ड राकिंगहॅमनें त्यास आपला खाजगी चिटणीस नेमिलें. तेथून तो निघावा ह्मणून हॅमिल्टननें ड्यूक आफ् न्यूकॅसलच्या द्वारा त्याच्यावर खोटे खोटे आरोप आणून त्याच्याविरुद्ध लार्ड राकिंगहॅमचें मन कलुषित करण्याचा यत्न केला. पण राकिंगहॅमच्या सरळपणामुळें तो त्यास मुळींच साधला नाहीं. नंतर त्यानें त्यास वेण्डोव्हरचा प्रतिनिधि ह्मणून पार्लमेंतांत आणिलें. लार्ड राकिंगहॅमच्या एका वर्षाच्या मुख्य प्रधानकींत, आपल्यास असा मदतनीस व स्नेही मिळाला हें आपलें सुदैव होय, अशी त्यानें त्याची खात्री करून दिली.

कामन्स सभेंत बर्कचें पहिलें संभाषण ता. २७ जानेवारी १७६६ रोजीं झालें; त्याचा विषय अमेरिकन वसाहतींचा असंतोष हा होता. त्याबद्दल 'मोठ्या कामनर'नें ( The Great Commoner. पिटचें टोपण नांव ) त्याची स्तुति केली. त्याचीं पुढें जीं संभाषणें झालीं तेणेंकरून त्याची सभेंत आणि बाहेर मोठीच वाहवा होऊं लागली. तात्पर्य, चांगल्या ग्रंथकाराचा तो लवकरच चांगला वक्ता व राजकारणी पुरुष बनला. कोणी ह्मणतात कीं बर्क हा केवळ पहिल्या प्रतीचाच वक्ता होता असें नाहीं, तर आजपर्यंतच्या एकंदर वक्त्यांत त्याचाच पहिला नंबर लागेल. त्याची बरोबरी कोणाच्यानेंच करवणार नाहीं. पण बर्कची कीर्ति मोठी करण्यासाठीं इतरांची ती कमी करण्याचें प्रयोजन नाहीं. जगांतील अत्यन्त मोठ्या वक्त्यांपैकीं तो एक होता असें ह्मटल्यानें त्याची कमी स्तुति होत नाहीं. एकपक्षीं तो डिमास्थेनिसपेक्षां मोठा वक्ता होता, किंवा दुसऱ्या पक्षीं सिसरोपेक्षां मोठा होता असें ह्मणणें ह्यांत विशेषसा अर्थ नाहीं. इंग्रजी भाषा बोलणाऱ्या वक्त्यांमध्यें त्याचा बहुधा पहिला नंबर लागेल असें ह्मणण्यांत बहुधा अतिशयोक्ति

होणार नाहीं. आणि एवढी त्याची स्तुति पुरे आहे. बर्कच्या राजकीय कारकीर्दीस जो आरंभ झाला तो स्वातंत्र्याची तरफदारी करण्यांत, जुलमानें त्रस्त झालेल्यांच्या वतीनें बोलण्यांत आणि अन्यायाचा तिरस्कार करण्यांत झाला असल्यामुळें तीस विशेषच शोभा आली. ज्या राजकीय समरांगणांत त्याला पुढें इतकीं वर्षें इतकें कसून लढावयाचें होतें त्यांत त्याचें वरील गुणामुळेंच लागलेंच स्वागत झालें. त्याचें सामर्थ्य लगेच लोकांच्या लक्षांत आलें. तेव्हां त्याची जी एकदम कीर्ति झाली ती आजपर्यंत कायम राहिली इतकेंच नव्हे तर दिवसेंदिवस वृद्धिंगत झाली आहे. आपल्या समकालीन लोकांच्या विचारसरणीवर ह्याच्यापेक्षां जास्त जबर पगडा दुसऱ्या कोणत्याहि ग्रंथकारानें बसविलेला नाहीं; आणि आपल्या पुढच्या पिढ्यांवरहि ह्याच्यापेक्षां जास्त कायमचा पगडा दुसरा कोणी बसवील असें वाटत नाहीं. मोठे उद्योगी व महादैदीप्यमान अशा त्या काळच्या सर्व माणसांमध्यें बर्कचेंच नांव लोकांमध्यें जास्त जास्त प्रसिद्ध व जास्त जास्त प्रिय होत गेलें आहे. त्यावेळचे त्याच्या तोडीचे जे दुसरे वक्ते आणि लोकप्रियतेंत त्याच्या बरोबरीचे जे इतर मुत्सद्दी होते त्यांचें प्रत्येक वर्षीं वजन कमी होत चाललें असतां, बर्कच्या शहाणपणाची किंमत दिवसेंदिवस लोक जास्तच ओळखूं लागले आहेत. तेव्हांपेक्षांहि आतां लोकांच्या लक्षांत ही गोष्ट जास्त स्पष्टपणें येऊं लागली आहे कीं, कोणत्याहि गोष्टीच्यासंबंधानें बर्कचें ह्मणणें बरोबर असो वा चुकीचें असो, तिच्यासंबंधानें सिद्धान्त ठरविण्यास तो ज्या दृष्टीनें सुरुवात करीत असे ती दृष्टि अगदीं बरोबर असे.

ह्यावेळीं वसाहतींबद्दल इंग्लंदांतील लोकांचा योग्य समज झालेला नव्हता, ही वसाहतकारांची चूक नव्हती. त्यावेळीं पेनसिल्व्हेनियासंबंधानें विशेष अधिकारानें बोलण्यास आणि इतर वसाहतींच्या वतीनें सामान्यतः बोलण्यास योग्य असा माणूस इंग्लंदांत हजर होता. त्यावेळच्या किंवा तत्पूर्वींच्या सर्व अमेरिकन लोकांमध्यें बेंजामिन फ्रांक्लिन हा अत्यंत प्रसिद्ध माणूस होता. त्याची ती इंग्लंदास पहिली सफर नव्हती. चाळीस वर्षांपूर्वीं तो केवळ अठरा वर्षांचा असतां मुख्य छापखा-

नेवाला होण्याच्या हेतूनें व त्यासाठीं सामानसुमान मिळविण्याकरितां इंग्लंदास आलेला होता. त्या अठरा वर्षांत तो पुष्कळ गोष्टी शिकलेला होता. छापावें कसें हें तो शिकला होता. गरीबीशीं आणि महत्वाकांक्षेशीं धीरानें आणि धिमेपणानें लढावें कसें हेंहि तो शिकला होता. तो वाचावयास प्रथम किती लहान वयांत शिकला हें त्यास आठवतच नव्हतें, पण त्यापासून त्यानें आपला आनंद आणि फायदा ह्यांच्यांत कितीतरी भर घातली होती; शिवाय तो लिहावयासहि शिकला होता. सातव्या वर्षी तो बोस्टन येथून आपल्या रागीट भावाच्या घरांतून निघून फिलाडेलफिया येथें गेला होता. खाण्यासाठीं दोनही खांकांत दोन रोट घालून जेव्हां तो शहरांत शिरला तेव्हां एक तरुण स्त्री दरवाजांत उभी राहून त्याची ती विलक्षण मूर्ति पाहून खदखदां हंसली. पण पुढें सहा वर्षांनीं तिनेंच त्याच्याशीं लग्न केलें. तितक्या मुदतींत त्यानें लंदन व फिलाडेलफिया या दोन ठिकाणीं छापखान्यांत रोजमजुरीचें काम करून शेवटीं या दुसऱ्या शहरीं छापखानेवाल्याचा धंदा सुरू केला होता. इ. स. १७२९ सालापासून त्याची लोकप्रियता आणि संपत्ति हीं दोनही सारखीच वाढूं लागलीं. संपत्तिबरोबर त्याचें ज्ञान, शहाणपणा आणि भूतदया हींहि वाढूं लागलीं. त्यानें " फिलाडेलफिया ग्यॅझेट " म्हणून एक वर्तमानपत्र काढिलें, आणि त्याच्या द्वारा काटकसर, उद्योग आणि गरिबींत आनंद ह्या गोष्टींचा तो लोकांस उपदेश करूं लागला. त्यानें ह्या शहराचें अनेकप्रकारें कल्याण केलें. तेथील प्रसिद्ध लायब्ररीची स्थापना त्यानेंच केली. त्या शहराचें सुख, कल्याण आणि सौंदर्य हीं वाढविण्याकडे त्यानें आपल्या ज्ञानाचा उपयोग केला. तद्वत्च त्या शहराची तटबंदीही त्यानें मजबूत केली. इंदियन लोकांपासून त्याचें रक्षण करण्याकरितां हंगामी फौज उभारून स्वतः तिचें आधिपत्य पतकरण्यास तो कबूल झाला. तात्पर्य, त्याच्यापेक्षां जास्त उद्यममय असा जीवितक्रम कोणाचाच नसेल, किंवा त्याच्यापेक्षां जास्त निश्चयी उत्साहानें आणि जास्त संमाननीय पक्केपणानें कोणीच त्याच्या इतक्या गोष्टी आपल्या आयुष्यांत केल्या नसतील. तेव्हां पेनसिल्व्हेनियांतील वसाहतवाले लोक त्याच्याबद्दल अत्यन्त अभिमान

बाळगीत आणि त्याचा सन्मान करण्यांत आनंद मानीत ह्यांत नवल नाहीं. इ० स० १७६७ सालीं जेव्हां तो दुसऱ्यानें इंग्लंदास आला तेव्हां तो पेनसिल्व्हेनियाच्या सार्वजनिक सभेचा प्रतिनिधि असून सर्व ब्रिटिश वसाहतींचा तो डेप्युटी पोस्टमास्टर जनरल होता. आकाशांतील वीज आणि कृत्रिम वीज हीं दोन्ही एकच आहेत असें सिद्ध केल्यामुळें सर्व सुधारलेल्या राष्ट्रांत तो प्रसिद्धीस आलेला होता. रॉकिंगहॅम अधिकारारूढ झाला तेव्हांची इंग्लंदची त्याची तिसरी खेप होती. ह्यावेळीं त्याच्या कृतिप्रचुर, संस्मरणीय आणि प्रशंसनीय अशा कारकीर्दीस जवळ जवळ साठ वर्षें झालेलीं होतीं; ह्यावेळीं त्याच्यावर स्तुतीची वृष्टि झालेली असून सामान्य पुस्तकी ज्ञानांत आणि सृष्टिरूप पुस्तकाच्या ज्ञानांत तो अगदीं पारंगत झालेला होता. पुढें जो त्याचा जीवितक्रम व्हावयाचा होता, त्या मानानें त्याचा आजवरचा जीवितक्रम अगदींच शुष्क होय. स्वदेशाची ह्यापुढें जी तो नोकरी बजावणार होता त्यामानानें त्यानें आजवर केलेली स्वदेशसेवा ह्मणजे केवळ वाळूचा एक कण होय, असें जर एखाद्या मोठ्या धोरणी व दूरदृष्टि माणसानें त्याच्याबद्दल ह्यावेळीं ह्मटलें असतें तर लोकांस आश्चर्यच वाटलें असतें. एडमंड बर्क ज्यावर्षीं पार्लमेंतांत शिरला, त्यावर्षीं हा आपल्या नवीन कारकीर्दीचा ओनामाच गिरवीत होता ह्मटलें तरी चालेल.

ग्रेनव्हिल प्रधानमंडळानें केलेला मूर्खपणा दुरुस्त करण्यासाठीं रॉकिंगहॅम प्रधानमंडळानें अगदीं शिकस्त केली. दोनही सभांत लांबलचक वादविवाद झाल्यानंतर फ्रांकलिनची कामन्ससभेपुढें साक्ष झाली. वसाहतींच्या विरुद्ध राजाच्या विशेष हक्कांचें समर्थन करण्यासाठीं लार्ड मॅन्सफील्डनें आणि त्या हक्कांविरुद्ध वसाहतींचें मंडन करण्यासाठीं बर्कनें, आपलें चातुर्य व वक्तृत्व हीं खर्च केल्यानंतर, ग्रेनव्हिलनें आपल्या कृतीचें मोठ्या धूर्ततेनें समर्थन केल्यानंतर आणि पिटनें आपल्या कीर्तीच्या धवलपणास जास्त भर घातल्यानंतर, स्टँप ॲक्ट पार्लमेंतानें शास्त्रोक्त-

* ही ग्रंथमालेंतून प्रसिद्ध झाली आहे.

रीत्या रद्द करून टाकिला; पण ज्या सेशनामध्यें तो रद्द झाला, त्याच सेशनांत दुसरा एक आक्ट पास झाला. त्याचें नांव 'डेक्लरेटरी' (विधान करणारा) अॅक्ट. त्या कायद्यानें असें नमूद केलें कीं, पाहिजे त्या बाबतींत अमेरिकन लोकांसाठीं पार्लमेंताच्या सल्लयानें कायदे करण्याचा राजास हक्क आहे. ह्या कायद्याचा उद्देश स्टांप अॅक्ट रद्द झाल्याबद्दल राजास जें मोठें दुःख झालें होतें त्याचें समाधान करावयाचें आणि वसाहतींस जो अत्यंत आनंद झाला होता त्यापासून त्यांस जागें करावयाचें, असा होता. स्टांपअॅक्ट रद्द झाल्यामुळें अमेरिकन लोकांस झालेल्या आनंदाचें ह्यानें फारसें परिमार्जन होईल असें फ्रांकलिनासदेखील वाटलें नव्हतें. पण अगदीं तशी स्थिति झाली. शिवाय त्यांच्या रागांत भर घालण्यासाठीं अमेरिकेच्या शत्रूंनीं असा विचार केला कीं, व्यापाराचे कायदे पुनः जोरानें अमलांत आणावयाचे. इंग्लंदांतील अमेरिकेचे हितचिंतक ह्याविरुद्ध खटपट करीत नव्हते असें नाहीं, पण त्यांची संख्या फार अल्प होती, त्यामुळें त्यांचें कांहींच चालेना. शिवाय वसाहतींचे गव्हर्नर वसाहतकारांस चीड जास्त यावी अशा प्रकारचें वर्तन करीतच होते. त्या सर्वांत मॅसॅचुसेटसचा गव्हर्नर बर्नार्ड ह्याची इतरांवर ताण होती. नवीन कायद्याच्या नकला ह्या गव्हर्नरांकडे पाठवितांना सेक्रेटरी कान्वे यानें त्यांस असें लिहिलें होतें कीं, नुक्तेच जे वसाहतींतून दंगे झाले त्यांबद्दल वसाहतकारांचा निषेध करावयाचा तो बेताबातानें करा, पण वसाहतकार नच ऐकतील तर सरकारचें तर्फे जें सैन्य व आरमार आहे, त्याचा लागल्यास उपयोग करा. बर्नार्ड यानें हीं बिलें मॅसॅचुसेटसच्या प्रतिनिधिसभेपुढें ठेवतांना त्यानें असें कांहीं व्याख्यान झोडिलें कीं, जणूं काय तीं हट्टी पोरेंच आहेत. तेव्हां त्या सभेनेंहि त्यास खरमरीत असा उलट जाब देण्यास कमी केलें नाहीं. तेथील गव्हर्नरानें असा कायदा पसार केला कीं, स्टांप अॅक्टामुळें झालेल्या दंग्यांत ज्यांचें अंग असेल त्या सर्वांस माफी दिली आहे. माफी देण्याचा अधिकार केवळ आपणासच आहे ह्या मुद्यावर जरी विलायतसरकारानें हा कायदा मान्य केला

नाहीं, तरी तो त्या वसाहतींत अमलांत आलाच आणि अशा रीतीनें हें प्रकरण जास्त जास्त चिडीवर जात चाललें. आतां ज्या सद्धेतुक प्रधानमंडळास बर्कच्या विलक्षण बुद्धिमत्तेची मदत व स्फूर्ति होती त्यांच्या सल्लयानें वागण्याचें जर राजानें मनांत आणिलें असतें तर ही माजणारी दुही कदाचित् अद्यापिही मोडली असती. पण एक वर्ष कारभार केल्यावर राकिंगहॅम प्रधानमंडळ अस्तास गेलें. तें अस्तास जाण्यास मोठेसें कारण झालें होतें असें नाहीं. पण राजास वाटत होतें कीं, मेणबत्ती जशी आपण पाहिजे तेव्हां फुंकून विझवितों, तशीं हीं प्रधानमंडळें पाहिजे तेव्हां फुंकून टाकावीं. त्याप्रमाणें त्यानें ह्या प्रधानमंडळास रजा दिली आणि पिट यास नवीन प्रधानमंडळ बनविण्याची कामगिरी सांगितली. पिटनें असें कांहीं विलक्षण प्रधानमंडळ बनविण्याची खटपट केली कीं, तें त्या विलक्षण प्रधानमंडळांच्या अमदानींतही अत्यन्त विलक्षण ह्मणून चिरस्मरणीय होऊन राहिलें.

पिट ज्या रोगानें आज इतके दिवस पीडलेला होता तो रोग अद्यापि होताच. शिवाय त्याचा विक्षिप्तपणाही वाढलाच होता. अशा रीतीनें त्याचें मन व शरीर दोन्हीं जरी बेतावर नव्हतीं तरी जोंपर्यंत अनियंत्रित अधिकार हातीं येईल तोंपर्यंत तो स्वीकारण्यास तो तयारच होता. प्रधानकी पत्करूं नको असें त्यास ह्मणणाऱ्या टेंपलशीं अलीकडे त्याचा तंटा झालेला होता ह्मणून त्यानें त्यांस नवीन मंडळांत घेतलें नाहीं. त्या मंडळाची घटना राजास खुश करण्याच्या धोरणावर केलेली होती. आलीकडे "राजाचे मित्र" ह्मणून एक नवीनच पक्ष उत्पन्न झालेला होता. राजाला खुश करावयाचें याव्यतिरिक्त त्यांचा दुसरा कांहींच राजकीय पंथ किंवा मत, किंवा इच्छा, किंवा हांव किंवा हेतु नव्हता. राजा सांगेल तें विचार न करतां बोलावयास किंवा डोळे मिटून करावयास ते सदा तयार असत. आतां ही वृत्ति त्यांनीं अत्यंत राजनिष्ठेवरून पत्करली होती असें नाहीं, तर अत्यंत द्रव्यनिष्ठेवरून होय. राजाची पैशाची पिशवी त्यांस जशी नाचवील तसे ते नाचत असत. शिवाय

राजा पदव्यांचा दाता होताच. अशा रीतीनें द्रव्य व सम्मानबुभुक्षूंचा हा एक जबरदस्त पक्ष बनला व त्यांपैकीं पुष्कळांस नव्या मंडळांत जागा मिळाल्या. अशा रीतीनें हें मंडळ ह्मणजे एक बहुरुप्याची अनेक प्रकारच्या अनेक ठिगळांची पोतडीच झाली. त्यांत सर्व पक्षांचे व सर्व मतांचे लोक आले. कान्वे व ग्रॅफटन हे जुन्या मंडळांतून तसेच उचलून घेतले होते. तसेच डयूक आफ् पोर्टलंद, लार्ड बेसबरो, सोंडर्स आणि केपेल ह्यांनाहि घेतले. पिटनें आपल्या पक्षांपैकीं जस्टिस प्रॅट यास लार्ड क्याम्डेन बनवून लार्ड चॅन्सलर केलें. लार्ड शेल्बर्न यास एक सेक्रेटरी बनविलें. आणि लोकप्रियतालोलुप अतएव अत्यंत अस्थिर जो चार्लस टौनशेंड त्यास फडणीस केलें. पण याच सुमारास पिट अर्ल आफ चॅथम बनून लार्डांच्या सभेंत गेला होता. हल्लीं अशा रीतीनें एकाद्यास पदवीस चढविणें ह्मणजे त्याच्या राजकीय कारकीर्दीचा बहुतेकांशीं अस्तच करणें असें समजतात. पण तेव्हां तशी स्थिति नव्हती, तथापि यावेळींही पिटची लोकप्रियता एकदम नष्ट झाली. जे लोक तो प्रधान होणार ह्मणून आनंदानें टिऱ्या पिटीत होते, तेच तो लार्ड झालेला पाहून क्रोधानें लाल झाले. जे लोक आदल्या दिवशीं पिटचे स्तुतिपाठक होते तेच दुसऱ्या दिवशीं चॅथमचे निंदक बनले. त्याच्या मंडळानें केलेल्या पहिल्याच कृतीनें भयंकर वाद माजला. पिकें चांगलीं न येऊन धान्य अत्यंत महाग झाल्यामुळें तें बाहेर पाठविण्याची त्यानें बंदी केली. ह्यांच्यावर फारच कडाक्याचा वादविवाद झाला. त्या वादाची गडबड निवते न निवते तोंच पिट पुनः आजारी पडला, तेणेंकरून मुख्य सत्ता टौनशेंडच्या हातीं गेली. टौनशेंड हा फार हुशार माणूस असून फार जाडा वक्ताहि होता. कित्येक लोक त्याची बर्कशींहि तुलना करितात. पण त्याला स्तुतिप्रियता आणि लोकप्रीतिसंपादनेच्छा या दोन पिशाचिकांनीं अत्यंत घेरिलें होतें. त्यानें पाहिलें कीं स्टांप ॲक्ट रद्द करणें ही गोष्ट लोकांसहि आवडली नाहीं, किंवा पार्लमेंटासहि आवडली नाहीं. ह्मणून त्यानें वसाहतींवर नवे कर बसविण्याचा निश्चय

केला; आणि त्याप्रमाणें अमेरिकेस जाणाऱ्या कांच, कागद व चहा ह्या तीन जिनसांवर जकात बसविण्याच्या हेतूनें एक बिल पार्लमेंटपुढें आणिलें. ह्या करापासून फक्त चाळीस हजार पौंडच उत्पन्न व्हावयाचें होतें. त्या रकमेचा विनिमय जरी वसाहतींतच करावयाचा होता तथापि त्याचा परिणाम अत्यन्त वाईट झाला. तो पाहण्यास तो फार दिवस जगला नाहीं. तो इ. स. १७६७ च्या सप्टेंबरांत ताप येऊन वयाच्या ४२ व्या वर्षींच निवर्तला. अशा रीतीनें तो स्वतः गेला खरा, पण त्याची कृति शिलकच राहिली, आणि ती त्याच्या देशास पुढें फार भोंवली. त्याच्या जागीं जो नवा फडणीस झाला तो आज कित्येक वर्षें पार्लमेंतांत होता व त्यानें बऱ्याच हुद्यांवर कामेंहि केलेलीं होतीं. पण तो अद्यापि फारसा प्रसिद्धीस आलेला नव्हता. त्याचें नांव लॉर्ड नॉर्थ. तो चांगला शिकला संवरलेला होता. त्याजबद्दल ग्रॅनव्हिलनें असें भविष्य केलें होतें कीं, हा जर असाच पार्लमेंतीय कारकीर्दींस चिकटून राहील तर एक दिवस मुख्य प्रधानहि होईल. इंग्लंदच्या दुर्दैवानें तो तसाच चिकटून राहिला व पुढें थोडक्याच वर्षांनीं मुख्य प्रधानहि झाला. ह्या गृहस्थाबद्दल ग्रॅनव्हिलनें असें भविष्य करावें आणि टौनशेंडच्या मागून त्यानें अधिकारावर यावें, ह्या दोनही गोष्टी दैवलिखितच असल्या पाहिजेत. कारण त्यानें पुढें दोघांचाहि कित्ता चांगलाच गिरविला आणि स्वदेशाचें कोटकल्याण केलें!

---

# प्रकरण सोळावें.



## विल्क्सप्रकरणाची पुनः उचल.

अशा रीतीनें राजाचें प्रधानमंडळ बाह्य देशीं गडबडीची तयारी करीत असतां त्यांच्या घरींच एकाकीं दुसरी एक गडबड उडाली; आणि ती अशा ठिकाणीं उडाली कीं, त्यांना त्याबद्दलचा मुळींच अजमास करितां आला नाहीं. त्यांना असें खास वाटत होतें कीं, "नार्थ ब्रिटन" मध्यें उद्दामपणाचे लेख लिहून ज्यानें चार दिवस लंदनास दणाणविलें होतें त्या विल्क्सचा आपण पुरा समाचार घेतला आहे, तो आतां वर डोकें कधीं करणार नाहीं. परंतु ही त्यांची चूक होती. "नार्थ ब्रिटन" पत्र तर नष्टच झालें होतें आणि चर्चिल मरून गेला होता; पण विल्क्स प्रकरण लोकांच्या मनांत धुमसत होतें. यावेळीं त्यानें पुनः पेट घेतला. तेणेंकरून "राजमित्र" अगदीं चकित होऊन गेले. ती कथा अशी:—

विल्क्सला युरोपवासाचा आतां अगदीं कंटाळा आला होता. त्याला स्वदेशप्रेम इतकें होतें कीं, त्यानें ड्यूक आफ् ग्रॅफ्टनला लिहूनदेखील पाठविलें कीं, तुह्मी जर मला परत येऊं द्याल तर मीं अगदीं एकांतवासांत जाऊन राहण्यासदेखील तयार आहे. पण त्याच्या ह्या विनवणींकडे कोणी लक्ष्य दिलें नाहीं. तेव्हां त्यानें १७६७ त आपल्या एकंदर हकीकतीचें एक छोटेखानी पुस्तक छापून लंदनांत पाठवून दिलें, आणि त्याची बरीचशी प्रसिद्धि झाल्यावर १७६८ च्या फेब्रुवारींत तो स्वतःच तेथें येऊन दाखल झाला. त्यावेळीं पार्लमेंताच्या निवडणुकी चालल्या होत्या. तेव्हां तो लंदन शहराचा एक उमेदवार ह्मणून पुढें आला. ही त्याची धिटाई पाहून त्याच्या शत्रूंना विस्मय वाटला व मित्रांना आनंद झाला. तो जर जरा अगोदर आला असता तर कदाचित् विजयीही झाला असता.

तो उशीरां आल्यामुळें त्याचें नांव उमेदवारांच्या यादींत अर्थात् टचें पडलें. तथापि त्यावेळीं त्यास १२०० वर मतें मिळालीं. जेव्हां तो लंदनांत आला तेव्हां त्याचें सामान्य लोकांनीं विलक्षण स्वागत केलें. पण तें त्या लोकांनींच तेवढें केलें असें नाहीं. कित्येक व्यापारी व श्रीमान् लोक यांनीं त्याचें कर्ज फेडण्यासाठीं फंड गोळा केला. अशा रीतीनें अजमासाबाहेर तो एकदम लोकप्रिय ब यामुळें विल्क्सची बरीच उमेद वाढून त्यानें जास्तच धिटाई लंदनमध्यें आपला पराजय झालेला पाहून लंदन ज्यामध्यें वसलेलें अशा मिडलसेक्स कौंटीचा उमेदवार ह्मणून पुढें आला. तेथेंही उमेदवार अगोदरपासून उभे असून त्यांना तेथील लोकांचा व सर चाही चांगला आश्रय होता. पण विल्क्सलाही आश्रय देण्यास वजनदार लोक पुढें सरसावलेच. त्यांत पोर्टलंडचा ड्यूक प्रमुख ह त्याचा जुना स्नेही टेंपल यानें त्याच्या नांवानें कांहीं जमीन क दिली; कारण त्यावेळीं एरवीं उमेदवार होतां येत नसे. आणि नांवाच्या तेथील एका धर्मोपदेशकानें चर्चिलप्रमाणें त्याचा निःसीम बनून त्यास फारच उत्तम साहाय्य केलें. तो धर्मोपदेशक असून ज जनसमूहवक्ता असल्यामुळें त्याच्या शिफारशीवरून विल्क्स फ लोकप्रिय झाला. आणि ह्या सगळ्याचा परिणाम अखेरीस असा झ कीं, दुसऱ्या दोघाही उमेदवारांना मागें टाकून विल्क्स फारच मो बहुमतानें पहिला निवडून आला (मार्च १७६८). तेथला वर्षांचा टोरी सभासद जार्ज कुक यास ८२७ मतें मिळालीं; वि उमेदवार सर बोचॅम्प प्राक्टर यास ८०७ मिळालीं आणि विल्क्स य १२९० मिळालीं. अर्थात् कुक दुसरा सभासद निवडून आला.

निवडणुकीचा हा निकाल जेव्हां लंदनांत समजला तेव्हां तेथ लोकांस अत्यन्त आनंद झाला. त्या दिवशीं त्यांनीं असें ठरविलें क आज रात्रीं प्रत्येक घरीं दीपोत्सव करावयाचा; आणि त्याप्रमाणें ज्या केलें नाहीं त्यांच्या घराच्या खिडक्या धड राहिल्या नाहींत. त्यावे

विल्क्सचे मुख्य शत्रू जे होते त्यांना लोकांनीं विशेषच प्रसाद दिला. लार्ड ब्यूटच्या घरास तर वेढाच पडला होता. विल्क्सला तुरंगांत पाठविण्याबद्दलच्या वारंटावर सही करणारा लार्ड ईगरमाँट ह्याच्या घराचीही तीच दशा झाली. दीपोत्साह न करणाऱ्या इतर घरा प्रमाणें ह्यांच्याही खिडक्या फुटल्या हें सांगावयास नकोच. शिवाय लोकांनीं त्या दिवशीं असा क्रम आरंभिला कीं, रस्त्यांत एकादी सरदाराची गाडी भेटली कीं ती उभी करावयाची, आंतल्या माणसांना विल्क्सच्या नांवाचा जयजयकार करावयास लावावयाचें, गाड्यांच्या तावदानांवर ४९ हा आंकडा खरडावयाचा, आणि मग त्यांस जाऊं द्यावयाचें. ड्यूक आफ् नार्थबर्लंदला तर विल्क्सच्या नांवानें त्यांनीं आपल्याबरोबर हलक्या दारूचा पेला झोंकावयास लाविलें. आस्ट्रियाचा वकील कौंट हॅड्झ्फेल्ट् याची फारच मजा झाली. लोकांना तो बहुधा कोणी तरी स्कॉच सरदार असावा असें वाटलें असावें. आणि लार्ड ब्यूट स्कॉच असल्यामुळें स्कॉच लोक ह्या वेळीं फार अप्रिय झालेले होते. ह्मणून त्यांनीं त्यास गाडीबाहेर खेंचून काढिलें, त्याची उचलबांगडी केली आणि त्याच्या बुटांच्या तळव्यांवर ४९ हा आंकडा खडूनें घालून मग त्यास सोडून दिलें. अशा रीतीनें लंदन शहर दोन दिवसपर्यंत ह्या लोकसमूहाच्या हातींच बहुतेक होतें. पोलीसचा बंदोबस्त कमी होता. कारण बरेंच पोलीस ब्रेंटफर्ड येथें विल्क्सची जी निवड झाली तेथें दंगा होईल ह्मणून बंदोबस्ताकारितां गेलें होतें. बरें, लष्कर आणावें तर त्यांतहि बरेच लोक विल्क्सच्या बाजूचे होतेच. असा घोंटाळा होता.

हा प्रकार पाहून राजा आणि प्रधान अगदीं चिडून गेले. राजाचें तर मस्तकच फिरलें. आणि त्यानें आंतून असा हुकूम फिरविला कीं, विल्क्सला पार्लमेंतांत बसूं देऊं नये. ही खटपट करण्यासाठीं सरकारचें सगळें बळ खर्चावयाचें. विल्क्सनें परत आल्यावर आपण फार राजनिष्ठ आहों, तुह्माला मागच्या प्रधानांनीं माझ्या बाबतींत फसविलें, मला

माफी करावी, असें राजास विनंतिपत्र पाठविलें होतें. त्यास
राजाचा जबाब होता.

इकडे विल्क्सवर कायद्याप्रमाणें खटपटी चालल्याच होत्या. विल
परत आल्यावर असें प्रसिद्ध केलें होतें कीं, किंग्सबेंच हें कोर्ट
उघडेल त्या दिवशीं मी त्या कोर्टापुढें मागच्या अपराधांबद्दल
काय सांगेल तें ऐकण्यास हजर राहीन. त्याप्रमाणें तो २० एप्रि
तेथें हजर झाला ( १७६८ ). त्यांनीं आठ दिवस विचार क
त्यास जामीनावर खुला करण्याचें नाकारिलें. तितक्यांत अर्थात् त्य
लोकप्रियता जास्तच वाढली. तो जो तुरुंगांत गेला तो एख
अपराध्याप्रमाणें किंवा राजरक्षणबाह्य माणसाप्रमाणें नव्हे, तर एक
राजाप्रमाणें गेला. त्याच्या मागें लोकांचा एवढा घोळका लागला
त्यांच्या हातांतून सुटून मुकाट्यानें तुरुंगांत प्रवेश करण्यासदेख
विल्क्सला मोठे प्रयास पडले. तेव्हां त्याच्या त्या तुरुंगासच रा
वाड्यापेक्षांदेखील जास्त महत्व आलें. एकाद्या खिडकींतून एक
वेळीं त्याचें तोंड दिसावें एतदर्थ लोक तासच्यातास त्याच्या तुरुं
भोंवतीं घिरट्या घालीत रहात.

हें सर्व पाहून प्रधान जास्तच चिडले. ता. १० मे रोजीं पार्लमे
उघडावयाचें होतें. त्या दिवशीं दंगा होईल या भीतीच्या मिषानें त्यां
विल्क्सच्या तुरुंगाभोंवती एक रेजिमेंट आणून उभें केलें. येणेंकरू
लोकांस चीड आली. शिवाय तें रेजिमेंट स्कॉच असल्यामुळें लोकांच
मनें जास्तच खवळलीं. कारण प्रत्येक स्कॉच वस्तूचा त्यांस तिरस्का
आला होता. तेव्हां खिडकींत विल्क्स दिसत नाहीं असें पाहू
त्यांनीं तुरुंगावर हल्ला करण्याचा आव घातला, किंवा लष्करास तसें वाटलें
नंतर शब्दांवरून धक्काबुक्कीवर काम येऊन त्या गर्दींत आलान नांवाच
एक निरपराधी तरुण शिपायांच्या हातून मारला गेला. तेव्हां दंग्याचा
कायदा वाचून दाखवून लष्करानें गोळीबार सुरू केला. त्यांत
दंगेखोरांपैकीं अर्धा डझन लोक मारले गेले, त्यांत एक स्त्री होती;

आणि कित्येकांस जखमा झाल्या. आलानच्या खुनाबद्दल डोनाल्ड मॅक्लीन ह्मणून एका स्कॉच शिपायावर खटला केला. त्यांत तो सुटला. तेव्हां त्याच्या कर्नलानें सरकारच्या तर्फे ह्मणून त्यास तीस गिनी बक्षीस दिल्या. तें पाहून लोक सरकाराविरुद्ध जास्तच चिडले. त्यांना वाटलें कीं, हे बाहेरचे भाडोत्री शिपाई आणून त्यांच्या द्वारा आमचें तोंड बंद करण्याचा सरकारानें विचार केला आहे. तेव्हां मग चोपड्या, भाषणें, व्याख्यानें या सर्वांच्या द्वारा प्रधानमंडळाविरुद्ध लोकमत उत्क्षुब्ध करण्याचे यत्न सुरू झाले.

प्रधानांस असें वाटलें कीं, विल्क्स जितका तुरुंगांत जास्त दिवस राहील तितका त्याजबद्दलचा लोकोत्साह कमी होईल. पण त्यांची निराशा झाली. खुद्द प्रधानमंडळांत मतभेद उत्पन्न झाला. जनोत्साह तर जास्तच वाढला, व तो लवकरच स्पष्ट रीतीनें निदर्शनास आला. मिडलसेक्सचा दुसरा सभासद कुक मेला. तेव्हां विल्क्सचा व लोकपक्षाचा अभिमानी ह्मणून पुढें आलेला सार्जंट ग्लीन हा उमेदवार उभा राहिला. तो निवडून न यावा ह्मणून सरकारानें अत्यंत खटपट केली, तरी तो निवडून आलाच. या निवडणुकींत आणखी दंगे झाले, आणखी खटले झाले, आणखी शिक्षा झाल्या, आणि शिक्षा झालेल्यांस आणखी माफ्या मिळाल्या. तेव्हां लोकांच्या चळवळीनें जास्तच पेट घेतला. मागच्या दंग्याच्या वेळीं होम सेक्रेटरी लार्ड वेमाऊथ यानें जरूर पडल्यास गोळीबार करा ह्मणून लष्करास हुकूम दिला होता, त्याची प्रत विल्क्सनें मिळवून " सेंट जेम्सेस क्रॉनिकल " ह्मणून एका व्हिग वर्तमानपत्रांत प्रसिद्ध केली, व त्याबरोबर प्रधानांविरुद्ध त्यानें एक झणझणीत पत्र लिहून प्रसिद्ध केलें.

तेव्हां प्रधानमंडळास जास्तच राग येऊन त्यांनीं विल्क्सला चांगलीच शिक्षा ठोठावण्याचा निश्चय केला. लार्ड ब्यारिंग्टन यानें तें पत्र शिस्तीप्रमाणें पार्लमेंतापुढें मांडिलें, व त्यांत सरकारची बेअब्रू केलेली आहे असें कामन्स सभेनें ठरवून विल्क्स यास तुरुंगातून जाब देण्यास

बोलाविलें. त्याप्रमाणें ता. ३ फेब्रुवारी १७६९ रोजीं तो सभेपुढें हजर झाला. त्यानें त्या पत्राचा आपण लेखक आहों ही गोष्ट एकदम कबूल करून शांतपणानें आणखी असें ह्मटलें कीं, तो लेख जास्त झणझणीत न लिहिल्याबद्दल मला वाईट वाटतें, आणि पुनः कारण पडल्यास तसें करण्यास मी चुकणार नाहीं. तो ह्मणाला, " जेव्हां जेव्हां एकादा स्टेट सेक्रेटरी अशा प्रकारचा रक्तस्रावजनक हुकूम सोडील, तेव्हां तेव्हां त्या प्रसंगानुरूप राष्ट्राला जागें करण्यासाठीं मी अशीच प्रस्तावना त्यास जोडीन. " विल्क्सच्या वतीनें बोलावयास कोणी उठलें नाहीं असें नाहीं. बर्क, बेडफर्ड व दुसरे पुष्कळजण ह्यांनीं विल्क्सच्या कृतीचें मंडन केलें किंवा निदान असें दाखविलें कीं, ह्या गोष्टीचा निकाल करणें हें काम कामन्ससभेचें नव्हे, तर कायद्याच्या कोर्टाचें आहे. पण ह्या प्रश्नावर मतें घेतलीं तेव्हां सरकारतर्फे २१९ पडलीं व विरुद्ध पक्षास कायतीं १३७ मिळालीं. विल्क्सनें लार्ड वेमाऊथला उद्देशून वरील पत्र लिहिल्याबद्दल आणि " नार्थ ब्रिटन " चा ४९ वा अंक प्रसिद्ध केल्याबद्दल आणि " स्त्रियांवरील निबंध " लिहिल्याबद्दल त्यास पार्लमेंटांतून पुनः हाकून दिलें. राजास हीच गोष्ट पाहिजे होती.

विल्क्सला हाकून दिल्यामुळें मिडलसेक्समधील एक जागा अर्थात् रिकामी पडली. तेव्हां तेथील लोकांनीं ता. १६ फेब्रुवारी रोजीं त्यास एकदम व कोणीही विरोध न करतां पुनः निवडिलें. तेव्हां दुसऱ्या दिवशीं कामन्ससभेनें त्यास पुनः हाकलल्याचा ठराव पास केला. यावेळीं त्यांनीं आणखी असें ठरविलें कीं, चालू पार्लमेंटांत बसण्यास विल्क्स हा नालायक आहे. ही गोष्ट अर्थात् सभेच्या अधिकाराच्या व विशेष हक्कांच्या बाहेरची होती. कारण तसें ठरविण्याचा अधिकार सगळ्या पार्लमेंटाचा होता; एकट्या कामन्ससभेचा नव्हता. आजपर्यंत विल्क्स-विरुद्ध राजपक्षानें जी जी खटपट केली होती त्या प्रत्येकीनें त्याजबद्दल लोकांची सहानुभूति वाढतच होती. ती कामन्ससभेच्या ह्या अधि-कारातिक्रमानें अत्यंत वाढून लोक अगदीं खवळून गेले. तेव्हां विल्क्सचे

स्नेही आणि तो ज्या तत्वासाठीं भांडत होता त्याची किंमत मानणारे, ह्या सर्वांनीं आपल्या कायदेशीर हक्कांच्या रक्षणासाठीं कसून भांडण्याचा निश्चय केला. ता. १६ मार्च रोजीं ब्रेंटफर्ड येथें पुनः निवड झाली, आणि विल्क्स बहुतेक विरोधाशिवायच पुनः पूर्ववत् निवडून आला. दुसऱ्या दिवशीं बर्कनें ह्मटल्याप्रमाणें कामन्स सभेनें त्याची निवड फुकट आहे असा ठराव पसार करण्याचा करुणहास्यरसप्रचुर पुनः फार्स केला. तेव्हां अर्थात् निवडणुकीचा प्रसंग पुनः आला; आणि यावेळीं विल्क्सविरुद्ध चांगला उमेदवार उभा करण्याचा सरकारनें निश्चय केला. कर्नल लट्रेल नांवाचा एक धीट व धाडशी माणूस त्यांनीं पुढें आणिला. पण त्याच्या मित्रांना त्याच्या जीवाबद्दल इतकी धास्ती पडली कीं, त्यांनीं त्याच्या आयुष्याचा विमादेखील उतरून ठेविला होता. लोकांनीं निवडणुकीच्या ठिकाणीं मुळींच दंगा केला नाहीं; मात्र योग्य खटपट करून विल्क्स यास पुनः अत्यंत मोठें बहुमत मिळवून दिलें. तें इतकें कीं, कर्नल लट्रेल यास कायतीं त्याच्या एकचतुर्थांश मतें मिळालीं; आणि एक वेडा वकील अगदीं आयत्यावेळीं पुढें घुसला होता, त्यास कायतीं पांचच मिळालीं.

ही निवड गुरुवार ता. १३ एप्रिल रोजीं झाली. लंदनमध्यें पुनः दीपोत्साह झाला आणि पुष्कळ लोकांनीं 'किंग्सबेंच प्रिझन' (ज्यांत विल्क्स होता त्या तुरुंगा) समोर जमून त्याच्या या तिसऱ्या जयाबद्दल त्याचें जोरानें अभिनंदन केलें. दुसऱ्या दिवशीं त्यास हुसकून लावण्याची कामन्स सभेनें पुनः तयारी आरंभिली. तो वादविवाद शनिवारची सगळी रात्र चालून (असें त्यावेळीं क्वचित्च होत असे) रविवारीं पहाटेस सभेनें असा ठराव पास केला कीं, कर्नल लट्रेल हाच मिडल सेक्सचा कायदेशीर रीतीनें निवडून आलेला सभासद आहे. ह्या ठरावास फारसा बहुमताचें पाठबळ नव्हतें. त्यास अनुकूल १९७ मतें मिळालीं व १४३ मतें प्रतिकूल पडलीं. तेव्हां कोणी अशी सूचना पुढें आणिली कीं, हा ठराव मिडलसेक्सच्या मतदारांस मान्य नसल्यास

त्यांस अर्ज करण्यास १९ दिवसांची मुदत द्यावी. तीस लार्ड नार्थ ह्याच्यानें विरोध करवला नाहीं.

ही सर्व धामधूम चालली असतां राजा व त्याचे प्रधान ह्यांजवर गुप्त व भयंकर अशा रीतीनें हल्ले करणारा एक नवाच गृहस्थ पुढें आला. ता. २१ मार्च १७६९ रोजीं "पब्लिक आडव्हर्टायझर" नामक एका वर्तमानपत्रांत "जूनिअस" ह्या सहीचें एक पत्र प्रसिद्ध झालें; आणि तेव्हांपासून इंग्लिश भाषेंतील राजकीयविषयक वाङ्मयास एक नवेंच स्वरूप आलें. ह्या वेळीं लंदन शहरांत हेंच अत्यन्त महत्वाचें वर्तमानपत्र होतें. तें प्रथम त्या नांवानें १७५२ सालीं सुरू झालें होतें; तथापि १७१९ सालीं डीफोनें "डेली पोस्ट" नांवाचें जें पत्र सुरू केलें होतें त्याचेंच तें प्रत्यक्ष वंशज होतें. त्यांत घरगुती व परदेशचीं वर्तमानें पुष्कळ येत असत, आणि गद्य व पद्यरूप पुष्कळ अस्सल लेख येत असून सर्व प्रकारचीं पत्रेंहि येत असत. पण "ज्यूनियस" ह्या सहीचें पहिलें पत्र त्यांत येईतोंपर्यंत त्यास फारसें राजकीय महत्व आलेलें नव्हतें. त्याचा लेखक कोणीहि असो; त्यानें त्या पत्रांत पूर्वीं लिहिलेलें होतें. त्या पत्राचा प्रकाशक वुडफाल यास त्या गृहस्थाचें पहिलें पत्र १७६७ त आलेलें होतें; तेव्हांपासून निरनिराळ्या टोपण नांवाखालीं त्याचीं पत्रें वरचेवर झळकत असत. पण ज्यूनियस ह्या सहीनें जेव्हां तीं येऊं लागलीं तेव्हां त्यांस महत्त्व आलें. तीं अगदीं आणीबाणीच्या प्रसंगीं येऊं लागलीं. यामध्यें लोकपक्षाचें समर्थन असे; आणि त्यांची भाषासरणी इतकी कडू व तिखट असे कीं, राजकीय विषयांच्या चर्चेमध्यें तसल्या सरणीचा आजपर्यंत कोणी उपयोग केलेला नव्हता.

ज्यूनियसच्या पहिल्या कांहीं पत्रांत सर विलियम ड्रेपर व लार्ड ग्रानूबी ह्यांच्यासंबंधानें झणझणीत टीका आलेली होती. पण विल्कसचा पक्ष घेऊन ज्यूनियस जेव्हां ड्यूक आफ् ग्रॅफ्टनवर हल्ले करूं लागला तेव्हां त्या पत्रांकडे लोकांचें लक्ष जास्तच लागूं लागलें. ब्रेंटफर्ड

येथील निवडणुकीच्या वेळीं झालेल्या दंग्यांत जार्ज क्लार्क नांवाचा एक माणूस मारला गेला होता, आणि त्याच्याबद्दल एडवर्ड मॅकर्क नांवाच्या माणसावर खटला होऊन शाबिती झाली होती. तरी त्यांत कांहीं संशय आहे ह्या मुद्यावर राजानें त्यास माफी केली. त्याला उद्देशून ज्यूनियसनें ड्यूक आफ् ग्रॅफ्टनला असें विचारिलें कीं, तुह्मांला अशा खुन्यांना माफी करावीशी वाटते आणि विल्क्ससारख्या लोकप्रिय व लहानसा गुन्हा केलेल्या माणसास माफी करावीसें वाटत नाहीं काय? विल्क्स हा आपला एकदां मित्र होता हें आपण विसरला वाटतें? किंवा आपणास फक्त खुन्यांसच माफी करण्यास राजास सुचवावेंसें वाटतें! अशा रीतीनें सुरू केलेला हल्ला ज्यूनियसनें सारखा चालविला होता. शिवाय त्याच्या त्या हल्ल्यांस जास्तच जोर येण्यास असें कारण झालेलें होतें कीं, विल्क्सचे खाजगी वर्तनाचें मंडन त्यांत कधीं केलेलें नसे. कर्नल लट्रेल हाच मिडलसेक्सचा कायदेशीर सभासद होय असा जेव्हां कामन्स सभेनें ठराव पास केला, तेव्हां विल्क्सच्या शत्रूंवर हल्ला करण्यास ज्यूनिअसास फारच चांगली संधि सांपडली. कारण ह्या ठिकाणीं विल्क्सचा खाजगी संबंध नसून हा सार्वजनिक स्वातंत्र्याचा प्रश्न झाला होता. कारण पार्लमेंटाचा सभासद होणें हें लोकमतावर अवलंबून नाहीं तर सभेच्या मतावर अवलंबून आहे, असें या ठरावानें सिद्ध होऊं पहात होतें. अर्थात् लोकांच्या राजकीय हक्कांवर ही जबरदस्त गदा आली होती; आणि त्यामुळें ज्यूनिअसला सभेचा व प्रधानांचा समाचार घेण्यास चांगलेंच फावलें.

ज्यूनियस ह्मणजे कोण ह्या प्रश्नाचा निकाल अगदीं खात्रीपूर्वक असा कधींच झालेला नाहीं. तो अमुक अमुक असावा असे आजपर्यंत पुष्कळ तर्क झालेले आहेत. कोणी ह्मणत तीं पत्रें विल्क्सनेंच लिहिलेलीं असावीं. आतां विल्क्स चांगलें लिहित असे आणि कटुहि लिहित असे हें खरें आहे, पण त्याला ह्या पत्राच्या लेखकाइतकें चांगलें किंवा कटूहि लिहितां येत नसे. डा० जानसनचें असें मत

पडलें कीं, तीं बर्कनें लिहिलीं असावीं; याचा अमळ चमत्कार वाटतो. कारण विल्क्सपेक्षां ज्यूनियसची लेखनसरणी जितकी श्रेष्ठ होती, तितकीच बर्कची ज्यूनियसपेक्षां श्रेष्ठ होती. हें जानसनसारख्या मार्मिक माणसाच्या लक्षांत यावयास पाहिजे होतें. आणखीहि दुसऱ्या लोकांचीं ह्यासंबंधानें नांवें घेत व घेतात. पण एकंदरींत पाहतां वॉरन-हेस्टिंग्सच्या अमदानींत कलकत्ता कौन्सिलचा सभासद असलेला त्याचा भयंकर शत्रू जो फिलिप फ्रॅन्सिस तोच ह्या पत्रांचा लेखक असावा ही गोष्ट एकंदरींत अत्यन्त संभवनीय दिसते.

असो. आतां मिडलसेक्सच्या मतदारांना पूज्य अशा विल्क्सबद्दल तिरस्करणीय अशा लट्रेलची जी कामन्स सभेंत योजना केली त्याविरुद्ध त्यांनीं अर्ज केला हें सांगावयास नकोच. या अर्जावर जो वादविवाद झाला तो त्या संस्मरणीय वादविवादांच्या दिवसांतहि अत्यन्त संस्मरणीय झाला. एक पक्षीं राजा आणि त्याचे प्रधान यांच्या वशीकरणास भुलून जाऊन ब्लॅकस्टोन यानें, ज्या राजकीय हक्कांचें प्रतिपादन उत्तम केल्याबद्दल त्याची इतकी प्रसिद्धि आहे, त्यांच्या विरुद्ध आणि आपल्या इभ्रती विरुद्ध संभाषण केलें. दुसऱ्या पक्षीं वेडबर्न ह्यानें वेळ ओळखून राजपक्ष सोडून दिला व लोकपक्षाच्या वतीनें संभाषण केलें. एका पक्षीं फ्लेचर नार्टन यानें सभेच्या ठरावाचें मंडण केलें, आणि दुसऱ्या पक्षीं जार्ज ग्रेनव्हिल यानें विरुद्ध बाजू इतक्या चातुर्यानें संभाळून धरिली कीं, तो हुशार वक्ता असल्यामुळें मोठा वकील कसा झाला असता हें चांगलें दिसून आलें. या प्रसिद्ध वादविवादांत बर्कचेंहि भाषण एकंदरींत फार उत्तमच वठलें; तथापि त्या दिवशींचें खरें भाषण ह्मटलें ह्मणजे जें एका अगदीं तरुण, बहुतेकांशीं मूल माणूस, अशा वक्त्यानें केलें. त्याचें नांव चार्लस जेम्स फॉक्स. मिडलसेक्सच्या अर्जास वाटाण्याच्या अक्षता मिळाल्या हें सांगावयास नकोच. सभेनें लट्रेलचीच निवड कायम केली. त्याच दिवशीं राजानें पार्लमेंताची ती बैठक संपली असें सांगतांना जें संभाषण केलें तें जणूकाय आपण मोठा जय मिळविला आहे अशा

थाटावर केलें. पण यावरून विल्कसची आपण कायमची वाट लाविली असें जर राजास किंवा प्रधानास वाटलें असलें, तर त्यांची लवकरच अगदीं पक्की निराशा व्हावयाची होती. विल्कसची लोकप्रियता या गोष्टीनें कमी न होतां उलट इतकी वाढली कीं, फ्रांक्लिनसारख्या थंड डोक्याच्या हुशार माणसास आपल्या रोजनिशींत असें नमूद करण्याची स्फूर्ति झाली: — तिसऱ्या जार्जाची खाजगी वर्तणूक जर वाईट असती आणि विल्कसची चांगली असती, तर दुसऱ्याला पहिल्यास देशांतून हुसकून लावितां आलें असतें. तात्पर्य, विल्कस हा आपणास राजा असावा आणि तिसरा जार्ज नसावा, असें राजाच्या निम्मे अधीक प्रजेस यावेळीं वाटूं लागलें होतें यांत बिलकुल संशय नाहीं. कारण इंग्रजांना जे हक्क व जीं स्वातंत्र्यें अत्यन्त मोलवान वाटतात त्या सर्वांचा विल्कस हा हल्लीं पक्का अभिमानी बनलेला दिसत होता, आणि त्याच हक्कांचा व स्वातंत्र्यांचा राजा हा हल्लीं तितकाच कट्टा शत्रू बनलेला दिसत होता.

एवंच किंग्सबेंचाच्या कैद्यावर दररोज सन्मानांची वृष्टि चालली असतां राजावर अपमानांची लाखोली चालली होती. राजानें तोंड बाहेर काढण्याची फुरसत कीं त्याला लोकांच्या रागाचा कांहीं तरी प्रसाद मिळालाच; आणि त्याच्या वाड्यांतदेखील त्याच्या प्रधानाविरुद्ध तक्रारी घेऊन डेप्युटेशनें पाठवावयास लोकांनीं कमी केलें नाहीं. इंग्लंदांत जिकडे तिकडे सार्वजनिक सभा भरूं लागल्या, आणि ह्या सभांतून पार्लमेंत बरखास्त करण्याबद्दल राजास विनंत्या होऊं लागल्या. सार्वजनिक दुःखाचें विवेचन करण्यासाठीं अशा सभा भरण्याची चाल इंग्लंदांत एव्हांपासूनच पडली असें ह्मणण्यास हरकत नाहीं. दोन वेळां लंडनचा मेयर शेरिफांसमवेत राजाकडे जाऊन कामन्स सभेच्या कृतींविरुद्ध अर्जाच्या रूपानें त्यानें लोकांच्या तक्रारी राजाचे कानावर घातल्या. पहिल्या अर्जास राजानें असें उत्तर दिलें कीं, हा अर्ज आपल्या इभ्रतीविरुद्ध आहे, पार्लमेंताला हानिकारक आहे, आणि इंग्लंदच्या राज्यपद्धतीशीं अननुरूप आहे. आणि असें उत्तर देऊन, मग राजानें आप-

त्याला शोभेल असें काय कृत्य केलें ह्मणाल, तर तो आपल्या मानकऱ्यांकडे वळून खदखदां हंसला. दुसऱ्या अर्जाची त्यानें अशाच उद्धटपणानें वाट लाविली. तेव्हां लंदनच्या लार्ड मेयरासही राग येऊन त्यानें राजास असें सुचविलें कीं, जे लोक प्रजेपासून राजाचें प्रेम दूर करूं पाहतात ते सार्वजनिक शांततेचा भंग करितात, आणि १६८८च्या राज्यक्रान्तीनें ठरविलेली जी राज्यपद्धति तिचें उल्लंघन करितात. हे शब्द ज्यानें उच्चारिले त्या मेयराच्या पुतळ्यावर पुढें ते सोन्याच्या अक्षरांनीं लिहून ठेविले. पण अशा प्रकारचे शब्द ऐकून शेवटीं राजा हसावयाचें सोडून चिडीस जाऊं लागला. एकदां तर असले शब्द ऐकून त्यानें तरवारीस हात घातला आणि ह्मणाला कीं, पार्लमेंत बरखास्त करण्यापेक्षां मला हीस हात घालणेंच जास्त पसंत वाटतें. इतक्या हातघाईवर हें प्रकरण दोन्ही बाजूंनीं आलें.

इकडे राजा याप्रमाणें उपमर्द करीत आणि करून घेत असतां तिकडे विल्क्सवर तुरंगांत असतांनाच जनप्रेमाची आणखी वृष्टि होत होती. लंडनच्या फॅरिंग्टन विदौट नामक वार्डाचा त्यास आल्डरमन निवडिलें. तुरंगांत त्यास मोठाल्या मिष्टान्नांच्या व पेयांच्या भेटी जाऊं लागल्या. कांहीं दिवस त्याच्यावर खरीखुरीच पैशाची वृष्टि सुरूं झाली. मुख्य मुख्य व्हिग लोकांनीं त्यास पैसे पुरविण्याचा मक्ताच घेतला. सरदार व सरदारिणी त्यास मोठाल्या रकमा पाठवीत. कांहीं राजकारणी माणसांनीं मिळून एक फंडच उभारिला आणि विल्क्सचें कर्ज फेडिलें. अशा रीतीनें विल्क्स कांहीं दिवस अगदीं देव बनून गेला. त्याची मर्जी प्रसन्न करितील ते पार्लमेंताचे सभासद बनूं लागले, लंदनचे शेरीफ बनूं लागले, आणि खेड्यापाड्यांतील मेयर बनूं लागले. अशा रीतीनें तो प्रतिराजाच बनला. ज्युनिअसदेखील त्याची खासगी आणि सार्वजनिक रीतीनें मनधरणी करूं लागला.

ता० १७ एप्रिल १७७० रोजीं त्याची कैद संपली. आपल्याबद्दल लंदनांत कांहीं प्रदर्शन होऊं नये ह्मणून त्यानें दुसऱ्या एका शहराचा

रस्ता धरिला. तरी लंदनांत त्या रात्रीं दीपोत्सव झालाच, आणि इतर शहरींही सार्वजनिक सणाप्रमाणें लोकांनीं तो दिवस पाळिला. इकडे त्याला जयामागून जय मिळूं लागले. आल्डरमन असतां त्यानें न्यायाचें कोर्ट व कामन्स सभा यांच्यावर असा एक जय मिळविला कीं, तेणेंकरून इंग्लंदांत मुद्रणस्वातंत्र्याची स्थापना होण्यास मोठी मदत झाली. पार्लमेंतांत होणाऱ्या वादविवादांचे रिपोर्ट वर्तमानपत्रांत येऊं नयेत एतदर्थ खटपट करण्याच्या इराद्यानें कामन्स सभेनें कांहीं छापखानेवाल्या लोकांना पकडण्याचा मूर्खपणाचा यत्न केला. विल्क्स आणि लार्ड मेयर यांनीं त्या लोकांचा पक्ष घेऊन त्यांस लपून बसण्यास सांगितलें, आणि राजाचा जाहीर हुकूम व सभेची आज्ञा यांच्याअन्वयें ज्यांनीं त्यांस पकडिलें त्यांस उलट अटकेंत टाकिलें. तेव्हां कामन्ससभेनें लार्ड मेयर व आल्डरमन आलिव्हर यांस तुरुंगांत टाकिलें, आणि विल्क्स यास आपल्या समोर हजर राहण्याचा हुकूम केला. विल्क्सनें शांतपणें असें उत्तर पाठविलें कीं, मी ज्याअर्थीं सभेचा सभासद आहे आणि ह्मणून रीतीप्रमाणें सभेंतील आपल्या स्थानीं हजर रहाण्याचा ज्याअर्थीं मला हुकूम झालेला नाहीं, त्याअर्थीं मी तो ओळखीत नाहीं. तेव्हां सभेनें त्यास हजर रहाण्याविषयीं दुसरा आणि तिसराही हुकूम पाठविला, पण त्यानें मुळींच दाद दिली नाहीं. तथापि कामन्ससभेनें त्याचें कांहीं केलें नाहीं यावरून त्याची लोकप्रियता किती वाढली होती हें स्पष्ट दिसतें. इकडे लार्ड मेअर आणि आल्डरमन आलिव्हर यांजवरही ते तुरुंगांत असतां अशीच सन्मानवृष्टि होऊं लागली व त्यावरून लोकमताचा कल स्पष्ट दिसून आला.

याप्रमाणें या बाबतींतही विल्क्स विजयी झाला, आणि तेव्हांपासून पार्लमेंताच्या सभेंतील भाषणांचे रिपोर्ट बंद करण्याचा यत्न कोणी केला नाहीं. नंतर मग विल्क्सवर आणखी मानाची वृष्टि झाली. त्यास शेरिफ निवडिलें. कोर्ट आफ् कामन कौन्सिलनें त्यास एक रुप्याचा पेला नजर केला. शेवटीं त्यास लार्ड मेयर करण्याची खटपट सुरू झाली.

हीं जागा त्यावेळीं अत्यंत मोठ्या मानाची समजत व अजूनही
मानाची समजतात. राजमित्रांनीं तो निवडला जाऊं नये
पूर्वीप्रमाणें शिकस्तीची खटपट आरंभिली. तरी शेवटीं प
व्हावयाचा तो झालाच. दोनदां त्याचा सर्वांवर नंबर आला,
दोनही वेळां कोर्ट आफ् आल्डरमेन ह्या सभेनें दुसऱ्यांच उमेद
निवडिलें. पण १७७४ सालीं तिसऱ्या निवडणुकीच्या वेळीं राज
लोकांच्या खटपटीस न जुमानतां त्या कोर्टानें त्यास लार्ड मेयर
डिलेंच. त्याच वर्षाच्या सामान्य निवडणुकीच्या वेळीं विल्क्स
सेक्सचा उमेदवार होऊन पांचव्यानें पुढें आला. यावेळीं त्याच्या
कोणी उभाच राहिला नाहीं. लट्रेलची निराशा झाली होती.
रीतानें पार्लमेंतांत प्रथम प्रवेश केल्यापासून दहा वर्षांनीं विल्क
पुनः विजयी होऊन मिडलसेक्सचा सभासद आणि लंदनचा लार्ड
म्हणून पुनः पार्लमेंतांत शिरला.

यानंतर विल्क्स सरासरी पावशतक राहिला; पण त्याचा पु
इतिहासाशीं विशेषसा संबंध येत नाहीं. त्याला लार्ड मेअरचें
किंवा लार्ड मेअरच्या मजा ह्या दोहोंचीहि फारशी आवड न
त्यांचा त्यास लवकरच कंटाळा आला, आणि जरी तो पुढें ब
वर्षे पार्लमेंतांत होता, व जरी तो तेथें आपलें काम शहाणप
उत्साहानें, आणि मुत्सदीपणानें करी, आणि नेहमीं लोकांच्या व
बोले, तरी त्यास एकांतवासांत रहाणें एकंदरींत जास्त आ
नंतर ग्रीक व ल्याटिन भाषेंतील ग्रंथ टीपा देऊन तो छापूं लाग
त्याच्या तारुण्यांत जे त्याचे अत्यन्त दीर्घ वैरी होते ते उतारव
त्याचे मित्र बनले. राजा, डा॰ जॉनसन देखील, त्याच्या मोहि
पडला. पुढें डा॰ जॉनसनशीं त्याचें झालेलें संभाषण हें अठरा
शतकाच्या इंग्लंदच्या वाङ्मय व राजकीयविषयक इतिहासांतील
अत्यन्त प्रसिद्ध अशी गोष्ट होऊन बसलें आहे. पुढें राजास त्य
असें आश्वासन दिलें कीं, मी विल्काइट ( विल्क्सपक्षाभिमानी ) कध

नव्हतां; व तें एका अर्थी खरेंहि होतें. कारण त्याच्या नांवावर विकून जे कांहीं तरी विलक्षण व फार पुढें गेलेल्या कल्पना लोकांपुढें मांडीत होते, त्यांच्या मताचा तो मुळींच नव्हता. पण आपलीं मतें आणि आपलें कर्तव्य यांस जागणारा या अर्थानें तो खरा विल्काइट होता.

ता० २८ नवंबर १७९७ रोजीं या वृद्ध, थकलेल्या आणि जीर्ण माणसानें लंदन शहराचा चेंबर्लेन या नात्यानें आडमिरल सर होरेशियो नेल्सन याचें स्वागत केलें. अशा रीतीनें जणू काय मावळत्या ताऱ्यानें उगवत्या ताऱ्यास अभिवंदनच केलें. त्यावेळीं नेल्सनला ३९ वें वर्ष लागलेलें होतें, आणि विल्क्स यास ७० वें लागलेलें होतें. नंतर लवकरच ( दिजंबर १७९७ अखेर ) विल्क्स मरण पावला. विलक्षण माणसांच्या शतकांतील एक अत्यन्त विलक्षण माणूस ह्मणून तो नेहमींच संस्मरणीय झाला आहे.

---

## प्रकरण सतरावें.

### अमेरिकशीं तंटा.

कामन्स सभेमध्यें विल्क्सबद्दल जो तंटा चालला होता त्याचा एक अगदीं तात्कालिक परिणाम असा झाला कीं, १७६८ च्या सामान्य निवडणुकीच्या वेळीं जो वयांतहि न आलेला असा एक तरुण गृहस्थ निवडून आला होता तिकडे लोकांचें लक्ष गेलें. तो अर्थात् चार्लस जेम्स फॉक्स हा होय. प्रथम तो विल्क्सचा पक्का विरोधी असून लट्रेलचा अभिमानी होता. त्यानें आनंदित अशा कामन्स सभेस मोठ्या आनंदानें असें सांगितलें कीं, लोकमतास मी मुळींच जुमानीत नाहीं. याबद्दल त्या १९ वर्षांच्या बांडाचें बर्कनें जेव्हां हळूच कान उपटले तेव्हां हा तरुण पुरुष पुढें लोकांच्या हकांचें मंडन आपल्यापेक्षांहि जास्त जोरानें करणार आहे हें बर्कच्या स्वप्नींहि नव्हतें.

चार्लस जेम्स फॉक्स हा हेन्री फाक्स, उर्फ लार्ड हालंड, याचा पुत्र असून त्यास लहानपणीं अगदीं वाईट शिक्षण मिळालेलें होतें. मुलगा फारच बुद्धिमान् आहे असें पाहून लार्ड हालंद अगदीं लहानपणापासूनच त्यास आपल्या बरोबरीनें वागवूं लागला, आणि तो ह्मणेल ते त्याचे लाड पुरवूं लागला. अशा रीतीनें मनसोक्त वागण्याची परवानगी मिळाली असतां त्याचे डोकें अगदींच फिरून गेलें नाहीं, आणि त्याचें वर्तन अगदींच बिघडलें नाहीं, हें त्याचा मूळचा स्वभावपिंड फार खबरदार होता याची साक्ष देतें. तथापि बापाबरोबर लहानपणींच यूरोप खंडांत त्यानें प्रवास केल्यामुळें तो जुगार खेळण्यांत आणि रंडीबाजी करण्यांत अगदीं तरबेज होऊन आला. आणि नंतर प्रसिद्ध पुरुष आणि सुंदर स्त्रिया यांचा लाडका बनून पार्लमेंतांतहि शिरला. बापाप्रमाणेंच पैसे खाण्याचें जर त्यालाहि व्यसन असतें तर त्यानेंहि बापाप्रमाणेंच लाखों रुपये जमविले असते. पण त्या कामांत तो अगदीं

सावळा होता. पार्लमेंतांत शिरल्यावर पहिलीं सहा वर्षें तो लॉर्ड नार्थचा व त्याच्या नीतीचा पक्का अभिमानी होता, आणि पुढें जन्मभर त्याच नीतीचा तो तितकाच विरोधी होता. शिवाय तो मोठा पंडित होता. ग्रीक, ल्याटिन, फ्रेंच, स्पॅनिश इत्यादि वाङ्मयांवर त्याची फारच भक्ति असे; आणि इतकें असून इंग्लिश वाङ्मयाचाही तो पुरा भक्त असे. त्याला चॉसर कवि तर अगदीं मुखोद्गत असे, आणि शेक्सपियराच्या नाटकांची जितकी माहिती प्रत्येकास असणें इष्ट आहे, पण जितकी फार थोडक्यांसच असते, तितकी त्यास होती. जर्मन-भाषेची आणि त्यावेळीं त्या भाषेंत वृद्धिंगत होणाऱ्या वाङ्मयाची मात्र त्यास मुळींच माहिती नव्हती.

फॉक्स ज्या मुदतींत लॉर्ड नॉर्थचा भक्त होता ह्मणून वर सांगितलें, त्या मुदतींतदेखील त्यांचें फारसें जमलें नाहीं. तेव्हां फॉक्सनें नौका-खात्यावरील ' लार्ड ऑफ् धि आडमिराल्टी ' या आपल्या जाग्याचा एकदम राजीनामा दिला. पुढें त्यास तिजोरीवरील कमिशनर ही जागा देऊन समजावतां समजावतां पुरें झालें. अशा रीतीनें त्यांचा जो पुनः मिलाफ झाला तो बरवरच झाला. फॉक्स कधीं कधीं लॉर्ड नार्थविरुद्धहि मत देऊं लागला. तेव्हां लॉर्ड हालंद मेल्याबरोबर लॉर्ड नार्थनें पुनः त्यास कामावरून काढिलें. पुढें कांहीं दिवस फॉक्स प्रधानांना कधीं कधीं आपला पाठिंबा देत असे; पण त्याचीं मतें हळू हळू विरुद्ध दिशेस कलूं लागलीं होतीं; आणि अमेरिकेशीं जेव्हां तंट्यास सुरवात झाली, तेव्हां तो विरुद्ध पक्षास उघडपणेंच जाऊन मिळाला, आणि ज्यांस लिबरल ह्मणून ह्मणतात त्या तत्त्वांचा एक अत्यंत मोठा व अत्यंत बोलका असा अभिमानी होऊन बसला. त्या तंट्याकडे आतां आपण वळूं.

एकीकडे इंग्लंदांत विल्क्ससंबंधानें लढाई चालली असतां दुसरीकडे अमेरिकेंत भावी संकटाचा ढग रुंद रुंद होत चाललाच होता. अमेरिकन् लोकांच्या नाखुशीस जुमानावयाचें नाहीं किंवा ती लक्षांतच आणावयाची

नाहीं असा इंग्लिश सरकारचा निश्चय जसजसा दृढावत चालला, तसतशी ती नाखुशी जोरावत चालली. यावेळीं अमेरिकन लोकांना ठोंसे देण्यास आपणास अत्यंत योग्य साधन सांपडलें, ह्मणून राजा आपणास अत्यंत दैववान् समजत होता. स्टेट सेक्रेटरी लॉर्ड हिल्सबरो हा अत्यंत विपरीत बुद्धीचा माणूस होता. एकादी वेळ कशी आली आहे, ह्याबद्दल चुकीचें अनुमान करण्याची त्यास अशी कांहीं हातोटी साधलेली होती कीं, ती जर उलट प्रकारची असती तर तो मोठा मुत्सद्दीच बनला असता. पण राजाचीहि बुद्धि यासंबंधानें अशीच विपरीत असल्यामुळें या बाबतींत दोघांचें मेतकूट उत्तम बनलें होतें.

बरें, इकडे स्टेट सेक्रेटरी अशा प्रकारचे असतां तिकडे बर्नार्डसारखे गव्हरनरहि त्याच नमुन्याचे होते. दोघांच्याहि नीतीचें धोरण अमेरिकन लोक निवतील कसे हें पाहण्याकडे नव्हतें, तर ते जास्त चिडतील कसे हेंच पाहण्याकडे होतें. इंग्लिश प्रधानमंडळांनीं अमेरिकेसंबंधानें एकामागून एक अशा ज्या भयंकर चुका केल्या त्यांस बर्नार्डचा केवळ पाठिंबा होता एवढेंच नाहीं, तर त्याचा त्या बाबतींत सल्लाहि होता. इकडे हिल्सबरोची तर अशी पक्की समजूत होती कीं, अमेरिकन लोक अगदीं भितरे व बदमाष असे आहेत; आणि त्यांना वठणीवर आणावयास नुसता चाबूक दाखविला ह्मणजे पुरे आहे. हुद्यामागून हुद्दा आणि पदवीमागून पदवी पटकावण्याइतकी अक्कलहुशारी ज्यास आहे, अशा जबाबदार प्रधानास आपल्या स्वतःच्या देशाचा इतिहास आणि आपल्या देशबांधवांचा स्वभाव यांची इतकी अल्प माहिती कशी असावी याचा मोठा चमत्कार वाटतो. तें कसेंहि असो. पण अमेरिकन लोक ह्मणजे अगदीं भेकड आहेत, या दृढ समजुतीवर त्यानें आपल्या सोंगाची बतावणी इतकी उत्तम केली कीं, मोठ्या साम्राज्याचें लहान करण्याचें काम मोठ्या शिताफीनें ज्यांनीं पार पाडिलें अशा ग्रेनव्हिल, टौनशेंड, आणि वेडरबर्न इत्यादि नररत्नमालिकेंत त्यानें आपलें नांव अक्षय्य गोंवून घेतलें.

स्टांप ॲक्टानें दंगेधोपे यांचें यथेष्ट पिक काढिल्यानंतर सरकारानें म्यूटिनी ॲक्ट ( बंडाचा कायदा ) नांवाचा कायदा इंग्लंदास लागू होता तो वसाहतींसहि लागू करून टाकिला. त्याचा उद्देश सैन्याची रहाण्याची आणि खाण्यापिण्याची तरतूद करावी असा होता. न्यूयार्क येथील कायदेमंडळानें हा कायदा अमलांत आणण्याचें नाकारिलें, व तें याच मुद्यावर कीं, स्टांप ॲक्टांत जें तत्त्व गोंवलेलें होतें तें यांतहि आहे. ह्मणून त्यांनीं सैन्याची तरतूद आपणांस वाटेल तशी केली, आणि इंग्लिश पार्लमेंताच्या कायद्यास एकीकडे गुंडाळून ठेविलें. तेव्हां उलट पार्लमेंतानें असें एक बिल पास केलें कीं, म्यूटिनी ॲक्ट अर्थश: आणि अक्षरश: मान्य करीतोंपर्यंत न्यूयार्कचा गव्हर्नर, कौन्सिल आणि आसेम्ब्ली यांना कोणताहि कायदा पास करतां येऊं नये. तेव्हां न्यूयार्क मऊ आलें. तें पाहून, जोर दाखविला कीं वसाहतकार वठणीस येतात या क्लृप्तीस जास्तच जोर आला, व तिचे अभिमानी आनंदानें टिऱ्या पिटूं लागले; पण तो आनंद फार वेळ टिकला नाहीं. कारण न्यूयार्कनें या कामीं जर माघार खाली तर मॅसॅचुसेटनें जास्तच जोर धरिला. तेथील लोकांनीं म्यूटिनी ॲक्ट मान्य करण्याचें साफ नाकारिलें इतकेंच नाहीं, तर इंग्लिश सरकारच्या ह्या इतर कृत्यांबद्दल दाद लावून घेण्यासाठीं सर्वांनीं ऐकमतानें कांहीं तरी केलें पाहिजे, त्या कामीं आह्मास मदत करा असें इतर वसाहतींस एक सर्क्युलर पाठविलें. काहींतरी विशिष्ट हेतूसाठीं वसाहतकारांनीं एकत्र होण्याचें हें दुसरें उदाहरण होतें, आणि तेणेंकरून इंग्लिश सरकारास बरीच अस्वस्थता उत्पन्न झाली आणि चीडहि आली. तेव्हां लार्ड हिल्सबरोनें बर्नार्ड यास असें लिहून पाठविलें कीं, होईल तसें करून हें सर्क्युलर मागें घ्यावयास लावावें. बर्नार्डनें तसें मोठ्या खुशीनें केलें असतें; पण काय करितो बिचारा? ती गोष्ट त्याच्या शक्तीच्या बाहेरची होती. त्यानें तेथील कायदेसभा बरखास्त करून टाकिली. तें पाहून वसाहतीमागून वसाहत मॅसॅचुसेटची पाठ थोपटूं लागली, आणि हिल्सबरोचा निषेध करूं लागली. मेरिलंद, डिलावेअर, व्हर्जिनिया, जार्जिया आणि

न्यूयार्क यांनीं जेव्हां अशा प्रकारचा निषेध केला, तेव्हां इंग्लिश सरकारानें वसाहतींचा कारभार पाहण्यासाठीं एक नवी जागा उत्पन्न करून तिजवर लार्ड हिल्सबरोची स्थापना केली. लार्ड हिल्सबरोला अजूनहि असाच भ्रम होता कीं, आपण जरा निश्चय दाखविला कीं वसाहतकार लागलेच नरमतील. परंतु तिकडून हळू हळू बातम्या अगदीं उलट येऊं लागल्या. एकदां अशी बातमी आली कीं, जकातीचे कायदे मोडल्याबद्दल एका अमेरिकनाचें जहाज सरकारी अधिकाऱ्यांनीं पकडिलें, त्यावरून बोस्टनमध्यें दंगा होऊन जकातीच्या कमिशनरांस जीव घेऊन पळून जावें लागलें. पुन: अशी बातमी आली कीं, बोस्टनचे लोक व तेथें नेऊन ठेविलेले शिपाई यांजमध्यें तंटे माजत आहेत. तेव्हां हिल्सबरोनें सुचविलें कीं, आठव्या हेन्रीच्या वेळचा एक कायदा अमलांत आणून अपराधी वसाहतकारांची चवकशी करण्यासाठीं त्यांस जहाजावर घालून इंग्लंदांत आणावें. तें पाहून कामन्स सभेंतील शहाण्यासुर्त्या सभासदांनीं असल्या मूर्खपणाचा अगदीं निषेध केला. तेव्हां वसाहतकारांस मोठ्या कष्टानें कांहीं सवलती दिल्या. बर्नार्ड साहेबास परत बलाविलें, कांहीं त्रासदायक कर काढून टाकिले. पण ह्या सवलती अगदीं अल्प असून त्या अगदीं उशीरां दिल्या, त्यामुळें त्यांचा उपयोग झाला नाहीं. ता० ५ मार्च १७७० हा दिवस बोस्टनच्या इतिहासांत संस्मरणीय झाला. एकीकडे चहा खेरीजकरून इतर जिनसांवरील जकात काढून टाकावी अशी तीन हजार मैलांवर लार्ड नॉर्थ पार्लमेंतास सूचना करीत होता, तों दुसरीकडे बोस्टनचे कांहीं रहिवासी आणि कर्नल प्रेस्टनच्या हाताखालील कांहीं शिपाई या दोघांमध्यें लहानसा तंटा होऊन तो एकदम पेटला. कांहीं शिपायांनीं गोळीबार केला, आणि कांहीं रहिवासी मारले गेले, व बरेच जखमी झाले. पुढें लेफ्टेनंट गव्हर्नराच्या हुकुमावरून प्रेस्टन व त्याचे शिपाई यांस कैद करून त्यांची चवकशी केली. त्यामध्यें अमेरिकन लोकांनीं इतका निःपक्षपात दाखविला कीं, जॉन ॲडाम्ससारख्या निःसीम स्वदेशभक्तानें त्यांची वकिली पत्करिली. या खटल्यांत कर्नल प्रेस्टन व त्याचे सहा

शिपाई हे निर्दोष ठरून दोघां शिपायांवर काय ती मनुष्यवधाची शाबिती झाली; पण इकडे जे रहिवासी मारले गेले होते त्यांस सार्वजनिक रीतीनें पुरिलें, आणि या दंग्यास बोस्टनची कतल ह्मणून नांव दिलें.

समुद्रावर जकातीच्या कायद्याची अंमलबजावणी करण्याकरितां ग्यॅस्पी नांवाच्या एका लढाऊ गलबताची योजना केलेली होती. त्याचा कमांडर डड्लिंग्टन ह्यास हें काम करतांना अमेरिकन लोकांस देववेल तितका त्रास देण्याची हौस वाटे. एक दिवस असें झालें कीं, प्राव्हिडेन्स बंदरांतील फेरी बोट चालली असतां तिनें निशाण खालीं केलें नाहीं; ह्मणून हें जहाज त्याच्यामागें लागलें आणि वाळूंत रुतलें. ही बातमी त्या बंदरांत पसरल्याबरोबर रात्रीं कांहीं लोक त्याच्यावर चढले; आणि त्याचा कमांडर व इतर नावाडी यांस धरून किनाऱ्यावर आणून ग्यॅस्पीस आग लावून दिली. या लोकांना पकडण्यासाठीं सरकारानें मोठें बक्षीस लाविलें; पण कोणीही सांपडला नाहीं.

ह्या कृतींनीं अर्थात् राजा व प्रधान जास्तच चिडले; त्यांत नार्थ व हिल्सबरो विशेष. पहिला तर राजाच्याच डोक्यानें विचार करी; राजा ह्मणेल तें यास मान्य. हिल्सबरोचा तर अद्यापि असा निश्चय कायमच होता कीं, अमेरिकन लोक गळ्यांत फांस अडकवून आपल्यासमोर येतील तेव्हां त्यांचें ऐकावयाचें. राजाची तर खात्री होती कीं, इंग्लंदानें सिंहाच्या सोंगाची बतावणी केली, कीं वसाहतकारांचीं कोकरें बनलींच. असें हें प्रकरण अगदीं बेतावर आलें असतां अशी एक गोष्ट घडली कीं, तिनें तें जास्तच चेतावलें.

१७६७ सालीं हचिंसन हा मॅसॅचुसेटचा गव्हर्नर आणि आलिव्हर हा लेफ्टेनेंट गव्हर्नर असतां त्यांनीं जार्ज ग्रेनाव्हिलचा प्रायव्हेट सेक्रेटरी व्हेटली यास कांहीं गुप्त पत्रें लिहिलीं होतीं. त्यांत त्यांनीं वसाहतकारांची पुष्कळ नालस्ती केलेली असून त्यांचे हक्क काढून घेतल्याशिवाय ते वठणीवर यावयाचे नाहींत असें आपलें मत ठोकून दिलें होतें. राजा व प्रधान

हे वसाहतकारांविषयीं आपलीं मतें असल्या पत्रांवरूनच बनवीत असत. हीं पत्रें प्रसिद्धीस येतील असें या दोघांच्या स्वप्नींही नसावें; पण राजकीय बाबतींत नेहमीं किंवा बहुधा, जें ध्यानीं मनीं नसतें तेंच घडत असतें. तसें येथेंही झालें. व्हेटली १७७२ च्या जून महिन्यांत मेला, आणि तीं पत्रें कोणीं चोरिलीं; कोणीं तें माहीत नाहीं. कशीं तरी तीं फ्रांक्लिनच्या हातीं पडलीं. त्यास तीं वसाहतकारांस दाखविण्याची कांहीं अटीवर परवानगी मिळाली. तीं पाहून सर्व बोस्टन रागानें लाल झालें, आणि या दोघांस दूर करण्याविषयीं मॅसॅचुसेटच्या कायदेसभेनें राजास अर्ज केला. हचिंसनला तीं पत्रें आपलींच असतील अशी खात्री होईना. तेव्हां तीं त्यास मोठ्या बंदोबस्तानें दाखविलीं. तेव्हां त्यानें तीं आपलीं म्हणून कबूल केलीं, आणि छापण्याची परवानगी दिली. मग काय विचारतां? तीं लागलींच सर्व अमेरिकाभर पसरलीं, व त्यांनीं सर्वत्र गवगवा करून टाकिला.

हीं पत्रें फ्रांक्लिनला व्हेटलीच्या भावानें दिलीं असतील म्हणून त्याजवर आरोप आला. तेव्हां त्यानें तीं आपणास दिलीं नाहींत असें फ्रांक्लिनानें स्पष्ट सांगितलें, पण तीं कोणी दिलीं हें तो सांगेना. तेव्हां त्याच्यावरच इंग्लंदच्या लोकांचा राग झाला. सालिसिटर जनरल वेडर्बेन ह्यानें त्यास कामन्स सभेंत त्याबद्दल यथेष्ट शिव्या दिल्या. त्या ऐकून बहुतेक सभासद खदखदां हंसूं लागले. दोघेजण मात्र हंसले नाहींत. एक लार्ड नार्थ, व दुसरा स्वतः फ्रांक्लिन. हा त्यावेळीं मॅसॅचुसेटसचा वरील अर्ज घेऊन सभेंपुढें आला होता. तो जरी मनांत अर्थात् जळत होता तरी त्यानें आपल्या चेहऱ्यावर त्याचें कांहीं एका चिन्ह दर्शविलें नाहीं.

हा वेडर्बेन कोण होता म्हणाल तर तो स्कॉचमन असून ब्यूटचा जातभाई होता. प्रथम त्यास बोलावयास मुळींच येत नसे आणि त्याचा स्कॉच स्वर निघे. पुढें त्यानें डिमास्थेनिसप्रमाणें मोठी, मेहनत करून त्या दोन्ही गोष्टींत सुधारणा करून घेतली आणि तो मोठा वक्ता

बनला. त्या कामीं त्यास वक्ता टामस शेरिडन आणि नाटकी माक्लीन यांनीं चांगली मदत केली. तो मोठ्या पंडितांचा स्नेह संपादन करण्याची फार खटपट करी, पण जॉनसन वगैरे त्यास दाद देत नसत. तो जो प्रसिद्धीस आला, तो या फ्रांक्लिनवरील रानटी हल्ल्यावरूनच आला. पुढें पुष्कळ वर्षांनीं तो जेव्हां लार्ड लोबरो बनून चीफ जस्टिस झाला, तेव्हां एका विनोदी एडिटरानें " मोठ्या साम्राज्याचें लहान करण्याचे नियम " ह्या फ्रांक्लिनच्या पुस्तकाची नवीन आवृत्ति काढून त्यास अर्पण केली; तें त्यानें वावगें केलें नाहीं.

इंग्लिश सरकारानें आतां निश्चय केला कीं, ह्या बंडखोर वसाहत-कारांशीं जास्त तडजोड करण्याच्या भानगडींत इतःपर पडावयाचें नाहीं. इतर जिनसांवरील जकात काढिली तेव्हां चहावरील राहिलीच होती. ती कायम ठेवून तिचा वसूल करण्याचा प्रधानांनीं निश्चय केला. ईस्ट इंडिया कंपनीपाशीं पुष्कळ चहा विकावयाचा पडलेला होता. तो वसाहतकारांस स्वस्त दरानें विकतां यावा ह्मणून त्या कंपनीनें तो इंग्रजी व्यापाऱ्यांच्या द्वारा न पाठवितां स्वतःच अमेरिकेस पाठविण्याची परवानगी मागितली. ती सरकारानें मोठ्या खुषीनें दिली; कारण त्यांस वाटलें कीं, स्वस्त्या चहावर अमेरिकन लोक थोडासा कर द्यावयास कांकूं करणार नाहींत; पण ही त्यांची अगदीं चूक होती. कारण, अमेरिकन लोकांनीं आणि विशेषतः मॅसॅचुसेट्सवाल्यांनीं असा निश्चय केला होता कीं, तो चहा जमिनीवर उतरूंच द्यावयाचा नाहीं. बोस्टननेंच या कामांतहि पुढाकार घेतला. सन १७७३ च्या दिजंबरांत चहाचीं तीन जहाजें तेथल्या बंदरांत येऊन दाखल झालीं. जहाजांच्या कप्तानांस बोस्टनच्या लोकांचा जेव्हां निश्चय कळला, तेव्हां ते इंग्लंदास चहा घेऊन परत जाण्यास तयार झाले; पण तेथील जकातखात्याचे अधिकारी किंवा गव्हरनर त्यांस तसें करण्याची परवानगी देईनात; आणि ज्या व्यापाऱ्यांच्या नांवावर तो पाठविला होता तेहि त्या गोष्टीस कबूल होईनात. तेव्हां बोस्टनच्या रहिवाशांनीं नवीन युक्ति काढिली. त्यांपैकीं

कित्येकांनीं तेथील इंडियन लोकांप्रमाणें आपलीं शरीरें चित्रविचित्र रीतीनें रगवून संध्याकाळच्या काळोखांत ते त्या गलबतांवर चढले. हे दिखाऊ इंदियन लोक मोठे श्रीमान्, अब्रूदार, आणि कुलवान् असे होते, व बोस्टनमध्यें ते सुप्रसिद्ध होते, त्यांनीं सुमारें दोन तासांच्या आंत तिन्हीं जहाजांवरील चहा काढून समुद्रांत लोटून दिला. ते पुष्कळ असल्यामुळें जहाजावरील खलाशांना त्यांस मुळींच प्रतिबंध करवला नाहीं. हें काम त्यांनीं इतक्या चलाखीनें केलें कीं, तें पुरें होईतोंपर्यंत त्याचा कोणास मागमूसहि लागला नाहीं. ह्या सोंगाड्यांपैकीं एकजण तरी १८४६ च्या मार्चपर्यंत जीवंत होता असें समजतें. हल्लीं जीवंत असलेल्या इंग्रजांनीं हेन्री पर्किंट आणि डेव्हिड किनिसन ह्यांच्यांशीं शिखंडी केलेली असेल, आणि ज्या कृत्यानें जार्ज यास चीड आली, व चॅथॅम यास राग आला आणि ज्याबद्दल वाशिंग्टननें आपली नाखुशी दाखविली, पण बर्कनें दाखविली नाहीं, त्या कृत्याची हकीकत त्यांच्याच तोंडून ऐकिली असेल. या कृत्यास बोस्टनची चहापार्टी ह्मणून नांव पडलेलें आहे.

या टीपार्टीची हकीकत लंदनमध्यें ता. १९ जानेवारी १७७४ रोजीं येऊन दाखल झाली आणि तारीख २१ रोजीं ती प्रसिद्ध झाली. दुसरीकडूनहि फारशा जास्त उमेदीच्या हकीकती आल्या नाहींत. चार्लस्टन शहरीं चहा उतरून घेतला खरा, बोस्टनप्रमाणें समुद्रास्तृप्यन्तु झाला नाहीं; तरी तो वखारींतूनच कुजत राहिला, कारण त्यांपैकीं एक औंसही कोणी विकत घेईना. फिलाडेल्फिया येथील रहिवाशांनीं ता० २७ दिजंबर १७७३ रोजीं चहानें जहाज दाखल झाल्याबरोबर दहा वाजतां जाहिरनामा काढून एकत्र जमून त्या गलबतास इंग्लंदचा मार्ग तें सुधारावयास लाविलें. न्युयार्क येथील लोकांनींहि चहा बंदरावर उतरण्यास मना केली, आणि एका लढाऊ जाहाजाच्या मदतीनें जो तेथें थोडा उतरला गेला तो चार्लस्टनप्रमाणेंच कुजत राहिला. हीं वर्तमानें ऐकून ज्या इंग्रजांचा तो अपराध होता ते, आणि ज्यांस पूर्व इतिहास

मुळींच माहीत नव्हता ते, दोघेहि वेड्यासारखे चिडले; पिटसारख्या ज्या लोकांचा वसाहतकारांना न्यायानें वागविण्याचा आणि इंग्लंदचें श्रेष्ठत्व कायम राखण्याचा, दोन्ही प्रकारचा सारखाच निश्चय होता, त्यांस मोठा राग आला; इंग्रज आणि वसाहतकार यांच्या सामोपचारानें तंटा मिटेल अशी ज्यांस आशा होती ते निराश झाले; आणि अन्यायाविरुद्ध प्रदर्शन करणें ह्मणजे उत्तम, मग तें कितीही जोराचें असो, अथवा कितीही नियमबाह्य असो, असें ज्यांचें मत होतें त्यांनीं टाळ्या पिटल्या.

ईस्ट इंडिया कंपनीचें येणेप्रमाणें नुकसान झाल्यामुळें ती अर्थात् सूड उगवावयास मागूं लागली, आणि राजानें तिचें ह्मणणें कबूल करण्याचा निश्चय केला. त्याच्या चिथावणीवरून लार्ड नार्थनें इ० सन १७७४ च्या प्रारंभीं बोस्टनच्या बंदराचा व्यापार अगदीं बंद करण्यासाठीं आपलें प्रसिद्ध बिल पुढें आणिलें. त्या बिलानें असें ठरलें कीं, त्या वर्षाच्या जूनच्या १ ले तारखेपासून त्या बंदरांत कोणीही माल चढवूं नये किंवा उतरूं नये. तसें केल्यास माल आणि जहाज दोनही जप्त केलीं जातील. नंतर मग त्या वसाहतीच्या कायद्यांत मोठाले फेरफार केले. मॅसॅचुसेटसची सनद बदलून टाकिली. तेथील कौन्सिलाच्या सभासदांची निवड जी आजपर्यंत लोक करीत असत, ती यापुढें गादीनें करण्याचें ठरविलें, आणि तेथील न्यायाधीशही राजानेंच नेमावेसें ठरविलें. आणखी एक असा कायदा पास केला कीं, वरील दंग्यांत सामील असलेल्या लोकांस चवकशीकरितां इंग्लंदास आणावें. तात्पर्य, बोस्टन शहर आणि मॅसॅचुसेट्स प्रांत यांना कडक शिक्षा करून त्यांस शुद्धीवर आणण्याचा सरकारचा बेत होता. राजा व प्रधान यांचा असा अंदाज होता कीं, बोस्टनचा व्यापार बंद झालेला पाहून मॅसॅचुसेट्समधील इतर बंदरें तो व्यापार आपल्या ताब्यांत मिळेल ह्मणून फुशारतील, आणि मॅसॅचुसेट्सला शिक्षा झालेली पाहून इतर वसाहती घाबरून जातील. पण हे सर्व अंदाज अगदीं चुकले. इतर बंदरांनीं बोस्टनचा व्यापार बळकाविला नाहीं, आणि बाकीच्या वसाहती

एकत्र व्हावयाच्या राहिल्या नाहींत. उलट ते जास्तच उत्साहानें एकोपा करूं लागले. वसाहतींस भेदरवण्यासाठीं बोस्टन बंदरासंबंधाच्या बिलाच्या प्रती सर्व वसाहतींतून सरकारानें प्रसिद्ध केल्या. याचा परिणाम अगदीं उलट झाला. जिकडे तिकडे मोठाल्या सभा भरल्या, आणि त्यांत बिलाचा निषेध करून त्यास विरोध करण्याबद्दल जोराचे ठराव पास केले. त्याची अम्मलबजावणी करण्याकरितां जेव्हां जनरल गेज तेथें आला, तेव्हां त्यास केवळ मॅसॅचुसेट्समध्येंच नव्हे तर सर्व वसाहतींतून मोठा गवगवा झालेला दृष्टीस पडला. जनरल गेज हा मोठा शूर माणूस होता, मोठा हुशार माणूस होता, आणि मोठा सभ्य माणूस होता. पण आलेकझांडरच्या सोंगाची बतावणी करण्याचें काम जरा त्यास जडच होतें. त्याला ज्या अडचणींना टक्कर द्यावयाची होती त्या त्याच्या शक्तीच्या बाहेरच्या होत्या. त्याला जें काम करावयास पाठविलें होतें तें त्याला फाजील होतें; तें त्यालाचसें काय, पण कोणालाहि फाजील भासलें असतें. शुद्धीवर आलेल्या आणि नरम झालेल्या प्रांतावर अंमल करण्यास त्यास पाठविलें होतें; पण तो येऊन पाहतो तों त्यास अन्यायानें उन्नत झालेले आणि हल्ल्यानें स्फुरण पावलेले अशा बेपर्वा लोकांशींच प्रसंग येऊन पडला.

अशी ही बोस्टन बंदराच्या बिलासंबंधानें गडबड चालली असतां, एक अत्यंत मधुर व अत्यंत मार्दवयुक्त अशी इंग्रजी भाषा लिहिणारा, ज्या जगाच्या सुखांत भर घालण्यास त्यानें इतकें केलें होतें, पण ज्या जगांत त्यास स्वतः फारसें सुख झालेलें नव्हतें, त्यांतून मुकाट्यानें निघून गेला. आलिव्हर गोल्डस्मिथ ज्या वर्षी मेला, त्या वर्षाच्या शेवटाबरोबर जसा जगाच्या इतिहासांतील एक शक शेवटास गेला, तसाच त्याच्याबरोबर इंग्रजी वाङ्मयांतीलही एक शक संपला. अठराव्या शतकांतील जें विशिष्ट वाङ्मय, ज्यास स्विफ्ट, ॲडिसन, स्टील आणि पोप यांजबरोबर सुरवात झाली, आणि ज्यामध्यें स्टर्न, रिचर्डसन्, सॉलेट आणि फील्डिंग इत्यादि तारे चमकले, त्याचा गोल्डस्मिथबरोबर

शेवट झाला. या वेळापासून जगाला जी नवी स्थिति येऊं लागली, त्याबरोबर एक नवेंच वाङ्मय उत्पन्न होऊं लागलें. यावेळीं वर्डस्वर्थ आणि कोलरिज यांस नुक्तें चवथें वर्ष लागलेलें होतें आणि गोल्डस्मिथच्या अमर गोष्टीचा (व्हिकार आफ् वेकफील्डचा) ज्याच्यावर इतका परिणाम झाला होता, व जो पुढें मोठा नामांकित होणार होता असा जो जर्मन कवि गटे त्याचें पहिलें काव्य गोल्डस्मिथ मेला त्याच वर्षी प्रसिद्ध झालें होतें.

गोल्डस्मिथचा जन्म आयर्लंदांत लांगफर्डच्या कौंटींत पॉलास येथें इ० सन १७२८च्या नवंबरमध्यें झाला होता. तो पंचेचाळीस वर्षांवर जगला; पण त्याचें आयुष्य गरिबींत, भटकण्यांत, घाणींत, मूर्खपणाच्या चैनींत, विलक्षण अभिमानांत, अविचाराइतक्याच विलक्षण उद्योगांत, अविश्रांत उद्योगानें जिंकून टाकलेल्या स्वाभाविक आलस्यांत आणि त्याच्या विस्मयजनक विलक्षण बुद्धीलाच केवळ हार जाणाऱ्या अशा विलक्षण तऱ्हेच्या साधेपणांत गेलें. गोल्डस्मिथच्या विचित्र स्वभावघटनेंत पुष्कळ परस्पर विरुद्ध आणि दिसण्यांत परस्परांशीं अननुरूप अशीं अंगें होतीं, पण त्याचीं व्यंगें, त्याजवर लोकांनीं प्रेम करूं नये अशा प्रकारचीं नव्हतीं, आणि त्याचे कांहींही दोष असोत त्यांच्यायोगानें त्याच्या ग्रंथांना मुळींच कालिमा आलेला नव्हता. त्याच्या लेखांतून एक प्रकारचा शुद्ध आणि गोड असा विनोद भरलेला आहे, आणि ज्या झऱ्याच्या कांठावर कोणींहि जनावरानें पाय दिलेले नाहींत, अशा झऱ्याच्या पाण्याप्रमाणें स्वच्छ आहे. त्याचें स्वतःचें आयुष्य गरिबींत आणि मोहांत आणि संकटांत गेलें असल्यामुळें त्याच्या लेखांतून गरीबांचे मोह आणि त्यांचीं संकटें ह्यांच्याशीं योग्य सहानुभूति दाखविलेली आढळते; आणि शिवाय तो जरी साधु नव्हता,—कारण त्याला दारूचा ग्लास आवडत असे, आणि तो उधळ्या असे,—तरी तो हलकट लोकांनीं भरलेल्या लंदनांत रहात असून हलकट व्यसनांपासून अगदीं अलिप्त असे, आणि त्याची भूतदया कांहीं विलक्षण असे.

त्याचा स्वतःचा स्वभाव चांगला असल्यामुळें त्याच्या धोरणावर त्यानें जे स्नेही जोडले होते तेहि अत्यंत शहाणे आणि अत्यन्त मोठे असेच होते. त्याचे निकट स्नेही ह्मटले ह्मणजे एडमंड बर्क, डा० जानसन आणि सर जोशुआ रेनोल्डस् ( प्रसिद्ध चितारी ) हे होत. त्याचे स्त्रीमित्रहि असत, व तेहि पुरुषमित्रांप्रमाणेंच निवडक असत. त्या त्याजवर माया करीत आणि त्याची वाखाणणी करीत, तशी माया व वाखाणणी करण्याची त्यांच्या अंगीं पात्रता असे, आणि त्यांच्या त्या स्नेहानें त्याचें तें दुःखमय आणि संकटमय आयुष्य त्यास सह्य आणि सुखकर असें होत असे. मेरी हार्नेक आणि तिची बहीण ह्या त्याच्या आयुष्यांतील चांदण्या होत्या, त्याच्या नायिका होत्या, त्याच्या देवता होत्या, आणि अत्युत्तम स्त्रीत्वाच्या त्या प्रतिमा होत्या. मेरी हार्नेक हिला त्यानें आपल्या ग्रंथांत " जेसमी ब्राइड " ह्या नांवानें अमर करून ठेविलें आहे. गरिबीच्या दिवसांत तो तिजविषयींचे विचार मनांत आणून त्यांवर आनंदांत राहत असे. तो जीवंत होता तोंपर्यंत तो तिला देवतेप्रमाणेंच भजत असे, आणि जेव्हां तो मेला तेव्हां त्याच्या केसांचें एक झुलूप काढून तें तिला दिलें. तिच्याबद्दल कादंबरीकार थ्यॅकारे एक हृदयद्रावक गोष्ट सांगतो. तिला देव मानणारा हा विलक्षण बुद्धिमान् माणूस निवर्तल्यावर ती पुष्कळ वर्षें जगली. तिनें एकोणिसाव्या शतकाचा बराच भाग पाहिला, आणि प्रसिद्ध टीकाकार हाझलिट यानेंदेखील तीस पाहिली होती. त्यावेळीं ती जरी अत्यंत वृद्ध होती तरी देखणी दिसत होती, आणि गोल्डस्मिथ आपल्या सौंदर्याची वाखाणणी करीत असे ह्याबद्दल आपणास मोठा अभिमान वाटतो असें तिनें त्यास मोठ्या अभिमानानें सांगितलें. ह्या ठिकाणीं हें सांगणें इष्ट दिसतें कीं गोल्डस्मिथ स्वतः फार कुरूप असून त्याचें लग्न झालेलें नव्हतें. गोल्डस्मिथ हा नेहमीं मंडळीचा भुकेलेला असे, आणि हलकट किंवा नीच माणूस नसला ह्मणजे पुरे, त्याच्या संगतीनें राहणें त्यास आवडे. त्यावेळचे मोठाले तत्त्वज्ञ, उपदेष्टे, आणि चतुरस्र लोक यांच्या संगतींत राहणें त्यास फार आवडे. बार्टन येथें मेरी आणि तिची

बहीण ह्यांच्या सहवासांत तर त्यास स्वर्गसुखच वाटे. पण त्याला अगदीं गरीब आणि अगदीं साध्या अशा माणसांच्या संगतींतही सुख होत नसे असें नाहीं. आपल्या एक अत्यंत आनंददायक निबंधांत तो असें ह्मणतो कीं, ' मी कर्मणुकीचा मोठा भोक्ता आहें; मग ती मला कोणत्याहि मंडळींत सांपडो; आणि 'चिंध्या नेसलेली रसिकता' असली तरी ती नेहमीं मला आनंद देते. ' तेव्हांच्या त्या लंदनांत चिंध्या ल्यालेली रसिकता विपुल असे. विलक्षण बुद्धीचें माणूस त्यावेळीं दुकानांच्या दरवाजांच्या कमानीखालून आणि दारूच्या पिठ्यांतून, आणि उघड्या मैदानांतून खिशांत पैसे नसल्यामुळें उपासमर काढीत पडलेले आणि भटकणारे दृष्टीस पडत. पण असलीं बुद्धिमान् माणसें गोल्डस्मिथ हुडकून काढी, त्यांचें सूक्ष्म अवलोकन करी, त्यांच्याशीं मजा मारी, आणि त्यांचीं हुबेहूब वर्णनें आपल्या ग्रंथांतून अशीं गोंवून टाकी कीं, तो निजधामास गेल्यावर एका शतकानंतरहि आह्मांस त्यांच्याशीं मनसोक्त आणि मनांतल्या मनांत मजा मारतां यावी. त्याच्या ग्रंथांतून ज्या विलक्षण भिकाऱ्यांचीं वर्णनें आढळतात, ते त्यास खुद्द दृष्टीस पडले असतील असें वाटत नाहीं. केबोनें जशी अमेरिका शोधून काढिली तसें त्यांस त्यानें हुडकून काढिलेलें नाहीं; तर त्याचा अनुभव आणि त्याची कल्पनाशक्ति ह्यांचीं तीं संयुक्त अपत्यें असत.

त्याचे ग्रंथ प्रसिद्धच आहेत; आणि त्या ग्रंथांचें योग्य चीज तो जीवंत असतां व्हावें तसें झालें नाहीं हें जरी खरें आहे, तरी त्याच्या पश्चात्च्या पिढ्यांनीं त्याच्या समकालीनांची ती चूक पूर्णपणें भरून काढिली आहे. ' शी स्टूप्स् टु कॉंकर ' ( She Stoops to Conquer. ) हें त्याचें हास्यकारक नाटक अद्यापि अत्यंत लोकप्रिय आहे. आणि ' धि गुडनेचर्ड मॅन ' ( The good natured man. ) हें नाटक जरी हल्लीं रंगभूमीवर फारसें येत नाहीं, तरी तें ज्यास विद्यार्थिदशेंत आवडलें नाहीं, असा सुशिक्षित माणूस विरळा. त्याच्या ' सिटिझन ऑफ् धि वर्ल्ड ' ( The Citizen of the World ) ह्या पत्रांतील

इंग्लंदच्या लोकांचें खुबीदार दोषाविष्करण कोणास माहीत नाहीं? गोड ऑबर्न खेड्यापेक्षां कोणतें खेडें इंग्रजी वाङ्मयांत जास्त प्रसिद्ध आहे? आणि 'व्हिकार ऑफ् वेकफील्ड' (वांईकर भटजी) बद्दल ह्मणाल तर त्याची आतां कोणती स्तुति व्हावयाची राहिली आहे? त्यानें सर्व जगास मोहून टाकिलें आहे; तें प्रत्येक राष्ट्रास प्रिय असून सर्व भाषांतून प्रसिद्ध झालेलें आहे, आणि अमर असे जे जगांतील ग्रंथ त्यांच्या पदवीस तें जाऊन बसलेलें आहे.

वाचक ह्मणतील इंग्लंदच्या राजकीय इतिहासाचें कथन करीत असतां इंग्रजी वाग्देवीच्या साम्राज्यांतील मध्यें एकादाच मणि घेऊन त्याचें चित्र आह्मीं रेखाटतों, हें काय गौडबंगाल आहे? वास्तविक स्थिति अशी आहे कीं, इंग्लंदच्या वाङ्मयाचा इतिहास त्याच्या राजकीय इतिहासाइतकाच, किंबहुना जास्त चटकदार आहे. पण तो सर्व येथें देत बसणें शक्य नाहीं व जरूरहि नाहीं; तथापि निव्वळ मराठी वाचकांस किंवा तात्पुरतेंच इंग्रजी जाणणारांस त्याचा थोडाबहुत आस्वाद मिळावा ह्मणून त्यांतले कांहीं चुटके उगीच जातां जातां सांगतों. एकादा जानसन, एकादा स्विफ्ट, एकादा गोल्डस्मिथ, एकादा शेरिडन, यांची वाचकांस अल्पस्वल्प माहिती प्रसंगानुरूप सांगितल्याशिवाय राहवत नाहीं; आणि त्याच्यायोगानें जरी थोडेसें विषयान्तर झालें, तरी कदाचित् विषयवैचित्र्यहि येऊन जास्त चटकदारपणाहि येण्याचा संभव आहे. असो. आतां हें गोल्डस्मिथाख्यान पुरें करून पुनः मुख्य गोष्टीकडे वळूं.

---

# प्रकरण अठरावें.

## अमेरिकेचें स्वातंत्र्य.

इंग्लिश प्रधान आणि इंग्लिश राजा यांना आतां अशी खात्री वाटत होती कीं, दंगेखोर परंतु भ्याड अशा ह्या अमेरिकन लोकांची बंडाची प्रवृत्ति नष्ट करण्यास उपाय योजावयाचे ते सर्व आपण योजले आहेत. यावेळीं बोस्टनचा व्यापार बंद करून टाकिला होता; त्या शहरांत इंग्लिश फौज नेऊन ठेविली होती; आणि चार्लस नदीवर इंग्लिश आरमार नेऊन ठेविलें होतें. तेव्हां तेथील भित्रे शेतकरी आणि त्यांचे पुढारी बोलके वकील, आतां नरम येतील, आणि एवढ्यावरच निभावली ह्मणून उपकार मानीत राहतील, ह्याबद्दल कोणी शंका घ्यावी? आतां ज्यांना याबद्दल शंका वाटत होती त्यांमध्यें इंग्लंदांतील अत्यन्त उत्तम आणि अत्यन्त शहाणे लोक ह्यांची गणना होत होती हें खरें आहे, पण त्यांच्या ह्मणण्याकडे कोण लक्ष्य देतो? तथापि त्यांचेंच ह्मणणें अखेरीस खरें ठरलें, आणि प्रधानाचें खोटें ठरलें. वकील लोक केवळ बोलके नव्हत तर कर्तेही आहेत, असें दृष्टोत्पत्तीस आलें. ज्या शेतकरी लोकांचा प्रधान इतका तिरस्कार करीत होते, त्यांनीं असें सिद्ध करून दाखविलें कीं, जे लोक पूर्वीं इंदियन लोक आणि रानटी जनावरें यांच्याशीं लढले त्यांचे वंशज इतक्यांतच भेकड झालेले नाहींत. अमेरिकेंतून लवकरच अशी बातमी येऊन थडकूं लागली कीं, तिजपुढें बोस्टनची कत्तल आणि बोस्टनची चहापार्टी, आणि ग्यॅस्पीचें दहन हीं कांहींच नाहींत. चकित झालेल्या प्रधानमंडळाच्या कर्णपथावर असें वर्तमान आलें कीं, निरनिराळ्या वसाहातींतील प्रतिनिधींचें शास्त्रोक्त कॉंग्रेस बोलाविलेलें असून तें फिलाडेल्फिया येथें भरलें आहे, आणि डेक्लरेशन आफ् राइट्स् ( हक्कांचें विधान ) नांवाचा त्यांच्या हक्कांचा मसुदा त्यांनीं तयार केला आहे. चॅथमला त्यांचें तें कृत्य फार

पसंत पडलें, आणि त्याबद्दल त्यानें त्यांची फार वाहवा केली. पण राजा आणि त्याचे प्रधान ह्यांना तेंच कृत्य अपमानकारक वाटलें किंवा निरर्थक वाटलें. तथापि वसाहतकारांनीं लवकरच असें सिद्ध करून दाखविलें कीं, कॉंग्रेसें भरून महत्वाचे राजकीय खलितें तयार करण्या-पलीकडच्याहि गोष्टी करण्याचें सामर्थ्य आपल्या अंगीं आहे. कारण नंतर ते लढाईवरच आले. असंतुष्ट झालेल्या वसाहातकारांनीं कॉंकॉर्ड येथें गोळा केलेल्या दारूगोळ्यावर आणि शस्त्रांवर हल्ला करण्याचा गेजनें बेत केला. ह्या त्याच्या बेताची बातमी पॉल रिव्हिअर नामक एका थडग्याचे दगड तयार करणारानें सभोलताच्या खेड्यांतून घोड्यावर बसून रात्रीच्या रात्रीं कळविली. कॉंकॉर्डच्या रस्त्यावर लेक्सिंग्टन ह्मणून एक खेडें आहे त्याठिकाणीं राजाचें सैन्य आणि कांहीं बंदूकवाले वसाहतकार यांमध्यें छोटीशी लढाई झाली, त्यांत वसाहतकारांचे बरेच लोक मारले गेले किंवा जखमी झाले, व बाकीच्यांची दाणादाण झाली. अशा रीतीनें ज्या युद्धास ब्रिटिश सैन्याच्या जयानें सुरवात झाली त्याची अखेर त्या सैन्याला अत्यन्त घातक अशा रीतीनेंच होऊन गेली. कॉंकॉर्ड येथील लोक अगोदरच सावध झालेले असल्यामुळें ज्या इंग्रज शिपायांनीं त्यांजवर हल्ला केला त्यांचे हातीं त्यांनीं एकहि शस्त्र लागूं दिलें नाहीं; आणि सभोंवताच्या खेड्यांनीं तेथील लोकांस मदत करण्यासाठीं सशस्त्र असे शेतकरी आणि बंदूकवाले यांस पाठवून दिलें. तेव्हां कॉंकॉर्डच्या पुलावर लहानशी झणझणीत चकमक उडाली. त्यांत राजाच्या सैन्याचा पराजय होऊन दोन्ही बाजूंचीं शूर माणसें मारलीं गेलीं. तेव्हां ब्रिटिश अमलदारानें कॉंकॉर्डमधून निसटण्याचा निश्चय केला. ती पिछेहाट इतिहासांतील अत्यन्त प्रसिद्ध पिछेहाटींपैकीं एक बनून राहिली आहे. प्रत्येक झाडामागून धोंडीमागून, भिंतीमागून आणि कुंपणामागून रानांतील युद्धांत तरबेज तालेल्या शत्रूंनीं त्या पळपुट्या सैन्यावर गोळ्यांचा वर्षाव सुरू केला. ह्या संस्मरणीय पळापळींत असलेल्या एका अंमलदारास असा भास झाला कीं, जणूकाय आकाशांतूनच गोळ्यांची आपल्यावर वृष्टि होत आहे, आणि ते शत्रू अदृश्य असून त्यांच्या बंदुकांचा अचूक नेम, आणि त्यांनीं कमून

केलेला अदृश्य पाठलाग, ह्यायोगानेंच ते ज्ञात होत आहेत. तहत कॉंकॉर्डपासून ब्रिटिश सैन्य शत्रूशीं सारखें लढत मागें चाललें होतें; पण त्याचा कांहीं एक उपयोग झाला नाहीं. कारण तो शत्रू तर दिसत नसे; पण त्याच्या आवाजाच्या प्रत्येक सरीबरोबर ह्यांचीं धेंडेंच्या धेंडें खालीं कोसळून पडत. ह्या परतणीस पळापळीचें स्वरूप येण्याचा रंग आला होता; इतक्यांत कॉंकॉर्ड एथून लार्ड पर्सी कांहीं सैन्य घेऊन मदतीस आला ह्मणून ती निभावली. पण तेणेंकरून पिछेहाट बंद झाली नाहीं, किंवा पराभूतिहि टळली नाहीं. जो लार्ड पर्सी अमेरिकन लोकांची टर उडविण्यासाठीं येतांना 'यांकी डुडल' हें विनोदास्पद गाणें गात आला होता, तोच जातांना जीवंत राहिलेले लोक बरोबर घेऊन मुकाट्यानें परत गेला. तो बोस्टन येथील सैन्याच्या तोफा आणि आरमारावरच्या तोफा यांच्या आश्रयाला अगदीं वेळेवर जाऊन पोहोंचला. कारण बंडवाल्यांची एक मोठी टोळी आपल्या जातभाईंना मदत करण्यासाठीं अगदीं जवळ येऊन ठेपली होती. ती जर अमळ आधीं येऊन बंडवाल्यांस मिळाली असती, तर पर्सी आणि त्याचे शिपाई खास कैद झाले असते. तरी पण झालें तेवढ्यानें ह्या कच्च्या वसाहतकार लढवय्यांना जय मिळाला होता, आणि जय मिळाल्यानें जो भरंवसा उत्पन्न होतो तो त्यांना प्राप्त झालेला होता. आणि ज्या शिपायांना असें वाटत होतें कीं, आपले लाल डगले पाहिल्याबरोबर आपले अशिक्षित विरोधी नरमून जातील, त्या शिपायांचा पुरा पराजय झाला होता.

ह्या अरिष्टाच्या धक्क्यांतून गेज सावध होतो न होतो तोंच त्यास असें समजलें कीं, बोस्टनला बंडवाल्यांनीं वेढा घातला आहे. कॉंकॉर्ड येथील लढाईतील आणि पळापळींतील विजेत्यांना जिकडून तिकडून कुमक आली. अशा रीतीनें ज्यांचीं शस्त्रें ओबडधोबड आहेत, पण ज्यांचे निश्चय बळकट आहेत, अशा लढवय्यांची त्यांच्या रांगांना तासातासाला भर पडूं लागली. तेव्हां गेजच्या कर्णपथावर उद्वेगजनक गोष्टी दाट आणि जलद येऊं लागल्या. अदलेच दिवशीं त्यानें अशी

कल्पना बांधली होती कीं, आपल्या हाताखालील सैन्याची संख्याच वसाहतकारांस घाबरवून टाकण्यास, आणि त्यांची दांडगाई कायमची मोडून टाकण्यास पुरे आहे; पण आज त्याला लज्जेनें आणि रागानें कंपविणारा पराजय खावा लागला. असें असतांहि गेजनें कांहीं एक केलें नाहीं, आणि शत्रू तर जास्त जास्त जमतच होते. बर्गाइन, क्लिंटन आणि हावे हेहि कुमक घेऊन आले, पण त्यांच्याहि हातून कांहीं एक करवलें नाहीं. इकडे त्यांनीं तिरस्कृत असे अमेरिकन शेतकरी रिकामे बसले नव्हते, इतकेंच नव्हे, तर ते इंग्लिशांसही रिकामे बसूं देईनात. इंग्लिश सेनापति एके सकाळीं उठून पाहतो तों बोस्टन ज्याच्या माऱ्यांत आहे असा एक उंचवटा शत्रूंनीं अंधाराचा फायदा घेऊन व्यापिला आहे, आणि त्याजवर ओबडधोबड बंदोबस्तहि केला आहे. सारांश जे नागरिक शिपाई आपल्या स्वातंत्र्याचें संरक्षण करण्यास गोळा झाले होते त्यांनीं इंग्लिश सेनापतीवर ताण केली. ह्या उंचवट्याचें नांव ब्रीडसहिल असून तो बंकर्सहिलच्या खालच्या बाजूस आहे; आणि चार्लस नदीच्या ज्या बाजूस चार्लस्टन शहर आहे त्याच बाजूस तो होता. गेजनें निश्चय केला कीं, त्यांना ही टेकडी फार वेळ पचूं द्यावयाची नाहीं. तो ह्मणाला, गैरमाहीत अशा प्रदेशांत गैरमाहीत अशा लढण्यामुळें आपल्या थोड्याशा माणसांवर शत्रूंनीं कदाचित् मागच्या प्रसंगीं अकस्मात् अल्प जय मिळविला असेल; पण प्रस्तुतचें काम ब्रिटिश शिपायाचें अगदीं हातखंडें आहे. प्रस्तुतचें काम त्यास चांगलें करतां येईल व करणेंहि फार अवघड नाहीं. आतां मजबूत केलेलीं ठिकाणें एकदम झडप घालून घ्यावयाचीं ही गोष्ट ज्यांस पिढीजाद ठाऊक, अशा सैन्यास न जुमानतां आपण ब्रीडसहिलचें संरक्षण करूं असा वसाहतकारांस भ्रम असेल तितकें बरेंच; त्यांचा भ्रम लवकरच त्यांना भोंवेल. आपलें काय गेलें? असा पोक्त विचार करून त्यानें असा हुकूम सोडिला कीं, ब्रीडसहिल एकदम खालसा केलीच पाहिजे; आणि तें लाडकें काम लार्ड हावे याच्या हाताखालीं बोस्टनमधील निवडक फौज देऊन त्यास त्यानें सांगितलें. ज्यांच्या मनोरथाचीं तोरणें

मोडून टाकण्याचें त्याच्यावर संपविलें होतें व त्याचाहि कृतनिश्चय होता, त्या अविचारी आणि मूर्ख वसाहतकारांची हावे यास बहुधा कींव आली असावी. तें कसेंहि असो. हें काम आपण क्षणांत फत्ते करूं अशी मनांत गांठ बांधून हावेनें हल्लयाची तयारी केली, आणि ब्रीडसहिलच्या समरास सुरवात झाली. ही लढाई अत्यंत विलक्षण आणि अत्यंत शौर्ययुक्त अशी झाली. एका बाजूस कांहीं शेकडे साधे गृहस्थ लोक होते, त्यांस बंदूक कशी धरावी हें व्यक्तिशः माहीत होतें आणि व्हालंटियर व हंगामी फौज या नात्यानें ज्यास कदाचित् कवाइत असें ह्मणतां येईल असें कांहीं ते शिकलेले होते. बरें, त्यांचे जे जनरल व इतर अंमलदार होते त्यांपैकीं कांहींस लढाईचें केवळ पुस्तकी ज्ञान होतें, आणि कांहींस रानटी जनावरें आणि त्यांच्यापेक्षांही रानटी इंडियन लोक यांच्याशीं लढण्याचा प्रसंग आलेला होता. दुसऱ्या बाजूस सर्व जगांत उत्तम असें कित्येक हजार सैन्य होतें, ज्यांस जय मिळविण्याची नेहमींची संवय असून त्यांच्या निशाणांवर प्रसिद्ध लढायांचीं नांवें चकाकत होतीं, ते चांगले शिकलेले होते. त्यांचीं शस्त्रें चांगलीं होतीं, आणि त्यांचे पोषाक चांगले होते. ते हुकूम ऐकल्याबरोबर अगदीं यंत्राबरहुकूम आपल्या हालचाली करीत. बरें, त्यांच्यावरचे जे अंमलदार होते त्यांचें पाणी अनुभवाच्या कसास उतरलेलें होतें. त्यांच्या जशी भीति स्वप्नींहि नसे, तशी पराभूतिही नसे. फार कशाला? या दोन परस्परविरोधी सैन्यांतील विरोध त्यांच्या केवळ वस्त्रांवरूनहि दृग्गोचर होत होता. ब्रीडसहिलच्या छातीइतक्या उंच भिंताडामागें जे लोक उभे राहिले होते त्यांना युनिफार्म ( एका नमुन्याचा सर्व पोषाक ) ह्मणजे काय तो माहीत नव्हता, आणि त्यांच्यामध्यें ऑफिसर व प्रायव्हेट ( अंमलदार व शिपाई ) हा भेददेखील नव्हता. ते आपलीं शेतें नांगरीत असतां किंवा ढोरें पाळीत असतां जे कपडे घालीत असत तेच घालून ते येथें लढाईकरितां आलेले होते; आणि त्यांच्यामध्यें जे शहरवासी होते ते दुकानांत किंवा ऑफिसांत जे साधे कपडे घालीत तेच घालून आलेले होते. बरें, त्यांच्या शस्त्रांतहि सारखवटपणा

फारच थोडा होता. प्रत्येकाची बंदूक निराळी असे, आणि पांखरें मारण्यांत किंवा वाघ, लांडगा, आस्वल इत्यादिकांची पारध करण्यांत तिचा पुष्कळ वेळां उपयोग केल्यामुळें ती त्याची लाडकी बनलेली असे. त्यांपैकीं कांहीं बंदुका फारच लांब होत्या, आणि बऱ्याच बंदुका तपासनीसानें मुळींच पसंत केल्या नसत्या. पण त्यांपैकीं प्रत्येक बंदुक ह्मणजे तिच्या मालकाला तो एक तिसरा हातच होता; आणि त्यांस जरी एकदम गोळीबार करण्याची संवय नव्हती, तरी त्यांना रानांतला अभ्यास असल्यामुळें त्यांचा नेम बहुधा चुकत नसे. इकडे इंग्लिश सैन्यापाशीं युद्धखात्यानें पसंत केलेल्या अगदीं ताज्या बंदुका होत्या, आणि त्यांस त्यांचा एकसमयावच्छेदेंकरून आणि एकविचारेंकरून असा कांहीं उपयोग करतां येत असे कीं, मुख्य सेनापतीनें त्यांची कवायतीचे वेळीं पाठच थोपटावी. बरें, त्यांच्या संख्येंतहि असाच फरक होता. वसाहतकार कायते सरासरी सोळाशें होते, आणि इंग्रज सरासरी चार हजार होते. त्यांनीं समरांगणांत एक गोळीहि उडविलेली नव्हती आणि ह्यांनीं त्या कामांत जन्म घालविलेला होता. तेव्हां ही लढाई सारख्या शक्तींच्या दोन फौजांमध्यें होत आहे असें प्रथमदर्शनींदेखील दिसत नव्हतें. टेंकडीच्या पायथ्यावरूनच माथ्यावर जाऊन तेथल्या बंडखोर कुळंबटांचा समाचार घेणें, ह्यास फारसा वेळ लागेल असें इंग्लिश सेनापतींस मुळींच वाटलें नाहीं. होईल तितकें लवकर गोळीबारानें मरून जाणें किंवा संगिनीच्या तडाक्यांत सांपडणें हाच त्या दंगेखोरांस उत्तम मार्ग ह्मटला ह्मणजे राहिला होता. गेजनें असा स्पष्ट जाहीरनामा लाविला होता कीं जो बंडवाला सशस्त्र सांपडेल त्यास फांशी द्यावयाचा. पण कॉंकॉर्डप्रमाणें येथेंहि जी अकल्पित गोष्ट तीच घडून आली. ब्रिटिश सैन्याला वसाहतकारांचा घातुक मारा सहन होईना. जणू काय आपण परेडच करीत आहों अशा रीतीच्या स्वस्थपणानें ते त्या चढणीवरून पुनः पुनः पुढें सरसावले; पण प्रत्येक वेळीं त्यांस पुष्कळ बळी देऊन मागें सरकावें लागलें. ह्या हल्लयांत त्यांचे फारच लोक मेले, त्यांत शिपायांपेक्षां अम्मलदारच जास्त मारिले गेले. बहु-

तेक सर्वच अम्मलदार गमावले ह्मटलें तरी चालेल. कांहीं वेळपर्यंत लढाई ह्मणजे हावेच्या सैन्यावर अनर्थपरंपराच दिसत होती. ब्रीड्-सहिल कधींच हातीं लागावयाची नाहीं, असें कांहीं वेळपर्यंत दिसत होतें. पण शेवटीं असा वेळ येऊन पोहोंचला कीं, तोंपर्यंत ज्यांनीं ती संभाळून धरिली होती त्यांच्यानें ती जास्त वेळ बचावून धरणें शक्य नव्हतें. त्यांचा दारूगोळा संपण्याच्या बेतांत आला, आणि त्याबरोबरच स्वस्थान संभाळण्याचें त्यांचें सामर्थ्य संपत आलें. नंतर हावेनें आपलें सैन्य एकत्र करून व त्यास उत्तेजन देऊन शेवटचा हल्ला केला, आणि तो जसा अगदीं हलके हलके कुच करून जावें अशा थाटावर केला. शत्रूंच्या भिंताडामागून शेवटचा बंदुकीचा आवाज झाला आणि ब्रीड्सहिल इंग्लिशांच्या हातीं आली. ह्या शेवटच्या हल्ल्यांत फारसा रक्तस्राव कोणत्याच पक्षाचा झाला नाहीं. ज्या कुंपणाच्या आंत बंडखोरांनीं इतका वेळ टिकाव धरिला होता, त्यासभोंवतीं धूर इतका दाट पसरला होता कीं, इंग्लिश शिपायांच्या संगीनींस शत्रूंचा फारसा समाचार घेतां येईना. बहुतेक दंगेखोर स्वतः उत्पन्न केलेल्या धुक्याच्या आश्रयानें मागें सरकले. शिवाय हेंहि अगदीं खरेंच होतें कीं, इंग्लिश सैन्याला त्यांचा पाठलाग करण्याची इच्छा किंवा कुवत मुळींच राहिलेली नव्हती, इतका त्यांचा सप्पा उडालेला होता. तसेंच शत्रूंच्या बळाचाहि त्यांस बरोबर अंदाज लागलेला नव्हता. तेव्हां इतक्या रक्तस्रावानें घेतलेली टेंकडी राखिली ह्मणजे मिळविली असें त्यांस वाटत होतें. एकंदरींत ब्रीडसहिल येथें राजाच्या सैन्यास जो जय मिळाला तो नांवाचा होता. खरा जय दंगेखोरांसच मिळाला होता. कारण जगांतील अत्युत्तम सैन्याविरुद्ध शेतकरी, दुकानदार, भट आणि वकील अशांच्या बनलेल्या अशिक्षित जमावास काय करतां येतें हें त्यांनीं सिद्ध करून दाखविलें होतें.

इकडे राजपक्षीयांस दाद नाहीं, इतके दंगेखोर बोस्टनच्या समोर जमले होते. ज्यास कैदेंत ठेवण्यासाठीं इंग्लिश सैन्य सात समुद्र

ओलांडून आलें होतें, तेंच सैन्य बोस्टनमध्यें स्वतः कोंडलें गेलें. ही वसाहतकारांची फौज जरी ओबडधोबड व अपक्क अशी होती, तरी ती सोत्कंठ आणि सनिश्चय अशी होती; आणि तिनें आपल्यांतूनच आपल्या-सारखे ओबडधोबड व अपक्क पण पराक्रमी, साहसी आणि धीट असे जनरल काढिले होते. उदाहरणार्थ इस्रायल पुटनाम्, ज्यानें लहानपणीं एका लांडग्यास त्याचा हातानें गळा दाबून ठार केलें होतें व जो फ्रेंचाच्या लढाईत ब्रिटिश निशाणाखालीं फारच उत्तम रीतीनें लढला होता, तो आतां त्या निशाणाविरुद्धच लढण्यास पुढें सरसावला. नॅथ-नियेल ग्रीन ह्यानें लष्करी पुस्तकें एकीकडे फेकून देऊन, हातांत तरवार धरिली होती. सारांश त्यानें ज्ञप्ति सोडून कृति पत्करिली होती आणि तींत तो आपलें नांवही करूं लागला होता. बेनिडिक्ट आर्नोल्ड जो फ्रेंचाशीं झालेल्या लढाईत टिकॉन्डेरोगा हा किल्ला छापा घालून घेऊन प्रसिद्धीस आला होता, तो त्या लढाईत पकडलेल्या तोफा घेऊन या नव्या फौजेस मदतनीस आला. ब्रीड्सहिलचा नायक प्रेस्कट हा तर लढाईच्या कामांत बुड्ढा झालेला होता; आणि आर्टीमस वॉर्ड, शूलर, पॉमेरॉय, हीथ व टामस, सलिव्हन व मॉंट गॉमरी, आणि वूस्टर व स्पेन्सर हीं नांवें बोस्टनमधील आणि लंदन येथील इंग्लिश लोकांस परिचित होऊं लागलीं होतीं. ह्या अपक्क अशा वसाहतकारांच्या फौजेंत दोघे इंग्रज जनरल झाले होते, एक चार्लसली आणि दुसरा होरेशियो गेट्स्. ह्या नूतन फौजेंत खरोखर अगदीं कवडी मोलाचे लोक फारच थोडे होते; पण सांगण्यास वाईट वाटतें कीं, त्यांत ह्या दोघांची गणना होत होती. जिला यापुढें कॉंटिनेंटल आर्मी (सगळ्या अमेरिका खंडाची फौज) हें नांव मिळालें, तिचे हे वरील सर्व गृहस्थ जनरल होते; पैकीं बहुतेक फार योग्य माणसें होतीं आणि ही त्या फौजेला मोठी सुदैवाची गोष्ट होती; पण सगळ्यांत तिचें अत्यंत मोठें सुदैव हें होतें कीं, तिला मुख्य सेनापति जो मिळाला तो अत्यंत उदार आत्मा मिळाला, आणि नंतर तो तत्कालीन सर्व लढवय्यांमध्यें अत्यंत मोठा लढवय्या ह्मणून प्रसिद्धीस आला.

कॅप्टन वाशिंग्टन हा व्हर्जिनियाच्या वसाहतींत जन्मलेला असून, तो फ्रेंचांशीं झालेल्या लढाईत इंग्लिशांच्या बाजूनें लढला होता, आणि जार्ज राजाचा झेंडा फोर्ट डुकिन ह्या मोडक्या किल्ल्यावर रोंविल्यावर त्यानें आपली तलवार म्यानांत सारून तो पुनः साधा शेतकरी बनला होता, आणि पुनः ती उपसण्याचा त्यास फारच अल्प संभव वाटत होता किंवा इच्छाहि नव्हती. त्याला वाटलें होतें कीं, आपल्यास आतां राहिलेलें आयुष्य एक सभ्य वसाहतकार या नात्यानें घालवितां येईल व त्याचें मागणेंहि एवढेंच होतें. त्यास बायको चांगली मिळालेली होती. तो पोटोमाक नदीच्या कांठीं मौंट व्हर्नोय या टेंकडीवर शेतीभाती करून स्वस्थ राहिलेला होता. तो खेडेगांवीं सभ्य गृहस्थ बनला होता, आणि शेतकी करावी, पारध करावी, मासे मारावे, हीं जीं खेडेगांवांतील सभ्य गृहस्थांचीं कामें आणि करमणुकी, त्यांपलीकडे त्याची महत्वाकांक्षा मुळींच जात नव्हती. शिवाय तो आपल्या वसाहतींचा एकनिष्ठ नोकर होता. फोर्ट डुकिनच्या पाडावानंतर तो आज पंधरा वर्षें व्हर्जिनियामधील पार्लमेंटाचा सभासद होता, आणि जरी तो वादविवादांत क्वचित्च पुढें येई, तरी त्याजवर त्याच्या साथीदारांचा व इतर नागरिकांचा विश्वास होता. तेथील लोकांमध्यें त्याची मानमान्यता होती. आणि समुद्रापलीकडील त्याच्या राजास नाहीं ह्मणण्याचें अगदीं धैर्य नाहीं इतके लांगूलचालनप्रिय किंवा इतके मूर्ख प्रधान जर मिळाले नसते, तर त्याचें बाकीचें आयुष्य शांततेनें, सभ्यतेनें, आणि उपयुक्ततेनें, परंतु ज्याच्यांत फारशा मोठाल्या गोष्टी घडून आल्या नाहींत अशा महत्कृत्यशून्यतेनें, गेलें असतें. वाशिंग्टनचें सामर्थ्य ध्यानांत आणून अमेरिकेंतील कॉंग्रेसनें आपल्या आयत्या वेळीं उभारलेल्या सैन्याचा त्यास मुख्य सेनापति नेमिलें. हें काम किती जोखमीचें, धोक्याचें आणि महत्वाचें आहे हें नीट ध्यानांत आणूनहि त्यानें तें पत्करिलें. त्यानें वास्तविक खर्चास लागेल त्यापेक्षां जास्त पगार घेण्याचें साफ नाकारिलें. त्याला प्रथम इंग्लंडापासून स्वतंत्र होण्याची कल्पना मुळींच आवडत नव्हती. त्यानें जें शस्त्र

धरिलें तें केवळ आपल्या आवडत्या हक्कांच्या संरक्षणार्थ धरिलें; तथापि त्यानें अद्यापि आपली राजनिष्ठा सोडिली नव्हती. तो मुख्य सेनापति झाल्यावर त्याचें विलक्षण लष्करी चातुर्य लवकरच दिसून आलें. त्यास आपल्या अव्यवस्थित सैन्यास व्यवस्थित स्वरूप देण्यास किती प्रयास पडले हें बोस्टनमध्यें कोंडलेल्या इंग्लिश जनरलास माहीत नव्हतें हें ठीक होतें. तथापि त्याचें धैर्य, त्याचा कधीं कमी न होणारा मनाचा थंडेपणा, आणि त्याचें अजेय प्रसंगावधान यांच्यायोगानें त्यानें येईल ती अडचण पार पाडिली. त्याचीं रेजिमेंटें मुदत संपल्याबरोबर नोकरी सोडून जात. त्याला दारूगोळा, शस्त्रास्त्रें, खाण्यापिण्याचे पदार्थ, आणि डगले यांची भरपूर वाण असे; आणि त्याचें सैन्य कधीं कधीं सगळेंच्या सगळेंच वितळून जाऊन त्याच्या निशाणाबरोबर केवळ मूठभर जनरलच राहतात कीं काय अशी नेहमीं भीति असे. अशी स्थिति असतां आपण किती निराश होण्याच्या बेतांत आलों आहों हें तो आपल्या शत्रूस कधींच कळूं देत नसे, आणि आपल्या मित्रासही क्वचित्च समजूं देत असे. तो कसेतरी लढवय्ये लोक तयार करी, कशी तरी खाण्यापिण्याची सामुग्री जमवी, कोठून तरी दारूगोळा मिळवी, आणि कशी तरी शस्त्रांची सिद्धता करी. शस्त्रांची वाण तर इतकी होती कीं, कित्येक टोळ्यांपाशीं बरचीशिवाय दुसरें शस्त्र नव्हतें, आणि फ्रांक्लिननें तर असें सुचविलें कीं, आपल्या स्वातंत्र्यासाठीं लढणाऱ्या आपल्या शेत्यांनीं इंदियन लोकांप्रमाणें धनुष्यबाण घेऊनच लढावें.

वर सांगितल्याप्रमाणें बोस्टनमध्यें कोंडलेल्या जनरलांस ह्याचा कांहीं एक सुगागा नव्हता. त्यांना एवढेंच माहीत होतें कीं, आपल्याला वेढा मजबूत पडला आहे आणि त्यांतून बाहेर पडण्याची कांहीं एक सोय नाहीं. ते त्यांचा तिरस्कार करण्याचा आव आणीत हें सांगावयास नकोच; त्यांत जनरल वर्गाइनची लार्ड हावेवर ताण होती. तथापि बोस्टनला वेढा घालणाऱ्या सैन्यांत भोंक पाडण्याची किंवा त्यांच्या पराक्रमी सेनापतीचे बेत मोडून काढण्याची किंवा दोघांपैकीं एकाचीहि छाती नव्हती. अशा रीतीनें सरासरी एक वर्ष हा वेढा राहिला.

शवटीं वाशिंग्टनानें त्यांस स्वाधीन व्हा किंवा निघून जा असें निक्षून सांगितलें. तेव्हां त्यांनीं दुसरा मार्ग पत्करिला; आणि बोस्टनमधील जे लोक अद्यापि राजनिष्ठेची कांस सोडण्यास तयार नव्हते त्यांस बरोबर घेऊन ते बोस्टनच्या बाहेर पडले. दुसरा एकादा राजा असता, किंवा दुसरे एकादे प्रधान असते, तर ह्या एका वर्षाच्या अनुभवानें तरी शहाणे होते; पण राजा व प्रधान दोन्ही सारखेच असल्यामुळें त्यांनीं युद्ध चालूच ठेवण्याचा निश्चय केला.

तेव्हां मग युद्ध चालू राहिलेंच; आणि प्रत्येक खऱ्या स्वदेशाभिमानी इंग्रजाच्या विरोधास न जुमानतां आणि वसाहतकारांचें धैर्य कांहीं केल्यानें खचावयाचें नाहीं, किंवा त्यांचा निश्चय कांहीं केल्यानें ढळावयाचा नाहीं, ह्याबद्दल एकामागून एकसारखे प्रत्यय येत होते, त्यांसही न जुमानतां, तें आणखीं पांच वर्षें चालू राहिलें (१७७६–८१). इकडे इंग्लंदांत फॉक्स अमेरिकन सैन्याच्या डगल्यासारखे निळे पिवळे डगले वापरीत असतां, आणि ड्यूक ऑफ् रिचमंड हा त्या सैन्यास "आपलें सैन्य" ह्मणून मुद्दाम, बोलण्याचा प्रसंग येईल तेव्हां ह्मणत असतां, आणि चॅथॅम व बर्क हे निष्फल आणि कलंक आणणाऱ्या मोहिमांचा निषेध करण्यांत आपलें सर्व वक्तृत्व खर्च करीत असतां, त्यांस न जुमानतां लढाई हट्टानें चालविलीच होती. राजा आणि त्याचे प्रधान हे वसाहतकारांस नरम करण्यास नव्या युक्त्या काढीतच होते; शेवटीं त्यांनीं त्या कामीं जर्मन फौजेचा उपयोग करण्यासाठीं अतोनात पैसा खर्च केला. तेव्हां अमेरिकन लोकांनीं राजनिष्ठेचें एकंदर ढोंग टाकून दिलें. न्यूयार्कमधील जार्ज राजाचा पुतळा त्यांनीं खालीं ओढिला आणि त्याच्या जर्मन फौजेविरुद्ध त्याचा उपयोग करण्यासाठीं त्याच्या गोळ्या पाडिल्या. इंग्लिशांनीं बोस्टन खालीं केल्यानंतरच्या उन्हाळ्यांत बंडवाल्या वसाहतींनीं सर्व मानवी इतिहासांत अत्यन्त संस्मरणीय अशा एका राष्ट्रीयहक्कविषयक खलित्याच्या रूपानें आपलें स्वातंत्र्य पुकारिलें (१७७७). त्यानंतर हें अनर्थमय युद्ध आणखीं चार वर्षें चालावयाचें होतें.

युद्धामध्यें सारखाच एका पक्षास जय मिळत नव्हता. प्रथम जरी अमेरिकन लोकांस जय मिळाले तरी पुढें त्यांचे पराजय झाले; तेणें-करून फिलाडेल्फिया शहर ब्रिटिश लोकांच्या हातीं आलें; तें पाहून वाशिंग्टनपेक्षां कमी शूर माणसाची छातीच दडपली असती. नंतर मग त्यांस जयामागून जय मिळत गेले व तेणेंकरून पुनः आशा आली. पुढें त्यांस बाहेरून मदत आली; फ्रान्स, जर्मनी, पोलंद यांनीं लॉफैटि, व्हान्स्टच्यूबेन, कोश्यूस्को यांच्यासारखे मोठाले वीर मदतनीस पाठविले. इंग्लिश जनरल बर्गाइनी हा साराटोगा मुक्कामीं सगळ्या फौजेसहित शत्रूच्या स्वाधीन झाला. १७७७च्या हिंवाळ्यांत वाशिंग्टनच्या सैन्याचे थंडीनें फार हाल झाले; पण नंतर फ्रान्सानें अमेरिकन लोकांचें स्वातंत्र्य कबूल केलें. ब्रिटिश फौजेनें फिलाडेल्फिया शहर खालीं केलें आणि पालजोन्स यानें आपलें तारूं घेऊन इंग्लंदच्या किनाऱ्यावरच लढाई आणून भिडविली आणि अशा रीतीनें आपलें नांव अमर करून टाकिलें. नंतर मग वसाहतकारांस पुनः हारी खाव्या लागल्या. त्यांत आर्नोल्ड हा विश्वासघात करून इंग्लिशांस जाऊन मिळाला, आणि त्या कामीं शत्रूंचा हेर ह्मणून मेजर आंड्री हा इंग्लिश अंमलदार फांशीं गेला. अमेरिकन फौजेंत आणखी कांहीं विश्वासघातकी निघालेच. एक ली आणि दुसरा गेट्स्. त्यास कारण, त्यांच्या मनांत वाशिंग्टनबद्दल उत्पन्न झालेला दुष्ट हेवा होय; तथापि तेणेंकरून अमेरिकन लोकांचें मोठेंसें नुकसान झालें नाहीं. शेवटीं सत्याचा जय झाला. १७८१ सालीं आणखी एक ब्रिटिश सैन्य शत्रूच्या स्वाधीन झालें. कार्नवालीसचें सैन्य यार्कटौन येथें आलें. तेव्हां मग नार्थलादेखील कबूल करणें भाग पडलें कीं आतां लढाई संपली. पुढच्या वर्षीं लढाई तहकूब ठेविली, आणि १७८३ सालीं पुष्कळ बोलणींचालणीं होऊन तहाच्या कलमांवर फ्रान्सांतील व्हरसेल्स येथें सह्या झाल्या. अशा रीतीनें अमेरिकन लोकसत्ताकाची पृथ्वीवरील स्वतंत्र राष्ट्रांत गणना होऊं लागली. वेडर्बर्ननें मागें सांगितलेला फ्रांक्लिनवर कामन्ससभेपुढें जो रानटी हल्ला केला होता त्यावेळीं ( फ्रांक्लिनानें ) जो भपकेदार पोषाक घातलेला होता, तो त्यानें

तेव्हांपासून तसाच राखून ठेविला होता. तो आतां ह्या तहाच्या वेळीं पुनः घालण्यास काढिला. त्या गोष्टीस पुष्कळ दिवस होऊन गेले होते.

अशा रीतीनें इंग्लंदनें केलेल्या ह्या अत्यंत मूर्खपणाच्या आणि अत्यंत अन्यायाच्या लढाईचा शेवट झाला. यामध्यें इंग्लंदच्या अत्यन्त मोठ्या वसाहती गमावल्या, पुष्कळ प्राणहानि झाली आणि पुष्कळ पैशाचा चकाचूर उडाला. ती लढाई चालली असतां त्या शतकांतील अत्यंत मोठा इंग्लिश मुत्सद्दी गमावला. प्रथम त्यानें या लढाईविरुद्ध आपलें सर्व वक्तृत्व खर्च केलें होतें; पण त्याला जो मोठा रोग झाला होता त्यानें पिडल्यामुळें त्याचें मनहि बदललें. वसाहतकारांस त्यानेंच इच्छिलेला जय जेव्हां मिळूं लागला तेव्हां तो निराश झाला. वसाहतींनीं मिळविलेलें स्वातंत्र्य कबूल करण्याचा जेव्हां प्रसंग आला तेव्हां त्याच्या मनास कसेसेंच वाटलें. आपण इंग्लंदास मिळवून दिलेलें राज्य निघून जावें ही कल्पनाच त्यास मान्य होईना. म्हणून तो त्या विरुद्ध बोलण्यासाठीं आजारी असतांहि लार्डांच्या सभेंत आला. तो तेथें रागानें आणि निराशेनें बोलत असतां त्याच्या तोंडांतून कांहीं वाक्यें अर्धवट आलीं नाहींत तोंच त्यास घेरी आली. त्यास तसाच तेथून उचलून नेला. पुढें थोड्या आठवड्यांनीं तो मेला. त्यास वेस्टमिन्स्टरमध्यें पुरिलें. त्याचें स्वदेशप्रेम अतुल होतें, आणि त्याचा सगळा जन्म त्याच्या हट्टी, दुराग्रही आणि मूर्ख अशा राजांशीं भांडण्यांत गेला होता. असो.

अशा रीतीनें राजाचा मूर्खपणा आणि त्याच्या प्रधानांचा नीचपणा ह्यांच्यायोगानें जेव्हां इंग्लंदानें अमेरिका गमावली तेव्हां ह्या धक्क्यापासून इंग्लंद पुनः उठणार नाहीं असें इंग्लंदच्या सर्व शत्रूंस व पुष्कळ मित्रांसही वाटलें. त्यांना वाटलें कीं, इंग्लंदच्या वैभवाचा आतां कायमचा अस्त झाला आहे, यांतून तें पुनः डोकें वर काढूं शकणार नाहीं. पण इंग्लंदांत जीव विलक्षण होता; तें ह्या धक्क्यांतून इतकें कांहीं जलद उठलें कीं, तें पाहून सर्वांस आश्चर्य वाटलें. ज्या तरुणांनीं, वृद्धांच्या तोंडून, केवढी मोठी हानि झाली ही! असे निराशेचे उद्गार ऐकिले होते, तेच त्यांच्या वृद्धपणीं, इंग्लंद पूर्वीपेक्षांही

मोठें श्रीमान् आणि वैभववान् झालेलें पाहण्यास जगले. त्यानें जर अमेरिका गमावली तर त्यापासून ते नवा धडा शिकले; आणि त्यांस आपल्या धोक्याबद्दल आणि आपल्या कर्तव्याबद्दल पूर्वीपेक्षां जास्तच जागृति झाली. अशा रीतीनें जार्ज राजाच्या मूर्खपणामुळें झालेलें नुकसान अन्य तऱ्हांनीं भरून आलें.

ज्या लढाईनें जगास एका नव्या राष्ट्राची आणि रोमपेक्षांही मोठ्या लोकसत्ताकाची जोड लाधली, त्याच लढाईनें पृथ्वीवरील मोठ्या लढवय्यांची जी मालिका, तींत एका अत्यन्त मोठ्या व अत्यन्त उदात्त अशा नांवांची भर पडली. अठराव्या शतकाच्या शेवटच्या चतुर्थांस जार्ज वाशिंग्टनच्या नांवानें जेवढी शोभा आलेली आहे तेवढी आजपर्यंत कोणत्याहि शतकास कोणत्याहि नांवानें आलेली नसेल. त्याचें बिलक्षण बळ, त्याची गोड तामसी वृत्ति, आणि त्याचा स्वाभिमानप्रचुर धिमेपणा यांची तोड आजपर्यंत क्वचित्च कोणीं केली असेल. " शांततेंत पहिला, लढाईत पहिला आणि लोकांच्या अंतःकरणांतहि पहिला. " हीनें हें विधान जेव्हां प्रथम केलें तेव्हांपासून पुनः पुनः उच्चारिल्यानें त्याच्या अगदीं चिंध्या झाल्या आहेत; पण ज्याच्या युद्धविषयक अचाट बुद्धीमुळें आणि शांततेच्या दिवसांतील विलक्षण विनयशीलतेमुळें अमेरिकेचे लोकसत्ताकास जगाच्या इतिहासांत शाश्वती आली. त्या महात्म्याच्यासंबंधानें तें नेहमींच खरें राहणार आहे. वाशिंग्टन हा युनैटेड स्टेट्स्चा पाहिला प्रेसिडेंट १७८९ सालीं झाला. त्यास तत्पूर्वीं त्या राष्ट्राचा राजा होण्याबद्दल अत्यंत आग्रह झाला होता; पण त्यानें मुळींच दाद दिली नाहीं. तो दोन वेळां चार चार वर्षेंपावेतों प्रेसिडेंट झाला, आणि नंतर तो मौंट व्हर्नन येथील आपल्या इस्टेटीवर शांतपणें कालक्रमणा करण्यास गेला. तेथें तो त्याच्या थोड्याशा लोकांच्या मूर्खपणाच्या क्रूर कृतघ्नपणामुळें कधीं खचला नाहीं, किंवा पुष्कळ लोकांच्या विचारयुक्त आणि कृतज्ञतापूर्ण अशा स्तुतीनें कधीं फुगला नाहीं. त्यास तेथें १७९९ सालीं शांतपणें मरण आलें; इकडे जो राजा त्यास अद्यापि बंडवाला म्हणून समजतच होता, त्यास अजून अस्वस्थपणाचीं व वेडेपणाचीं पुष्कळ वर्षें घालवावयाचींच होतीं.

---

# प्रकरण एकोणिसावें.



## गॉर्डन दंगे.

सन १७७८ सालीं सरजार्ज सॅव्हिली यानें रोमन क्यॅथलिक लोकांविरुद्ध असलेले कांहीं कायदे रद्द करण्याबद्दलचें आपलें बिल पास करून घेऊन आपलें नांव प्रसिद्ध करून घेतलें. तो फार उदार मतांचा माणूस होता. जीं जीं बिलें देशाच्या हिताचीं असतील त्यांच्या वतीनें आणि जीं जीं विरुद्ध असतील त्यांच्याविरुद्ध तो पांच पार्लमेंतें यार्कचा प्रतिनिधि या नात्यानें लढत होता. याबद्दल त्याची बर्कनेंदेखील ब्रिस्टलमधील आपल्या एका भाषणांत फार स्तुति केली. त्या स्तुतीस तो अगदीं योग्य होता. तो अमेरिकेशीं झालेल्या युद्धाच्या अगदीं विरुद्ध होता. १७८३ सालीं पिटनें पार्लमेंताची सुधारणा करण्याकरितां जें बिल पुढें आणिलें होतें त्यास त्यानें मोठ्या उत्साहानें आपला पाठिंबा दिला होता. राजाचे जमिनविर जे हक्क होते त्यांचें नियंत्रण करण्यासाठीं त्यानें एक उत्कृष्ट बिल तयार केलें होतें. पण त्याचें नांव विशेषतः क्यॅथलिक लोकांच्या तर्फे जी त्यानें वर सांगितलेली खटपट केली तिजवरून प्रसिद्धीस आलेलें आहे. त्याचें एक कारण त्या बिलाचें उत्कृष्टत्व, आणि दुसरें कारण त्यामुळें पुढें जे भयंकर दंगे उद्भवले ते.

सरजार्ज सॅव्हिलीच्या कायद्यानें कॅथलिक धर्माच्या इंग्लिश प्रजेवरील कांहीं रानटी नियत्रणें काढून टाकिलीं होतीं. तीं नियंत्रणें तिसऱ्या विलियमाच्या कारकीर्दीत १६९९।१७०० च्या सुमारास त्या प्रजेवर लादलेलीं होतीं. तीं काढल्यापासून रोमनक्यॅथलिक लोकांस विशेषसा फायदा होता असें नाहीं; पण प्राटेस्टंट इग्रंजांप्रमाणें तीं हीं माणसेंच आहेत एवढें ओळखल्याची ती एक साक्ष होती. तेणेंकरून इंग्रजांना अत्यंत प्रिय व

अत्यंत सामान्य असे कांहीं हक्क इंग्लिश क्यॅथलिकांस मिळाले होते. असले रानटी कायदे आयर्लंदांत व स्काटलंदांत यावेळीं क्यॅथलिकांविरुद्ध होतेच. पण हें बिल पास झाल्यावर अशी बातमी पसरली कीं, स्काटलंदांतील क्यॅथलिकांसहि लवकरच असल्याच सवलती किंवा बंधमुक्तता देण्याचा विचार आहे. हें ऐकून स्काटलंदांच्या प्राटेस्टंटांनीं लागलीच मोठी ओरड सुरू केली. आपला धर्म धोक्यांत पाडणार या मिषानें त्यांनीं अत्यन्त मोठी चळवळ सुरू केली; जिकडे तिकडे सभा व मंडळ्या स्थापन केल्या; आणि क्यॅथलिकांविरुद्ध भयंकर पुस्तकें व प्यांफ्लेटें छापून पसरून दिलीं. तेणेंकरून क्यॅथलिकांचा जिकडे तिकडे छळ होऊं लागला. एडिंबरो, ग्लासगो व इतर मोठालीं स्काटिश शहरें या ठिकाणीं प्राटेस्टंट बदमाष क्यॅथलिक गृहस्थांस त्रास देऊं लागले. तें पाहून सरकारानें वरील कायद्याचा फायदा स्काटलंदांतील क्यॅथलिक लोकांस देण्याचा विचार सोडून दिला. तथापि स्काटलंदांत उत्पन्न झालेली चळवळ इंग्लंदांत येऊन भिडली. अर्थात सरकार पुढें कदाचित् पास करील अशा बिलाविरुद्ध नव्हे, तर ती नुकत्याच पास झालेल्या प्रत्यक्ष बिलाविरुद्ध सुरू झाली. नंतर मग स्काटलंदाप्रमाणें इंग्लंदांतहि धर्मांध प्राटेस्टंटांच्या सभा व मंडळ्या स्थापन झाल्या. इंग्लंदांत जी प्राटेस्टंट असोसिएशन स्थापन झाली ती जशी जादूच्या कांडीनें उत्पन्न व्हावी त्या नमुन्यावर झाली, आणि तिनें स्काटलंदांतील तसल्याच चळवळीचा मुख्य व पुढारी जो लार्ड जॉर्ज गॉर्डन त्यास आपला मुख्य नेमिलें.

ह्या क्यॅथलिक लोकांविरुद्ध चळवळीचा तो ह्याप्रमाणें जेव्हां अग्रणी झाला तेव्हां तो फार तरुण माणूस होता. त्याचा जन्म १७५० त झाला असल्यामुळें जेव्हां ही चळवळ शिखरास पोंहोचली तेव्हां त्याच्या वयास नुकीं तीस वर्षें झालीं होतीं. त्याची तेव्हांपर्यंतची कारकीर्द अम्मळ विविध झालेली होती. तो प्रथम आरमारांत नोकरीस होता; पण अमेरिकेचें युद्ध नुकेंच सुरू झालें तेव्हां बढतीच्यासंबंधानें त्याचें व लार्ड सांडविचचें भांडण होऊन ती त्यानें रागानें सोडिली

होती. तेव्हां तो पार्लमेंतांत शिरला. तो लजरशल नांवाच्या शहराचा प्रतिनिधि झाला, व लवकरच विक्षिप्त ह्मणून कामन्ससभेंत प्रसिद्धीस आला. त्याचीं मतें फार विलक्षण असत. तो प्रत्येक वस्तूवर व प्रत्येक व्यक्तीवर हल्ला करी; पण तो ज्या शिव्या देई त्यांत एक-प्रकारच्या विनोदाचें मिश्रण असे आणि ह्या त्याच्या गुणामुळें तो लवकरच एक महत्वाचा सभासद होऊन बसला. लवकरच कामन्स-सभेंत एक सामान्य ह्मणच पडून गेली कीं, राष्ट्रांत हल्लीं तीन पक्ष आहेत :—एक प्रधानमंडळ, दुसरे त्यांचे विरोधी, आणि तिसरा लार्ड जार्ज गार्डन. असे एकेरे मुत्सद्दी पार्लमेंतांत आजपर्यंत पुष्कळ होऊन गेले आहेत पण लार्ड जार्ज गॉर्डनच्या तोडीचा दुसरा कोणी नसेल.

लार्ड जॉर्जच्या कारकीर्दीकडे हल्लीं बारीक दृष्टीनें पाहतां तो डोकें फिरलेला माणूस होता, ही गोष्ट अगदीं स्पष्ट दिसते. त्यावेळीं ही गोष्ट लोकांच्या लक्ष्यांत आलेली होती असें दिसत नाहीं. तो जेव्हां राजाला पेपिस्ट किंवा पोपपक्षीय ह्मणून शिव्या देई, तो जेव्हां ह्मणें कीं, असा एक काळ येईल कीं, तेव्हां लार्ड जार्ज गार्डन राजा व पार्लमेंत यांजकडून माना वांकवून पाहिजे तें करून घेईल. तो असें वेडें वेडें भकत असतां मध्येंच ओकसाबोकशी रडूं लागे, तेव्हां लोक त्याची थट्टा करीत, किंवा जांभया देत, किंवा हंसत; पण लवकरच त्यांच्या असें प्रत्ययास आलें कीं, तो केवळ हास्यास्पद विदूषकच नाहीं.

स्काटलंदांत कॅथलिक लोकांचे हाल कसे सुरू झाले होते तें वर सांगितलेंच. त्या गोष्टी अर्थात पार्लमेंताच्या नजरेस आल्या. तेव्हां विल्क्सनें डंडस यास स्कॉटिश कॅथलिकांसंबंधाचें बिल सभेपुढें आणण्यास आव्हान केलें. डंडस जेव्हां ह्मणाला कीं, तेथील चळवळ निवेपर्यंत थांबूया, तेव्हा विल्क्सनें, तुह्मी अशाच रीतीनें दंगेखोरांस उत्तेजन देतां, असें प्रधानांस लावून बोलण्यास कमी केलें नाहीं, आणि त्याकामीं बर्क व फॉक्स यांनीं पाठिंबा दिला. तेव्हां लार्ड जार्जीला पुढें येण्याची संधि सांपडली. त्यानें फॉक्सवर हल्ला केला; त्यानें बर्कवर

हल्ला केला. तो ह्मणाला स्काटलंदांतील प्रत्येक नॉनक्यॉथलिक ( क्यॅथलिक नव्हे असा ) क्यॅथलिक बिलाविरुद्ध उठण्यास तयार आहे व यांनीं आपल्यास पुढारी नेमिलें आहे. शिवाय तो इंग्लंदांतील प्राटेस्टंट सभेचा मुख्य नेमिला होता हें वर सांगितलेंच. ह्या सर्व मानांनीं त्याचें डोकें फिरून गेलें. नंतर त्यानें वरील मंडळीची सेंट जॉर्जिस् फील्ड्स् ह्या मैदानांत ता. २ जून १७८० रोजीं एक जंगी सभा भरविण्याचें ठरविलें. तो सर्व घोळका घेऊन कामन्स सभेपुढें जावयाचें आणि क्यॅथलिक बंधनविमोचन बिलाविरुद्ध अर्ज दाखल करावयाचा असें ठरलें होतें. शिवाय असेंहि ठरलें होतें कीं, त्यावेळीं सगळ्या निःसीम प्राटेस्टटांनीं आपल्या टोप्यांना खूण ह्मणून निळी फीत लावावी.

ठरल्याप्रमाणें त्या तारखेस सभा भरली. लार्ड जार्ज गोर्डननें असें ह्मटलें होतें कीं, सभेस २०,००० लोक जमल्याविना मी तिचा अर्ज कामन्स सभेपुढें नेणार नाहीं; पण वीस हजारसेच काय, साठ हजारांवर लोक त्या सभेस जमले होते. कोणी ह्मणतात, लाखाजवळ जवळ माणसें जमलीं असावीं. हा सर्व घोळका एकेका रांगेंत सहा सहा अशा रीतीनें वेस्टमिनिस्टर ( पार्लमेंट सभागृह ) कडे निघाला. त्यामध्यें लंदनमधले बदमाष लोक पुष्कळ होते. ते तीन मार्गांनीं सभागृहापुढील तेव्हां रिकाम्या असलेल्या मोठ्या मैदानांत जमले, आणि दोन्ही सभांतील सभासदांवर, ते सभागृहांत प्रवेश करीत असतां हल्ले करूं लागले. त्यावेळीं विलक्षण गम्मत अशी चालली होती कीं, एकीकडे हा घोळका खालच्या सभेच्या सभासदांस धक्काबुक्की करीत असतां आणि दुसरीकडे वरच्या सभेच्या सभासदांस ठार करण्याचा यत्न करीत असतां, त्या सभेंत ड्यूक ऑफ् रिचमंड हा वार्षिक पार्लमेंतें आणि मतदानाचा सार्वजनिक हक्क ह्यांच्या मंडनार्थ संभाषण करण्यांत गुंतला होता. त्या सभेचा सभासदामागून सभासद केंस विस्कळित झालेला, रक्तबंबाळ, तोंड सुकून गेलेला आणि कपडे फाटलेला असा प्रवेश करीत होता, आणि घोळक्याच्या उन्मत्तपणाबद्दल त्यास

शिव्या देत होता. आशबर्न, टौनशेंड व विलबी, स्टामेंट व बाथर्स्ट, मान्स्फील्ड, मौंटफर्ट व बोस्टन, अशाच थाटानें एकामागून एक सभागृहांत शिरत होते. बिशपामागून बिशपहि सरासरी तीच दशा होऊन आला; पण रिचमंडचा ड्यूक आपल्या भाषणांत इतका मग्न झाला होता कीं, त्यामध्यें अशा रीतीनें व्यत्यय येतो म्हणूनच तो कुरकुरूं लागला. वरच्या सभेची जर अशी स्थिति होती तर खालच्या सभेची त्याच्याहूनही वाईट होती. कारण त्या सभेच्या सभासदांची सरासरी अशीच दशा होत असून शिवाय त्या सभागृहा-सभोंवतीं गराडा जास्तच पडला होता. याचें कारण अर्ज त्या सभे-पुढें दाखल व्हावयाचा होता. फिकट तोंडाचा, पातळ केंसांचा आणि काळ्या कोटाचा लार्ड जार्ज गार्डन हा राक्षसी अर्ज ताबड-तोब घ्या म्हणून ओरडून त्या सभेस सांगत होता. तेथें तो गम्मतच करीत होता. तो मध्यें मध्यें एकसारखा उठून दर-वाजाकडे घुसून जाई, आणि कोण सभासद अर्जासंबंधानें काय म्हणतो तें त्या घोळक्यास ओरडून सांगे. एकदां तो स्पीकरासच शिव्या देऊं लागला, एकदां मि० रौस यास देऊं लागला, एकदां लार्ड नार्थ यास देऊं लागला. कधीं कधीं तो एखाद्या सभासदाची स्तुति करी, तथापि ती स्तुति त्याच्या निंदेपेक्षां जास्त हास्यास्पद अ.ा. एकदां एक सभासद त्यास जाग्यावर जाऊन बसावयास सांगूं लागला, तेव्हां तो त्यास लगेच एखाद्या पोरासारखा बिलगूं लागला, त्यास कुरवाळूं लागला व त्याच्या खांद्यावर थापट्या मारूं लागला, आणि एक प्रकारचा करुणास्पद आनंद बोबडें बोलून दर्शवूं लागला. मग तो एका लहानशा ग्यालरींत जाऊन आपल्या अनुयायांस चिडवून सांगूं लागला कीं, स्कॉच लोकांनीं क्यॅथलिकांचीं प्रार्थनागृहें पाडिलीं तसें तुम्ही केल्याशिवाय तुमची दाद कोणी घेणार नाहीं. कांहीं वेळपावेतों त्यास याप्रमाणें पाहिजे तसें बहकूं दिलें. सरतेशेवटीं कर्नल हालराइड यानें त्यास धरून अशी धमकावणी दिली कीं, तुला न्यूगेटच्या तुरुंगांत एकदम पाठवावा अशी सूचना मी सभेपुढें आणितों; आणि कर्नल

गॉर्डन ह्मणून त्याचा एक आप्त होता त्यानें त्यास अशी धमकावणी दिली कीं, एकादा दंगेखोर दरवाजांतून आंत यावयास लागूंदे, कीं मी ही तरवार तुझ्या पोटांत खुपसलीच ह्मणून समज. तेव्हां तो अमळ दबला, आणि इतक्यांत बंदोबस्ताकरितां थोडेसे घोडेस्वार व पायदळ तेथें येऊन दाखल झाले. तेव्हां मग सभागृहाचा सज्जा व सभोंवतालचें आवार हीं मोकळीं झालीं, आणि अर्ज एकदम घ्यावा या गार्डनच्या सूचनेवर जेव्हां मतें घेतलीं, तेव्हां कायतीं सहा मतें अनुकूल पडलीं, आणि १९२ प्रतिकूल पडलीं. असें जरी झालें तथापि गडबड सुरू राहिलीच व ती आपले प्रकाश पाडूं लागलीच. जी गर्दी वेस्ट मिन्स्टरजवळून हाकलून लावली ती लहान लहान कंपू करून चोहोंकडे शहरांत पसरली, आणि क्यॅथलिक लोकांचीं देवळें पाडूं लागली, त्यांजवर हल्ले करूं लागली, तीं लुटूं लागली व जाळूं लागली. तेव्हां लष्करास बोलावणें पाठविलें; तें फार उशीरां आलें; पण त्यांनीं १३ असामी गुन्हेगार पकडिले, आणि न्यूगेटमध्यें नेऊन टाकिले. तेव्हां तितक्यापुरती गर्दी कमी झाली. त्यावरून लोकांस वाटलें कीं, इतक्यावरच हें प्रकरण निभावलें. ही शुक्रवारची गोष्ट झाली; शनिवार तारीख ३ रोजींहि कांहीं गडबड झाली नाहीं, तेव्हां लोकांना जास्तच भरंवसा आला; पण जून चार रविवार रोजीं एकदम सर्व स्वरूप बदललें. दंगेखोर मूरफील्ड्सच्या मैदानांत पुनः जमले. पुनः रोमन क्यॅथलिकांच्या घरांवर हल्ले सुरू झाले, लुटालुटी होऊं लागल्या, आणि त्यांस आगी लागूं लागल्या. तेव्हांचा लार्ड मेयर केनेट याच्यांत दम नव्हता. लष्कर हाताजवळ असतां त्यानें त्याचा उपयोग केला नाहीं. जर त्यानें प्रथमच योग्य खबरदारी निश्चयानें घेतली असती तर प्रकरण तेथल्या तेथेंच दबलें असतें. पण त्यानें तसें केलें नाहीं; तेव्हां तें जास्तच पेटलें आणि बेताबाहेर गेलें.

सोमवारीं जरी दंगा जास्तच माजला तरी बव्हेरिया व सार्डिनिया येथील वकीलांचीं देवळें मोडणारांस जो धरून देईल त्यास ५००

पौंडांचें बक्षीस मिळेल एवढा जाहिरनामा लावण्याव्यतिरिक्त अधिकाऱ्यांनीं कांहीं एक केलें नाहीं. तेव्हां दंगेखोरांस जास्तच उत्तेजन आलें. त्यांनीं गार्डनच्या वाड्यासमोर जमून परेड केली आणि नंतर सर जार्ज सॅव्हिली, व शुक्रवारच्या दंग्यांतील गुन्हेगारांस पकडण्याच्या कामीं मदत करणारे दोन सभ्य व्यापारी ह्यांच्या घरांवर हल्ले करून त्यांतील सामान रस्त्यांत आणून जाळिलें; आणि ज्या शिपायांनीं शुक्रवारचे कैदी धरून नेले होते त्यांजवर दगड फेंकिले. इतकें झालें तेव्हां मंगळवारीं अधिकारी अमळ जागे झाले. पार्लमेंतासभोवतीं त्या दिवशीं पुनः गर्दी जमली व त्यांनीं लार्ड सांडविच यास जखम करून त्याची गाडी मोडून टाकिली. तें पाहून लार्ड जार्ज गार्डनदेखील भ्याल्यासारखा झाला. कारण त्यानें असें प्रसिद्ध केलें कीं, प्राटेस्टंट सभा दंगेखोरांस मुळींच ओळखत नाहीं. कर्नल हर्बर्टनें त्यास जाऊन सांगितलें कीं, टोपीवरची फीत मुकाट्यानें काढून टाकिलीस तर बरें. कर्नल हर्बर्ट तरवारीचा धड होता व वचनाचाहि धड होता. तेव्हां गार्डननें मुकाट्यानें टोपीवरील फीत काढून खिशांत घातली. अधिकाऱ्यांनीं कर्नल गार्डन व कर्नल हर्बर्ट यांचें जर अनुकरण केलें असतें तर प्रकरण इतकें चेवलेंच नसतें. पण अद्यापिहि ते कांहीं करीनात. कामन्स सभेनें असा गुळमुळीत ठराव पास केला कीं दंगा दबला ह्मणजे प्राटेस्टंट अर्जाचा विचार केला जाईल, आणि लार्ड जार्जला घालवून देण्याबदल कोणी सूचना केली ती मान्य केली नाहीं.

तेव्हांपासून पुढें दोन दिवसपर्यंत दंगेखोरांनी सगळ्या लंदनांत धुमश्चक्री घातली. सर्व दिशा संध्याकाळीं जळणाऱ्या इमारतींनीं लाल भडक दिसूं लागल्या. जिकडे तिकडे दंगेखोरांनीं दारू पिऊन धुंद होऊन नासधूस करून टाकिली व लोकांस त्राहि त्राहि करून सोडिलें. मंगळवारीं संध्याकाळीं दंगेवाल्यांनीं मोठेंच साहसाचें कृत्य केलें. शुक्रवारीं पकडलेले कांहीं दंगेखोर न्यूगेटच्या तुरुंगांत नेऊन ठेविले होते. तिकडे गर्दी वळली, आणि त्याचा रक्षक एकर्मन ह्याजपाशीं किल्ल्या मागूं

लागले. तो दाद देईना, तेव्हां त्यांनीं तुरुंगास वेढा घातला. तो तुरुंग इतका मजबूत होता कीं, एक डझन माणसें जरी त्यास प्रतिरोध करण्यास तयार असतीं तरी त्याचा बचाव झाला असता. पण एकर्मन-शिवाय कोणी पुढें झाला नाहीं. तेव्हां दंगेखोरांनीं कुऱ्हाडी, पिकंदरें आणि विस्तव यांचा उपयोग करून आंत प्रवेश केला, आणि आपले कैदेंत असलेले साथीदार व इतर सर्व कैदी यांस मोकळें करून घेऊन त्यांस मोठ्या थाटानें घेऊन गेले. दुसऱ्या दिवशीं डा० जॉनसन तिकडे फिरत फिरत गेला तों तो तुरुंग जळतच होता. तें पाहून अर्थात् त्या पिकलेल्या पंडितास भोंवतालच्या भितऱ्या भुसारी दुकानदारांचा असें करूं दिल्याबद्दल मोठा राग आला.

एकीकडे दंगेखोरांची एक टोळी ह्याप्रमाणें दंगा करीत असतां, दुसरीकडे दुसऱ्या टोळ्या असेच प्रताप गाजवीत होत्या. उदाहरणार्थ, क्लार्केनवेल येथील नवीन तुरुंगाची दुसऱ्या एका टोळीनें हीच दशा केली, आणि तेथील कैद्यांस सोडून दिलें. दुसऱ्या एका टोळीनें सर जान फीलिंडगच्या घरावर हल्ला करून त्याचें सामान रस्त्यांत आणून जाळून टाकिलें. तिसऱ्या एका टोळीनें लार्ड मॉन्स्फील्डच्या घरावर हल्ला केला, व त्याचीहि तीच दशा केली. तो व त्याची बायको मोठ्या मारामारीनें बाहेर पडलीं. त्याचा कायद्यांच्या पुस्तकांचा फारच मोठा संग्रह होता; तो समग्र जाळून फस्त केला. ही मंगळवारची गोष्ट. बुधवारींही लंदनांत तीच स्थिति होती. दंगेखोर आतां जास्तच धिटाई करूं लागले. ते तुरुंगाच्या अधिकाऱ्यांना आणि क्यॅथलिक घरवाल्यांना स्पष्ट निरोप पाठवूं लागले कीं, आह्मी अमुक अमुक वेळीं तुमच्यावर हल्ला करण्यास येणार आहों. तेव्हां सर्व लोक अगदीं भयभीत झाले. सर्व दुकानें बंद झालीं. पुष्कळ भितरे लोक आपल्या घरांस इजा होऊं नये ह्मणून खिडक्यांतून निळीं निशाणें फडकवूं लागले व दरवाजांव-रून "नो पोपरी" ( क्यॅथलिक धर्म आह्मांस नको ) अशीं अक्षरें खडूनें लिहून ठेवूं लागले. अशा तऱ्हेची कांहीं खूण ज्या घरांवर नव्हती

त्यांचा दंगेखोरांनीं जाळून फन्ना केला, व तुरुंगाचीही तीच दशा उडविली. संध्याकाळीं सर्वत्र लखलखाट होऊन गेला. तेव्हां मग अधिकारी जागे झाले, व त्यांनीं बंदोबस्ताकरितां लष्कर आणिलें. कांहीं लोक पळून गेले; कांहींनीं आपल्या बंदुका भरिल्या व तरवारीस धार दिली; आणि दुसरे कांहीं खिशांत हात घालून रस्त्यांतून दंगेखोरामागून भटकूं लागले, व मजा काय होते ती पाहूं लागले, व त्याचें टिपण करूं लागले.

ह्या सर्व गडबडींत राजा मुळींच गडबडला नाहीं किंवा घाबरला नाहीं हें सांगण्यास आनंद वाटतो. हानोवरचें सर्वच घराणें धीट असे, पण ह्या प्रसंगीं तो धीटपणा जसा उत्तम रीतीनें दृष्टीस पडला तसा दुसऱ्या केव्हांच नसेल. प्रसंग मोठा कठीण होता; पण राजानें मोठा धीर दाखविला. त्याचें प्रिव्हिकौन्सिलही घाबरून गेलें; पण त्यानें धीर सोडिला नाहीं. मॅजिस्ट्रेटांचा भितरेपणा पाहून त्यास फार वाईट वाटलें व तो आपल्या छातीवर हात ठेवून असेंही ह्मणाला ह्मणून ह्मणतात कीं, एक तरी मॅजिस्ट्रेट आपलें कर्तव्य करण्यास तयार आहे याचा मला आनंद वाटतो. तसाच त्याचा अटर्नी जनरल वेडर्बर्न यानेंही या प्रसंगास फार योग्य असें वर्तन केलें. नेहमीं दंग्याच्या वेळीं मॅजिस्ट्रेटाच्या हुकमाशिवाय दंगेखोरांवर गोळी घालण्याचा लष्करास अधिकार नसतो. पण सध्याचा विलक्षण प्रसंग ध्यानांत आणून त्यानें मुख्य सेनापति लार्ड आह्मर्स्ट यास तसें करण्याचा लेखी अधिकार देऊन टाकिला, आणि तेव्हांपासून दंगा अमळ निवूं लागला.

वरील बंदोबस्त अगदीं योग्यच वेळीं झाला. कारण त्या दिवशीं ब्यांक आफ इंग्लंड ही पेढी फोडण्याकरितां दंगेखोरांनीं दोनदां यत्न केले; पण अगोदरच योग्य खबरदारी घेतलेली असल्यामुळें न्यूगेट-सारखी स्थिति झाली नाहीं. ब्यांकेसभोंवतीं लष्कर हजर असल्यामुळें त्यांनीं दंगेखोरांस दोन्ही प्रसंगीं हांकलून लाविलें. जर ब्यांक फुटली असती तर प्रकरण फारच जास्त विकोपास गेलें असतें. पण ते यत्न फसले, व तेव्हांपासून दंगा निवाला. तथापि या दिवशीं दंगेखोरांनीं

सर्वांत भयंकर अशी एक गोष्ट केली. हालबर्नमध्यें लांग्डेल नांवाच्या एका क्यॅथलिकाच्या दारूच्या मोठाल्या भट्ट्या होत्या, त्यांच्यावर दंगेखोरांनीं हल्ला करून त्यांस आग लावून दिली. तेव्हां दारूच्या नद्या सर्व नळांतून वाहूं लागल्या, व त्यांनीं पेट घेतला. दारू पिऊन धुंद झालेले दंगेखोर ती पिण्याचा यत्न करूं लागले, आणि भाजून मेले. इकडे लष्कर त्यांस हाकलून लावीतच होतें, आणि जे न ऐकतील त्यांस गोळ्या घालून ठार करीत होतें. अशा रीतीनें तो आठवडाभर चालू असलेली आग जणूं काय रक्तानें विझली. गुरुवारीं जिकडे तिकडे शांत झालें. दुकानें अद्यापि उघडलीं नव्हतींच; पण दंगा नाहींसा झाला होता.

हा दंगा शमवण्यामध्यें दंगेखोरांपैकीं किती दगावले हें बरोबर कधींच समजलें नाहीं. सरकारी आंकडे प्रसिद्ध झाले त्यांत २८५ मेले व १७३ स मोठ्या जखमा झाल्या असें नमूद होतें. पण पुष्कळ मेलेले व दुखावलेले दंगेखोर त्यांच्या मित्रांनीं व नातेवाईकांनीं मुकाट्यानें उचलून नेले असतील. पैशाचें एकंदर नुकसान एक लक्ष ऐंशी हजार पौंडांचें झालें ह्मणून ह्मणतात. ह्या सगळ्यास कारण अधिकाऱ्यांनीं प्रथम दाखविलेला दुबळेपणा हा होय. शिवाय पुढें दंगेखोरांवर खटले केले त्यांत ४९ स देहान्त शिक्षा सांगितली, पण २९ सच अखेरीस फाशीं दिले. जान विल्क्स असें ह्मणाला कीं मी जर राजा असतों तर सगळ्या दंगेखोरांस फांसावर चढविलें असतें.

अखेरीस लार्ड जार्ज गार्डन यास ९ तारखेस पकडिलें. वास्तविक रीत्या त्यास प्रारंभींच कैद करावयास पाहिजे होतें. पण त्यास आतां पकडतांनाहि पुनः चुकी केलीच. त्यास एखाद्या साध्या तुरुंगांत न पाठवितां लंडन टावरमध्यें पाठविलें, आणि दंगा अगदीं शमला असूनहि त्याच्याबरोबर मोठें लष्कर पाठविलें. अशा रीतीनें त्यास नसतें जास्त महत्व दिलें. पुढें त्याच्यावर राजद्रोहाचा आरोप ठेवून १७८१च्या फेब्रुवारींत त्याची चवकशी केली; त्या वेळीं दंग्याची कोणास आठवणदेखील

राहिली नसेल. त्यास अर्स्किन, केनियनसारखे प्रसिद्ध वकील मिळाले होते. अखेरीस त्यास निरपराधी ठरवून सोडून दिलें. यास कारण आरोप मोठा ठेविला हें उघडच आहे. पुढें १७८७ सालीं फ्रान्सची राणी व फ्रेंचांचा वकील यांची बेअब्रू केल्याचा आरोप त्याजवर शाबीद झाला. तेव्हां तो हालंडास पळून गेला. डच सरकारानें त्यास पकडून इंग्लिश सरकाराच्या हवालीं केलें. तेव्हां त्यास न्यूगेटच्या तुरुंगांत घातलें. तेथें त्यानें बरींच वर्षें घालविलीं, आणि ख्रिस्ती धर्म सोडून यहुदी धर्माचा स्वीकार केला. पुढें तेथें तो ता. १ नवंबर १७९३ रोजीं मेला. त्यावेळीं त्यास अवघीं ४२ वर्षें झालेलीं होतीं. अशा रीतीनें ही वेडी कारकीर्द पुष्कळ नुकसान करून अखेरीस संपली.

---

## प्रकरण विसावें.

# पिट, फॉक्स व शेरिडन.

ज्या १७८० सालीं गोर्डन दंगे उद्भवले, त्याच सालीं दोन नवे गृहस्थ पार्लमेंतांत शिरले. ते दोघेहि तरुण होते. त्यांचे दोघांचेहि बाप आजे आधींच प्रसिद्धीस आलेले होते. ते दोघेहि पुढें फार उदयास यावयाचे होते. त्यापैकीं एकजण मोठा विद्वान् व होतकरू आहे, आणि वयाच्या विसाव्याच वर्षीं त्यास मुत्सदी व महा-पंडित यांचें उत्तम ज्ञान प्राप्त झालेलें आहे, ही गोष्ट त्याच्या कुटुंबांतील माणसें व त्याचे निकट स्नेही एवढ्यांसच माहीत होती. दुसरा पहिल्या-पेक्षां आठ वर्षांनीं वडील असून तो यापूर्वींच कांहीं दिवस जगा पुढें आला होता. कारण त्यानें कांहीं नाटकें अगोदरच लिहून प्रसिद्ध केलेलीं होतीं. कामन्स सभेस ज्यावेळीं नवीन माणसें व नवीन तरतरी यांची जरूरी होती त्यावेळीं विलियम् पिट आणि रिचर्ड ब्रिन्स्ले शेरिडन हे एकदम पार्लमेंतांत शिरले ही मोठी सुदैवाची गोष्ट होय.

असें ह्मणतात कीं, ईलियड वाचूं लागलें ह्मणजे वाचकांस पहिल्यापा-सूनच ह्या किंवा त्या कोणत्या तरी एका पक्षाबद्दल सहानुभूति उत्पन्न होते, व तेव्हांपासून तो एक ग्रीक बनतो किंवा ट्रोजन बनतो. तिसऱ्या जार्जाचा इतिहास वाचूं लागलें ह्मणजे बहुधा तशीच स्थिति होते. त्या वेळेला दोन मुत्सदी पुष्कळ वर्षेंपर्यंत पुढें पुढें असून प्रत्येक महत्वाच्या प्रश्नाच्यासंबंधानें त्यांच्यांत अगदीं मतविरोध असे; आणि त्यामुळें इंग्लिश लोकांत राजकीय प्रश्नांच्यासंबंधानें जे दोन तट तेव्हां होते व हल्लींहि आहेत, त्यांचे ते उत्तम प्रतिनिधी होते. अठराव्या शतकां-तील शेवटचीं शेवटचीं वर्षें आणि एकोणिसाव्या शतकांतील प्रथमारं-भाचीं कांहीं वर्षें ह्यांचा इंग्लंदचा इतिहास ह्मटला ह्मणजे ह्या दोन

माणसांचाच इतिहास मुख्यत्वेंकरून होय. इंग्लंदांतील राजकीय पक्षाचा जो इतिहास आहे तो विरुद्ध तटांचे जे नामांकित अग्रणी त्यांच्यामधील फार दिवसांच्या व फार महत्वाच्या चढाओढीचाच इतिहास बहुधा असतो. कांहीं वर्षांपूर्वी ग्लॅडस्टन आणि डिझरायली यांच्यामध्यें जशी पुष्कळ वर्षें अगदीं बेतून राहिलेली असे, तशी शंभर वर्षांपूर्वी चार्लस जेम्स फॉक्स आणि विलियम पिट यांजमध्यें बेतून राहिलेली असे. ज्यास हल्लीं आपण लिबरल तत्त्वें ह्मणून ह्मणतों त्यांतील सर्व जोम आणि जोर यांचा तेव्हांचा अत्युत्तम प्रतिनिधि लार्ड हालंडचा पुत्र हा असे; आणि ज्यास आपण कान्सर्व्हेटिव्ह तत्वें ह्मणून ह्मणतों त्यांचें उत्तम प्रतिबिंब लार्ड चॅथमचा पुत्र याच्यामध्यें दृष्टीस पडतें.

ह्या दोन माणसांचीं मतें जशीं भिन्न होतीं तशीं हीं दोन माणसेंहि परस्पर भिन्न असत. फॉक्सचें मूलवय व प्रथम तारुण्य हीं निष्काळजी-पणाचीं व गैरमार्गाचीं असून पिटचें तारुण्य गंभीर आणि थंड असें असे. फॉक्सच्या अंगांत शारीरिक उत्साहाचें अगदीं वैपुल्य असून पिट अगदीं भिडस्त व निष्काम असा असे. एकास डोंगर आणि दऱ्या शोधून काढणें, आणि फळबागा व फुलबागा ह्यांतून रेंगाळणें हें आवडे आणि दुसरा सरळ मार्गानें जाऊन सरळ मार्गानें परत येणारा माणूस होता. त्यांच्या मनांप्रमाणें त्यांचीं बाह्यस्वरूपेंहि अगदीं भिन्न असत. फॉक्स अतिशय लठ्ठ असून अतिशय गबाळ्या असे; त्याला नीटनेटकेपणाची मुळींच चाड नसे, आणि त्याच्या हनवटीवर व गालावर तीन दिवसांची दाढी वाढलेली असे ( इंग्लिश लोक रोज दाढी करतात ); तरी तो अत्यंत गोडा माणूस असे. त्याला शिक्षण अत्युत्तम मिळालेलें असून तो मनाचा अत्यंत कोमल असे; तथापि तो बाहेरून कधीं कधीं दांडगा व निर्दय दिसे, पण केवळ बाहेरूनच. पिट अंगानें सडपातळ असे, पोर दिसे, पोषाकांत वगैरे अगदीं नीटनेटका असे; त्याचा नेहमींचा स्वभाव अगदीं धिमा असून कधीं कधीं

त्याच्यावर थट्टामस्करीचें तेज पडे; तो वयाच्या मानानें वृद्ध दिसे. त्याचें आत्मनियंत्रण अगदीं कडक असे; त्याच्यामध्यें शोभादायक असें कांहींच दिसत नसे; तरी त्याच्या अंगीं एक प्रकारची मनोवेधकता असेच. पळपुटें प्रेम, शारीरिक प्रेम, चोरटें प्रेम, सभ्य प्रेम आणि टिकाऊ प्रेम वगैरे पुष्कळ प्रकारच्या प्रेमांचा फॉक्स भोक्ता होता. मोहपाश फार असूनही पिट एकाद्या तपस्व्यासारखा आचरणानें फार कडकडीत असे. एका काळीं त्याच्या मित्रांनीं त्यास आग्रहदेखील केला कीं, सध्याच्या लोकस्थितीस अनुसरून तूं एकदां तरी पण्यांगनेच्या हातांत हात घालून लोकांपुढें ये; पण त्यानें त्यांच्या आग्रहास भीक घातली नाहीं. त्याच्यासंबंधानें प्रेमकथाहि काय ती एकच आहे; तिजपासून सुख कोणालाच झालें नाहीं, व तें अद्यापि अनुत्कलित गूढच आहे. त्या दोघांच्या दोनच सामान्य अभिरुची होत्या. त्यांच्या पिढींतील व शतकांतील पुष्कळ सभ्य गृहस्थांमध्यें त्या दृष्टीस पडत असत. त्या अभिरुची मद्यपान आणि राजकारण ह्यांबद्दल होत. हालंदचा मुलगा आणि चॅथॅमचा मुलगा ह्या तऱ्हेचीं जीं माणसें असत तीं शिपायाच्या किंवा खलाशाच्या धंद्यांत न शिरलीं तर बहुधा राजकारणांत शिरत; आणि वरील धंद्याचींदेखील बरींच माणसें शिवाय त्या धंद्यांत शिरत. तात्पर्य, राजकारणांत शिरणें किंवा पार्लमेंताचा सभासद होणें ही गोष्ट युनिव्हर्सिटींत शिरणें किंवा पारधींत शिरणें ह्यासारखी त्यांस अगदीं स्वाभाविक असे. या दोघांच्या संबंधानें तर असें झालेलें होतें कीं, त्यांना राजकारणाच्या शिक्षणाचें जणूं काय बाळकडूच मिळालेलें होतें. दाईखान्याच्या उंबरठ्यापासून तों सेंट स्टीफनच्या ( पार्लमेंतगृहाच्या ) उंबरठ्यापर्यंतचा मार्ग जणूं काय पहिल्यापासून अगदीं ठरलेला होता. जो मुलगा ज्या वयांत दुसरी मुलें अक्षरओळख करूं लागतात त्या वयापासून बापाचा अगदीं बरोबरीचा संवगडी बनलेला होता, आणि जो मुलगा संभाषणकलेचीं तत्वें आणि वादविवादाचें रहस्य प्रत्यक्ष मोठ्या कॉमनरच्या तोंडून शिकला होता, त्या मुलांना मुत्सद्दीपणाचें शिक्षण आणि राज्य-

कर्तृत्वाचें ज्ञान हीं विशेष अनुकूल तऱ्हेवर मिळालेलीं होतीं असें ह्मटलें पाहिजे. आतां दुसरी जी अभिरुचि किंवा व्यसन त्यापासून अलग राहणें हें त्या काळच्या माणसांना बहुतेक दुरापास्तच असे. जें मद्य त्याच्या बापाचा फार दिवसांचा मित्र आणि अलीकडील शत्रू जो रिग्बी त्यापासून तों वृद्ध कामगार, जुगाऱ्या आणि पत्रलेखक सेल्विन ह्याच्यापर्यंत त्याला जे जे माहीत होते त्या सर्वांस प्रिय असे, त्याच्या अभिरुचीपासून फॉक्स जर मुक्त असता तर मोठा चमत्कारच झाला असता. लहानपणीं अशक्त असून पोर्ट वाइनच्या पूरांवर निभावलेला जो पिट त्यानें ज्या सुखकर मद्याच्यायोगानें त्यास आपली जाणारी शक्ति कायम राहीलसें वाटे, त्या मद्यापासून मुक्त राहणें हें तर केवळ अशक्यच होतें. हर्क्युलिसलादेखील जी जास्त झाली असती इतकी दारू पिऊन तिच्या धुंदींत कामन्स सभेस येणें हें दुर्व्यसनी फॉक्स ह्याच्यासंबंधानें जितकें योग्य समजलें जात असे, तितकेंच शुद्ध आचरणाचा जो पिट त्याच्यासंबंधानेंहि समजलें जात असे. पुष्कळ बाटल्यांच्या त्या दिवसांतदेखील मुत्सद्यांमध्यें मितपान माहीत नव्हतें असें नाहीं. कारण फॉक्स, पिट व शेरिडन यांस जसा कोणी त्यांच्या अमितपानाबद्दल दोष देत नसे, तसेच बर्क याचे त्याच्या मितपानाबद्दल कोणी गुण गात नसे.

विलियम पिट ह्याचा जन्म १७५९ त झाला असून त्या वेळीं दुसरा जार्ज गादीवर स्थिर बसलेला दिसत होता, आणि ज्याची नोकरी चॅथमचा पुत्र करणार होता त्या नातवाबद्दल जगास कांहीं एक माहीत नव्हतें. तो चवथें मूल असून दुसरा मुलगा होता; आणि चॅथमचा तिसरा मुलगा व शेवटचें मूल याचा जन्म नंतर दोन वर्षांनीं व्हावयाचा होता. विलियम पिट अगदीं बाळपणापासून नाजूक असे, ह्मणून त्यास शाळेस कधींच पाठविलें नव्हतें. त्यास शिक्षण खाजगी रीतीनें दिलेलें असून त्याजवर बापाची प्रत्यक्ष नजर असे. पाहिल्यापासून त्याची बुद्धि वयाबाहेर दिसत असे. तो फार होतकरू दिसे, व तो कृतिकरहि असे. तो फार उत्सुकतेनें व दृढतापूर्वक ज्ञान संपादन करी. तो जें शिके तें

तो चांगलें व पूर्णपणें शिके. सार्वजनिक कामास लागणाऱ्या गोष्टींचा पाढा त्यास पाळण्यापासून मिळालेला असल्यामुळें अभिरुचि जाणण्याचें व संकल्प बनविण्याचें जेव्हां त्याचें वय झालें तेव्हांपासून तो सार्वजनिक कामासाठीं सर्वप्रकारची तयारी करूं लागला. सारांश, जेव्हां मोठा चॅथॅम निवर्तला तेव्हां त्यानें आपल्यामागें आपल्यासारखाच प्रसिद्ध होणारा मुलगा ठेवून दिला; तो मुलगा त्याच्याच पद्धतीनें शिकलेला होता. त्याचाच उपदेश त्यानें घेतलेला होता. त्याचेंच उदाहरण त्याच्यापुढें होतें. एक दंतकथा अशी आहे---व ती कदाचित् दंतकथेपेक्षांही जास्त विश्वसनीय असेल--कीं, दैवानें पहिल्यापासून असें ठरविलेलें होतें कीं, फॉक्सची अचाट बुद्धि व कीर्ति ह्यांची पिट्च्या अचाट बुद्धीशीं व कीर्तीशीं टक्कर लावावयाची. असें ह्मणतात कीं, फॉक्सच्या नातेवाईकांस कोणी खात्रीपूर्वक असें सांगितलें कीं, चॅथॅमचा जो लहान मुलगा हल्लीं शिक्षकाच्या हाताखालीं शिकत आहे त्याची बुद्धि अशी कांहीं दिसतें कीं, तो लार्ड हालंदचा ताईत जो विलक्षण बुद्धीचा पुतळा फॉक्स त्याच्याशीं भयंकर स्पर्धा करूं शकेल. पिट्ची पक्क समजूत आणि उत्सुक बुद्धि यांची तरुण फॉक्स यास लहानपणींच ओळख झाली होती हें मात्र खरें आहे. एके रात्रीं तो व पिट हे लार्डांच्या सभेच्या ग्यॅलरींत एकत्र उभे राहण्याचा योग आला होता. तेथें चाललेला वादविवाद पिट फार लक्ष लावून ऐकत आहे असें त्याच्या दृष्टीस पडलें. तसेंच चाललेल्या वादावर शहाणपणानें टीका करितांना आणि त्याच्या विकास पावणाऱ्या बुद्धीस जीं प्रमाणें खात्रीचीं न वाटतील त्यांजवर फार जलद आक्षेप काढितांना पाहून त्यास मोठा विस्मय वाटला. पिट शाळेंत होता तेव्हांपासूनच त्याला कामन्ससभेची आवड उत्पन्न झाली; तो कामन्ससभेंत शिरावा ही गोष्ट अनिवार्यच होती, आणि तेथें त्यानें कायद्याप्रमाणें वयांत येण्याच्या अगोदरच प्रवेशहि केला.

ग्रीकतत्त्ववेत्त्यांचें असें ह्मणणें असे कीं, योग्यता आणि ऋजुता हे गुण माणसाच्या वागणुकींत अवश्य पाहिजेत; ते दोन्ही पिटमध्यें उत्तम प्रकारें वसत होते. त्यानें सार्वजनिक कामांत पडण्याची

उत्साहानें व धिमेपणानें तयारी केली होती; महत्वाचा प्रसंग आला ह्मणजे तो उदात्तबुद्धीनें कमर बांधीत असे; त्यानें माणसाला बद्ध करणाऱ्या ज्या आशा त्यांचा विचारपूर्वक त्याग केलेला होता. आपल्यास भयंकर रोग जडलेला आहे हें लहानपणापासूनच त्यास माहीत असूनहि आणि त्याजवर आकस्मिक रीतीनें मोठे दारुण प्रसंग आले असतांहि त्यानें कधीं धीर सोडिला नाहीं. अशी त्याची वृत्ति व स्थिति असूनहि पुढें तो लवकर मरावयाचा होता त्याबद्दलचेंच नुकसान जणूं काय भरून निघण्यासाठीं त्याला जें सार्वजनिक कामांत थोडक्या वयांतच इतकें यश मिळालें, यामुळें त्याच्या एकंदर चरित्रास एकप्रकारची विलक्षण शोभा आलेली आहे. आपल्या समकालीनांचें प्रेम आपल्यावर प्रबल रीतीनें ओढून घेणें हें त्याच्या इतकें फारच थोडक्यांस साधतें. ज्या गुणांमुळें इतर लोक इंग्लिश लोकांचा द्वेष करितात पण दराराहि बाळगितात, ते गुण ह्याच्या अंगीं पूर्णपणें वसत आहेत असें ह्याच्याबद्दल इतर राष्ट्रांस जितकें वाटत होतें तितकें इतर थोड्याच मुत्सद्यांबद्दल वाटत असेल. राजकीयविषयक त्याची उपजत बुद्धि फार उत्कृष्ट होती, आणि तिसऱ्या जार्जापेक्षां अधिक विचारी, अधिक समंजस आणि अधिक शहाणा अशा राजाची प्रधानकी करण्याचें जर त्याच्या नशिबीं आलें असतें, तर त्याचें नांव जगांतील जे मोठे सुधारक त्यांच्या यादींत खचीत पडलें असतें. घरीं अविचारी आणि अयोग्य अशा राजाच्या ह्मणण्यास अयोग्य असतां मानडोलवणें आणि बाहेर यूरोपांतील अत्यन्त बलाढ्य आणि अत्यन्त हुशार अशा विजेत्याशीं इच्छेविरुद्ध गांठ पडणें, येणेंकरून, परिस्थिति इतकी एकसारखी प्रतिकूल नसती तर जें स्थान पिटला त्याच्या कुशाग्र बुद्धीमुळें प्राप्त झालें असतें, तें स्थान त्यास प्राप्त झालें नाहीं. त्यावेळच्या परिस्थितींतच जें स्थान त्यास प्रत्यक्ष प्राप्त झालें तें तरी मोठेंच होतें.

पिटबरोबर जो दुसरा नवा माणूस पार्लमेंतांत शिरला तो फॉक्स-इतकाच त्याच्याहून भिन्न होता. यावेळीं पिटची जरी थोडक्यांसच

माहिती होती, तरी शेरिडनबद्दल प्रत्येकास थोडी बहुत माहिती होतीच. शेक्सपियरच्या नंतरचा हा अत्यन्त प्रसिद्ध नाटककार. आपणास चतुर ह्मणविणाऱ्या पिढींपैकीं जो हा अत्यन्त चतुर माणूस, वक्तृत्व ह्मणजे एक अत्यन्त मोठी कला होय असें मानणाऱ्या युगांपैकीं अत्यन्त उत्कृष्ट जो हा वक्ता, आणि जें शतक जगाच्या सर्व भागांतून विनोदाच्या आवडीबद्दल प्रसिद्ध होतें त्यांतील जो हा अत्यन्त विनोदी माणूस, तो लहान असतां त्यास मंदमति व टाकाऊ ह्मणून समजत, आणि हा फार आळशी व निष्काळजी आहे असें ह्मणत, हें ऐकून ज्यांच्या गुणांचें चीज होत नसेल त्यांस कदाचित् कांहीं समाधान वाटण्याचा संभव आहे.

शेरिडनचा आजा डा. टामस शेरिडन, जो स्विफ्टचा स्नेही असून डब्लिन येथें उपदेशकाचा व शाळामास्तराचा धंदा करीत असे, तोहि फार आनंदी, अगदीं बेफिकीर, गबाळ्या व गरीब असा माणूस असे. त्याचा बाप टामस शेरिडन हाहि तितकाच आनंदी व तितकाच निष्काळजी माणूस असे, तो नाटकांत सोंग घेत असे, आणि लोकांस वक्तृत्वाची कला शिकवीत असे; त्यानें जिच्याशीं लग्न केलें होतें ती कादंबऱ्या लिहित असे, आणि तिनें स्विफ्टचें एक चरित्र लिहिलें होतें. एकवेळीं तो डा. जानसनचादेखील स्नेही असे. पण त्याच्याबद्दल विशेष ध्यानांत ठेवण्यासारखी गोष्ट ही होती कीं, तो आपल्या मुलाचा बाप होता. त्याच्या किंवा त्याच्या बायकोच्याही ध्यानांत हा मुलगा आपणांस किती धन्य करणार आहे हें आलेलें दिसत नाहीं. मिसेस शेरिडन आपल्या दोन मुलांबद्दल एकदां असें ह्मणाली होती कीं, असले काळवत्री दगड मी पूर्वी कधींही पाहिले नव्हते. तथापि बापानें दोघांही मुलांना हारो येथील प्रसिद्ध शाळेंत पाठविण्यापुरते पैसे कसेंतरी करून जमविले, आणि सुदैवानें डा. पार ह्यानें ताडिलें कीं, रिचर्डच्या अंगीं कितीही दोष असले तरी तो कांहीं अगदीं फत्तर नाहीं. तो आणि तेथील हेडमास्तर सम्नर ह्यांच्या ही गोष्ट लवकरच लक्षांत आली कीं, रिचर्डच्या अंगीं

बुद्धि पुष्कळ आहे. तिला पक्कदशेस आणण्याचें सामर्थ्य त्यांच्यापैकीं एकाच्याहि अंगीं नव्हतें.

हारो येथील शाळेंतून निघाल्यावर शेरिडन लंदन येथें गेला, व तेथून बाथ येथें गेला. लंदनमध्यें असतां तो कांहीं जास्त उद्योग करण्यास किंवा काळजीपूर्वक अभ्यास करण्यास शिकला नाहीं. त्यास ग्रीक भाषेंतील गद्य ग्रंथांचीं इंग्रजींत पद्य भाषांतरें करण्यांत मात्र गोडी वाटे, व त्या कामीं त्याचा मित्र व शाळासोबती हालहेड हा त्यास मदत करी. हा धंदा सोडून पुढें ते दोघे दुसऱ्याच एका उद्योगास लागले, व तेथेंहि ऐकमत्यानेंच लागले. कारण ते दोघेहि मिस लिनले नांवाच्या एका तरुणीवर एकदम प्रेम करूं लागले. ती अत्यंत सुंदर होती, व त्यामुळें तरुण व वयस्क असे बरेच लोक तिच्या नादीं लागले होते. अखेरीस तिनें ह्याच्याशींच लग्न केलें, आणि हालहेड निराश होऊन हिंदुस्थानांत निघून गेला, आणि पुष्कळ वर्षे जगून पुढें पार्लमेंटाचा सभासदहि झाला. तो १८३० सालीं मेला. त्यानें बंगाली भाषेचें एक व्याकरण केलेलें असून वॉरन हेस्टिंग्सच्या सांगण्यावरून हिंदुधर्मशास्त्राचें एक कोड त्यानें तयार केलें होतें.

लग्नानंतर शेरिडन कायद्याच्या नादास कांहीं दिवस लागला, पण त्याला गोडी दुसऱ्याच विषयाची होती. तदनुसार " धि रायव्हल्स " ( The Rivals ) हें त्याचें पहिलें नाटक १७७५ सालीं रंगभूमीवर आलें, आणि तेव्हांपासून नाटककलेच्या इतिहासांतील एका नव्या भागास सुरवात झाली. १७७७ सालीं त्याचें अतिप्रसिद्ध नाटक जें " धि स्कूल फॉर स्कॅन्डल " ( The school for scandal ) तें प्रसिद्ध झालें, आणि त्याच्यामागून " धि क्रिटिक " ( The Critic ) हें प्रसिद्ध झालें, पण चमत्कार असा कीं, हीं तीन उत्तम नाटकें लिहिल्यावर त्यानें पुनः एकहि नाटक लिहिलें नाहीं.

त्यानें तो धंदा तितकाच सोडून एकदम एक नवाच धंदा पत्करिला. तो एकदम राजकारणांत शिरला. तत्पूर्वीं त्यानें राजकीय विषयांवर

कांहीं छोटेखानी लेख लिहून प्रसिद्ध केले होते. मात्र या विषयाचें अध्ययन तो नेहमींच फार उत्साहपूर्वक करीत असे. १७८० सालीं त्यास या कामीं पुढें येण्यास संधि सांपडली, आणि स्टाम्फर्ड नांवाच्या शहरचा प्रतिनिधि होऊन तो पार्लमेंतांत शिरला. याचवेळीं कर्मधर्मसंयोगानें त्याची आवडती व सुंदर बायको वारली. तेव्हां त्यास अत्यंत दुःख झालें, पण तें हळू हळू कमी होऊन त्यानें मिस ओग्ल नांवाच्या एका स्त्रीशीं दुसरें लग्न केलें.

पिट जेव्हां पार्लमेंतांत शिरला तेव्हां इंग्लंद मोठ्या अडचणींत सांपडलें होतें, आणि प्रधानमंडळ मोठ्या धोक्यांत पडलें होतें. १७८१ जानेवारींत नार्थ अद्यापि अधिकारारूढ होताच, त्याला राजाचा अद्यापि आश्रय होताच; आणि अमेरिकेशीं चाललेल्या लढाईतून इंग्लंद कसें तरी अब्रूनें पार पडेल ह्मणून त्यास कांहीं अल्पस्वल्प आशा होतीच पण पुढें नवंबरांत कार्नवालीस यार्कटौन येथें शत्रूचे हस्तगत झाला ही अनिष्ट बातमी जेव्हां येऊन थडकली, तेव्हां नार्थ लागलाच खालीं घसरला. त्या दहा महिन्यांत पिटनें कामन्स सभेंत अगोदरच आपलें नांव केलें होतें. तो आतां केवळ पिटचा मुलगा नव्हता; तो स्वतःच पिट बनला होता. तो विरुद्ध पक्षास जाऊन मिळाला होता; त्या पक्षास त्या वेळीं पुष्कळ नामांकित माणसें होतीं, तरी याच्या येण्यानें त्यानें त्यास शोभा आणिली. विरुद्ध पक्षाच्या अग्रणींनीं ही गोष्ट उदार बुद्धीनें लागलीच कबूल केली. पार्लमेंतांतील पहिल्या प्रतीच्या माणसांपैकीं हा एक आहे असें फॉक्सनें लवकरच आपलें मत जाहीर केलें, कारण विलक्षण बुद्धीचा अंकुर कोठें दिसला ह्मणजे त्याची वाखाणणी करण्याची त्याची नेहमींच तयारी असे. बर्क ह्मणाला, हा जुन्या खोडाचा केवळ तुकडा नव्हे, तर प्रत्यक्ष जुनें खोडच आहे. ही स्तुति फार मोठी होती, पण अपात्रीं नव्हती. जेव्हां लार्ड नार्थच्या च्युतीनंतर राजास व्हिग पुढाऱ्यांस आमंत्रण करणें भाग पडलें. तेव्हां पिटला स्वतः आपणास इतकी योग्यता आलेली वाटत होती कीं, त्यास जेव्हां प्रधानमंडळींत घेऊं लागले तेव्हां त्यानें हो ह्मणण्याच्या ऐवजीं नाहीं ह्मणून ह्मटलें.

या वेळीं राकिंग्घॅम पुनः मुख्य प्रधान बनला. या नव्या मंडळांत शेल्बर्न पक्षाचे व्हिग आणि राकिंग्घॅम पक्षाचे व्हिग या दोघांचाहि समावेश झाला. वालपोलच्या वेळेपासून चालत आलेला राजकीय तत्त्वांचा प्रतिनिधि राकिंग्घॅम हा होता, आणि चॅथमच्या वेळापासून चालू असलेल्या तत्त्वांचा खरा किंवा खोटा प्रतिनिधि शेल्बर्न हा होता. राजाला राकिंग्घॅमशिवाय केवळ शेल्बर्नला घेणें जास्त आवडलें असतें; पण शेल्बर्नचे अनुयायी थोडे असल्यामुळें त्याचा उपाय चालला नाहीं. शिवाय शेल्बर्न पुढारीहि चांगला नव्हता. बाकी त्याचीं मतें राकिंग्घॅमच्या मतांपेक्षां जास्त उदार अशीं होतीं. शिवाय तो लहानपणीं क्याम्पेन व मिन्डेन या लढायांत लढलेला होता; पण त्याच्या अंगीं प्रधानमंडळ बनविण्याचें सामर्थ्य नव्हतें. असो. या मंडळांत फॉक्स सेक्रेटरी आफ स्टेट झाला, बर्क सैन्याचा पेमास्टर जनरल झाला, शेरिडन अंडर सेक्रेटरी आफ स्टेट झाला. पिटला आयर्लंडाची दुय्यम खजिनदारी देत होते, पण त्यानें ती नाकारिली. तो आपली योग्यता जाणून असल्यामुळें दुय्यम प्रतीची जागा पत्करावयाची नाहीं असा त्यानें निश्चय केला होता. त्यास फार वेळ थांबावें लागलें नाहीं. राकिंग्घॅम मंडळ चारच महिने अस्तित्वांत होतें; पण तेवढ्या मुदतींत पिटनें प्रतिनिधि निवडण्याच्या पद्धतीमध्यें सुधारणा सुचवून आपल्यास प्रसिद्ध करून घेतलें. ती सूचना जरी २० मतांनीं नापास झाली तरी फॉक्स आणि शेरिडन यांना ती पसंत होती. शांतता आणि सुधारणा या गोष्टी पिटलाच नेहमीं अत्यंत आवडत असत. पुढें तो जो लढाईंत गुंतला व सुधारणेला प्रतिकूल झाला, ती दैवाची विचित्र करणी म्हटली पाहिजे.

१७८२ च्या लढाईंत राकिंग्घॅम मेल्यानंतर अमेरिकेंतील लढाईची व्यवस्था कशी लावावी याबद्दल फॉक्स व शेल्बर्न याजमध्यें मतभेद उत्पन्न होऊन फॉक्स, बर्क व राकिंग्हॅमचे बरेचसे अनुयायी जेव्हां प्रधानमंडळांतून निघाले, तेव्हां पिटनें जाणलें कीं, आपणास आतां पुढें

येण्यास योग्य संधि आली आहे. फॉक्सनें राजीनामा दिल्यामुळें शेल्बर्ननें पिटला फडणिशीची जागा देऊं केली, आणि त्यानें ती पत्करिली. त्या वेळीं तो केवळ तेवीस वर्षांचा होता व फॉक्स तेतीस वर्षांचा होता. पण एव्हांपासून पिट व फॉक्स यांजमध्यें जो विरोध उत्पन्न झाला तो पुढें ते दोघे मरेतोंपर्यंत कायमच होता.

पिटचा हा पहिला विजय वर्षभरहि टिकला नाहीं. फॉक्स आपल्या मनांत घोकत असलेल्या मोठाल्या सुधारणा बनवून आणण्याकरितां अधिकारारूढ होण्यास फार उत्सुक होता. ह्मणून त्यानें शेल्बर्न मंडळास खालीं आणण्याचा यत्न सुरू केला. त्या कामीं त्यानें नार्थचें साहाय्य घेतलें ही गोष्ट मात्र गैर केली. कारण नार्थचीं व त्याचीं मतें अत्यन्त भिन्न होतीं. शिवाय नार्थवर त्यानें आजपर्यंत इतके कडक हल्ले केलेले होते कीं, हे दोघे पुनः स्नेही बनतील ही गोष्ट संभवनीयच दिसत नव्हती. तथापि शेल्बर्न व पिट यांस खालीं ओढण्यासाठीं तो नार्थचा साथीदार होण्यास तयार झाला. शिवाय त्यानें बर्कलादेखील या अपवित्र दोस्तींत येऊन मिळण्यास मोहिनी घातली. तात्पर्य, ज्या दोघांच्या यत्नांमुळें नार्थ मुख्यत्वेंकरून अधिकारावरून खालीं आला होता तेच दोघे गृहस्थ, तो अधिकाराचा पूर्वींप्रमाणेंच दुरुपयोग करील हें माहीत असतांहि त्यास पुनः अधिकारावर आणण्यास कारणीभूत झाले. फॉक्स व नार्थ एकत्र मिळाल्याबरोबर शेल्बर्न अर्थात् एकदम खालीं आला, आणि राजालाहि ते दोघे सांगतील तसें मुकाट्यानें ऐकावें लागलें. कारण त्या दोघांचे मिळून अनुयायी पार्लमेंतांत फारच होते. अशा रीतीनें ज्यास कोडबोळें प्रधानमंडळ ह्मणून ह्मणतात तें बनलें. पण तें राजासहि आवडलें नाहीं किंवा लोकांसहि आवडलें नाहीं. अमेरिका गेल्यापासून राजा नार्थचा तिरस्कार करीत होता, आणि फॉक्स लिबरल बनल्यापासून त्याचा तो द्वेष करीत होता. लोकांसहि शुद्ध आचरणाचे लिबरल फॉक्स व बर्क, नार्थसारख्या नीच व हांजी हांजी करणाऱ्या टोरीस जाऊन मिळाले हें मुळींच आवडलें नाहीं. याचा परिणाम अर्थात्

असा झाला कीं, ह्या नव्या प्रधानमंडळास पार्लमेंतांत बहुमताचा एवढा पाठिंबा असतां तें त्या मानानें लवकरच खालीं आलें, व त्यापुढें फॉक्सला नेहमीं अधिकारापासून दूरच राहवें लागलें. राजा तर इतका चिडला कीं, तो या प्रधानांच्या हातून नोकरी घेण्याच्या ऐवजीं हॅनोवरला जाण्यास तयार झाला. पण लार्ड थर्लोनें त्यास हळूच असें सुचाविलें ह्मणून ह्मणतात कीं, हॅनोवरला जाणें जितकें सोपें आहे तितकें तेथून इंग्लंदास परत येणें सोपें नाहीं. तेव्हां त्यानें तो विचार तितकाच ठेविला. असो.

पिटनें अधिकारच्युत झाल्याबरोबर पार्लमेंतीय सुधारणेबद्दलचा आपला विचार पुढें आणिला. त्यानें सभेस असा ठराव पास करण्यास सुचविलें कीं, यापुढें निवडणुकींचे वेळीं लांच आणि खर्च हे बंद करण्याचे उपाय योजणें फार अवश्यक आहे. तो असें ह्मणाला कीं, यापुढें ज्या गांवांतील बहुपक्षानें निवडणुकीचे वेळीं लांचाचा पाहिजे तसा उपयोग केल्याचें पार्लमेंतानें नेमलेल्या निवडक कमेटीस आढळून येईल, त्या गांवच्या लोकांचा मत देण्याचा अधिकार काढून घ्यावा, आणि या लांचाच्या प्रकरणापासून तेथील जो न्यून पक्ष अलिप्त असेल त्यास तो गांव ज्या जिल्ह्यांत असेल त्या जिल्ह्याच्या निवडणुकीच्या वेळीं मतें देण्याचा अधिकार द्यावा. त्यानें असेंहि सुचविलें कीं, जिल्ह्यांतील नैट लोक आणि लंदनचे लोक यांस कांहीं प्रतिनिधि नेमण्याचा अधिकार द्यावा. ह्या त्याच्या सूचना १४९ विरुद्ध २९३ ह्या बहुमतानें नापसंत ठरल्या. पण ह्यानें नव्या मंडळास फायदा झाला नाहीं; कारण सुधारणेस फॉक्स व त्याचे साथीदार ह्यांनीं प्रतिकूल व्हावें हें त्याच्याच पुष्कळ विचारवंत अनुयायांस बरें वाटलें नाहीं.

ह्या कोडबोळे प्रधानमंडळाच्या ज्या एका बिलानें तें मुख्यत्वेंकरून संस्मरणीय झालें आहे, तें बिल ह्मटलें ह्मणजे फॉक्सचें इंडिया बिल हें होय. खरोखर पाहिलें तर हीं दोन बिलें होतीं. पहिल्याचा उद्देश असा होता कीं, सात कमिशनरांचा मिळून एक बोर्ड स्थापावा; त्यांच्याकडे ईस्टइंडिया कंपनीच्या सर्व इस्टेटीची पाहिजे तशी व्यवस्था

करण्याचा, आणि त्या कंपनीचे हिंदुस्थानांतील सर्व कामगार नेमण्याचा व काढण्याचा पूर्ण अखत्यार चार वर्षेंपावेतों असावा, आणि प्रधानमंडळ बदललें तरी चार वर्षेंपावेतों ही व्यवस्था बदलूं नये. कंपनीच्या व्यापाराची व्यवस्था करण्याचें काम एका डिरेक्टरांच्या कौन्सिलाकडे असावें, आणि ह्या कौन्सिलानें ह्या सात कमिशनरांच्या अगदीं धोरणानें चालावें. हे कमिशनर व हे डिरेक्टर ह्यांनीं कंपनीच्या भागीदारांपुढें एकंदर हिशेब दर साहामाहीस मांडावे, आणि पार्लमेंतापुढें प्रत्येक वर्षाच्या आरंभीं मांडावे. कमिशनरांची पहिली नेमणूक प्रस्तुत पार्लमेंतानें, ह्मणजे अर्थात् फॉक्स व नार्थ यांच्या मंडळानें करावी; आणि चार वर्षांच्या अंतीं गादीनें करावी. डिरेक्टरांच्या कौन्सिलमध्यें ज्या रिकाम्या जागा पडतील त्या कोर्ट आफ् प्रोप्रायटर्स ( मालकांचें मंडळ ) यानें भराव्या. दुसऱ्या बिलाचा उद्देश गव्हर्नर जनरल व त्याचें कौन्सिल ह्यांचे अधिकार वाटून देण्याचा आणि त्यांनीं हिंदुस्थानचे रहिवाशी आणि राजेरजवाडे यांच्याशीं कशें वागावें हें ठरविण्याचा होता.

अर्थात् पहिलें बिल अत्यन्त महत्वाचें होतें. कारण तें पास झाल्यास फॉक्स व त्याचे स्नेही यांचे हातीं प्रस्तुतः मोठा अधिकार येणार होता. हें पाहून राजा व त्याचे मित्र यांचें पित्त फार खवळलें. त्यांच्या ही गोष्ट लक्ष्यांत आली कीं, हें बिल पास झाल्यास फॉक्सच्या हातीं फारच मोठी सत्ता येणार आहे. कमिटीपुढें बिल जाऊन कमिशनरांचीं नांवें भरण्याची जेव्हां वेळ आली तेव्हां सर्व नांवें फॉक्सच्या अनुयायांचींच घातलेलीं दिसलीं. तेव्हां पिटला फॉक्सविरुद्ध आपलें सर्व वक्तृत्व खर्च करण्यास चांगलीच संधि सांपडली. शिवाय त्याला या कामीं हेन्रीडंडस या गृहस्थानें फार उत्तम मदत केली. त्याला हिंदुस्थानच्या कारभाराची माहिती फार चांगली होती, कारण त्यानें त्याचा चांगला अभ्यास केलेला होता. यापूर्वीं हिंदुस्थानचा कारभार सुधारण्याकरितां त्यानें स्वतःच एक बिल आणिलें होतें, आणि तें जरी पास झालें नाहीं तरी तेणेंकरून त्याचें हिंदुस्थानविषयक ज्ञान

व लोकांमध्यें कीर्ति, हीं दोन्ही जास्त वाढलीं होतीं. सारांश, त्यानें प्रस्तुत प्रसंगीं पिट यास चांगलाच पाठिंबा दिला.

डंडसपेक्षां राजानेंच या कामीं पिट यास विलक्षण मदत केली. फॉक्स व नार्थ यांस इच्छेविरुद्ध प्रधानकी द्यावी लागली याबद्दल त्याच्या मनास लागून राहिलेलेंच होतें. त्यांचा त्यानें आतां चांगला सूड उगविला. लार्ड टेंपल नांवाच्या दुय्यम प्रतीच्या एका मुत्सद्याकडून त्यानें लार्डांस असें कळविलें कीं, जे सरदार फॉक्सच्या बिलांस आपलें अनुकूल मत देतील त्यांस मी आपले मित्र समजणार नाहीं इतकेंच केवळ नाहीं तर शत्रू समजेन. मग काय विचारतां? पुष्कळ सरदार कोडबोळे प्रधानमंडळावर एकदम उलटले. आतां राजाचें हें करणें अगदीं गैर होतें ह्यांत बिलकुल संशय नाहीं. पण तें बरोबर साधलें. कारण हीं बिलें जेव्हां लार्डांच्या सभेपुढें गेलीं तेव्हां तीं तेथें १९ च्या बहुमतानें नापसंत ठरलीं. त्याबरोबर राजानें ह्या नावडत्या प्रधानमंडळाचा त्रास काढून टाकण्याचा निश्चय केला. त्यानें फॉक्स व नार्थ यांस लागलीच केवळ रजा दिली इतकेंच नाहीं, तर ती त्यांचा मोठा अपमान करून दिली. त्यांचा वरील रीतीनें पराभव झाल्यानंतरच्या मध्यरात्रीं त्यानें या दोघांकडे जासुदांच्या हस्तें असा निरोप पाठविला कीं, आपण आपल्या अधिकाराचीं सीलें राजाच्या हवालीं करावीं असें राजेसाहेबांच्या मर्जीस येत आहे; आणि तीं सीलें स्वाधीन करावयाचीं तीं स्वतः न करतां आपले अंडर सेक्रेटरी फ्रेझर व नेपिअन यांचे हस्तें करावीं; कारण राजास आपली भेट घेणें मुळींच प्रशस्त वाटत नाहीं. अर्थात् सीलें लागलींच रवाना झालीं, व राजानें तीं तशींच लार्ड टेंपलच्या हवालीं केलीं; तेव्हां दुसऱ्या दिवशीं टेंपलनें बाकीच्या प्रधानांस काढून टाकल्याचे हुकूम फर्माविले.

पुनः जेव्हां कामन्ससभा भरली तेव्हां फॉक्स व नार्थ हे विरुद्धपक्षाच्या बाकांवर जाऊन बसले. त्यांच्याकडे अद्यापि बहुमत होतेंच, त्यांचा त्यांनीं राजाविरुद्ध सूड उगविण्याच्या कामीं उपयोग करण्याचा

निश्चय केला. पिटला फडणिशीची व तिजोरीच्या पहिल्या लार्डाची जागा मिळाल्यामुळें त्याची जेव्हां आपल्बी येथील प्रतिनिधीची जागा रिकामी पडली तेव्हां ती भरण्यासाठीं कोणी पुढें सूचना आणिली. ती ऐकून विरुद्ध पक्षाचे लोक खदखदां हंसले. कारण पिटनें एवढ्या मोठाल्या जागा एवढ्या लहान बयांत पत्करण्याचें धाडस करावें हें त्यांस अगदीं मूर्खपणाचें काम वाटलें. इतक्यांत लार्ड टेंपलनें एकाएकीं राजीनामा दिला. त्यास कारण त्याच्या मनांत पार्लमेंत एकदम बरखास्त करावें असें होतें, पण पिट त्यास अनुकूल नव्हता. कांहींहि असो; त्यामुळें पिट यास मुख्य प्रधानकी पत्करावी लागली. बहुमत विरुद्ध असतां ही जबाबदारी अंगावर घेणें नेहमींच धोक्याचें असतें, व तें पिटसारख्या तरुण माणसास विशेषच धोक्याचें दिसत होतें. तरी त्यानें मागें घेतलें नाहीं. प्रधानकी हातीं आल्याबरोबर त्यानें प्रथम स्वतःचें इंडिया बिल पुढें आणिलें, पण तें अगदीं नापसंत झालें. शिवाय, शेल्बर्नला त्यानें प्रधानमंडळांत न घेतल्याबद्दल त्याचा त्याजवर राग होताच. तरी तो घाबरला नाहीं. बहुमत प्रतिकूल असूनही कांहीं महिने त्यानें काम तसेंच रेटलें. शेवटीं १७८४ च्या मार्च महिन्यांत योग्य संधि आलेली पाहून त्यानें पार्लमेंत बरखास्त केलें.

नवीन निवडणुकीचा परिणाम फॉक्सला जितका प्रतिकूल झाला तितकाच पिटला अनुकूल झाला. फॉक्सचे १६० अनुयायी यांनीं आपल्या जागा गमाविल्या, आणि पिटला अर्थात् तितक्याच जागा नव्या मिळाल्या. खुद्द फॉक्सलादेखील निवडून येण्यास मोठी मारामार पडली. अशा रीतीनें कोडबोळें प्रधानमंडळाचा शेवट झाला. इंग्लंदास असलीं प्रधानमंडळें आवडत नाहींत असें डिस्रायली ह्मणे तें खोटें नव्हे. फॉक्सनें आपलीं मतें व आपली इभ्रत एकीकडे गुंडाळून ठेवून अधिकाराच्या लोभानें जें हें प्रधानमंडळ बनविलें त्याचें त्यास अशा रीतीनें लवकरच जबरदस्त प्रायश्चित भोगावें लागलें. कारण यापुढें मरेपर्यंत तो बहुतेक अधिकारभ्रष्टच राहिला. मरणाच्यापूर्वीं थोडे दिवस काय

तो त्याच्या हातीं पुनः अधिकार आला होता. इकडे पिट आतां जो अधिकारारूढ झाला तो मरेपर्यंत बहुतेक अधिकारारूढच होता. मध्यें काय तो दोन तीन वर्षें मोकळा होता.

पिटचें पूर्वीचें बिल आठांच्या बहुमतानें नापसंत झालेलें होतें, तें आतां त्यानें बहुतेक तसेंच पुढें आणिलें, आणि तें आतां दोनशेंच्या-वर बहुमतानें पसंत ठरलें. त्या बिलानें जो बोर्ड आफ कंट्रोल स्थापन केला, व जी दुबार राज्यपद्धति सुरू केली ती १८५८ पर्यंत बहुतेक तशीच सुरू होती. पिटच्या बिलाचे जे शत्रू होते ते ह्मणूं लागले कीं, ह्या बिलानें पिटच्या हातीं आलेली सत्ता फॉक्सच्या बिलानें त्याच्या हातीं जितकी आली असती त्याहून मुळींच कमी नाहीं, उलट जास्त दिवस टिकणारी मात्र आहे. शिवाय पुढें पुष्कळ वर्षेंपर्यंत या बिलाविरुद्ध अशी तक्रार येत होती कीं, हिंदुस्थानांतील जागा भरतांना स्कॉच लोकांवर विशेष मेहरनजर केलेली दिसते.

यावेळीं सरकारी तिजोरीची स्थिति अत्यन्त शोचनीय झालेली होती. ती सुधारण्यास चांगलाच माणूस पाहिजे होता, व तो पिट हाच अगदीं योग्य रीतीनें सांपडला. फ्रान्सांतील फडणीसांनीं तेथील तिजोरीची जितकी गैरव्यवस्था केलेली होती तितकीच लार्ड नार्थ यानें इंग्लंदच्या तिजोरीची केलेली होती. ती काढून टाकण्यास पिट मोठ्या धैर्यानें लागला, व त्यानें त्या कामीं आपली विलक्षण बुद्धि खर्च केली. जकात न देतां चोरून माल आणण्याची चाल इतकी जबरदस्त सुरू झाली होती कीं त्या कामीं सरासरी चाळीस हजार माणसें खपत असत. पण पिटनें या जकातींची अशा कांहीं चतुराईनें व्यवस्था केली कीं, हें चोरून माल आणणें त्याच्यापुढें अगदीं विरघळून गेलें. उदाहरणार्थ, घरांच्या खिडक्यांवर कर बसवून चहावरील जकात त्यानें इतकी कमी केली कीं, चोरून चहा आणण्यांत कोणासच फायदा नाहींसा झाला. तिजोरींत पैशाची मोठी तूट पडली होती; ती भरून काढण्यासाठीं त्यानें कर्जें काढिलीं, व तीं अगदीं प्रसिद्ध रीतीनें काढिलीं. त्यामुळें तीं थोडक्या

व्याजानें मिळालीं. हें पाहून लोकांस मोठें आश्चर्य वाटलें ; कारण आजपर्यंत ह्या कामांत प्रधान फार खाबूपणा करीत असत. शिवाय त्यानें आजपर्यंत ज्या जिनसांवर कर नव्हते, पण कर बसविणें योग्य होतें, अशा कित्येक जिनसांवर कर बसविले. अशा रीतीनें त्यानें सरकारी जमाखर्चाची योग्य तोंडमिळवणी केली. शेवटीं त्यानें १७८६ मध्यें राष्ट्रीय कर्ज हळू हळू कमी करण्याची जी अजब युक्ति काढिली त्यांत त्यानें आपल्या चातुर्याची कमाल करून दाखविली. त्यानें एक सिंकिंग फंड ( कर्ज कमी करणारा फंड ) ह्मणून तयार केला, व त्याबद्दल पार्लमेंटाकडून असा कायदा करून घेतला कीं, पार्लमेंटाचा उलट कायदा होईतोंपर्यंत त्या फंडाचा विनियोग मोठ्या अडचणीच्या प्रसंगींहि इतर कामीं करूं नये. ह्या फंडाची व्यवस्था करण्यासाठीं त्यानें कामन्स सभेचा स्पीकर मुख्य फडणवीस, मास्टर आफ् धि रोल्स ह्मणून एक वरिष्ठ न्यायाधिकारी अकौंटंट जनरल, आणि इंग्लंदच्या ब्यांकेचे गव्हर्नर व डेप्युटी गव्हर्नर हे मुख्य अधिकारी एवढे कमिशनर्स नेमिले. ह्या स्वतंत्र आणि वाकबगार मंडळीच्या हवालीं दरवर्षीं दहा लाख पौंड करावे, व त्यांनीं सरकारी ठेव विकत घेऊन हळू हळू राष्ट्रीय कर्ज काढून टाकावें अशी व्यवस्था केली.

पिटला प्रारंभीं प्रारंभीं सर्वच गोष्टींत यश आलें असें नाहीं. पार्लमेंटीय सुधारणा घडवून आणण्याकरितां त्यानें आणखी एकवार व शेवटचा यत्न केला, व तो निष्फळ झाला. तसेंच इंग्लंद व आयर्लंद यांजमध्यें समेट करण्यासाठीं त्यानें पहिला प्रयत्न केला, व तोहि फुकट गेला. ह्या गोष्टीच्यासंबंधानें त्याचें नशीब असें कांहीं चमत्कारिक होतें कीं, ती गोष्ट साधण्याची इच्छा त्यास नेहमींच असे, पण कधीं सफल मात्र झाली नाहीं. शिवाय, त्याची विलक्षण बुद्धि, त्याची वक्तृत्वशक्ति आणि त्याची लोकप्रियता हीं इतकीं होतीं तरी कामन्स सभेंतील त्याची स्थिति एका दृष्टीनें डळमळीतच होती. एकाद्या मुत्सद्याच्या मागें मोठ्या बहुमताचें आणि राजाच्या स्थिर भरंवशाचें पाठबळ असतें तरी,

त्यास एकादा शेरिडन, एकादा बर्क व एकादा फॉक्स अशा लोकांशीं सारखें व अविश्रांत झुंझत रहाणें फार कठीण गेलें असतें. पण पिटला ह्या दोहोंपैकीं कोणतेंच पाठबळ खात्रीचें व कायमचें नव्हतें. शिवाय विरुद्ध पक्षास जसे हे मोठाले वक्ते व मुत्सदी होते, तसे याच्या बाजूस कोणीच नव्हते. सारांश त्याचें प्रधानमंडळ "सर्वगुणसंपन्न" (The Ministry of All the Talents) बिलकुल नव्हतें. तर त्यास वस्तुतः एकट्यासच सर्व गोष्टी संभाळाव्या लागत होत्या.

प्रत्यक्ष राजा जर आपल्या उत्तम प्रधानास डळमळीतच पाठिंबा देत होता, तर राजाचा वारस त्याचें मनापासून व एकसारखें वैर करीत होता. पिट जेव्हां अधिकारारूढ झाला, तेव्हां प्रिन्स आफ् वेल्स हा फॉक्सच्या पक्षास जाऊन मिळालेला होता. यास कारण त्याचें व बापाचें जमत नव्हतें, व फॉक्सचें आणि राजाचें जमत नव्हतें एवढेंच होय. ह्याचें वर्तन अतिशय वाईट असे. आजपर्यंतची त्याची कारकीर्द ह्मणजे मद्यपान आणि मारवाड्याचें देणें, गरीब बायकांस फसविणें आणि गलिच्छ चैनी करणें, असल्या कृत्यांत गेलेलें होतें. १७८९ च्या दिसेंबरांत मिसेस फिट्झहर्बर्ट नांवाच्या एका तरुण सुंदर विधवेशीं त्यानें लग्नाचा पोकळ विधि केला होता. ही गोष्ट पार्लमेंतापर्यंत गेली, व फॉक्सनें राजपुत्राच्या सांगण्यावरून त्याच्या वतीनें ती गोष्ट साफ नाकबूल केली. हें ऐकून त्या गरीब बाईचें अंतःकरण अर्थात् अगदीं फाटून गेलें. पुढें फॉक्स यास जेव्हां खरी गोष्ट समजली तेव्हां राजपुत्राच्या खोटेपणाचा व आपल्या पदरीं खोटेपणा आणल्याचा त्यास अत्यंत राग आला. पुढें त्यानें पुष्कळ दिवस त्याच्याशीं संभाषण केलें नाहीं. तें जर तो कायमचेंच सोडता तर फार बरें झालें असतें. पुढें ह्या गोष्टीचा हळू हळू विसर पडत चालला. राजा व राजपुत्र ह्यांच्यामध्यें समेट झाला. राजानें पार्लमेंतास विनंति केली, आणि त्यावरून व राजपुत्रानें आपलें वर्तन सुधारण्याचें वचन दिल्यावरून त्याचीं कर्जें फेडण्यासाठीं पार्लमेंतानें कांहीं रकम मंजूर केली.

ह्या कामीं पिट त्यास अनुकूल नव्हता हें तो विसरला नाहीं. इतक्यांत राजाची प्रकृति पुनः एकवार फार बिघडली. गादीवर बसल्यावर लवकरच त्यास एकदां वेड लागलेलें होतें. तसेंच १७८८ च्या पावसाळ्यांत पुनः एकवार लागलें. तेव्हां रीजंट नेमण्याची व्यवस्था करण्याची जरूरी उत्पन्न झाली, आणि त्यावरून पार्लमेंतांत भयंकर वादविवाद सुरू झाला. फॉक्स अविचारानें असें ह्मणूं लागला कीं, राजा निधन पावला असतां प्रिन्स आफ् वेल्स यास राज्याचीं सूत्रें हातीं घेण्याचा जितका अधिकार येईल तितकाच हल्लींहि आहे. पिटचें मत असें पडलें—व तेंच इंग्लंदच्या राज्यपद्धतीस जास्त धरून होतें—कीं, रीजंट नेमणें व त्यास कोणकोणते अधिकार द्यावयाचे हें ठरविणें हे हक्क पार्लमेंताचे आहेत. पिटला हेंहि अर्थात् माहीतच होतें कीं, हे राजपुत्र रीजंट बनले कीं आपला अधिकार गेलाच. तथापि ह्या मुद्यावर त्यानें फॉक्सच्या ह्मणण्यास विरोध केला नाहीं. तें कसेंहि असो. इतक्यांत सुदैवानें राजाचें डोकें थाऱ्यावर आलें, आणि हा सर्व वाद अर्थात् तितक्यापुरता तरी पूर्ण मिटला. राजा बरा झाला ही गोष्ट प्रधानाच्या व राष्ट्राच्या दोघांच्याहि हिताचीच झाली ह्यात बिलकुल संशय नाहीं.

राजपुत्राचीं ह्याच्यानंतरचीं जीं वेडेपणाचीं कृत्यें, त्याचीं इष्कबाजीचीं खटलीं, त्याचीं कर्जें, त्याचे स्नेह, आणि १७९५ च्या एप्रिलांत त्याची नातेवाईक ब्रन्सविकची प्रिन्सेस क्यॉरोलिन आमीलिया इलिझाबेथ हिच्याशीं त्याचें असुखाचें लग्न, ह्या गोष्टींचें येथें जास्त वर्णन करण्याची अवश्यकता नाहीं. कारण राजास पुनः वेड लागून त्याच्या हातीं दिखाऊ सत्ता पुनः जाण्यास आणखीं २० वर्षें जाण्याचीं होतीं; आणि त्या वीस वर्षांत दोघेहि राजकीय प्रतिस्पर्धी—पिट व फॉक्स—मरून जावयाचे होते.

---

प्रकरण एकविसावें.

## वॉरनहेस्टिंग्सवरील खटला.

हिंदुस्थानचा पहिला गव्हर्नर जनरल वॉरनहेस्टिंग्स हा होता. त्यानें आपल्या दहा बारा वर्षांच्या कारकीर्दींत जशीं अनेक महत्कृत्यें केलीं, तशीं अनेक अनन्वित कृत्येंहि केलीं. ह्या सर्व गोष्टी हिंदुस्थानच्या इतिहासज्ञांस विदित आहेतच. तो १७८९ सालीं जेव्हां विलायतेस परत गेला तेव्हां त्यासंबंधानें त्याजवर कामन्ससभेनें लार्डांच्या सभेपुढें मोठा खटला केला. त्यांत कामन्ससभेच्यातर्फे बर्क, शेरिडन, वगैरेनीं प्रमुखत्व पत्करिलें होतें. त्या खटल्याची हकीकत प्रस्तुत प्रकरणांत देण्याचें योजिलें आहे.

बर्कच्या विशाल मनास न्यायाची अत्यंत मोठी चाड होती. एखादी मोठी गोष्ट साधण्यासाठीं एकादा अन्याय केला तरी चालेल असें ह्मणणारांपैकीं तो नव्हता. आपल्या राज्याचा विस्तार करण्यासाठीं एकहि अन्यायाची गोष्ट करणें त्यास कबूल नसे; आणि त्याच्या दृष्टीनें वॉरनहेस्टिंग्सनें आपल्या कारकीर्दींत किती तरी अन्यायाचीं कृत्यें केलीं होतीं. वाईटापासून चांगल्याची निष्पत्ति व्हावी एतदर्थ वाईट करण्यास बर्क कधींहि तयार नसे. रोहिलखंडाशीं केलेलें युद्ध जर अन्यायाचें होतें, नंदकुमारास फांशीं देणें हें जर लज्जास्पद होतें, आणि चेतसिंगास पदच्युत करणें आणि बेगमांस लुटणें हे जर अपराध होते, तर तेणेंकरून राष्ट्राच्या ऐहिक मोठेपणांत कदाचित् भर पडली असेल ह्या गोष्टीस महत्व देणारा बर्क मुळींच नव्हता. वॉरनहेस्टिंग्सनें जीं दुष्कृत्यें केलीं तीं हिंदुस्थानांतील इंग्लिशांचा अंमल व महती हीं कायम राखण्यास अवश्यक होतीं असें जरी कोणी सिद्ध करून दाखविलें असतें, तरी बर्कच्या मनाच्या हायकोर्टांत वॉरनहेस्टिंग्स

हा दोषीच ठरला असता. बर्कचें ह्मणणें असें असे कीं, असल्या दुष्कृत्यांनीं हिंदुस्थानांतील इंग्रजी अमलास किंवा इंग्रजी इभ्रतीस फायदा होत नाहीं, तर उलट धक्का पोंहोचतो. पण इंग्लंदचा फायदा किंवा इंग्लंदची महती असल्या कृत्यांवर अवलंबून आहे अशी जर वस्तुस्थिति असती तर तो तो फायदा नको ह्मणाला असता, आणि त्या महतीकडे त्यानें ढुंकूनहि पाहिलें नसतें.

बर्कची अत्यन्त मोठी मनोवृत्ति ह्मटली ह्मणजे न्यायप्रीति ही होती. त्याचा राजकीय बाबतींत मोठा आवडीचा विषय ह्मटला ह्मणजे हिंदुस्थान व हिंदुस्थानचा कारभार हा होता. ज्यावेळीं हिंदुस्थानांतील इंग्लिश साम्राज्याचा नुसता उदय होत होता, ज्यावेळीं हिंदुस्थानचा कारभार ह्मणजे केवळ एका व्यापारी कंपनीचा नफातोटा, असें सगळ्या इंग्लिश राष्ट्रास वाटत असे, अशा वेळीं बर्क आपल्या एकंदर विशाल बुद्धीचा उपयोग हिंदुस्थानविषयक ज्ञान संपादन करण्यांत करीत असे. बर्कनें जरी ह्या देशाच्या किनाऱ्यावर कधीं पाय ठेविला नव्हता, तरी ज्या इंग्रजांनीं आपला बहुतेक जन्म ह्या देशीं घालविलेला होता त्यांच्यापेक्षांहि त्यास या देशाची माहिती जास्त होती; आणि हें ज्ञान बर्क पाहिजे तेव्हां आणि पाहिजे तितकें पुढें आणूं शकत असे. हिंदुस्थानच्या जमाखर्चाच्या आंकड्यांस तो मनोवेधक स्वरूप देऊं शके. हिंदुस्थानच्या समकालीन गोष्टींस तो जीवंत करून दाखवी. सारांश, त्याच्या हातांत हिंदुस्थान ह्मणजे एक अत्यन्त चित्ताकर्षक विषय होऊन बसे. हिंदुस्थानच्या कारभारावर तो बोलूं लागला ह्मणजे त्याच्या भाषणास कादंबरीचें मनोहारित्व आणि पार्लमेंतीय रिपोर्टाचें यथार्थत्व येत असे.

बर्कच्या हिंदुस्थानविषयक एकंदर नीतीचें रहस्य अर्काटच्या नबाबाच्या कर्जाच्यासंबंधानें त्यानें जें प्रसिद्ध भाषण केलें त्यांतील एकाच वाक्यांत आलेलें आहे. " हिंदुस्थानांत पैदा झालेला फसवाफसवीचा प्रकार, अन्याय, जुलूम आणि खाबूपणा हे जे अपराध आहेत. ते इंग्लंदांत जन्मास आलेल्या व वाढलेल्या तसल्या अपराधांच्याच जातीचे, रक्ताचे,

आणि मासाचे आहेत." ह्या एका वाक्यांत गोंवलेल्या नीतितत्वापासून बर्क कधीं ढळला नाहीं. वॉरन हेस्टिंग्स आणि त्याचे भागीदार ह्यांची नीति आणि बर्कची नीति ह्यांच्यांत हाच मोठा भेद होता कीं, पहिले ह्मणत कीं, पौर्वात्य लोक जर खोटें बोलतात, फसवतात, खोटे कागद करितात, आणि जरूर पडल्यास खूनहि करितात, तर इंग्लिश लोकांनींहि त्यांच्यावर कडी करण्यासाठीं त्याच साधनांचा उपयोग केला पाहिजे. आणि हा ह्मणे कीं असें करणें कधींहि व कोठेंहि रास्त होणार नाहीं.

अशा जबरदस्त प्रतिवादीच्या वकिलाविरुद्ध वॉरन हेस्टिंग्सनें आपल्या तर्फेनें कोणास उभें केलें ह्मणाल तर मेजर स्कॉट यास. बर्क जर अत्यन्त जाडा वक्ता व अत्यन्त जबरदस्त माहितीचा माणूस होता तर मेजर स्कॉट हा अगदीं सामान्यबुद्धीचा आणि अगदीं साधारण वक्तृत्वाचा माणूस होता; तो इतका कीं, त्याच्या बोलण्यानें कामन्स सभेस व इतर सर्व श्रोत्यांस अगदीं कंटाळा उत्पन्न होत असे. वॉरन हेस्टिंग्ससारख्या मोठ्या अधिकाऱ्याची असल्या भयंकर आरोपांवर जर चवकशी होत होती तर त्याचा वकील ह्मणजे अत्यन्त जाडा व अत्यन्त कुशल असा पाहिजे होता. बर्कच्या तोडीचा वकील वॉरन हेस्टिंग्स यास मिळणें तर अशक्यच होतें. कारण त्यावेळीं दुसरा त्याच्या जोडीचा माणूसच इंग्लंडांत नव्हता; पण त्याच्यासारखी कांहींशी विलक्षण बुद्धि व कांहींसें सामर्थ्य ज्यास आहे असा वकील जरी त्यास मिळाला असता, तरी त्याच्या खटल्यास निराळें स्वरूप आलें असतें. पण वॉरन हेस्टिंग्सचें एवढें नशीब नव्हतें. त्याच्या दुर्दैवानें त्यास शत्रु जसा फार प्रबळ भेटला, तसा मित्र फार दुर्बल मिळाला.

हेस्टिंग्स जेव्हां हिंदुस्थानांतून विलायतेस परत गेला तेव्हां त्यास आपल्यावर अशी घोरपड पुढें येणार आहे हें मुळींच माहीत नव्हतें. त्याला अशी खात्री वाटत होतीसें दिसतें कीं, आपण सरकारची एवढी मोठी कामगिरी बजाविली आहे कीं, ती बजावतांना आपण जर कांहीं चुका केल्या असतील तर त्या सहज झांकल्या जातील. त्याला मना-

पासून असें वाटत होतें कीं, आपण आपल्या राष्ट्राचे व राजाचे फार मोठे नोकर आहों. तो आपल्या प्रामाणिकपणाला उद्देशून जें इतके वेळां बोलत असे त्यावरून तो प्रामाणिक होता हें नव्हे, तर आपण प्रामाणिक आहों असें त्यास मनापासून वाटे, हें गृहीत करण्यास हरकत नाहीं. त्यानें जेव्हां इंग्लंदांत पाय ठेविला तेव्हां आपणास मानमरातब मिळेल, आपणास वाहवा, वाखाणणी, आणि शाबासकी मिळेल असाच अंदाज करून ठेविला. आपल्या अंदाजाविरुद्ध आपल्यावर खटला होईल हें त्याच्या स्वप्नींही नव्हतें.

जेव्हां त्याच्यावर पार्लमेंतांत हल्ला सुरू झाला तेव्हां त्याचें महत्व किंवा त्यास तोंड देण्याचा उत्तम मार्ग हीं त्याच्या लक्षांत आलीं नाहींत. आपल्या कृतीच्या मण्डनार्थ तो स्वतःच बोलण्याचा आग्रह धरूं लागला. त्याच्या अंगीं जर विलक्षण वक्तृत्वशक्ति असती, आणि काय बोलावयाचें व तें कसें बोलावयाचें याची योग्य निवड व मांडणी करण्याचें चातुर्य जर त्याजमध्यें असतें तर अशा आग्रहानें त्याचा कदाचित् फायदा झाला असता. पण हेस्टिंग्सच्या अंगीं ह्यांपैकी एकहि गुण नव्हता; ह्मणून त्यानें गप बसावयाचें होतें. एक चूक अशी आहे कीं, त्याबद्दल कॉमन्ससभा कधीं क्षमा करीत नाहीं; ती त्यानें केली. ती कोणती ह्मणाल तर त्यानें तीस कंटाळवून सोडिलें. त्यानें आपल्यातर्फें जें काय लांबलचक बाड लिहून आणिलें होतें ते वाचण्यास त्यानें सबंद दोन दिवस घेतले; तें त्यास अगदीं अल्पसें वाटलें, व सभेस अत्यंत दीर्घसें वाटलें. तेव्हां हा इकडे आपलें चऱ्हाट वळीत असतां सभा तिकडे जांभया देऊं लागली. सामान्य प्रतीच्या लेखी वक्तृत्वाची सभेस पुरी संवय झालेली असल्यामुळें हेस्टिंग्सच्या लेखानें ती अगदीं त्रासून गेली.

बर्क, फॉक्स व शेरिडन यांच्यासारखे कुशल बारगीर जरी त्याच्यावर एकसारखे गोळ्या सोडीत होते तरी त्यानें आशा सोडिली नव्हती

रोहिलखंडांतील लढाईसंबंधाचा आरोप जेव्हां कामन्ससभेनें मोठ्या बहुमतानें नामंजूर केला तेव्हां त्याची आशा जास्तच वाढली. पण इतक्यांत त्याची अगदीं निराशा होण्यास असें कारण झालें कीं, पिटनें त्याचा जो पक्ष घ्यावयाचा तो थोडासा वेळ घेतल्यासारखें करून एकदम सोडून दिला. ती हकीकत अशी.

कामन्स सभेंत हेस्टिंग्सचा एक मोठा उल्हासी असा तरुण वकील होता. त्याचें नांव सर जेम्स ब्लान्ड बर्जिस. बनारसचा राजा चेतसिंग ह्याच्याशीं हेस्टिंग्सनें जें वर्तन केलें त्यासंबंधाचा त्याजवरील आरोप जेव्हां सभेपुढें आला तेव्हां त्याच्या वतीनें बोलण्यास हा तरुण सभासद जो उठला तो केवळ पिटच्या पसंतीनेंच नव्हे, तर त्याच्या प्रत्यक्ष आग्रहावरून होय. आतां त्याच्या बोलण्याकडे सभेनें विशेष लक्ष दिलें नाहीं ह्यांत कांहीं नवल नाहीं. बर्कचें बोलणें ऐकल्यावर एकादा जुना व प्रसिद्ध वक्ता उभा राहता तरी त्याची डाळ शिजली नसती. मग ब्लांड बर्जिस तर जुनाहि नव्हता किंवा प्रसिद्धहि नव्हता. तेव्हां कांहीं वेळ बोलून बाकीचें बोलावयाचें तें आपणच बोलावें असें पिटच्या कानांत गुणगुणून तो खालीं बसला, आणि पिटच्या सूचनेवरून तो वादविवाद त्यानें दुसऱ्या दिवसावर टाकिला.

दुसऱ्या दिवशीं पिटचें वक्तृत्व ऐकण्यासाठीं ह्मणून ब्लान्ड बर्जिस मोठ्या उत्सुकतेनें सभेंत येऊन बसला. पण पिटनें उठून हेस्टिंग्सवरील आरोपासंबंधानें जेव्हां आपलें मत स्पष्टपणें सांगितलें तेव्हां त्यास आश्चर्य वाटलें, त्याची निराशा झाली, व त्यास रागही आला. कारण पिटनें प्रस्तुत आरोपाच्यासंबंधानें हेस्टिंग्सवर सभेंत झालेल्या हल्लयाच्या फाजील-पणाचा थोडासा निषेध केल्यावर आणि हेस्टिंग्सची थोडीशी गुळमुळीत स्तुति केल्यावर तो ह्मणाला कीं, हा आरोप लार्डांच्या सभेपुढें जावा या सूचनेस मी अनुकूल आहें. हें ऐकून पिटच्या बहुतेक अनुयायांस मोठें आश्चर्य वाटलें; पण ब्लांड बर्जिसला तर पिटनें केवळ विश्वासघात केल्यासारखें वाटलें. पण तो बिचारा काय करितो? तरी पण त्याच्या

हातीं जें अल्पस्वल्प होतें तें करावयास त्यानें कमी केलें नाहीं. हा आरोप लार्डांच्या सभेपुढें जावा अशाबद्दल दोन्ही पक्षांचें बहुतेक ऐकमत्य दिसल्यामुळें प्रत्यक्ष मतें घेतल्याशिवाय हा ठराव पास आहे असें स्पीकर ह्मणण्याच्या बेतांत आला. इतक्यांत ब्लांड बर्जिस ताडकर उडी मारून उठला, आणि ह्मणाला कीं, ह्या प्रश्नाच्यासंबंधानें सभेचीं प्रत्यक्ष मतें घ्यावीं असा माझा आग्रह आहे. तेव्हां अर्थात् मतें घेतलीं; आणि त्यांत त्या ठरावास अनुकूल अशीं मतें पुष्कळ मिळालीं ही गोष्ट जरी निर्विवाद आहे तरी त्यांत असेंहि दिसून आलें कीं, प्रतिकूल मतें देणारांपैकीं पुष्कळजण पिटचे नेहमींचे अनुयायी होते. हें पाहून हेस्टिंग्स यास अर्थात् अमळ बरें वाटलें व धीरही आला. ह्या कृतीमुळें पिट ब्लांड बर्जिसवर फार रागावला आणि हेस्टिंग्स त्याचा जन्माचा मित्र व उपकारी झाला हें सांगावयास नकोच.

नंतर हेस्टिंग्सला धक्क्यामागून धक्के बसूं लागले. अयोध्येच्या बेगमांच्यासंबंधानें त्याजवर जो आरोप आला त्याचा विचार चालला असतां शेरिडननें असें कांहीं उत्कृष्ट भाषण केलें कीं, तेणेंकरून कांहीं दिवस बर्कचे भयंकर हल्लेदेखील शुष्क वाटूं लागले. ज्यांनीं तें भाषण ऐकिलें ते तें भाषण ह्मणजे सगळ्या जगांतील अत्युत्तम भाषणांपैकीं एक होतें ह्मणून ह्मणतात. त्याचा जो हल्लीं तुटका तुटका भाग उपलब्ध आहे त्यामध्यें विशेष असें कांहींच दिसत नाहीं. पण तें ऐकून श्रोते अगदीं मोडून गेले ही गोष्ट निर्विवाद आहे. फॉक्स आणि बायरन ह्यांनीं जी त्याची स्तुति केली त्यावरूनच ही गोष्ट स्पष्ट सिद्ध होते.

सरतेशेवटीं पिटच्या संमतीनें कामन्ससभेनें असें ठरविलें कीं, हेस्टिंग्सवर कामन्ससभेनें लार्डांच्या सभेपुढें खटला करावा. त्याप्रमाणें खटला करण्याकारितां जी कमिटी नेमिली तींत फ्रान्सिसचें नांव असावें असा बर्कचा आग्रह होता. पण पिटनें ही गोष्ट बिलकुल कबूल केली नाहीं, आणि सभेनेंहि आपलें मत तसेंच दिलें आणि हें झालें तें ठीकच झालें. कारण फ्रान्सिसचा आणि हेस्टिंग्सचा खाजगी द्वेष किती होता हें सर्व विश्रुत आहे. कमिटीनें नेमिल्यावर १७८७ च्या मे महिन्यांत बर्कनें

हेस्टिंग्स याजवर लॉर्डांच्या सभेपुढें रीतीप्रमाणें दोषारोपण केलें. तेव्हां त्या सभेचा सार्जंट ॲट आर्म्स यानें त्यास रीतीप्रमाणें कैद केल्यावर वीस हजार पौंडांचे दोन जामीन घेऊन सोडून दिलें. ह्या खटल्यामध्यें पुढें जी दिरंगाई व्हावयाची होती तिचीं चिन्हें एव्हांपासूनच दिसूं लागलीं. कारण १७८७ च्या मेंत जरी त्यास प्रथम कैद केलें तरी खटल्यास सुरवात १७८८ फेब्रुवारी ता० १३ पर्यंत झाली नाहीं.

ही चौकशी सुरू होण्यापूर्वीं हेस्टिंग्स विरुद्ध लोकमत खवळण्यास बर्क व त्याचे मित्र यांच्या कृतीपेक्षां राजा व त्याचे दरबारी ह्यांचीच कृति जास्त कारण झाली. हे लोक हेस्टिंग्स व त्याची बायको ह्यांच्याशीं विशेषच सलगी दाखवूं लागले, आणि हेस्टिंग्स यास इंग्लिश लोकमताची बरोबर ओळख नसल्यामुळें तो आपल्यावर राजाची मर्जी आहे असा विशेषच दिमाख करूं लागला. तें पाहून लोक त्याच्यावर जास्तच चिडले. इतक्यांत राजास एक उत्तम हिरा नजर ह्मणून पाठवावा अशी निजामास स्फूर्ति झाली, आणि इंग्लंदांत काय चाललें आहे हें त्यास माहीत नसल्यामुळें त्यानें ती कामगिरी हेस्टिंग्सकडेच सहजगत्या संपविली. हा हिरा त्यानें एका लेव्हीच्या प्रसंगीं प्रसिद्धपणें राजास समर्पण केला. तेव्हां मग काय विचारतां? लोकांत अशी अफवा उठली कीं हेस्टिंग्स राजास हिरे लांच देऊन आपल्या तर्फेचा करून घेत आहे. सारांश, एका हिऱ्याचे अनेक हिरे झाले, आणि निजामानें दिलेल्या नजरेस हेस्टिंग्सच्या लांचाचें स्वरूप आलें. शेवटीं हें प्रकरण इतकें पेटलें कीं, तो प्रश्न कामन्स सभेपुढें आला, आणि मेजर स्कॉटनें हेस्टिंग्सच्या तर्फेनें उठून जेव्हां खरी हकीकत प्रसिद्धपणें सांगितली, तेव्हां तें विझून गेलें.

मानवी व्यवहारांत विरुद्धपणाचीं जीं कांहीं विलक्षण उदाहरणें कधीं कधीं दृष्टीस पडतात त्यांतील वॉरन हेस्टिंग्सची चौकशी हें एक आहे. ती जेव्हां सुरू झाली तेव्हां सगळ्या इंग्लिश राष्ट्रांस तिजबद्दल जिज्ञासा वाटत होती. ती जेव्हां पुरी झाली तेव्हां तिजबद्दल त्या लोकांस आठवणहि राहिली नव्हती. हा खटला जेव्हां प्रथम सुरू झाला तेव्हां तो पाहण्यास जी गर्दी होऊं लागली तीस वेस्टमिन्स्टर हॉल देखील पुरत नव्हता. त्यावेळीं

इंग्लंदांतील सर्व संपत्ति, सर्व दर्जा, सर्व बुद्धिमत्ता, सर्व चतुरस्रपणा आणि सर्व सौंदर्य त्या इमारतींत गोळा झालें होतें. जेव्हां तो पुरा झाला तेव्हां, आणि पुरा होण्यापूर्वींहि पुष्कळ दिवस तो ऐकण्यास येणारे लोक इतके कमी झाले होते कीं, पांच पन्नास लोकहि तेथें हजर नसत. मध्यें एकदां तर असें वाटूं लागलें कीं, हा खटला तर कधीं संपावयाचाच नाहीं. जे पुरुष व ज्या स्त्रिया हा किंवा तो पक्ष मोठ्या उत्सुकतेनें घेऊन पहिल्या सुनावणीच्या वेळीं हजर होत्या त्यांपैकीं कित्येक मरूनदेखील गेल्या; तरी आपला खटला चाललाच होता.

हा रेंगाळलेला खटला चालू असतां खुद्द वॉरन हेस्टिंग्सनें आपलें धैर्य सोडिलें नाहीं किंवा आपला अभिमान टाकिला नाहीं ही गोष्ट निर्विवाद आहे. आपल्यास हा विनाकारण त्रास होत आहे अशी त्याची पूर्ण खात्री होती. त्याला मनःपूर्वक असें वाटे कीं, बर्क आणि फॉक्स हे आपल्यावर अगदीं खोटे आरोप आणीत आहेत, व तसें तो बोलूनहि दाखवी. सारांश, एकाद्या निर्दोषी मनुष्याचा नाहक छळ होत असला म्हणजे तो जर विचारी असेल तर जसा साधूसारखा शांत होत असतो, तशी त्याची वृत्ति असे; आणि आरोपी वृत्तीवरूनच जर खटल्याचा निकाल करावयाचा असता, तर हेस्टिंग्स कधींच दोषमुक्त झाला असता. त्यानें आपल्या ह्या हिंदुस्थानांत इतकीं वर्षें काढिलेलीं होतीं कीं, तो आपल्यासारखा कांहीं अंशीं दैववादी बनला होता. खटला चालू असतां तो एका जिवलग मित्रास म्हणाला, हल्लीं मी एका प्राच्य गोष्टीचें स्मरण करून आपलें समाधान करून घेत असतों. ती गोष्ट अशी:—एका राजाचा स्वभाव असा असे कीं, चांगली स्थिति असली म्हणजे तो अत्यंत आनंदी होत असे आणि वाईट स्थिति आली म्हणजे त्याची निःसीम निराशा होई. ह्या त्याच्या एकान्तवृत्तीमुळें त्याला अत्यंत त्रास होई. म्हणून त्यानें आपल्या दरबाऱ्यांस असें सांगितलें कीं, ह्या वृत्तीला रामबाण म्हणून असा कांहीं मंत्र मला सांगा कीं, तो मला आपल्या हातांतील आंगठीवर कोरून ठेवतां येईल. पुष्कळांनीं पुष्कळ वचनें सुचविलीं,

पण तीं त्याच्या पसंतीस उतरेनात. शेवटीं त्याच्या मुलीनें त्याला एका पाचेच्या खड्याची आंगठी दिली. त्यावर दोनच शब्द आरबी भाषेंत कोरलेले होते, आणि त्यांचा अर्थ असा होता कीं, "ओबी वक्त निकल जावेंगा" (हीहि स्थिति निघून जाईल). ते शब्द त्यास फार पसंत पडले. ही गोष्ट सांगून हेस्टिंग्स ह्मणाला, खटला चालला असतां माझे शत्रू जेव्हां मजवर शिव्यांचा भडिमार करूं लागतात तेव्हां मी धीराचें कवच धारण करितों. मनुष्याचें जीवित चंचल आहे ह्याची मी आठवण करितों, आणि आपल्याशींच ह्मणतों "हीहि स्थिति निघून जाईल."

ती स्थिति निघून गेलीच; पण वेळ मात्र फार लागला. खटला सात वर्षे चालला. त्यास १७८८ च्या फेब्रुवारींत सुरवात होऊन १७९५ च्या एप्रिलांत त्याची परिसमाप्ति झाली. एवढ्या अवधींत लोकांस जर त्याचा अगदीं कंटाळा आला, तर त्यांत नवल तें कोणतें? शिवाय तीं सात वर्षे ह्मणजे सामान्य वर्षे नव्हत. तर फ्रान्सांतील मोठ्या राज्यक्रांतीचीं वर्षे. त्या सात वर्षांत फ्रान्सचा राजा व राणी ह्या दोघांचाही शिरच्छेद झाला होता. बास्टिलीचा तुरुंग फुटला होता. कितीतरी सरदारांची व इतर राजपक्षीयांची कत्तल उडाली होती, तेथें लोकसत्ताकाची स्थापना होऊन त्या राष्ट्राचें बहुतेक यूरोपाशीं युद्ध सुरू झालें होतें; आणि त्यांत फ्रान्साची मोडकीतोडकी फौज यूरोपांतील मोठमोठ्या राष्ट्राच्या जंगी सैन्यास जिकडे तिकडे पराजित करून टाकीत होती. तेव्हां अशा मोठ्या धामधुमीच्या धिंगाण्यांत वॉरन हेस्टिंग्सच्या खटल्याचा लोकांस बहुतेक विसर पडला ह्यांत आश्चर्य काय?

ह्या एवढ्या अवधींत घडलेल्या ह्या गोष्टींचा ह्या खटल्यांतील मुख्य नायकावरही मोठा परिणाम घडलेला होता. बर्कनें वॉरनहेस्टिंग्सवर जेव्हां हा खटला सुरू केला, तेव्हां त्याच्या मोठेपणाचा अगदीं कळस झालेला होता; तेव्हां त्याची कीर्ती अगदीं शिखरास पोंचलेली होती. पण फ्रान्सांतील राज्यक्रांतीचा उद्भव आणि वाढ ह्यांचा त्याच्या मनावर

अत्यंत मोठा व अत्यंत अनिष्ट असा परिणाम झाला. एकाद्या प्रश्नांतील मुख्य रहस्य आणि त्यांतील आनुषंगिक गोष्टी ह्यांच्यांतील भेद ओळखण्यास ह्या प्रसंगीं त्याची तैलबुद्धि असमर्थ झाली. त्या राज्यक्रांतीच्यावेळीं ज्या क्रूरपणाच्या गोष्टी झाल्या, त्या पाहून ती क्रान्ति यशस्वी झाल्यामुळें जे फायदे झाले ते त्यास दिसेनासे झाले. त्यावेळीं जो रक्तस्राव झाला, त्यामुळें तो इतका घाबरून गेला कीं, त्याला रक्तापलीकडे कांहीं दिसेनासें झालें. त्याला भीति पडली कीं, इंग्लंदांत उद्यां तीच स्थिति होणार. त्यामुळें तो त्या राज्यक्रांतीविरुद्ध वेड्यासारखें बडबडूं लागला व लिहूं लागला; आणि त्यामुळें कित्येकांस असा भ्रम पडला कीं, वॉरनहेस्टिंग्सच्या विरुद्ध हा जें बोलतो तेंहि त्याचें बरळणेंच असेल.

असो. अशा स्थितींत चाललेला हा खटला शेवटीं पुरा झाला. तो पुरा होण्यापूर्वी आणखी कांहीं उत्कृष्ट भाषणें आणि पुष्कळ नीरस भाषणें अर्थात् झालींच. शेरिडननें आणखी एक अद्वितीय भाषण केलें, पण त्याच्याबद्दल कांहींच हकीकत उपलब्ध नाहीं. इकडे कसा तरी खटला पुरा करा ह्मणून हेस्टिंग्स दीनवाण्या विनवण्या करीतच होता. तो आतां वृद्ध होत चालला होता, तो इतकीं वर्षें नांवाचा तरी कैदी ह्मणून होता; ह्मणून काय होतें काय नाहीं ही जी त्यास सारखी खात असणारी चिंता तिजपासून मुक्त होण्यास तो फार उत्सुक झाला होता. अखेरीस पुष्कळ वर्षें हें प्रकरण चालून आणि त्यांत हेस्टिंग्सवर फाजील निंदा व फाजील स्तुति ह्या दोहोंचाहि यथेष्ट वर्षाव होऊन शेवटीं तो संपला. १७९५ च्या एप्रिलांत त्याच्यावर आलेल्या सोळाहि आरोपांतून त्याला मुक्त केलें. हा अचिंतित निकाल ऐकून बर्कला अर्थात् वाईट वाटलें व त्यानें तसें बोलूनहि दाखविलें. तो ह्मणाला हल्लींचें युग दुष्टाचरणाचेंच असल्यामुळें कांहीं आरोपांतून हेस्टिंग्स सुटेल असा माझा अजमास होताच, पण तो सर्वच आरोपांतून सुटेल असें मला वाटलें नव्हतें. खुद्द हेस्टिंग्सलादेखील अजीबात सुटण्याची आशा नसावी असें दिसतें.

पण तो जरी सुटला, तरी त्याचे पैशाचें फार नुकसान झालें. इतके दिवस खटला चालल्यामुळें तो बहुतेक भिकेस लागला. त्याचा खर्च त्यास भरून मिळावा ह्मणून पिटशीं पुष्कळ खटपट झाली, पण ती फुकट गेली. शेवटीं कंपनी व सरकार ह्यांजमध्यें कांहीं व्यवस्था ठरून त्यास थोडेसें पेनशन मिळूं लागलें.

वॉरन हेस्टिंग्स सर्व आरोपांतून सुटला यास कारण कांहीं अंशीं बर्कचीच कृति झाली. त्याला अन्यायाची अत्यंत चीड असल्यामुळें, त्याला शुद्धाचरणाची विलक्षण चाड असल्यामुळें, आणि वॉरन हेस्टिंग्स दोषी आहे याबद्दल त्यास पूर्ण खात्री वाटत असल्यामुळें, त्याचीं भाषणें फाजील कडक होत असत, आणि त्याचा फायदा आरोपीस झाल्यावांचून अर्थात् राहिला नाहीं. त्यानें हेस्टिंग्सला लावलेल्या विशेषणांचा कटुपणा पाहून वाईट वाटल्यावांचून राहत नाहीं. पण ह्या बाबतींत शेरिडननें तर बर्कवरहि ताण केली होती; आणि त्याचीं भाषणें जरी फारच मनोवेधक असत तरी त्याच्या भाषणाचें अर्थात्च बर्कच्याइतकें वजन पडत नसे. खरोखर बर्कची बाजू इतकी मजबूत होती कीं, तिला अतिशयोक्तीची मदत नको होती. वॉरन हेस्टिंग्सच्या दुष्कृत्यांची अगदीं सरळ कहाणीच त्याला दोषी ठरविण्यास पुरे होती. तीस बर्कच्या व शेरिडनच्या वाक्पांडित्यानें जोर आला नाहीं, उलट जोर कमी झाला. ह्याचा उत्कृष्ट दाखला मिस बर्नी नामक बाईच्या आत्मचरित्रांत बरोबर सांपडतो. ती ह्मणते: बर्कनें हेस्टिंग्सवर जेव्हां दोषारोपण केलेलें मीं ऐकिलें आणि त्याच्या अपराधांची मालिका माझ्या कानीं आली तेव्हां हेस्टिंग्सबद्दलची माझी सहानुभूति हळूहळू नष्ट झाली; पण बर्कच्या हल्ल्याचा कटुपणा जसजसा वाढत चालला तसतसा त्याच्या वक्तृत्वाचा मनाची खात्री करण्याचा प्रभाव हळूहळू कमी होत चालला, आणि अशा रीतीनें त्याच्याच भाषणाच्या पूर्वभागानें केलेला परिणाम नष्ट करण्यास त्याचा उत्तरभाग कारण झाला.

आतां या खटल्यांत शिव्या आणि अतिशयोक्ति यांचा मक्ता एकाच पक्षानें घेतला होता असें नाहीं हें उघडच आहे. हेस्टिंग्स व त्याचे

हितचिंतक ह्यांनींहि ह्या शस्त्रांचा उपयोग करण्यास मुळींच कमी केलें नाहीं. पण हेस्टिंग्स यास तसें करण्यास कांहीं तरी सबब होती. एक गोष्ट अशी कीं, असें करणें हा त्या काळचा प्रघात होता, आणि दुसरी अशी कीं तो आपल्या अब्रूसाठीं लढत होता. ह्मणून त्यानें वर्तमानपत्रें, प्यॅम्फ्लेटें, निन्दात्मक लेख, थट्टेचीं चित्रें, झणझणीत शिव्या आणि चुरचुरीत चुटके ह्या सर्वांचा फिर्यादी पक्षावर वर्षाव करण्यास मुळींच कमी केलें नाहीं.

हेस्टिंग्स जरी दोषमुक्त झाला तरी बर्कची खटपट फुकट गेली असें मुळींच नाहीं. बर्कच्या भाषणांनीं जरी विशिष्ट व्यक्ति सदोष ठरली नाहीं, तरी सामान्य पद्धति सदोष ठरलीच. कारण तेणेंकरून इंग्लिश लोकांच्या असें स्पष्ट लक्षांत आलें कीं, इंग्लंदची भरभराट आणि इंग्लंदची इभ्रत हीं दोन्हीं वाढण्यास हिंदुस्थानांत न्यायपद्धति उत्तम पाहिजे. तात्पर्य, हिंदुस्थानांतील इंग्रजांच्या कारभारास तेव्हांपासून जें नवें धोरण लागलें त्याचें सर्व श्रेय बर्ककडे आहे.

वॉरन हेस्टिंग्सच्या कारकीर्दीची दुपार आणि तिपार हीं जितकीं वादळाचीं गेलीं तितकीच सांज शांततेची गेली. आजपर्यंतचा राजाचा हिंदुस्थानांतील प्रतिनिधि आतां एका खेड्यांतील खोत होऊन बसला. नंतर २३ वर्षें त्यानें डेलिसफर्ड येथील आपल्या शेतीवर आपल्या पत्नीसह सुखानें काढलीं. नंतर तो कधीं कधीं लंदनास येत असे, पण त्यास खेड्यावरच रहाण्यांत फार सुख वाटे. पिट मेल्यावर कामन्ससभेनें आपल्याविरुद्ध केलेले ठराव रद्द व्हावे ह्मणून त्यानें पुनः एकदां खटपट करून पाहिली, पण ती साधली नाहीं. त्यास एरवीं सरदारी देत होते, पण तो नको ह्मणाला. अखेरीस १८१८ च्या आगस्टांत वयाच्या ८५ व्या वर्षी तो शांतपणें मरण पावला.

---

## प्रकरण बाविसावें.

# फ्रान्सांतील राज्यक्रांति.

---

अमेरिकेंत लोकसत्ताकाची जी स्थापना झाली तेणेंकरून इंग्लंदच्या-संबंधानें पाहतां जशी केवळ वसाहतींचीच हानि झाली असें नाहीं, तसें यूरोपच्यासंबंधानें पाहतां नव्या जगांत ( अमेरिकेंत ) नव्या शासन-पद्धतीचीच स्थापना केवळ झाली असें नाहीं. युनैटेडस्टेट्समध्यें वाशिंग्टन हा लोकमतानें पहिला प्रेसिडेंट निवडला जात होता. आणि तेथील लोक आपल्या काळजीपूर्वक बनविलेल्या नव्या शासनपद्धतीची फुशारकी मारीत होते. अशा वेळीं ज्या तत्त्वांच्या आधारावर ही निवड आणि ही रचना झाली होती, तीं तत्त्वें अचिंतित आणि अनल्प अशा गोष्टींची तयारी करीत होतीं. अमेरिकेच्या स्वातंत्र्याच्या युद्धांत मोठ-मोठाले कुलवान् व श्रीमान् फ्रेंच गृहस्थ अमेरिकन वसाहतकारांच्या वतीनें लढले होते इतकेंच नव्हे तर त्यांनीं चांगलें शौर्य दाखविलें होतें. अमेरिकेंतील दंग्यास जेव्हां राज्यक्रान्तीचें स्वरूप आलें आणि राज्यक्रान्ति जेव्हां यशस्वी झाली, तेव्हां हे फ्रेंच गृहस्थ जे फ्रान्सांत परत गेले ते नव्या लोकसत्ताकाची आणि त्यांतील साध्या परंतु सणसणीत लोकांची स्तुति गातच गेले. स्वतंत्रता आणि समता ह्याबद्दलचीं जीं मतें फ्रान्सांतिल विचारवंत आणि विश्वकोशकार ( Encyclopaedists ) स्थापीत होते त्यांचा प्रत्यक्ष प्रयोग अमेरिकेंत आतां होत होता, आणि तो प्रयोग कसा काय यशस्वी होत आहे ही गोष्ट फ्रान्सांतील अत्यन्त शहाणे आणि अत्यन्त वेडे असे दोनही प्रकारचे तत्त्वविवेचक डोळ्यांत तेल घालून पाहत होते. अमेरिकेंतील सैन्यास रजा दिल्यापासून पांच वर्षांच्या आंत फ्रान्सांतील राज्यविषयक तत्त्ववेत्त्यांचे विचार सफल होण्याची विलक्षण वेळ येऊन ठेपली. फ्रान्सांत चालू असलेल्या राज्यपद्धतींत कांहीं तरी फेरबदल केला पाहिजे असें तेथील लोकांस अर्धवट रीतीनें आज किती

दिवस वाटत होतें, पण अमेरिकेंत लोकसत्ताकाची स्थापना होऊन जेव्हां त्यांच्या स्वप्नांस जागृतावस्थेचें स्वरूप आलें तोंपर्यंत त्यांच्या अर्धवट कल्पनांस व्यवस्थित स्वरूप आलें नाहीं.

ह्यावेळीं फ्रान्साची स्थिति निःसंशयच वाईट होती. तेथें सरंजामी पद्धतीचा ( फ्यूडल सिस्टिम ) जो अवशेष राहिला होता, तेणेंकरून फ्रान्साचा द्रव्यदृष्ट्या, राज्यदृष्ट्या आणि शरीरदृष्ट्या नाश होत चालला होता. अठराव्या शतकाच्या शेवटीं फ्रान्सची एकंदर स्थिति काय होती हें सविस्तर सांगणें हा ह्या पुस्तकाचा उद्देश नाहीं. त्या देशांतील राजकीय आणि सामाजिक स्थितीस जीं अनिष्टें खाऊन टाकीत होतीं, तीं सर्व टर्गोसारखे मोठाले फ्रेंच फडणवीस, व्हालटेर आणि रूसोसारखे मोठाले फ्रेंच तत्त्वज्ञ, आणि विश्वकोशकारासारखे सुज्ञ फ्रेंच लोक या सर्वांस पूर्णपणें अवगत होतीं, आणि तीं कमी करण्यासाठीं हे सर्व लोक प्रत्यक्ष आणि अप्रत्यक्ष रीत्या खटपट करीत होते. इतर देशांतीलहि तीक्ष्णदृष्टि प्रेक्षक उदाहरणार्थ लार्ड चेस्टरफील्डसारखे व्यवहारज्ञ आणि आर्थरयंगसारखे तत्वज्ञ, ह्यांनीं फ्रान्साच्या समाजस्थितींत शिरलेल्या रोगाचीं चिन्हें अवलोकिलीं होतीं, आणि त्यांचा परिणाम पुढें काय होईल त्याचें भविष्य अगोदरच वर्तवून ठेविलें होतें. सरदारवर्ग आणि धर्मोपदेशक वर्ग यांना काय ते विशेष हक्क दिलेले होते; त्यांच्या हातीं बहुतेक सर्व अधिकार असे, आणि त्याचा बहुधा ते दुरुपयोग करीत. ह्या दोन वर्गांपैकीं जे नसतील त्यांस कायदे वगैरे करण्याचा कोणताच अधिकार नसे, आणि करांचें सर्व ओझें त्यांजवरच असे. न्यायदानपद्धतीहि असावी तशी मुळींच नसे. तात्पर्य, फ्रान्सांतील तीनचतुर्थांशाहून जास्त लोक ज्या स्थितींत रहात, झगडत, दुःखें सोशीत आणि अखेरीस मरत, ती स्थिति इतकी निकृष्ट होती कीं, इतर बाबतींत फ्रान्सांत दृग्गोचर होणारी जी सुधारणेची विशेष प्रगति तिला ही अगदीं शोभत नसे. पण अशा रीतीनें फ्रान्साची स्थिति जरी वाईट होती तरी तिच्यांत ती सुधारण्याचें बीज होतें. पूर्वींपेक्षां जास्त विचारस्वातंत्र्य आणि जास्त भाषणस्वातंत्र्य यांचा पगडा

लोकांवर बसत होता. दुःख आणि क्लेश ह्यांच्यावर तात्विक विचार होत असल्यामुळें त्या दुःखांचें परिमार्जन कसें करावें आणि ते क्लेश कमी कसे करावे ह्या गोष्टीकडे लोकांचीं मनें वळूं लागलीं. त्यांस इंग्लंदची राज्य-पद्धति फार पसंत वाटूं लागली, आणि तसलीच पद्धति आपल्या देशांत सुरू करावी अशी त्यांस फार इच्छा होऊं लागली. फ्रान्साच्या मानानें इंग्लंदांतील कायद्याची समता आणि मृदुता आणि तेथील लोकांना आपले विचार बोलून दाखविण्याच्या साधनांची सुलभता हीं त्यांस मोठीं ग्राह्य वाटत. इतक्यांत अमेरिकेंत जणूं काय नवें इंग्लंद उत्पन्न झालें आणि तें एवढासा जुलूम सोसण्याच्या ऐवजीं लढाई करून स्वतंत्र झालें असें पाहून फ्रेंचांस आपण एवढाले जुलूम निमूटपणें कसे सोशितों, याची जणूं काय लाज वाटूं लागली; आणि तशी स्थिति आपण फ्रान्सांत केव्हां घडवून आणूं असें तेथील बऱ्याच लोकांच्या मनांत येऊं लागलें.

ज्या इंग्रज लोकांस फ्रेंच लोकांच्या राजकीय मतांची माहिती होती आणि ज्यांस त्यांजबद्दल कळवळा वाटत असे, त्यांस तेथें चाललेली ही चळवळ पाहून फार समाधान वाटलें. त्या देशांतील जमाबंदीची जी चुकीची पद्धति होती तिच्यायोगानें सरकारी तिजोरींत जास्त जास्त मोठें भगदाड पडूं लागलें, आणि एकामागून एक असे फडणीस जेव्हां हताश होऊन मागें सरूं लागले, तेव्हां तेथील सामान्य लोकांस आणि सरदार लोकांसहि असें वाटूं लागलें कीं, ह्या पद्धतींत कांहींतरी सुधारणा केलीच पाहिजे. अमेरिकेस मदत घेऊन गेलेला लॉफायटी ह्मणूं लागला कीं, 'स्टेट्स जनरल' ही जी फ्रान्सांतील पार्लमेंट सभा, जी आज दोन शतकें बहुतेक मुळींच भरली नव्हती, ती भरावी. तेथील राजाचा भाऊ ड्यूक ऑफ आर्लीन्स हा राजाशीं उघड उघड विरोध करूं लागला; आणि तेथील प्रसिद्ध मुत्सद्दी मिराबो हाहि लोकांचा पक्ष घेऊन भांडूं लागला. शेवटीं १७८९ च्या वसंतऋतूंत 'स्टेट्स जनरल' च्या सभेस राजानें शास्त्रोक्त निमंत्रण दिलें. ही सभा ह्मणजे जवळ जवळ इंग्लिश पार्लमेंटासारखीच होती हें वर सांगितलेंच. पण ही सभा आज

कित्येक वर्षें मुळींच भरलेली नव्हती. आज पुष्कळ राजांच्या कारकीर्दींत फ्रान्स स्वेच्छाचारी सत्तेखालींच वस्तुतः लोळत होतें. त्यामुळें ही सभा भरतांना काय काय गोष्टी कराव्या लागतात, ह्याचीदेखील कोणास माहिती नव्हती; ह्मणून ती फार जुनीं दफ्तरें चाळून मोठ्या कष्टानें मिळवावी लागली. शेवटीं ती उपलब्ध होऊन धर्माध्यक्षवर्ग, सरदारवर्ग, आणि सामान्यजनवर्ग ह्यांच्या प्रतिनिधींची सभा वर्साइल येथें भरली. ती भरण्याचें कारण असें दाखविलें कीं, राष्ट्र कर्जबाजारी होईल अशी भीति उत्पन्न होईल, अशी जी सरकारी जमाबंदीची दशा झाली आहे, ती सुधारण्याची कांहींतरी युक्ति काढावी. पण ही सभा जमल्याबरोबर असें दिसूं लागलें कीं, सभेचा उद्देश किंवा निदान बऱ्याच सभासदांचा उद्देश एवढेंच करून थांबण्याचा नाहीं. ही गोष्ट धर्मोपदेशक आणि सरदार ह्यांच्या प्रतिनिधींस पसंत पडेना. तेव्हां सामान्यजनप्रतिनिधि त्यांच्यापासून विभक्त झाले, आणि त्यांनीं आपली सभा निराळीच भरवून तीस "न्याशनल आसेंब्ली" किंवा राष्ट्रीय सभा असें नांव दिलें. तेव्हां पारीसच्या लोकांस अशी भीति पडली कीं, राजा कदाचित् ह्या सभेस जोरानें रजा देईल, ह्मणून ते दंगा करून उठले, आणि बास्टिली नांवाचा जो प्रसिद्ध व तिरस्कृत तुरुंग त्याजवर त्यांनीं हल्ला केला. तो तुरुंग फोडून तेथील कैद्यांस सोडवून रस्त्यांतून मोठ्या थाटानें मिरवीत नेलें, आणि तेथील मुख्य अधिकारी डी लॉने याचा शिरच्छेद करून त्याचें डोकेंहि रस्त्यांतून हिंडविलें.

फ्रान्सचा राजा सोळावा लुई हा जर निराळ्या प्रकारचा माणूस असता तर कदाचित् ह्या वादळांतून डोकें संभाळून तो बाहेर पडला असता पण त्याच्या अंगीं त्यास तोंड देण्याची शक्ति नव्हती व इच्छाहि नव्हती. त्याचे मंत्री, त्याचे स्नेही, त्याचे आप्त आणि त्याचे सरदार, त्याचा हा अनिश्चितपणा पाहून आणि आपलीं डोकीं कदाचित् शाबूत राहणार नाहींत अशी भीति वाटून देशत्याग करिते झाले. फ्रान्सास जणूं काय वारें लागलें आहे असें दिसूं लागलें. वारें कसलें

तर राज्यक्रांतीचें. आज कित्येक शतकें तेथील लोकांवर जुलूम होत होता; ह्मणून आतां जेव्हां त्यांच्या हातीं अधिकार आला तेव्हां सहजच ते त्याचा दुरुपयोग करूं लागले. तेथील दंगेखोर लोकांनीं व्हर्साइल येथील राजवाड्यावर हल्ला केला, आणि तेथें बरीच कत्तल उडविली आणि उडवून घेतली. लॉफायटीच्या मध्यस्तीमुळें राजाराणी हीं बचाविलीं; पण त्यांस धरून पारीसमध्यें मोठ्या दिमाखानें नेलें. तीं आतां नांवाचीं राजाराणी राहिलीं होतीं; तरी वस्तुतः आपल्या ट्यूइलिरिस नामक राजवाड्यांत कैदीच बनलेलीं होतीं.

फ्रान्सांत झालेली ही चळवळ ऐकून सर्व यूरोप अगदीं चकित होऊन गेलें. इंग्लंदांत जे लिबरल मतांचे धुरीण होते त्यांस राजकीय स्वातंत्र्याचा फ्रान्सांत नवीनच उदय होत आहे असें समजून त्यांनीं त्याबद्दल आपली पूर्ण पसंती दर्शविली. बास्टिलीचा तुरुंग फुटला हें ऐकून फॉक्स आनंदानें टिऱ्या पिटूं लागला. फ्रान्सांतील इंग्लंदचा वकील ड्यूक आफ डार्सेट ह्यानेंहि ही मोठीच राज्यक्रांति घडून आली असें समजून तिचें अभिनंदन केलें. तेव्हां अप्रसिद्ध असलेले पण पुढें फार प्रसिद्धीस येणारे तरुण लोक उत्सुक होत्साते ह्या स्वातंत्र्योदयास उद्देशून काव्यें रचूं लागले; उदाहरणार्थ वर्डस्वर्थ कवि. तद्वत्च ज्या लोकांस फ्रान्सचें हें करणें पसंत पडलें ते लोक सभा भरूं लागले, आणि आपणास असल्याच सुधारणा हव्या असें ह्मणूं लागले; आणि फ्रेंच लोकांचें अभिनंदन करण्यासाठीं आपले प्रतिनिधी तिकडे पाठवूं लागले; पण इंग्लंदांतील सामान्य लिबरल लोकांचें फ्रान्सांत होणाऱ्या गोष्टींच्यासंबंधानें सामान्यतः असें मत झालें असतां त्यांच्यांत एकजण मात्र असा होता कीं, त्याचें मत अगदीं भिन्न झालें. बरें त्याचें मत असें भिन्न होण्यास तो अंतःकरणाचा वाईट होता असें मुळींच नाहीं. उलट तो फार सदय अंतःकरणाचा असून त्याची योग्यता अशी होती कीं, त्याच्या मताची किंमत इतरांच्या मतांच्या किंमतीहून फारच जास्त होती. तो कोण ह्मणाल तर एडमंड बर्क होय. फ्रान्सांतील राज्यक्रांति अगदीं बाल्यावस्थेंत

असतां, आणि शेरिडन व फॉक्स ह्यांची फ्रेंचांची स्तुती करण्याच्या कामीं चढाओढ चालली असतां, बर्क त्या क्रांतीस अगदीं मनापासून व अत्यंत जोरानें शिव्या देऊं लागला. त्यानें "फ्रेंचराज्यक्रांतीवर विचार" ह्मणून एक पुस्तक प्रसिद्ध केलें, आणि त्याचें लागलेंच फ्रेंच भाषेंत भाषांतर झालें, आणि तें यूरोपांतील सर्व राजांस आणि राजाभिमानी लोकांस अत्यंत पसंत पडलें. तिसऱ्या जार्जाचें तर त्यासंबंधानें असें मत झालें कीं तें प्रत्येक गृहस्थानें वाचलेंच पाहिजे.

बर्कच्या मतांचें वजन दिवसेंदिवस वाढण्यास असें कारण झालें कीं, फ्रान्सांत ह्या क्रान्तीपासून ज्या ज्या गोष्टी घडून येतील ह्मणून त्यानें भविष्य केलें होतें त्या त्या सर्व तशा घडून आल्या. पण त्या घडून येण्यास कांहीं अंशीं बर्कच स्वतः कारण झाला हें विसरतां कामा नये. कारण त्याच्या लिहिण्यावरून फ्रान्सांतून पळून गेलेल्या सरदारांस चेव आला, त्यांना जास्त जास्त दोस्त मिळूं लागले, आणि यूरोपांतील राजांशीं संगनमत केल्यामुळें फ्रान्सावर हल्ला करण्यास त्यास उत्तेजन मिळालें. तें पाहून उलटपक्षीं फ्रेंच लोक जास्त चिडले, आणि त्यांनीं आपल्या राजाचें डोकेंच उडविलें. इंग्लंदचें फ्रान्साविरुद्ध मत होण्यास बर्कचेच लेख कारण झाले, आणि त्यायोगानें या दोन देशांचें दीर्घ वैमनस्य बनून राहिलें. असें अखेरीस झालें तरी प्रथम प्रथम लिबरल मताच्या इंग्लिश लोकांस फ्रान्सांत चाललेल्या गोष्टींत कांहीं एक गैर दिसलें नाहीं. बास्टिलीचें फोडणें, सरदारांच्या किल्ल्यांवर शेतकऱ्यांनीं हल्ले करणें, अशा ज्या कांहीं फाजील गोष्टी प्रथम झाल्या त्या व्हावयाच्याच असें त्यांचें मत झालें. नॅशनल आसेम्ब्लीचे लोक ज्या सुधारणा करीत आहेत त्या बरोबर आहेत, व त्या मजबूत पायावर रचल्या जात आहेत, अशी त्यांची समजूत झाली. राजा आणि राणी जरी कैद झालीं होतीं तरी त्यामध्यें त्यांस मोठेसें वाटलें नाहीं. स्वतः फ्रेंच राजास देखील त्याबद्दल कांहीं एक वाटत नव्हतें, तर तोच सुधारणापक्षास उघड उघड आणि मनः-

पूर्वक मिळाला होता. पुढें राजाचें कुटुंब पळून जाण्याचा यत्न करूं लागल्यामुळें त्यांच्यावर कैद जास्तच झाली, तरी देखील इंग्लिश लोक घाबरले नाहींत. पण बर्कला इतक्यांतच आपलीं भविष्यें खरीं होत आहेत असें वाटूं लागलें. त्याला त्या राज्यक्रांतींत तींत होणाऱ्या चुकांव्यतिरिक्त कांहींच दिसत नव्हतें. ह्मणून यूरोपांतील इतर राष्ट्रांनीं फ्रान्साविरुद्ध जेव्हां कट केला तेव्हां त्यास फार बरें वाटलें. नंतर तो आजपर्यंतचे जे त्याचे दोस्त व स्नेही होते त्यांच्यापासून त्वेषानें विभक्त होऊं लागला. जे लोक अमेरिकेंतील तंट्याच्या प्रसंगीं आणि हेस्टिंग्सवरील फिर्यादीच्या बाबतींत त्याच्या हातांत हात घालून लढत होते, तेच लोक आतां फ्रेंच लोकांचें करणें पसंत कसें करितात किंवा त्याविरुद्ध कांहींच कसें बोलत नाहींत, याचें त्यास मोठें आश्चर्य वाटूं लागलें. फॉक्सवर त्याचें आजपर्यंत मोठें प्रेम असे. पण तो आतां फ्रेंच राज्यक्रांतीचें अभिनंदन करितो हें पाहून त्यानें त्याचा स्नेह सोडून दिला. तो त्यास केवळ इंग्लंदचाच नव्हे तर सगळ्या जगाचा शत्रू भासूं लागला! १७९७त तो मेला तोंपर्यंत त्याचा त्या क्रांती-बद्दल द्वेष कायम राहिला, आणि जे जे लोक त्या क्रांतीस व त्या क्रांति-कारांस अगदीं शिव्याशाप न देतील त्यांच्यांशीं तो कधीं स्नेहभावानें वागला नाहीं.

इकडे यूरोपांतील राष्ट्रांनीं फ्रान्साविरुद्ध जेव्हां जूट केली आणि राजाचे भावांस फ्रान्सांत परत आणण्याचा विचार चालविला, आणि राजाच्या केंसास धक्का लागल्यास पारीस शहराचा नायनाट करून टाकूं अशी भीति घातली, तेव्हां फ्रेंच लोक अर्थात् रागानें आणि भीतीनें वेडे होऊन गेले. पुढें सप्टंबर महिन्यांत झालेल्या कत्तली, नॅशनल आसेम्ब्लीनें कान्व्हेन्शन हें नांव धारण करून लोकसत्ताकाची केलेली स्थापना, मॅरा, डान्टन, रोब्सपीअर, इत्यादिकांचा झालेला उदय, प्रथम राजाचा आणि मग राणीचा झालेला शिरच्छेद, आणखी मग घडून आलेल्या आणखी कत्तली, हे सर्व या जुटीचेच प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष परिणाम होत, आणि

या जुटीस उत्तेजन देणारा बर्क. बरें या जुटीच्या हातून ह्मटल्याप्रमाणें कार्य घडलें असतें तरी एक असो; पण तसेंहि झालें नाहीं. आपल्या देशावर जबरदस्त घोरपड आली आहे असें पाहून सर्व फ्रेंच लोक जीवावर उदार होऊन राज्याच्या सीमांवर येऊन धडकले, आणि त्यांच्यावर हल्ला करण्यास जीं मोठालीं सैन्यें आलीं होतीं त्यांचप्रावर त्यांनीं अशी कांहीं कडी केली कीं, सगळें जग आश्चर्यानें तोंडांत बोट घालून राहिलें. हा जो इतर यूरोपाचा फ्रान्साशीं चाललेला झगडा त्यांत इंग्लंदास ओढण्याची पिट यास हौस नव्हती. पण लोकमत हळूहळू त्या बाजूस कलूं लागलें. जार्ज राजा तर पहिल्यापासूनच फ्रेंच लोकांच्या अगदीं विरुद्ध होताच. तो ह्मणूं लागला कीं, फ्रेंचांच्या या मतांस जर एकदम फांटा दिला नाहीं तर सगळ्या यूरोपांत एकहि राजा गादीवर रहाणार नाहीं. तद्वतच इंग्लंदांतील सरदारवर्ग आणि धर्माधिकारीवर्ग, ज्यांच्या जमिनी व इतर इस्टेटी होत्या, तेहि घाबरूं लागले. त्यांस वाटलें कीं, ही फ्रान्सांतील वावटळ कदाचित् इंग्लंदच्या किनाऱ्यास येऊन पोहोंचेल, आणि मग आपलीहि तीच स्थिति होईल. लार्ड लाडरडेल, लार्ड स्टॅनहोप असे कांहीं थोडेसे सरदार फ्रान्सांतील राज्यक्रान्तीचा उघडपणें पक्ष घेणारे होते हें खरें आहे. तसेंच विरुद्ध पक्षाच्या कांहीं लोकांची फ्रेंचांशीं पूर्ण सहानुभूति होती हेंहि खरें आहे. पण एकंदर लोकमताचा ओघ त्या क्रान्तीच्या विरुद्ध होता; त्यामुळें पिटचा निरुपाय होऊं लागला.

तत्पूर्वी, फ्रान्सांत होणाऱ्या क्रान्तीविषयीं पिटचें मत प्रतिकूल नव्हतें. फ्रान्साशीं स्नेह ठेवणें इष्ट आहे असें त्याचें ठाम मत ठरलेलें होतें. १७८७सालीं फ्रान्स व इंग्लंद या मधील व्यापाराची वृद्धि होण्यासाठीं आणि तेथील कलाकौशल्यास उत्तेजन मिळण्यासाठीं फ्रान्साशीं त्यानें जो प्रसिद्ध व्यापारविषयक तह केला होता त्याचा फायदा पूर्ण होण्यासाठीं फ्रान्साशीं स्नेहभाव कायम ठेवणें अगदीं जरूर होतें. शिवाय रशिया व प्रशिया यांचें प्रस्थ फार माजत चाललें होतें त्यास अटकाव करण्यास असला स्नेहभाव करणें अवश्य आहे असें त्याचें मत होतें. इतक्यांत व्हांकाव्हर बेटामधील

नूट कासाउंट नामक एका वसाहतीसंबंधानें स्पेन व इंग्लंद यांजमध्यें हातघाईवर प्रकरण आलें; तेव्हां स्पेननें फॅमिली कॉम्पॅक्ट या तहाच्या अन्वयें फ्रान्सशीं मदत मागितली. राजा व प्रधान मदत देण्यास तयार होते; पण इतक्यांत नॅशनल आसेंब्लीनें आपल्या संमतीशिवाय लढाई करण्याचा राजाचा हक्क काढून घेतला, आणि असें ठरविलें कीं, स्पेनास यावेळीं मदत करूं नये. हें पाहून पिट यास जास्तच संतोष झाला. पण लोकमत विरुद्ध होतेंच. पुढें राजा व राणी यांचे शिरच्छेद झाले; तरी पिट गडबडला नाहीं. पण शेवटीं फ्रान्सानें पिटचा निरुपाय करून टाकिला. कारण १७९२ च्या हिंवाळ्यांत नॅशनल आसेंब्लीच्या बनलेल्या कान्व्हेन्शननें असा जाहिरनामा लाविला कीं, जीं राष्ट्रें स्वतंत्र होण्यास उत्सुक असतील त्यांस मदत करण्यास आह्मी तयार आहों. आणि तदनुरूप हालंदवर हल्ला करण्याची फ्रान्सानें तयारी देखील केली, आणि इंग्लंद जेव्हां आडवें येऊं लागलें, तेव्हां १७९३च्या आरंभीं त्यानें इंग्लंदाविरुद्धच युद्ध करण्याचें जाहीर केलें. या युद्धांत प्रथम फ्रान्सास अपजयच आला आणि जर्मनींतिल राजांनीं इंग्लंदास जर मनःपूर्वक मदत केली असती तर कदाचित् पारीस शहर त्यांच्या हातीं आलें असतें, आणि तेथील क्रान्ति कांहीं वेळ तितकीच थांबली असती. फ्रान्साच्या सभोंवतीं शत्रूचा गराडा पडल्यासारखा दिसूं लागला. इतक्यांत त्या देशांतल्या देशांतच यादवी सुरू झाली. मार्सेलीस आणि लियॉन्स हीं शहरें पारीसविरुद्ध उठलीं. टूलान शहरानें लोकसत्ताकावर उठून इंग्लिश आरमारास आपल्या बंदरांत येऊं दिलें. तेव्हां इंग्लंद व इंग्लंदचे दोस्त यांचा जय होणार असें दिसूं लागलें. पण फ्रेंच लोकांवर जसजशीं जास्त संकटें येऊं लागलीं तसतसा त्यांनीं जास्तच जोर धरिला. ते आपल्या सैन्यास उत्साहानें जाऊन मिळूं लागले; आपसांतील यादवी त्यांनीं जोरानें मोडून टाकिली; आणि राजघराण्याच्या तर्फेनें उठलेला लाव्हेन्डी याचा पराभव करून टाकिला. लियॉन्स व मार्सेलीस या शहरांचा त्यांनीं बहुतेक विध्वंस करून टाकिला. दोस्तांच्या सैन्यांपैकीं पुष्कळांचा पराभव केला; आणि जर्मनी व आस्ट्रिया यांनीं तर पोलंदची वांटणी

करून टाकण्याच्या कामीं गुंतून लढाईस मुळीं हातभारच लाविला नाहीं. त्यांस खात्री होती कीं, आपण पाहिजे तेव्हां फ्रान्सास ताळ्यावर आणूं. इतक्यांत अशी एक गोष्ट अकस्मात् घडली कीं, तेणेंकरून फ्रान्सास जास्तच जोर आला.

टूलान बंदर इंग्रजांच्या हातीं गेलें हें वर आह्मी सांगितलेंच. तें जर तसेंच त्यांच्या हातीं राहिलें असतें तर फ्रान्सास निःसंशय जास्त धोका उत्पन्न झाला असता. कारण तिकडून इंग्लंदास व इतर दोस्तांस पाहिजे तितकें सैन्य फ्रान्सांत भरतां आलें असतें. पण अशा आणी-बाणीच्या प्रसंगीं योग्य माणूस अकस्मात् पुढें आला, आणि त्यानें आपल्या चातुर्यानें फ्रान्साचा बचाव केला. तो त्यावेळीं फ्रेंचांच्या तोफखान्यावरील लेफ्टेनंटचें काम करीत असून अगदीं अप्रसिद्ध होता. तो फार चलाख बुद्धीचा तरुण माणूस असल्यामुळें त्याच्या एकदम लक्ष्यांत आलें कीं, टूलानचें एक भूशिर इंग्रजांनीं बंदोबस्ताविना मोकळें सोडिलेलें आहे, तें जर आपण घेतलें तर ते आपल्या अगदीं कह्यांत येतील. कारण तेथें तोफा लाविल्यास त्या शहराचें संरक्षण करणें अशक्य होतें. ही त्याची युक्ति वरिष्ठ अधिकाऱ्यांस पसंत पडली, आणि ती अगदीं फत्ते झाली. इंग्लिश आरमाराच्या मुख्यास आपलीं जहाजें घेऊन बंदर सोडून जाणें भाग पडलें, आणि टूलान पुनः फ्रेंचांच्या ताब्यांत आलें.

हा तरुण गृहस्थ कोण होता ह्मणाल तर नेपोलियन बोनापार्ट. त्याचा जन्म कार्सिका बेटांत आयाटचो शहरीं १७६९ त झाला होता. तो वयाच्या दहाव्या वर्षीं ब्रीन येथील लष्करी शाळेंत शिरला होता. त्यानें सोळाव्या लुईच्या कारकीर्दींत लष्करांत नोकरी केलेली होती, पण तेव्हां सांगण्यासारखें कांहींएक कृत्य त्याच्या हातून झालेलें नव्हतें. पुढें तो इतके दिवस लोकसत्ताकाचीहि नोकरी करीतच होता. त्यानें पुढें इंग्लंदास पुष्कळ टोले दिले, हें क्रमाक्रमानें येणारच आहे; पण पहिला जो टोला त्यानें त्या देशास दिला, तो टूलान शहर फ्रान्सास परत मिळवून दिलें हा होय.

प्रकरण तेविसावें.

# आयर्लंदचें बंड.

यावेळीं आयर्लंदची स्थिति समाधानकारक नव्हती. ग्रेटब्रिटनच्या अमलाविरुद्ध आयर्लंदाच्या पुष्कळच तक्रारी होत्या. त्या सगळ्या येथें सांगत बसण्याची जरूरी नाहीं. पण जार्ज राजाच्या कारकीर्दींत त्या देशाची एक विशेष तक्रार अशी होती कीं, तेथील रोमन क्यॅथलिक प्रजेला राजकीय व धर्मविषयक बाबतींत ज्या पुष्कळ अडचणी उत्पन्न केलेल्या होत्या त्या कमी करण्याचें कोणी सुचविल्यास राजा मुळींच ऐकत नसे. आयर्लंदांतील पांचषष्ठांश प्रजा क्यॅथलिक धर्माची होती; पण अमेरिकेंतील स्वातंत्र्याचें युद्ध सुरू होईतोंपर्यंत ग्रेटब्रिटन किंवा आयर्लंद यापैकीं कोणत्याहि क्यॅथलिकास पार्लमेंतांत बसण्याची किंवा पार्लमेंतीय उमेदवारास मत देण्याची, किंवा ब्यॅरिस्टर अथवा सालिसिटर होण्याची, किंवा म्यॅजिस्ट्रेट अथवा ज्यूरर होण्याची, किंवा जमीन विकत घेण्याची किंवा कर्जाबद्दल कायदेशीर जामीन होण्याची परवानगी नव्हती. गार्डनदंग्यांच्या प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें त्यांच्याविरुद्ध तत्पूर्वीं चालू असलेल्या क्रूर कायद्यांत इ० स० १७७८ सालीं कांहीं सुधारणा केली होती हें खरें आहे; कारण तत्पूर्वीं सामान्य क्यॅथलिकास आयर्लंदांत राहण्याव्यतिरिक्त दुसरी कशाचीच परवानगी नव्हती, आणि आयरिश धर्मोपदेशकास कायद्यानें तीहि परवानगी नव्हती. परंतु फ्रान्सांत फ्यूडल सिस्टिमचा पाडाव होऊन स्वातंत्र्यतत्त्वाचा जास्त उदय होईतोंपावेतों ग्रेटब्रिटन व आयर्लंद यांतील क्यॅथलिक लोकांस धार्मिक किंवा राजकीय स्वातंत्र्य ह्मणण्यासारखें कांहींएक नव्हतें. आयर्लंदांत पार्लमेंट होतें ही गोष्ट खरी आहे, पण तें प्राटेस्टंटांचें पार्लमेंट होतें; तें प्राटेस्टंटांनीं निवडलेलें असे, आणि त्यास स्वातंत्र्य असें बिलकुल नव्हतें. अमेरिकेंतील स्वातंत्र्ययुद्धानें जुलूम भोगणाऱ्या सर्वच राष्ट्रांचीं मनें विलक्षण आशांनीं गुंग होऊन गेलीं, आणि त्या बाबतींत आयर्लंदाचा नंबर पहिला होता. तथापि प्रथम आयरिश लोकांच्या मनांत इंग्लंदा-

पासून विभक्त होण्याचें नव्हतें. त्यावेळीं त्या लोकांचा मुख्य अग्रणी हेन्री ग्राटन हा होता. तो मोठा मुत्सदी, मोठा स्वदेशभक्त आणि मोठा वक्ता असे.

ग्राटनचा उद्देश इंग्लंदापासून विभक्त व्हावें किंवा आयर्लंदांत स्वतंत्र-सत्ताकाची स्थापना करावी असा मुळींच नव्हता. त्यांची हांव इतकीच होती कीं, आयर्लंदांतील सर्व पंथांच्या लोकांस पूर्ण स्वातंत्र्य असावें, आणि तेथील पार्लमेंत इंग्लिश पार्लमेंताच्या कह्यांत बिलकुल असूं नये. सारांश कानडा किंवा आस्ट्रेलिया येथें जशाप्रकारची राज्यपद्धति हल्लीं आहे तशी त्यास पाहिजे होती. अमेरिका स्वतंत्र होऊन तिचें व फ्रान्साचें जेव्हां सख्य झालें, व तें इंग्लंदास भयप्रद होऊन लढाई झाल्यास आयर्लंदाचें संरक्षण करण्यास आपण असमर्थ आहों असें जेव्हां इंग्लंदानें कबूल केलें, तेंव्हां ग्राटन व दुसरे निःसीम आयरिश स्वदेशभक्त यांनीं व्हालंटीयर फौज तयार केली. आणि अशा रीतीनें जेव्हां त्यांनीं स्वदेशरक्षणाचें काम शिरावर घेतलें तेव्हां ते स्वतःचे कायदे करण्या-साठीं सहजच स्वतःचें पार्लमेंत मागूं लागले. तेव्हां इंग्लिश सरकारानें त्यांस तितक्यापुरतें तरी स्वतंत्र पार्लमेंत दिलें ( १७८२ ), आणि तें ग्राटनच्या खटपटीनें मिळाल्यामुळें त्यास ग्राटनचें पार्लमेंत असें नांव प्राप्त झालें. तथापि आयरिश लोकांस अद्यापि धर्मस्वातंत्र्य मिळालेलें नव्हतें; ह्मणजे तेथील कॅथलिकांस वर सांगितल्याप्रमाणें पार्लमेंताचे सभासद होण्याची किंवा निवडण्याची वगैरे परवानगी नव्हती. ह्मणून ती या आयरिश पार्लमेंताच्या द्वारा मिळविण्याची ग्राटननें खटपट सुरू केली. पण तीस राजाच्या दुराग्रहामुळें यश आलें नाहीं. पिट या प्रश्नाला मनापासून अनुकूल होता, पण राजाच्या दुराग्रहास त्यास शेवटीं हार जावें लागलें, व पुनः राजास ह्या बाबतींत त्रास द्यावयाचा नाहीं असा त्यानें निश्चय केला. पण इ० स० १७९४ त अशी गोष्ट घडून आली कीं, तेथें नवीन पाठविलेला व्हाइसराय अर्ल फिट्झ् विलियम् हाहि ह्या गोष्टीस पूर्णपणें अनुकूल आढळून आला; ह्मणून त्यानें आयरिश अग्रणीच्या आशांस आपण होऊनच उत्तेजन दिलें. याचा परिणाम

असा झाला कीं, तीन महिन्यांनींच त्यास तेथून परत बोलाविणें भाग पडलें. अशा रीतीनें आयरिश लोकांच्या व त्यांच्या पुढाऱ्यांच्या आशांचा एकदम भंग झाला.

तेव्हांपासून बारीक रीतीनें पाहणाराच्या एक गोष्ट नजरेस आलीच असली पाहिजे. ती ही कीं, आयरिश लोकांस ग्राटन साहेबाच्या ज्या बातांबेताच्या मागण्या त्या पसंत पडेनाशा होऊं लागल्या, व त्यामुळें ते त्याच्या व त्याच्या मताच्या इतर पुढाऱ्यांच्या कह्यांत राहीनासे झाले. आयर्लंदास दिलेलें निराळें पार्लमेंत जरी थोडकींच वर्षें अस्तित्वांत होतें ( १७८२—१८०० ), तरी तेवढ्या मुदतींत त्या लोकांच्या ही गोष्ट लक्ष्यांत आली कीं, इंग्लंदांतल्या पार्लमेंताप्रमाणें हेंहि पार्लमेंत राजाच्या व त्याला पसंत असलेल्या मंत्र्यांच्या अगदीं मुठींत राहतें. तेव्हां अशा प्रकारचें नांवाचें स्वतंत्र पार्लमेंत मिळणें ह्मणजे मोठीशी गोष्ट नाहीं असें आयरिश स्वदेशभक्तांपैकीं जे विशेष तरुण व विशेष उत्साही होते त्यांस सहजच वाटूं लागलें; आणि परिस्थिति अनुकूलशी दिसत असल्यामुळें त्यांच्या आशा फारच उंच भराऱ्या मारूं लागल्या. या तरुणांना फ्रान्सांतील राज्यक्रान्ति अत्यन्त पसंत वाटूं लागली; आणि फ्रान्सानें स्वतंत्र होऊं पाहणाऱ्या इतर राष्ट्रांस वरच्याप्रमाणें साहाय्याचें आश्वासन दिल्यामुळें त्यांच्याहि मनांत आयर्लंद देश अगदीं स्वतंत्र करून टाकावा असें फार फार येऊं लागलें. तेव्हां अर्थात् ग्राटनच्या मागण्या त्यांस अगदीं पुळपुळीत भासूं लागल्या, व त्या कधीं सफल होणार नाहींत असेंहि वाटूं लागलें. अर्थात् ते पुढें लवकरच बंड करून उठले. त्यांच्यामध्यें पुष्कळ लोक पराक्रमी व अत्यन्त शुद्धहेतुक असे स्वदेशभक्त होते. त्यांमध्यें थीओबाल्ड वुल्फटोन आणि लार्ड एडवर्ड फिट्जरल्ड यांचा नंबर सर्वांत वर होता. आयर्लंदांत पुढें लवकरच होणाऱ्या धामधुमीच्या इतर सर्व अग्रणींप्रमाणें आणि ग्राटनप्रमाणें हे दोघेहि प्राटेस्टंट धर्माचे होते. वुल्फटोन हा मोठा हुशार व होतकरू असा तरुण माणूस होता. तो प्रथम रोमन क्यॅथलिक लोकांच्या राजकीय व धर्मविषयक अडचणी काढून टाकण्यासाठीं खटपट करणाऱ्या एका सभेचा सेक्रेटरी होऊन पुढें आला. ह्या मंडळीस कांहीं काळानें ( असोशिएशन आफ् युनैटेड्

आयरिशमेन् ) संयुक्त आयरिश मंडळी असें नांव प्राप्त झालें. या लोकांचा तेव्हांचा उद्देश वर सांगितला तेवढाच होता. पुढें आपल्याला दिसून येईलच कीं, हा हेतु जेव्हां साध्य होईना, तेव्हां ही मंडळी दुसऱ्या व जास्त कडक अशा उद्देशांसाठीं खटपट करूं लागली.

वुल्फटोन हा बायरन कवीप्रमाणें मोठा उमदा आणि आवेशयुक्त पण अम्मळ विक्षिप्त स्वभावाचा माणूस होता. विद्यार्थिदशेंत तो निष्काळजी असे, किंवा जे विषय त्याला आवडतील तेवढ्यांबद्दल तो काळजी करी, आणि अगदीं परीक्षेच्या वेळापर्यंत इतर अभ्यासांची हयगय करीत असे. त्यानें लंदनमध्यें राहून कायद्याचा अभ्यास केला होता, व तो बॅरिस्टरही झाला होता; पण त्याचें त्या धंद्यांत मुळींच लक्ष नव्हतें. त्याला वाङ्मयाची विशेष अभिरुचि असे, आणि प्रवासाची व विशेषतः लष्करी कामाची फार हौस असे.

वुल्फटोनच्या मनांत ज्या अनेक विलक्षण कल्पना नेहमीं घोळत असत त्यांपैकीं एक अशी होती कीं, अमेरिकेच्या दक्षिणसमुद्रांत एक लष्करी वसाहत करावी; अशासाठीं कीं स्पेनला ब्रिटिश राज्यास अडथळा करतां येऊं नये. ही कल्पना त्यास इतकी महत्वाची वाटली कीं, त्यानें पिटला त्याबद्दल एक पत्रदेखील लिहिलें. पिटनें अर्थात् तिकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं. असो. तिसऱ्या जार्जाकडून कॅथलिकांना राजकीय व धार्मिक हक्क मिळत नाहींत असें पाहून वुल्कटोनच्या मनानें असें घेतलें कीं, आयर्लंदास स्वातंत्र्य मिळवून दिल्याशिवाय त्यास सुखाची आशा नाहीं, आणि हें स्वातंत्र्य मिळवावयाचें तर बोनापार्ट आणि फ्रान्स यांची कांस धरिली पाहिजे. याच सुमारास वुल्फटोननें जी एक गोष्ट उदारबुद्धीचे, बुद्धिमान, आणि गरीब लोक बहुधा करितात, ती करून टाकिली होती. ह्मणजे त्यानें एकदम आपलें लग्न उरकून घेतलें होतें. त्याच्या बायकोचें नांव मटिल्डा असें असून ती त्यावेळीं केवळ सोळा वर्षांची होती. त्या दोघांचें परस्परांवर अत्यन्त प्रेम असे. टोननें जेव्हां स्वदेशसेवेंत जन्म घालविण्याचा आणि जरूर पडल्यास मरण्याचाहि निश्चय केला तेव्हां त्यानें तीस आपला हा निश्चय कळविला, पण तिनें मुळींच नको ह्मटलें नाहीं. असें सांगतात कीं,

एका आणीबाणीच्या प्रसंगीं आपण गर्भार असल्याचेंदेखील तिनें त्यास कळविलें नाहीं, असें कीं तेणेंकरून त्याची नाउमेद होऊं नये. कांहीं दिवसांनंतर, टोन अमेरिकेस गेला, आणि तेथें फ्रेंचराजसत्ताकाच्या तेथील वकिलाशीं संगनमत करून तो यूरोपास परत आला, आणि कार्नो व नेपोलियन बोनापार्ट ह्यांच्यांशीं त्यानें पत्रव्यवहार सुरू केला. त्यानें त्यांच्या मनांत असें भरवून दिलें कीं, तुह्मी जर लष्कर घेऊन जहाजांतून याल आणि आयर्लंदाच्या दक्षिण किंवा पश्चिम किनाऱ्यावर उतराल, तर आयरिश लोक तुमच्याकडे धांवून येतील, आणि नंतर मग इंग्लंदला आयर्लंद सोडून द्यावें लागेल किंवा निष्फळ लढत बसावें लागेल. नेपोलियन व कार्नो ह्यांस ही युक्ति पसंत पडली; पण त्यांचा उद्देश आयर्लंदास स्वातंत्र्य देण्याचा किंवा त्याचें कल्याण करण्याचा नव्हता, तर केवळ इंग्लंदास घोंटाळ्यांत पाडावें एवढाच होता. शेवटीं टोन फ्रेंचांच्या फौजेंत शिरला, आणि नेपोलियनच्या मनांत आपली युक्ति जास्त जास्त भरविण्याची खटपट करूं लागला.

लार्ड एडवर्ड फिटजरल्ड हा लीन्स्टर येथील मोठ्या ड्यूकचा पुत्र होता. त्याचा जन्म टोन जन्मला त्याच वर्षीं झालेला असून ते दोघे पुढें एकाच वर्षीं मरावयाचे होते. अमेरिकेंतील युद्धाच्यावेळीं तो राजाच्या पक्षानें लढलेला होता. नंतर त्यास फ्रेंच क्रान्तिकारांच्या कल्पना फार पसंत वाटूं लागल्या, आणि लष्करांत असतांना त्या मोकळ्यामनानें बोलून दाखविल्याबद्दल तो कित्येक वेळां अगदीं घोंटाळ्यांत पडण्याच्या बेतांत आला होता. नंतर तो पॅरीसमध्यें गेला, व राज्यक्रान्तीच्या बाजूचा प्रसिद्ध लेखक जो टामस पेन त्याच्याशीं ओळख करून आणि त्याच्या एकंदर मतांस व क्लृप्त्यांस अगदीं भुलून जाऊन, लोकसत्ताक स्थापन झाल्याबद्दल जे तेथें उत्साह चालले होते त्यांत प्रसिद्धपणें जाऊन मिसळला. ही गोष्ट इंग्लंदांत समजून त्यास लष्करांतून हांकून लावण्यांत आलें. तोहि वुल्फटोनसारखा उदार, शूर व उच्च स्वभावाचा माणूस असून त्यानेंहि त्याच्याप्रमाणेंच प्रीतिविवाह केलेला होता. त्याच्या बायकोचें नांव पामेला. तो पुष्कळ

वर्षें आयरिश पार्लमेंतांत प्रतिनिधि असून तो ग्राटनच्या ह्मणण्यास आपला पाठिंबा देत असे. पण राजा व त्याचा मुख्य प्रधान यांच्या-कडून आयर्लंदास कांहीं लभ्यांश व्हावयाचा नाहीं अशी त्याचीहि टोन-प्रमाणेंच लवकरच खात्री झाली. वर सांगितलेली ' युनैटेड आयरिशमेन ' ही मंडळी जेव्हां कायदेशीर मार्ग सोडून सशस्त्रबंड करण्याच्या बेतांत आली तेव्हां तिच्या पुढाऱ्यांपैकीं हा एक पुढारी बनला. पुढें तो फ्रान्सांत गेला, आणि तेथें आपणास मदत मिळावी ह्मणून त्यानें खूप खटपट केली. पण पुढें तो आयर्लंदांतील सूत्रधारित्व चालविण्यासाठीं परत आला, आणि टोन हा बोनापार्टला वरचेवर जागें करण्यासाठीं तेथेंच राहिला.

याशिवाय ह्यांचे ह्या कामीं आणखी मदतनीस ह्मटले ह्मणचे आर्थर ओकानार व टामस ॲडिस एमेट हे होते. आर्थर ओकानार हा एका मोठ्या आयरिश कुळांत जन्मलेला होता. एमेट हा हें बंड फसगतीस गेल्यावर अमेरिकेस पळून गेला, व तेथें न्यूयार्कमध्यें मोठा वकील ह्मणून पुढें प्रसिद्धीस आला. ह्याचा एक लहान भाऊ राबर्ट एमेट नामक होता त्याचेंहि ह्या दंग्यांत अंग होतें, त्याचें वर्णन पुढें येईल.

प्रस्तुत धामधुमीच्यासंबंधानें एक गोष्ट नेहमीं लक्षांत बाळगिली पाहिजे. ती ही कीं, हे दंग्याचे पुढारी जी जी गोष्ट ह्मणून करीत ती ती ताबडतोब सरकारास कळत असे. हल्लींप्रमाणें तेव्हांहि प्रत्येक आयरिश चळवळींत घरभेद्या हा असेच. ह्या हेरांस पिटकडून पगार असे, व ते आपल्यासारखेच खरे स्वदेशभक्त आहेत असें समजून टोन वगैरे लोक त्यांच्याशीं निकट सलगीनें राहत. त्यामुळें हे जें जें काय करीत त्याची प्रधानांस इत्थंभूत बातमी लागलीच लागे.

टोन बोनापार्टची उठावणी करण्यासाठीं फ्रान्सांत राहिला होता हें वर सांगितलेंच आहे. त्याची पुष्कळ दिवस दाद लागेना; कारण बोना-पार्टीच्या मागें हजार लिफडीं होतीं, व त्याला हें कृत्य फारसें महत्वाचें वाटत नव्हतें. त्यामुळें मध्यें मध्यें टोन अगदीं निराश होई, पण तो फारच धिमा माणूस होता ह्मणूनच टिकला. शेवटीं इ. स. १७९६च्या दिजंबरच्या अखेअखेरीस जनरल होश हा १४,००० हजार सैन्य बरो-

वर घेऊन आयर्लंदाच्या नैऋत्येवर हल्ला करण्यासाठीं ह्मणून आरमारावर बसून निघाला. त्याच्याबरोबर टोन हा होताच. त्यांस वारा चांगला मिळाला नाहीं. जहाजें एकसारखीं एकमेकांपासून दूर दूर जात. अखेरीस तीं ब्यांट्रीबे ह्या उपसागरांत जाऊन पोहोंचलीं, पण कांहीं केल्या किनाऱ्यास लागेनात. ह्यावेळीं जर त्यांस किनाऱ्यावर उतरतां आलें असतें तर आयर्लंद सहज स्वाधीन झालें असतें, कारण इंग्लिशांची कांहीं एक तयारी नव्हती; पण इलिझाबेथच्या वेळेला स्पॅनिश आरमाराचा जसा वादळानें पराभव केला, तशीच आतां स्थिति झाली; अखेरीस निरुपाय होऊन फ्रेंच आरमार मागें परतलें. पुढें फ्रेंचांनीं आणखी एक दोन वेळां यत्न करून पाहिले, पण त्यांस यश आलें नाहीं. प्रथम डच लोकांनीं स्थापन केलेलें लोकसत्ताक आणि फ्रेंच सरकार यांच्यामध्यें असें ठरलें कीं, डच लोकांनीं जहाजें पुरवावीं आणि फ्रेंचांनीं ५००० सैन्य पुरवावें, आणि जनरल होशनें त्याचें आधिपत्य करावें. पण डच लोक याप्रमाणें फ्रेंचांना सर्व यश देण्यास तयार होईनात. अशा रीतीनें ही स्वारी लांबणीवर पडूं लागली. इकडे टोनचा जीव तीळ तीळ तुटतच होता. इतक्यांत नोर मुकामीं इंग्रजी खलाशांनीं बंड केलें ( १७९७ ), तेव्हां अशी ही उत्तम संधि जात आहे असें पाहून टोनला कसेंसेंच झालें. शेवटीं डच सैन्यानेंच डच जहाजांतून या मोहीमेवर जावें असें ठरलें. त्याप्रमाणें तें आरमार निघालें. त्यास आडमिरल डंकन हा आडवा आला दोघां आरमारांची क्यांपर्डौन येथें चांगली चकमक उडून अखेरीस इंग्रज विजयी झाले. ॲडमिरल डंकन लार्ड क्यांपर्डौन बनला, आणि डच लोकांनीं पुनः इंग्लंदावर स्वारी करण्याचें कधीं मनांत आणिलें नाहीं. इतक्यांत जनरल होश मरण पावला, आणि अशा रीतीनें टोनचा एक फारा दिवसांचा खरा व शूर मित्र गमावला.

इकडे ह्या सर्व गोष्टी चालल्या असतां तिकडे आयर्लंदाची स्थिति जास्त जास्त वाईट होत चाललीच होती. आयरिश लोक बंडाच्या खटपटींत आहेत हें पाहून इंग्लिशसरकारानें व पार्लमेंतानें त्यांच्याविरुद्ध जबरीचे कायदे आणि लष्करी कायदे पास करण्याचें व अमलांत आणण्याचें सुरू केलें. शिवाय इंग्लंद व स्काटलंड यांतन हंगामी फौजा

तेथें पाठविल्या, व त्यांनीं आयरिश लोकांस फटके मारण्याचें, फांशीं देण्याचें, आणि गोळ्या घालून ठार करण्याचें काम सुरू केलें. इकडे युनैटेड आयरिशमेन या मंडळीस जास्त जास्त लोक मिळतच होते, व अल्स्टर प्रांतांत दंगा होण्याचा अगदीं बेत आला होता. आयरिश पार्लमेंतांत ग्राटन, आर्थर ओकानार व लार्ड एडवर्ड फिटजरल्ड हे आयर्लंदांत शांतता स्थापन करण्यास जबरीचे कायदे, फटके, फांस आणि गोळ्या यांच्या व्यतिरिक्त दुसऱ्या कांहीं साधनांचा उपयोग करा ह्मणून ओरडून सांगतच होते; पण त्यांचें कोणी ऐकेना. तेव्हां शेवटीं त्यांनीं निराश होऊन पार्लमेंतांतून आपलें अंग काढून घेतलें; आणि त्यांच्यापैकीं दुसरे दोघे निराश होऊन बंडास मिळाले. इकडे इंग्लिश पार्लमेंतांत चार्ल्स जेम्स फॉक्स आणि व्हिटब्रेड हे आयर्लंदाच्या दुःस्थितीचीं खरीं कारणें शोधून काढण्याची खटपट व्हावी ह्मणून यत्न करीतच होते, पण तेहि फुकट गेले.

बोनापार्टीनें आयर्लंदावर पुनः फौज पाठविण्याचा बेत केला होता, पण तो फिरवून ती फौज आपल्याबरोबर ईजिप्तदेशीं नेण्याचें त्यानें ठरविलें. तेव्हां युनैटेड आयरिशमेन ह्या लोकांनीं निराश होऊन स्वतःच बंड करण्याचा निश्चय केला, व लार्ड एडवर्ड फिटजरल्ड यास आपला मुख्य केलें. त्यांना वाटलें कीं, आपण उठल्याबरोबर कित्येक कौंटींचे लोक आपल्यास येऊन मिळतील; पण सरकारास आपलें सर्व करणें समजतें आहे हें त्यांच्या ध्यानींमनींही नव्हतें.

अखेरीस हें बंड इ० स० १७९८ च्या आरंभीं झालें. दंगेखोरांना वेक्सफर्ड व इतर कौंटींत कांहीं थोडेसे जय मिळाले. फादर मर्फी नांवाचा एक धर्मोपदेशक बंड होऊं नये ह्मणून प्रथम फार खटपट करीत होता, व वेक्सफर्ड कौंटीच्या एका भागांतील लोकांस आपलीं शस्त्रें सरकारच्या स्वाधीन करण्यासदेखील त्यानें लाविलें. पण तसें केल्यावरहि त्या लोकांचा छळ पूर्ववत्च होत आहे असें पाहून तो स्वतःच निराश होऊन बंडवाल्यांस जाऊन मिळाला. तो बंडवाल्यांचा मुख्य झाला, व त्यानें बरेच जय मिळविले. पण त्याला फार वेळ

टिकाव धरतां आला नाहीं. शस्त्रांची, पैशाची, सर्वच गोष्टींची त्यास वाण असल्यामुळें, अखेरीस त्याचा पराजय झाला, आणि इ० स० १७९८ च्या अखेरीस त्यास फांशीं दिलें.

एकंदर आयरिश लोकांची तीच दशा झाली. त्यांस बाहेरून मुळींच कुमक न मिळाल्यामुळें आणि त्यांस शस्त्रयुक्त व शिकलेल्या सैन्याशीं लढावयाचें असल्यामुळें ते लवकरच जेरीस आले. बंडाचा शेवट होण्याच्या पूर्वीं लार्ड एडवर्ड फिटझरल्ड हा निवर्तला. वेक्सफर्डमध्यें जेव्हां दंगा उद्भवला तेव्हां सरकारास त्याची अगोदरपासून सर्व बातमी असल्यामुळें त्यांनीं तावडतोब त्यांतील प्रमुखांस कैद केलें, आणि लार्ड एडवर्ड यास पळतां पळतां पुरे झालें. पण तो जेथें लपला होता ती जागा शोधून काढिली, आणि अशा रीतीनें ता० १९ मे १७९८ रोजीं त्यासही डब्लिन येथें कैद करण्यांत आलें. तो प्रथम स्वाधीन होईना, व सरकारचे लोक जेव्हां त्यास धरूं लागले, तेव्हां तो जीवावर उदार होऊन त्यांच्याशीं बराच झगडला; त्यांत त्यानें त्यांस कित्येक जखमा केल्या, व त्यासहि एक गोळी लागली. पुढें त्यास कैद करून नेलें. कैदेंत असतांनाच तो सहा दिवसांनीं निवर्तला.

इतक्यांत फ्रेंच लोकांनीं आयर्लंदास मदत करण्यास आणखी एक यत्न केला. जनरल हंबर्ट नांवाचा एक साहसी सरदार सरासरी एक हजार लोक घेऊन दोन तीन जहाजांत बसून आयर्लंदाकडे निघाला, आणि कॉनॉट प्रांतांत किलालाबे येथें उतरून तेथून लांगफर्डच्या कौंटी-पर्यंत त्यानें मजल मारिली. त्याला बरेच आयरिश शेतकरी जाऊन मिळाले. त्यानें त्यांस फ्रेंच डगले चढवून आपल्या सैन्यांत सामील करून घेतलें. त्यानें पुढें आपल्यापेक्षां मोठ्या अशा एका इंग्लिश फौजेवर अकस्मात् हल्ला करून जयहि मिळविला; पण अखेरीस त्यास अपेश आलें. कारण, इतक्यांत इंग्लिश फौजेनें त्याला चोहोंकडून घेरिलें. लॉर्ड कॉर्नवालीस हा इंग्लिश सैन्याचा मुख्य अधिकारी होता. जनरल हंबर्ट याचा निरुपाय होऊन त्यास इंग्लिशांस शरण जावें लागलें. तेव्हां त्यास व त्याच्या फ्रेंच सैन्यास लढाईतील कैदी समजून फ्रान्सास परत पाठवून दिलें. आयरिश लोकांस धरून बंडवाले ह्मणून बहुतेकांस

ठार केलें. यांमध्यें वुल्फटोनचा एक भाऊ मॅथ्यूटोन ह्मणून होता त्यांलाही धरून डब्लिन येथें पुढें लवकरच फांशीं दिलें. अशा रीतीनें फ्रेंचाच्या दुसऱ्या स्वारीचा निकाल लागला.

तिसरी स्वारी ता० २० सप्टेंबर १७९८ रोजीं ब्रेस्ट शहराहून निघाली, तींत ३००० फ्रेंच लोक असून नऊ जहाजें होतीं व टोनहि ह्या स्वारीबरोबर होताच. तो सेनापतीच्याच जहाजावर होता. ह्या जहाजांसहि वारा अनुकूल सांपडला नाहीं, त्यामुळें त्यांस बराच वळसा घ्यावा लागला, व त्यांची बरीच फाटाफूट झाली. अखेरीस ता० १० आक्टोबर रोजीं त्यांतलि चार जहाजें आयर्लंदच्या वायव्य किनाऱ्यावर लॉक स्विली येथें लागलीं. तेथें त्यांस आठ इंग्लिश जहाजें आडवीं आलीं. तेव्हां त्यांना एकीकडे सारून पुढें जाण्याचा त्यांचा मार्ग मुळींच खुंटला. ह्मणून इंग्लिशांच्या स्वाधीन होण्यापूर्वीं फ्रेंचाच्या बावख्यासाठीं लढण्याचा फ्रेंच सेनापतीनें निश्चय केला. पण त्याच्याजवळचीं इतर जहाजें लहान होतीं, ह्मणून त्यांस सुरक्षित जागीं जाऊन राहण्यास त्यानें हुकूम केला; आणि टोन यास असें सांगितलें कीं, तुला धरिलें तर बंडवाला समजून फांशीं देतील, आह्मांस लढाईतील कैदी समजून तसें वागवितील; करितां तूं या लहान जहाजांवर बसून आपला जीव वांचीव. पण फ्रेंचांनीं आपल्या देशासाठीं लढावें, आणि आपण जीव बचावण्यासाठीं पळून जावें हें त्यास मुळींच पसंत पडलें नाहीं. तो सेनापतीच्याच जहाजावर राहिला, आणि त्याच्याबरोबर लढून अखेरीस त्याच्या बरोबर कैदहि झाला. त्याच्या अंगावर फ्रेंचाचा लष्करी पोषाक असल्यामुळें त्यास एकदम कोणी ओळखिलें नाहीं; पण पुढें सर जार्ज हिल नामक एका अल्स्टर प्रांतांतील सरदारानें त्यास ओळखिलें. तेव्हां त्याची कोर्ट मार्शलपुढें चौकशी झाली. त्यांत त्यानें खरी खरी हकीकत सांगितली, ह्मणजे आपल्या देशासाठीं आपण भांडत होतों हें त्यानें प्रांजलपणें कबूल केलें. त्यानें कोर्टास एवढीच विनंति केली कीं, मला फांशीं न देतां गोळी घालून मारण्याचा हुकूम द्या, पण ती मान्य झाली नाहीं. इतक्यांत जान फिलिप कुरान ह्या नामांकित बॅरिस्टरानें चीफ जस्टिस लार्ड किलवार्डेन ह्याच्यापुढें असा अर्ज केला कीं, टोन हा

इंग्लिश फौजेंत नसल्यामुळें त्याची चवकशी दिवाणी कोर्टापुढेंच झाली पाहिजे. तो अर्ज मान्य होऊन त्यास दिवाणी अधिकाऱ्यांच्या स्वाधीन करण्याचा लष्करी अधिकारी प्रोव्होस्ट मार्शल यास हुकूम झाला; पण तो तो मानीना. तेव्हां चीफ जस्टिसनें त्यासच कैद करण्याचा हुकूम सोडिला. पण इतक्यांत इकडे वुल्फटोननें आपल्या गळ्याची एक शीर कापून घेतली होती, त्यामुळें पुढें तो थोडक्याच दिवसांनीं निवर्तला. इ० स० १७९८ च्या बंडांतील त्याचें मरण हीच शेवटची गोष्ट होय.

पुढें ह्या दंग्याला एक शेंपूट फुटलें. तें अर्थात् राबर्ट एमेट यानें फोडिलें. हा टामस ऑडिस एमेट याचा भाऊ असून मोठा हुशार, उदार व अविचारी आणि उत्साही असा माणूस होता. आयर्लंदच्या स्वातंत्र्याच्या आशा वुल्फटोन व लार्ड एडवर्ड फिटजरल्ड यांच्याच थडग्यांत पुरल्या गेल्या असें त्यास वाटेना. बरें, आपणास ह्या कामीं फ्रान्स मदत करील अशीहि त्यास आशा नव्हती. तेव्हां त्यानें फक्त आयरिश लोकांचीच एक मंडळी तयार केली, व तीस पुष्कळ तरुण व शूर सभासद येऊन मिळाले. त्याचा बेत डब्लिनचा किल्ला प्रथम घ्यावयाचा असा होता. इतक्यांत पिटनें " ॲक्ट आफ् युनियन " हा कायदा पसार करून घेतला होता. हा कायदा त्यानें आयरिश पार्लमेंताच्या सभासदांस सरदाऱ्या, मोठाल्या पगाराच्या जागा, मोठालीं पेन्शनें, आणि लांचादाखल रोख रकमाहि देऊन पास करून घेतला होता. सभासदांपैकीं जे खरे स्वदेशाभिमानी होते तेवढे मात्र शेवटपर्यंत विरुद्ध राहिले; पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. अखेरीस तो कायदा पसार झाला, आणि ता. १ जानेवारी १८०१ पासून अमलांत आला. या कायद्यानें आयरिश व इंग्लिश पार्लमेंत हीं दोन्हीं एक झालीं, व इंग्लिश पार्लमेंतासच आयर्लंदानें कांहीं सभासद पाठवावे असें ठरलें. ह्या कायद्यामुळें आणि लांच देऊन तो पसार करून घेतला असल्यामुळें एमेटला जास्त चीड आली, आणि त्यानें बंड करण्याचा यत्न केला (१८०३); पण त्यास बिलकुल यश आलें नाहीं. कारण पूर्वींप्रमाणें ह्या दंग्याचीहि सरकारास अगोदरपासून सर्व बातमी होतीच. त्यामुळें आयर्लंदांत

सर्वत्र एकदम बंड व्हावयाचें तर राहिलेंच, पण खुद्द डब्लिनमध्येंदेखील झालें नाहीं. नाहीं ह्मणावयास डब्लिनच्या एका रस्त्यांत मात्र थोडीशी दंगल झाली, व तिच्यांत अत्यन्त वाईट गोष्ट अशी झाली कीं, वर सांगितलेला चीफ जस्टिस याची गाडी रस्त्यांत अडवून दंगेखोरांनीं त्यास ठार केलें. तो अत्यन्त निःपक्षपाती व न्यायी असे. त्याचा पोलीसास मोठा दरारा असे, आणि सरकारच्या खुशामतीसाठीं तो कधींही अन्याय करीत नसे. डब्लिनच्या दंग्याची ही स्थिति पाहून एमेट जागा झाला, व असल्या दंग्यांनीं कांहींएक हित व्हावयाचें नाहीं व ते कधींहि यशस्वी व्हावयाचे नाहींत, हें त्याच्या लक्षांत आलें. तेव्हां तो विकलो प्रांतांत होणारा दंगा मोडण्यासाठीं ह्मणून गेला. तेथें त्यास फ्रान्सांत पळून जाण्यास सांगत होते. पण वर सांगितलेला प्रसिद्ध वकील कुरान ह्याच्या मुलीवर तो फिदा झालेला होता, ह्मणून तिला भेटण्याकरितां डब्लिन येथें परत आला. तेथें त्यास पकडिलें, व लार्ड नार्वरी नामक न्यायाधीशापुढें चवकशीसाठीं त्यास नेलें. तेथें त्यानेंहि वुल्फटोनप्रमाणें सर्व गोष्टी प्रांजलपणें कबूल केल्या, तेव्हां त्यास फांशीची शिक्षा देऊन ती लागलीच दुसऱ्या दिवशीं अमलांत आणिली.

राबर्ट एमेटच्या मरणानें जार्जांच्या कारकीर्दींतील आयरिश दंग्यांची अखेर झाली. पिटचा कायदा अद्यापि अमलांत आहेच, पण आयरिश लोकांस तो कधींहि पसंत पडलेला नाहीं हें होमरूलबद्दलची चळवळ वगैरे गोष्टींवरून स्पष्ट होतच आहे. १७०७ सालीं स्काटलंड व इंग्लंद यांचीं पार्लमेंटें एक केलीं, त्यापासून स्काटलंदची सारखी भरभराटच होत गेली, तशी या इ. स. १८०१ च्या कायद्यापासून आयर्लंदाची कां झाली नाहीं हा एक फार महत्वाचा प्रश्न आहे. पण त्याचीं सविस्तर कारणें देत बसण्यास येथें सवड नाहीं. सामान्यपणें इतकेंच ह्मणतां येईल कीं, स्काटिश व आयरिश या दोन लोकांचे जसे स्वभाव भिन्न आहेत, तशी हे दोन कायदे पसार केले तेव्हांची परिस्थिति, व ह्या दोन कायद्यांत घातलेल्या अटी हींहि परस्परांपासून फार भिन्न आहेत.

---

## प्रकरण चोविसावें.

# नेपोलियन बोनापार्ट.

जगाच्या इतिहासांत पहिल्या नेपोलियनच्या इतिहासाइतकें आश्चर्यकारक दुसरें कांहींच नाहीं. अगदीं गरीब स्थितीपासून इतक्या मोठ्या स्थितीला दुसरा कोणताच माणूस चढला नाहीं. सुधारलेल्या जगाच्या समोर याच्यापेक्षां जास्त मोठ्या सोंगाची बतावणी कोणी केली नाहीं, किंवा याच्यापेक्षां जास्त विलक्षण जय कोणाचे झाले नाहींत, अथवा जास्त शोचनीय अशी च्युतिहि कोणाची झाली नाहीं. त्याच्या विचित्र कारकीर्दींतिल प्रत्येक गोष्ट नेहमींच्या अनुभवांतील, सामान्य रूढींतील, किंवा केवळ शक्यतेंतील गोष्टींहूनहि अगदीं भिन्न, अगदीं विलक्षण, आणि अत्यन्त मोठ्या प्रमाणावर झालेली आढळून येते. प्राचीन काळचे लोक आपल्या खोदिव कामांतून जशा विलक्षण मोठाल्या मूर्ती कोरीत असत, तद्वत् याच्या असामान्य कारकीर्दीचें वर्णन करतांना इतिहासकारास विलक्षण मोठाले शब्द व विशेषणें घालण्याचा विलक्षण अधिकार आलेला दृष्टीस पडतो. तथापि वास्तविकरीत्या पाहतां त्या कारकीर्दींचें वर्णन करावयास, तिच्यांतील ज्या मुख्य मुख्य गोष्टी,--त्या मनोऱ्याच्या इकडून चढण्याच्या व तिकडून उतरण्याच्या ज्या मोठाल्या पायऱ्या,--त्यांचें यथार्थ वर्णन करणेंदेखील पुरे आहे. स्मारकस्तंभावर जिंकलेल्या निरनिराळ्या केवळ लढायांचें निवळ कथन जसें शूरराष्ट्राच्या स्वाभिमानाची तृप्ति करण्यास पुरे होतें, तद्वत् ह्या विलक्षण कारकीर्दींतील संपदा आणि आपदा यांचें हुबेहूब चित्र थोडक्याशा शब्दांनीं सुरेख रीतीनें काढतां येतें. 'कार्सिका', 'सेंट हेलेना', 'ब्रुमायर', 'मास्को', 'टुलान', 'वाटर्लू'; तात्पर्य दोन बेटें, दोन लढाया, आणि दोन शहरें, एवढ्या नांवांमध्यें या महाविजेत्याची शकावली थोडक्यांत गोविलेली आढळते.

फ्रेंच लोकांना तर--जे फ्रेंच त्याच्या अगदीं विरुद्ध असतील त्यांना-देखील नेपोलियनबद्दल कृतज्ञता आणि पसंती हीं नेहमींच वाटलीं पाहिजेत. बोर्बोन घराण्याचा ( फ्रान्सांतील राज्यकर्ते घराणें ) आणि राजा परमेश्वराचा अंश आहे या मताचा जो अत्यन्त आग्रही अभिमानी असेल त्यालादेखील, नेपोलियननें फ्रान्साच्या कधीं स्वप्नींहि आली नव्हती इतकी युद्धकीर्ति त्या देशास मिळवून दिली, ही गोष्ट नाकबूल करतां येणार नाहीं. इ. स. १७८९ च्या राज्यक्रान्तीचा जो निःसीम भक्त असेल त्याला-देखील नेपोलियनें केलेल्या अप्रतिम कामगिरीचें वैभव कबूल करणें अगदीं भाग पडतें. पहिला प्रतिवादी रोमच्या साम्राज्याइतकेंच नेपो-लियनचें साम्राज्य विस्तृत व प्रबल झालें ही गोष्ट कबूल करितो. दुसरा प्रतिवादी नेपोलियनचे कायद्याचें कोड, कला, शास्त्रें, व्यापार, शेती इत्यादिकांला त्यानें दिलेलें उत्तेजन, आणि जमाबंदी व सैन्य यांची नव्या व सुधारलेल्या शिस्तीवर केलेली रचना, ह्या गोष्टी कबूल करितो. पण तेव्हांच्या व पुढील बऱ्याच काळच्या सामान्य इंग्रजाला नेपोलियन ह्मणजे इंग्लंदचा कधीं न शमणारा केवळ शत्रूच भासत होता. टुलानच्या दिवसापासून तों वाटर्लूच्या दिवसापर्यंत तो इंग्लंदचा मोठा बागुलबुवा बनलेला होता ; कारण तेवढ्या मुदतींत त्याचें इंग्लंदशीं एक उघड उघड रीतीनें युद्ध चाललेलें असे, किंवा गुप्तपणें बेत चाललेले असत ; त्याच्या मनामध्यें नेहमीं एक उद्देश घोळत असे, त्याच्या मनाला नेहमीं एका आशारूप पिशाचाची बाधा झालेली असे. ती कोणती तर अपणास अजिंक्य समजणारा जो हा इंग्लंद देश त्याला एकदां जिंकावयाचा. पिटला खरोखर लढाईचा द्वेष असे ; पण त्याला आपला बाकीचा बहु-तेक सर्व जन्म संग्रामप्रधानाचें काम करण्यांत, आणि काल जो इटालीं-तील वीर बनलेला होता तर आज फ्रान्सचा मुख्य म्याजिस्ट्रेट बनला, व उद्यां फ्रेंचांचा बादशाह बनणारा होता, अशा भाग्यवान् वीराशीं मरेन किंवा मारीन अशा इरईनें लढण्याच्या कामीं आपली सर्व बुद्धि व सर्व शक्ति खर्च करण्यांत घालवावा लागला.

बराच दीर्घ काळपर्यंत असें दिसत होतें कीं, नेपोलियनच्या युद्ध-विषयक अचाट बुद्धीपुढें कोणाचें कांहीं एक चालावयाचें नाहीं, आणि त्याची महत्वाकांक्षा कशानेंहि तृप्त व्हावयाची नाहीं. बराच वेळपर्यंत त्याच्या तरवारीच्या धारेवर जयश्री जणू काय बसलेली आहे, आणि विजयश्रीची त्याच्यासाठीं जणू काय पायघडीच पसरलेली आहे, असें दिसे. त्यानें ईजिप्त देश व्यापून टाकिला, आणि शिकंदर बादशहानें पूर्वेकडे मिळविलेल्या जयांवर आपण ताण करणार अशीं त्यास स्वप्नें पडूं लागलीं. युरोपांतील राज्यें त्याच्या तडाक्यापुढें चुरून गेलीं. खुष्कीवर तर त्यास बहुतेक अजिंक्यपत्रच देण्याची पाळी आली. इंग्लंद त्याच्या तडाक्यांतून निभावलें यास कारण इंग्लंदचें समुद्रावर वर्चस्व होतें हें होय. पण पुष्कळ वर्षेंपावेतों नेपोलियन आपल्या देशावर केव्हां हल्ला करील याचा नेम नाहीं, अशी इंग्रजांस सतत भीति वाटत असे. ह्मणून समुद्रकिनाऱ्यावरील प्रत्येक शहरांतून लोक व्हालंटियर बनूं लागले, कवाईत शिकूं लागले, आणि शहराच्या संरक्षणाच्या स्थानांवरून पाहरे करूं लागले. इकडे युरोपांत होत असलेल्या लढायांमध्यें इंग्लंदची नाचक्की होतच होती; आणि फ्रेंचांस जर इंग्लंदच्या किनाऱ्यावर एकदां पाय ठेवतां आला असता तर इंग्लंदास फारच जड गेलें असतें. नेपोलियनची खात्री होती कीं इंग्लिश चानलची मालकी जर आपल्याकडे कांहीं कलाकपर्यंत आली तर आपण हूं हूं ह्मणतां लंदन काबीज करूं; पण तशी मालकी त्यास कधीं मिळाली नाहीं, आणि त्याच्या मनांतील हेतु सफळ झाला नाहीं. तात्पर्य इंग्लंदचें आरमार, या सर्वभक्षकाच्या तडाक्यांतून त्याच्या बचावास कारण झालें.

इंग्लिश आरमाराची स्थिति जरी अशी उत्तम होती तरी इंग्लिश खलाशांची स्थिति असावी तशी बिलकुल नव्हती. प्रथम खलाशांच्या कामावर जे लोक लावीत असत ते बहुतेक जुलूम करूनच लावीत असत. बरें, त्याला अशा रीतीनें एकदां जहाजावर घेतला ह्मणजे

त्यास चांगल्या रीतीनें वागवीतहि नसत. त्यांना पोटभर खावयास घालीत नसत, व त्यांची राहण्याची जागाहि स्वच्छ नसे. शिवाय कधीं कधीं त्यांचे वरिष्ठ अधिकारी त्यांच्यावर फार क्रूरपणा करीत. अशा स्थितीमध्यें हे खलाशी इतकें उत्तम काम करीत व इतका स्वदेशाभिमान दाखवीत ह्याचा मोठा चमत्कार वाटतो. तथापि फ्रान्साशीं लढाई सुरू होऊन प्रथम प्रथम इंग्लंदचा जिकडे तिकडे पराजय होत असतां, इंग्लिश खलाशाला जनावरापेक्षांहि जास्त वाईट रीतीनें वागविण्याची जी पद्धति तिचा भयंकर परिणाम होण्याच्या अगदीं बेतांत आला. १७९७ सालीं पुष्कळ जहाजांवरील खलाशी आपणास फार अन्यायानें वागवितात हें पाहून चिडून गेले; त्यांत सर्वांत मोठा अन्याय ह्मटला ह्मणजे हा असे कीं, त्यांचा पगार कित्येक महिन्यांचे महिने तुंबवून ठेवीत. ह्मणून स्पिट्‌सहेड येथील खलाशी वरील सालीं बंड करून उठले. तथापि त्यांनीं अगदींच शिस्त सोडिली नव्हती, आणि लार्ड हावे यानें त्यांच्याशीं सामोपचारानें वागून तें बंड मिटविलें. पण अशा रीतीनें हा दंगा दबतो न दबतो तोंच नोरबंदरीं फारच मोठें बंड झाल्याची बातमी आली. ह्या दंग्याचा पुढारी पार्कर नांवाचा एक खलाशी असून तो फार धीट व साहसी होता. त्यामुळें या दंग्यास लवकरच भयंकर स्वरूप आलें. ॲडमिरल डंकन टेक्सेल नदीमध्यें डच आरमारास कोंडून टाकण्याच्या कामीं अगदीं गर्क झाला असतां त्याचें बहुतेक सर्व आरमार लढावयाचें टाकून नोर येथील दंगेखोरांस जाऊन मिळण्यासाठीं चालतें झालें. अशा रीतीनें प्रसंग फार कठीण आला, पण इंग्लंदनें निश्चयानें वागून तोहि टाळिला. पार्कर व त्याचे कित्येक साथीदार यांस फांशीं दिलें, आणि अशा रीतीनें तो दंगा मोडून टाकिला. इकडे ॲडमिरल डंकन फक्त तीन जहाजांनिशीं इंग्लंदची अब्रू राखण्याची खटपट करीतच होता. आपल्या बाजूचीं बहुत जहाजें निघून गेलीं आहेत. आणि आपण दुर्बल झालों आहों हें डच लोकांच्या लक्षांत येऊं नये ह्मणून काल्पनिक जहाजांस एकसारख्या खुणा करण्याचा धडाका त्यानें

चालविलाच होता; आणि पुढें डच जहाजें याजवर चालून आलीं तेव्हां त्याच्या अगोदरच याचीं निघून गेलेलीं जहाजें परत आलीं होतीं, आणि पुढें जी चकमक उडाली तींत इंग्लिशांस चांगलाच जय मिळाला. त्यास क्यांपर्डौनचा जय ह्मणतात.

सारांश, ह्यावेळीं इंग्लंदांत ॲडमिरल किंवा नौकाधिपती फार उत्तम होते. तिसऱ्या जार्जाची कारकीर्द इतर कोणत्याहि गोष्टीबद्दल जरी प्रसिद्ध नसती, तरी एवढ्यावरूनदेखील संस्मरणीय झाली असती. सेन्टव्हिन्सेंट, कालिंगवुड, हार्वे, डंकन, हीं नांवें सर्व इंग्लिश लोकांस फारच प्रिय झालेलीं आहेत; पण सगळ्यांत नेल्सनचें नांव अत्यन्तच प्रिय झालेलें आहे. ह्याचा जन्म इ. स. १७५८ च्या सप्टेंबर महिन्यांत झालेला असून त्याला मृत्यु इ. स. १८०५ च्या आक्टोबरांत आला. तेवढ्या ४७ वर्षांत इंग्लंदवर मोठालीं संकटें आलीं आणि इंग्लंदास मोठाले जयहि मिळाले. इ. स. १८०५ सालीं त्यानें जो ट्राफलगारचा जय मिळविला तेणेंकरून स्पॅनिश व फ्रेंच दोनही आरमारांचा धुव्वा उडून जाऊन इंग्लंदवर स्वारी करण्याचें जें नेपोलियनचें मनोराज्य त्याचा कायमचा भंग झाला. ही जी त्यानें इंग्लंदची मोठी कामगिरी बजाविली त्याबद्दल इंग्लंदला मोठाच चट्टा सोसावा लागला. तो हा कीं खुद्द नेल्सन त्या लढाईंत मरण पावला. पण त्यानें ह्मणजे इंग्लंडचा बचाव केला होता.

नेल्सन जीवंत असून लढाया जिंकीत असतांच पिटच्या मुख्य अधिकाराला धक्का बसला. नाईलची लढाई आणि एकरचा बचाव या गोष्टी नुकत्याच घडून आलेल्या असतां, आणि नेपोलियन फ्रान्सचा मुख्य कॉन्सल होऊन एक वर्ष पुरें झालें असतां, इ० स० १८०१ सालीं पिटनें राजीनामा दिला, आणि त्याच्या जागीं ॲडिंग्टन मुख्य प्रधान बनला. तो अगदीं सामान्य मुत्सद्दी होता, आणि तीन वर्षें त्यानें आपलें दौर्बल्य व्यक्त केल्यानंतर इ० स० १८०४ सालीं निरुपाय होऊन पिट पुनः परत आला. याच वर्षीं नेपोलियन फ्रेंचांचा बादशाह

बनून पूर्वींपेक्षांहि जास्त प्रबल झालेला होता. इंग्लंदचें वर्चस्व समुद्रावर होतें हें खरें आहे, पण नेपोलियन आतां यूरोपचा मालक झाला होता. इकडे पिटची प्रकृति झपाट्यानें क्षीण होत चालली होती. नेपोलियनची भरभराट जास्त जास्तच होत आहे हें पाहून तो अगदीं निराश झाला. प्रथम उल्म येथें नेपोलियनचा मोठा जय झल्याची बातमी आली, आणि नंतर आस्टर्लिडझ् येथील आली, आणि ह्या दुसऱ्या बातमीनें पिटचें अंतःकरण फाटून गेलें. पिटच्या उदयाची वेळ जितकी प्रसन्न व शांत होती तितकीच त्याच्या अस्ताची वेळ दुःखमय व गडबडीची अशी झाली. राजाला खुष ठेवण्यासाठीं त्यानें ॲडिंग्टनला आपल्या प्रधानमंडळांत घेतलें याचें त्यास फारसें वाईट वाटलें नसेल; पण डंडस जो हल्लीं लार्ड मेलव्हिली झाला होता त्याची च्युति मात्र त्याच्या अंतःकरणास फार लागली. लार्ड मेलव्हिली हा आरमारखात्याचा खजीनदार असून तेव्हांचें त्याचें वर्तन लोकांस पसंत पडलेलें नव्हतें, ह्मणून त्याच्याविरुद्ध पार्लमेंत सभेंपुढें कित्येक निषेधदर्शक सूचना आल्या. त्या पास होऊं नयेत ह्मणून पिटनें शिकस्त करून पाहिली, पण कांहीं एक उपयोग झाला नाहीं. मतें घेतलीं तेव्हां २१६ विरुद्ध २१६ अशीं अगदीं सारखीं पडलीं, तेव्हां स्पीकरनें आपलें मत डंडसविरुद्ध दिलें. हें पाहून पिटला अत्यन्त वाईट वाटलें, व त्यास अश्रु आवरतां आवरतां पुरे झालें.

यानंतर मरणापूर्वीं पिटला एक मात्र मोठ्या आनंदाचा व अभिमानाचा प्रसंग आला. ट्रॉफलगार येथें जो इंग्लिशांचा विजय झाला त्याचें त्यास मोठें भूषण वाटलें. त्याप्रसंगीं तो आपलें अत्यन्त उत्तम व उदार असें स्वरूप धारण करून लोकांपुढें आला आणि त्यानें आपलें शेवटचें उत्तम संभाषण केलें. पण नंतर थोडक्याच आठवड्यांनीं ह्मणजे इ० स० १८०५च्या दिजंबरांत पिट बॉथ येथें असतां वर सांगितलेल्या आस्टर्लिड्झ येथील पराजयाची बातमी आली. त्या बातमीनें वस्तुतः त्याला ठारच केलें. त्याच्यापूर्वीं बरेच दिवस भयंकर रीतीनें तो आजारी होता.

ही बातमी ऐकल्यावर तो लंदन येथें आला तेथें त्याची भाची लेडी हेस्टर स्टानहोप हिनें त्याची शुश्रूषा चांगली केली; पण त्या धक्यांतून तो उठलाच नाहीं. तो तीस ह्मणाला, तो यूरोपचा नकाशा आतां गुंडाळून ठेव; आणखी दहा वर्षे त्याची जरूर लागणार नाहीं. अशा रीतीनें त्याचें चित्त व्यग्र होऊन तो २३ जानेवारी १८०६ रोजीं मरण पावला.

अशा रीतीनें ज्या इंग्लंदानें तीन महिन्यांच्या मुदतींत नेल्सन व पिट अशीं दोन अमूल्य माणसें गमाविलीं होती तेंच इंग्लंद आणखी आठ महिन्यांच्या आंत अशाच आणखीं एका मोठ्या माणसास गमावणार होतें. पिट यास वेस्टमिन्स्टर येथें पुरिलें, व त्याच्या प्रधानमंडळास हांकून लाविलें. तेव्हां त्याचा प्रतिस्पर्धी फॉक्स हा शेवटीं अधिकारारूढ झाला, पण त्याचा तो अधिकार फारच अल्प वेळ टिकला. पिटचें व त्याचें खासगी वैमनस्य कधींच नव्हतें. पिटच्या मरणानंतर त्याचें कर्ज फेडण्याकरितां आणि त्याच्या भाच्यांना पेनशन करून देण्याकरितां ज्या सूचना आणिल्या त्यांस त्यानें मोठ्या खुषीनें संमति दिली. पिट हा उत्कृष्ट मुत्सद्दी होता अशा अर्थाचें, त्याचें स्मारक करावें ह्या सूचनेस मात्र तो अनुकूल झाला नाहीं. पिटच्या मरणोत्तर लार्ड ग्रेनव्हिलीनें जें प्रधानमंडळ बनविलें त्यांत तो फॉरेन सेक्रेटरी आणि कामन्स सभेचा अग्रणी बनला. फॉक्सच्या मनांत नेहमीं तीन प्रश्न घोळत असत:— कॅथलिकांची मुक्तता, फ्रान्साशीं तह, आणि गुलामांचा व्यापार. पैकीं पहिला प्रश्न सध्यां पुढें आणिला असतां कार्य न होतां उलट प्रधानमंडळास मात्र धक्का बसेल हें तो जाणून होता. तद्वत्च फ्रान्साशीं तह होण्याची सध्यांतरी आशा नाहीं हेंहि त्यास स्पष्टपणें दिसतच होतें. पण गुलामांचा व्यापार आपणास लवकरच बंद करतां येईल अशी मात्र त्यास जबरदस्त आशा होती; आणि ह्मणून तो त्याची प्रकृति बिघडत चालली असतांहि पार्लमेंतसभेस न चुकवतां जात असे. पण त्यास जलोदर होऊन तें फोडावें लागलें. तेव्हां त्याची प्रकृति जास्तच बिघडली, आणि ता. १३ सपटंबर १८०६ रोजीं तो मरण पावला. तो त्या

काळचा अत्यन्त मोठा लिबरल मुत्सद्दी होता; आणि स्वातंत्र्याचा अत्यन्त निःसीम भक्त होता.

फॉक्स मरून फार दिवस झाले नाहींत तोंच प्रधानमंडळाची राजाशी प्रत्यक्ष चकमक उडण्याचा प्रसंग आला. त्यांनीं राजास अशी सूचना करण्याचें धाडस केलें कीं, क्यॅथलिक लोकांस व डिसेंटर लोकांस सरकारी आरमारांत व फौजेंत नोकरी धरण्याची मोकळीक द्यावी. पण जार्जाच्या आकुंचित मनाला अशी मोकळीक त्यांस देणें ह्मणजे अगदीं धर्मविरुद्ध वाटलें. ह्मणून तो कबूल होईना. तेव्हां प्रधानमंडळ मुकाट्यानें मूग खाऊन बसलें; तरी तेवढ्यानें जार्जाची तृप्ति होईना. तो त्यांस असें ह्मणूं लागला कीं, क्यॅथलिकांस कोणतीहि सवलत देण्याबद्दलची सूचना आह्मी कधींहि करणार नाहीं असें मला लेखी वचन द्या. पण प्रधानमंडळास असलें वचन देणें फारच नीचपणाचें कृत्य वाटलें; ह्मणून ते कबूल होईनात. तेव्हां त्यांस हाकून लाविलें आणि त्याच्या ऐवजीं ड्यूक आफ् पोर्टलंद आणि मि. पर्सीव्हल हे अधिकारारूढ झाले.

स्पेन्सर पर्सीव्हल हा हुशार वकील असून मोठा चतुर वावदूक व पार्लमेंतीय वक्ता होता. त्याचें खाजगी वर्तन फारच उत्कृष्ट असे. तो अधिकारावर आला तेव्हांची वेळ कठीण होती. इ स. १८१० सालीं राजकन्या आमिलिया ही मरण पावल्यामुळें राजाचें डोकें फिरून त्यास वेड लागलें. तेव्हां रीजंट कोणास नेमावें व त्यास काय अधिकार द्यावे याबद्दल पुनः कडाक्याचे वादविवाद झाले. शेवटीं इ. स. १७८८ सालीं ठरलेल्या नमुन्यावर इ० स० १८११ त रीजन्सी बिल पसार झालें. पण त्याच वर्षाच्या मे महिन्यांत पर्सीव्हल हा जान बेलिंघाम नामक एका वेड्या पिराच्या हातून गोळी लागून कामन्स सभेच्या सज्जांतच मारला गेला.

इ० स० १८११च्या जानेवारीपासून १८२०च्या जानेवारीपर्यंतचीं नऊ वर्षें हीं जरी तिसऱ्या जार्जाच्या कारकीर्दींतील शेवटचीं ह्मणून गणलीं जातात तरी वस्तुतः तीं चवथ्या जार्जाच्या कारकीर्दींतील पहिलीं

ह्मणून समजलें पाहिजे. हीं नऊ वर्षें इंग्लंदच्या इतिहासांत फार महत्वाचीं आहेत. ज्या नेपोलियनची छाया यूरोपच्या नकाशावर हळू हळू पुढें सरकत जाऊन पिटचें आयुष्य अंधः कारमय व आंखूड करती झाली होती, त्या नेपोलियनच्या भव्य आकृतीची इंग्लंदास अद्यापि सारखी भीति होतीच. पण आतां ह्या कॉर्सिकन विजेत्याशीं समुद्रावर झगडण्यास जरी नेल्सन राहिलेला नव्हता, आणि दरबारांत झगडण्यास जरी पिट राहिलेला नव्हता, तरी आतां त्याच्याशीं झगडून अखेरीस त्याचा पराजय करण्यास एक नवाच इंग्लिश वीर पुढें येत होता.

नेपोलियन जन्मला त्याचवर्षीं, ह्मणजे इ० स० १७६९ सालीं मार्निंग्टनचा पहिला अर्ल ग्यॅरेट वेलस्ली यास डब्लिन मुक्कामीं एक मुलगा झाला. त्याचें नांव आर्थर ठेविलें. आर्थर वेलस्लीच्या बाळपणाबद्दल किंवा पहिल्या तारुण्याबद्दल फारशी माहिती मिळत नाहीं. त्याच्या आईला तो मूढ वाटे, व त्यामुळें तो तिला आवडत नसे असें दिसतें. तो प्रथम चेल्सी येथें शिकला, नंतर ईटनच्या सार्वजनिक शाळेंत गेला, व तेथून ब्रुसेल्स येथें गेला; पण त्याला गाण्याशिवाय दुसऱ्या कशाची विशेष अभिरुचि लागलेली दिसत नाहीं, आणि ही अभिरुचि त्यास बापाकडून आलेली होती. त्याच्या आईला वाटे कीं, हा रणांगणांत शत्रूच्या गोळीच्या तडाक्यांत सांपडण्यापलीकडे जास्त योग्यतेचा नाहीं. ह्मणून तो सोळा वर्षांचा झाला तेव्हां आंगर्स येथील फ्रेंचांच्या लष्करी शाळेंत त्यास शिकावयास पाठविलें; तेथें त्यानें त्यास जरूर तेवढी इंजिनिअरींगची विद्या संपादन केली; याच वेळीं नेपोलियन हा ब्रीन येथील शाळेंत लष्करी विद्या शिकत होता. इ० स० १७८१ सालीं त्याचा बाप मरण पावल्यावर त्याचा वडील भाऊ मार्निंग्टनचा अर्ल बनला, आणि त्याच्या आश्रयानें आर्थर वेलस्ली हा फौजेंत शिरून ७३व्या पायदळ पलटणींत निशाणवाला बनला. नंतर वयांत येतो न येतो तोंच भावाच्या वशिल्यानें तो वरच्या पदवीस चढला, आणि आयरिश पार्लमेंताचा सभासदहि बनला. जें काम हातीं घेतलें तें मनापासून करावयाचें अशी त्यास एव्हांपासूनच

संवय लागली. पुढें फ्रान्साशीं लढाई करणें जेव्हां पिट यास भाग पडलें तेव्हां तो लार्ड मोईराच्या हाताखालीं यूरोपांत गेला, व तेथें त्याच्या दृष्टीस कांहीं लढाई पडली; पण तो १७७७त तेतिसाव्या रेजिमेंटाबरोबर हिंदुस्थानांत गेला, तेव्हांच त्याच्या खऱ्या लष्करी कारकीर्दीस सुरवात झाली. हिंदुस्थानांत त्यानें कोणकोणत्या लढाया मारिल्या व काय काय पराक्रम केले हें सर्व प्रसिद्धच आहे. तेथून परत आल्यावर त्याचा नेपोलियनशीं स्पेन व पोर्तुगाल या द्वीपकल्पांत झगडा सुरू झाला, आणि वाटर्लूच्या मैदानांत त्या झगड्याची समाप्ति झाली. डळमळणाऱ्या, पडणाऱ्या बादशाहास शेवटचा जो धक्का मिळाला तो याचाच होय. तेव्हां नेपोलियनची रवानगी सेंट हेलेना येथें झाली ( १८१५ ). व तेथें सर हडसन लोच्या क्षुद्र जुलमाखालीं त्या विलक्षण कारकीर्दीचा शेवट झाला ( १८२१ ).

तिसऱ्या जार्जाच्या कारकीर्दीच्या प्रारंभीं प्रारंभीं जशी अमेरिकेशीं अनर्थाची लढाई झाली, तशी त्या कारकीर्दीच्या शेवटीं शेवटींहि त्याच देशाशीं पुनः अनर्थाची लढाई झाली. नेपोलियननें इंग्लंदचा व्यापार बुडविण्याची जी विलक्षण शक्कल काढिलेली होती तिचा परिणाम असा झाला कीं, इंग्लंद व अमेरिका यांजमध्यें वैमनस्य उत्पन्न झालें; आणि पर्सीव्हलच्या वेडेपणामुळें उत्पन्न झालेला जो मतभेद त्याजवर त्याच्या मागून अधिकारावर आलेल्या क्यॅसलरीच्या शहाणपणानें झांकण पडेना. इंग्लिशप्रधानांचा असा आग्रह होता कीं, अमेरिकन लोकांच्या जहाजांत ब्रिटिश प्रजा आहे किंवा नाहीं हें पाहण्यासाठीं तीं जहाजें पाहिजे तेथें भरसमुद्रांस थांबविण्याचा आपणास अधिकार आहे, आणि दुसरा आग्रह असा होता कीं, ब्रिटिश माणूस अमेरिकेंत जाऊन अमेरिकन बनला तरी त्याजवरील आपला हक्क जात नाहीं. हें मतभेद शहाणे मुत्सद्दी असते तर तेव्हांच निघून गेले असते. पण पर्सीव्हल मेल्यावर लार्ड लिव्हर्पूल मुख्य प्रधान बनला, तो अगदीं आकुंचित बुद्धीचा माणूस होता व त्यास कोणतीहि सुधारणा नको असे. तो अमेरिकेचें ह्मणणें कांहींच

कबूल करीना. तेव्हां तेथील लोकांस राग येऊन ते इ. स. १८१२ च्या जून महिन्यांत इंग्लंदविरुद्ध युद्ध करण्यास प्रवृत्त झाले. ह्या लढाईंत दोनही पक्षांची फार तारांबळ उडाली. इंग्लंद नेपोलियनशीं चाललेल्या युद्धानें दुर्बल झालेलें होतें, आणि अमेरिका आपसांतील तंट्यांनीं दुर्बल झालेली होती. शिवाय तिचें आरमार फारच लहान होतें. या लढाईंतील अतिशय शरमेची गोष्ट ह्मटली ह्मणजे इंग्लिश जनरल रॉस यानें वाशिंग्टन काबीज करून तेथील क्यॅपिटल व इतर सार्वजनिक इमारती विलायत सरकारच्या हुकमावरून जाळिल्या ही होय. दोनही देशांच्या व्यापारास चांगलाच चट्टा बसल्यानंतर हें युद्ध घेंट येथें तह होऊन संपलें.

वाटर्लूच्या लढाईनंतरच्या साली शेरिडन मरण पावला. त्यास वेस्टमिन्स्टर येथें पुरलें. तो पिट व फॉक्स यांच्यामागें दहा वर्षें, बर्कच्या मागें वीस वर्षें, आणि जान्सनच्या मागें तीस वर्षें जगला होता. तात्पर्य, अठराव्या शतकास प्रसिद्धीस आणणारीं जीं मोगलीं माणसें त्यांतला तो शेवटचा होता. नंतर दोन वर्षांनीं इंग्लंदांतील मोठा कायदेपंडित, सामाजिक सुधारक आणि जगन्मित्र जो सर सॅम्युएल रॉमिली तो मोठ्या दुःखद स्थितींत मरण पावला. त्याचें त्याच्या बायकोवर अत्यंत प्रेम असे; ती आक्टोबरांत मरण पावली तेव्हां त्यास वेड लागलें, आणि त्या भरांत त्यानें आत्महत्या केली. त्यावेळीं त्याचें वय ६१ वर्षांचें होतें. तो फार प्रामाणिक व सरळ माणूस असे. त्यानें इंग्लंदच्या फौजदारी कायद्यांत फार सुधारणा करून त्याचा क्रूरपणा कमी करण्याच्या कामीं, आणि गुलामगिरीची चाल बंद करण्याच्या कामीं फार खटपट केली. राजकीय व सामाजिक सुधारणेच्या इतिहासांत त्याचें नांव नेहमीं स्मरणीय राहील.

जार्ज राजाच्या अखेरच्या अखेरच्या वर्षांत राजघराण्यामध्यें जनन व मरण या देवता बऱ्याच झपाट्यानें आपलें काम करीत होत्या. या राजाच्या दीर्घ कारकीर्दींत आणि दीर्घतर आयुष्यांत त्याला खरें सुख

फारच थोडें झालेलें होतें. त्याच्या घराण्यांत जे कौटुंबिक कलह जणू काय ठराविक बनलेले होते त्यांची छाया त्याच्या मूल वयावर पडलेली होतीच. पुढें सुदैवानें त्याला बायको चांगली मिळाली हें खरें आहे. पण त्याच्या मुलांनीं त्यास फारसें सुख मुळींच दिलें नाहीं. म्हातारपणीं तर तो अंध, बहिरा आणि शेवटीं वेडा झाल्यामुळें त्याला ते दिवस दुःखाचेच गेले. शेवटीं शेवटीं त्यास असा भ्रम पडला कीं आपणास मरून पुष्कळ दिवस होऊन गेले आहेत. तो असें म्हणत असे म्हणून म्हणतात कीं "मला तिसऱ्या जार्जाच्या स्मरणार्थ काळा पोषाख घातला पाहिजे, कारण त्याच्यासाठीं सर्वच तसा पोषाक करीत आहेत हें मला माहीत आहे." तात्पर्य, जार्ज जीवंत असून मेल्यासारखाच होता, आणि त्याला प्रिय असणारीं माणसें त्याच्या भोंवतीं एकामागून एक मरावयास लागलीं होतीं. ता. ६ नवंबर १८१७ रोजीं राजकन्या चार्लोटी मरण पावली. प्रिन्स रीजंट जार्ज याचें तें तेवढेंच अपत्य होतें. ती फार लोकप्रिय असे, गादीला प्रत्यक्ष वारसांच्या ती मालिकेंत होती; आपण गादीवर बसूं अशी तिला स्वतः फार आशा होती व इतर पुष्कळांनाहि होती. सेंट हेलेना येथील कद्यास आपली सुटका झाली तर ती हिच्याच हातून होईल अशी फार आशा होती. तिनें साक्सकोबर्गचा प्रिन्स लिओपोल्ड याच्याशीं ता. २ मे १८१६ रोजीं लग्न केलें होतें; आणि पुढें एक दीड वर्षानेंच ती मृत पोर प्रसवून त्यांतच मरण पावली. तेव्हां तिला बेविसावें वर्षदेखील पुरें झालेलें नव्हतें. तिच्या मृत्यूची वार्ता ऐकून तिची आजी जी वृद्ध राणी तीस फार वाईट वाटलें. तिची प्रकृति आधींच पुष्कळ दिवस क्षीण झालेली होती, ती आतां जास्तच क्षीण होत चालली, आणि ता० १७ नवंबर १८१८ रोजीं ती मरण पावली. तिला त्यावेळीं ७४ वर्षें झालेलीं होतीं. ती फार साधीभोळी, सरळ व प्रामाणिक बाई असे. ता. २४ मे १८१९ रोजीं तिसऱ्या जार्जाचा चवथा पुत्र डयूक आफ् केंट यास एक मुलगी झाली; तिचें नांव व्हिक्टोरिया ठेविलें. ता. २३ जानेवारी १८२० रोजीं हा डयूक मरण पावला, आणि नंतर सहा दिवसांनीं खुद्द राजा निवर्तला. त्यावेळीं त्याच्या वयास ८२वें आणि कारकीर्दीस ६०वें वर्ष लागलेलें होतें.

अतिशय मोठा राजनिष्ठ मनुष्य असता तरी त्यानें हा राजा जगला त्यापेक्षां एक तासहि जास्त जगावा अशी इच्छा केली नसती. तो मेला तो सुटला.

अशा रीतीनें जी कारकीर्द संपली ती तेव्हांच्या इंग्लंदच्या इतिहासांत अत्यन्त दीर्घ, आणि कदाचित् अत्यन्त विलक्षण अशीच होती. त्याच्या मरणाच्या पूर्वी नुक्तीच जन्मलेली व्हिक्टोरिया हिची कारकीर्द ह्याच्यापेक्षांहि दीर्घ आणि ह्याच्यापेक्षांहि जास्त विलक्षण झाली हें आमच्या वाचकांस सांगावयास नकोच. इ. स. १८३७चे इंग्लंद इ. स. १९०१च्या इंग्लंदाहून जितकें भिन्न होतें तितकें इ. स. १८२०चे इंग्लंद इ. स. १७६०च्या इंग्लंदाहून भिन्न नव्हतें. तथापि तिसऱ्या जार्जाच्या कारकीर्दीच्या साठ वर्षांत इंग्लंदांत झालेल्या घडामोडी फारच महत्वाच्या आणि फारच फलावह अशा होत्या. त्या अमदानींत इंग्लंदचें राजकिय वैभव जरी फार विलक्षण रीतीनें अवनति व उन्नति पावलें, तरी सुधारणेची प्रगति अव्याहत रीतीनें सुरूच होती. इ. स. १८२० च्या इंग्लंदची सामाजिक स्थिति इ. स. १७६० च्या सामाजिक स्थितीहून फारच भिन्न होती. लोकसंख्येची वृद्धि, मोठ्या शहरांची वाढ, जलमार्ग व खुष्कीमार्ग यांची वृद्धि, नवीन नवीन पूल बांधणें व कालवे खोदणें, माणसास श्रम कमी पडतील अशा प्रकारचे यांत्रिक शोध करणें, शास्त्रीय शोधांच्या मागें लागणें, धर्मौदार्य, भूतदया, आणि सहानुभूति जास्त दाखविणें, शिक्षणाचा हळूहळू प्रसार करणें, ज्ञानाची वृद्धि आणि रीतीभातींची सुधारणा करणें, ह्या सर्व गोष्टींमुळें, पुढें हॅनोवर घराण्याचे आणखी दोन राजे मरून गेल्यावर, याच्या कारकीर्दीपेक्षा जास्त लांब, जास्त सुप्रसिद्ध, जास्त आशाकर आणि जास्त फलावह अशी जी कारकीर्द व्हावयाची होती, तिला तिसऱ्या जार्जाची कारकीर्द ही जणूकाय योग्य प्रस्तावनाच झाली. तिसरा जार्ज जर होता त्यापेक्षां जास्त शहाणा माणूस असता तर त्याची कारकीर्द त्याच्या देशास जास्त सुखावह झाली असती; तथापि सामान्य राजांच्या दृष्टीनें पाहतां आणि त्याच्या अक्कलेच्या मगदुराच्या दृष्टीनें पाहतां, तो चांगला माणूस होता ह्या बाबतींत तरी निदान त्याचा देश पुण्यवान होता.

---

## प्रकरण पंचविसावें.

# चवथ्या जार्जाच्या कारकीर्दीस सुरवात.

चवथ्या चार्जाच्या कारकीर्दीस जी सुरवात झाली ती मोठ्याशा शुभचिन्हांनीं झाली नाहीं. तिसरा जार्ज मरून गेल्यामुळें ह्या राजाच्या नांवाची द्वाही फिरवितात न फिरवितात तों तो स्वतः इतका आजारी पडला कीं, जुन्या राजाचें शव थंड झालें नाहीं तोंच दुसऱ्यास पुरण्याची वेळ येते कीं काय अशी लोकांस भीति पडली. आतां अशी गोष्ट प्रत्यक्ष घडून आली असती तर लोक ह्मणजे दुःखानें अगदीं विव्हळ होऊन गेले असते अशी मुळींच गोष्ट नाहीं. नवा राजा गादीवर आला तेव्हां तो बराच वृद्ध झालेला होता, तो आज पुष्कळ वर्षें दुय्यम राजाचें काम करीत होताच. त्याची एकंदर राहणी किती घाणेरडी आहे हें सर्वांस माहीत होतें, आणि हा जगला तरच आपल्या देशाची धडगत आहे असें कोणासही वाटत नव्हतें. तात्पर्य, ह्या गोष्टीचें हल्लीं जितकें महत्व सहजच वाटतें तितकें त्यावेळीं वाटत नव्हतें. पण कर्मधर्मसंयोगानें जार्ज बरा झाला. तथापि लागलीच दुसरी बातमी उठली ती ही कीं तो आपल्या राणीचा घटस्फोट करून टाकण्याकरितां आपल्या प्रधानांची मदत मागत आहे. अशा रीतीनें नव्या कारकीर्दीस सुरवात क्वचित्च होत असेल. बरें, हें प्रकरण निवर्ते न निवर्ते तों अशाप्रकारचा एक गुप्त कट उद्भवला कीं, तसा कट त्यावेळीं इंग्लंदांत बहुतेक कधींहि झालेला नव्हता, व हल्लीं तर मुळींच होत नाहीं. ह्या सर्व गोष्टींचें पुढें सविस्तर वर्णन येणारच आहे. ही नुसती प्रस्तावना झाली.

वृद्ध राजा मरावयास टेंकला तेव्हां जार्ज हा फार आजारी असल्यामुळें त्याच्या समाचारास त्यास जातां आलें नाहीं हें सांगावयास नकोच. पुढें तो लवकर बरा झाला हें वर सांगितलेंच आहे. तेव्हां त्याला राजनिष्ठेची मानपत्रें रीतीप्रमाणें मिळालीं. त्यानें रीतीप्रमाणें

गादीवर बसल्याचें इतर राजांस जाहीर केलें, आणि आपल्या 'परम प्रिय' पित्याच्या मृत्यूबद्दल त्यानें रीतीप्रमाणें फार दुःखप्रदर्शनहि केलें. जें प्रधानमंडळ इतके दिवस कारभार करीत होतें तेंच त्यानें कायम केलें. यावेळीं लार्ड लिव्हरपूल मुख्य प्रधान होता, लार्ड एल्डन लार्ड चान्सलर होता. या प्रधानमंडळापैकीं लार्ड पामर्स्टन हा अत्यन्त तरुण प्रधान होता.

वेळ मोठी घोंटाळ्याची होती. लार्ड लिव्हरपूल हा अगदीं जुन्या तऱ्हेचा टोरी असून त्याला राजकीय सुधारणा किंवा क्रान्ति मुळींच आवडत नव्हती. लोकांचीं गाऱ्हाणीं कोणी सरकारापुढें मांडूं लागला तर त्याला धरावा आणि तुरुंगांत टाकावा एवढीच त्याची कल्पना असे. तें गाऱ्हाणें ऐकून ध्यावें व त्यांत तथ्यांश असल्यास त्याचें निरसन करावें, ही कल्पना त्यास मुळींच शिवलेली नव्हती. जमाबंदीच्या कामांत मात्र त्याचीं मतें जरा सुधारलेलीं असत. लार्ड एल्डन हा फार धूर्त असून स्वार्थसाधु होता, आणि तो जरी अगदीं जुन्या तऱ्हेचा टोरी ह्मणून आपणांस दाखवीत असे तरी त्याचीं खरीं मतें सुधारलेलींच असत.

इकडे राजाची राणीचा घटस्फोट करण्याची खटपट चाललीच होती. पण तिच्याविरुद्ध आणिलेला पुरावा बरोबर नसल्यामुळें प्रधान कां कूं करीत होते; तथापि राजकीय प्रार्थनापुस्तकांतून तिचें नांव गाळण्यास ते कबूल झाले. राणी यावेळीं रोम येथें होती. ती ह्मणूं लागली कीं, माझा एकंदर कायतो निकाल लवकर न कराल आणि माझे योग्य हक्क मला सर्व न द्याल, तर मी एकदम लंदनास येईन. हेन्री ब्रूहाम हा तिच्या वतीनें इंग्लंदांत खटपट करीत होता, आणि ह्या तंट्याची कांहीं तरी तडजोड करावी अशी त्याची फार इच्छा होती. पण जार्ज कोणत्याहि तडजोडीस कबूल होईना. तिला त्याचा कायमचा घटस्फोट करून टाकावयाचा होता. शेवटीं पुष्कळ वाटाघाट होऊन अशा तडजोडीस राजा मोठ्या नाखुषीनें कबूल झाला कीं, राणीनें ९२,००० पौंडांचें वर्षासन घ्यावें, तिच्या पदव्या तिनें बाह्यदेशीं लावून घ्याव्या, पण इंग्लंदांत तिचें नांव प्रार्थनापुस्तकांत येऊं नये, किंवा ती राणी आहे असें

कोणत्याहि सरकारी कागदांत नमुद होऊं नये. ह्या अटीस राणी मुळींच कबूल होईना व ती एकदम इंग्लंदास निघाली. ब्रूहामशिवाय विल्बर फोर्स, क्यॅनिंग, पुढें चीफ जस्टिस झालेला डेन्मन, आणि अल्डर्मन वूड, हे तिचे मुख्य हितचिंतक होते; कारण राजानें तिजवर आणिलेल्या आरोपांपैकीं विशेष भयंकर आरोपांतून ती मुक्त आहे असें त्यांस मनःपूर्वक वाटत होतें. शेवटीं राजाच्या ह्मणण्याप्रमाणें हा खटला लार्डांच्या सभेपुढें नेण्यास प्रधान कबूल झाले; पण राणी लंदनास आली तेव्हां लोकांस तिच्याबद्दल इतका कळवळा वाटूं लागला कीं, ते तिच्या वतीनें दंगा करण्यासदेखील तयार झाले; आणि जे लोक राणीच्या विरुद्ध आहेत ह्मणून वाटतील त्यांजवर हल्ले करूं लागले. त्यांत ड्यूक आफ वेलिंग्टन हा एक होता. जार्ज क्यॅनिंग हा ह्या खटल्याच्या अगदीं विरुद्ध असल्यामुळें त्यानें प्रधानकीचा एकदम राजीनामा दिला. ह्या खटल्याचें सविस्तर वर्णन करण्याचें प्रयोजन नाहीं. ब्रूहाम व डेन्मन हे राणीच्यातर्फे वकील होते. त्यांनीं आपल्या संभाषणांतून राजावर खूप ताशेरा झोडिला. शेवटीं ह्या बिलाच्या तिसऱ्या वाचनास लार्डांच्या सभेंत काय तीं नऊ मतें जास्त मिळालीं. तेव्हां कामन्स सभेपुढें तें बिल नेल्यास त्याची धडगत दिसत नाहीं असें समजून प्रधानांनीं तें मुकाट्यानें मागें घेतलें. तथापि तेवढ्यावरून तंटा मिटला असें मुळींच नाहीं. राजास राज्याभिषेक अद्यापि व्हावयाचाच होता, व तो होईल तितका लवकर करून घेण्याविषयीं राजा फार उत्सुक झाला होता. तेव्हां राणीनें असें जाहीर केलें कीं, आपण त्या दिवशीं वेस्ट मिन्स्टर आबेच्या देवळांत हजर राहून राजाची पत्नी ह्या नात्यानें आपला राज्याभिषेक करून घेण्याचा हक्क प्रतिपादणार. तेव्हां तडजोडीबद्दल पुनः खटपटी सुरू झाल्या, व पूर्वींच्या अटींस कबूल होण्यास राणीस आग्रह होऊं लागला. ती बिलकुल कबूल होईना. तेव्हां राजानें राज्यारोहण समारंभाच्या दिवशीं तिकिटाशिवाय वेस्टमिन्स्टर आबेमध्यें कोणास घेऊं नये असा हुकूम सोडिला. ह्मणून राणी जेव्हां हट्टानें दरवाजापुढें आली तेव्हां तीस आंत सोडिलें नाहीं. ही गोष्ट ता० १९ जुलई १८१९

रोजीं झाली. त्यावेळीं थाटमाट फारच मोठा केला हें उघडच आहे. पण ह्या तंट्यामुळें एकंदर समारंभाचा विरस झाला. पुढें ही दुर्दैवी राणी फार दिवस जगली नाहीं. ता० ७ आगस्ट रोजीं ती मरण पावली. यावेळीं राजा आयर्लंदास जाण्याच्या बेतांत होता, तो ही फार आजारी पाहून लाजेकाजेनें थांबला.

इकडे जार्जाच्या राज्यारोहणाच्या घंटा वाजत असतां तिकडे सेंट हेलेना एथें इंलंदचा अत्यंत मोठा शत्रु मरावयास घातला होता. ता० ९ मे १८२१ रोजीं नेपोलियन निवर्तला. त्याच्या मरणाची वार्ता ऐकून सर्व जगांत अर्थात् एक प्रकारचा हाहाःकार झाला. इतिहासांतील अत्यन्त विलक्षण व्यक्तींपैकीं तो एक होता ह्यांत बिलकुल संशय नाहीं. विजेता या नात्यानें अर्वाचीन इतिहासांत त्याच्या तोडीचा माणूस कोणीच दृष्टीस पडत नाहीं. तो वनवासांत असतां त्याला बारीक सारीक गोष्टींतदेखील त्रास देत असत, आणि त्याबद्दल तो एकसारखी कुरकुर करीत असे हें वाचून कसेंसेंच वाटतें. त्याला बादशहा न ह्मणतां केवळ जनरल ह्मणावयाचें ह्मणून जो आग्रह चालला होता तो जितका क्षुद्रबुद्धीचा तितकाच मूर्खपणाचाहि निदर्शक होता; कारण फ्रेंच लोकांस जर त्याला बादशहा बनवण्याचा हक्क नव्हता तर जनरल बनवण्याचा तरी कोठून आला? शिवाय त्याच्यावर कैदहि फारच सक्त ठेविली होती.

राजा गादीवर बसल्यावर लवकरच एक गुप्त कट झाला ह्मणून आह्मीं वर सांगितलें, त्याचें नांव 'केटो स्ट्रीट कान्स्पिरसी' अथवा केटोनामक रस्त्यांतील गुप्त कट. या कटांतील लोकांचा असा बेत होता कीं, सगळ्या प्रधानमंडळाची एकदम कत्तल उडवावयाची. कटाचा मुख्य पुढारी थिसलवुड नामक अर्धवट वेडा व अर्धवट लुच्चा असा एक माणूस होता त्याला असा भ्रम झाला होता कीं, प्रधानांनीं आपलें कांहीं खासगी नुकसान केलेलें असून त्याबद्दल सूड उगविण्यासाठीं त्यांस ठार करणें अगदीं योग्य आहे. हा विचार त्यानें तिसरा जार्ज जिवंत असतांच मनांत आणिलेला होता; पण तो मेला तेव्हां नवा राजा कदाचित् प्रस्तुत प्रधानांस हांकून देईल, व मग आपणास सूड उगविण्याचें कारण राहणार नाहीं

ह्या अजमासावर तो अंमल थांबला होता. पण चवथ्या जार्जानें त्या प्रधानमंडळासच कायम ठेविलें हें पाहून त्यास तें कृत्य हातीं घेणें ज़रूर वाटलें.

हा सर्व बेत एडवर्ड्स नांवाचा सरकारी हेर होता त्यास पूर्वींपासूनच माहीत होता. त्यानें थिसलवुड यास असें सुचविलें कीं ता० २३ फेब्रुवारी १८२० रोजीं लार्ड हॅरोबी याच्या घरीं सर्व प्रधानांस मेजवानी होणार आहे, ती संधि तुला आपला कार्यभाग उरकून घेण्यास बरी आहे. थिसलवुड यास ही गोष्ट पसंत पडली. तो व त्याचे मित्र केटो स्ट्रीट या गल्लींत राहत असत. तेथून निघून लॉर्ड हॅरोबीच्या वाड्यावर सर्व पाहुणे येऊन पोहोंचल्याबरोबर येण्याचा त्यांनीं बेत केला, आणि एकानें दरवाजावर ठोठावून दरवाजा उघडला ह्मणजे सर्वांनीं एकदम शिरून प्रधानांचा समाचार घेण्याचें ठरविलें. त्या हेरानें अर्थात् ही सर्व बातमी लार्ड हॅरोबी यास आगाऊ दिली असल्यामुळें त्यानें मेजवानीचा वगैरे कांहींएक बेत न करितां पोलीसास मात्र वर्दी देऊन ठेविली होती; आणि शेजारीं यार्कचा आर्चबिशप राहत होता त्याच्या घरीं मेजवानीस पाहुणे येत असल्यामुळें कटवाले सहजच फसून गेले. त्यामुळें पोलीसानें त्यांजवर आयताच हल्ला केला. त्यांत थिसलवुडनें एका पोलीस शिपायास ठार केलें, आणि लष्करी शिपाई वेळेवर न आल्यामुळें कटवाले पळून गेले; पण दुसऱ्या दिवशीं थिसलवुड यास कैद केलें. त्याची व त्याच्या चार भागीदारांची चयकशी करून पांचहि जणांस देहान्त शिक्षा दिली, आणि तदनुसार ता० १ मे रोजीं त्या सर्वांस फांशीं दिलें.

ह्या खटल्यांत जो पुरावा पुढें आला त्यावरून असें स्पष्ट दिसत होतें कीं, ह्या कटांत केटोस्ट्रीटमधील ह्या थोड्याशा वेड्या पीरांखेरीज दुसरें कोणी सामील नव्हतें. तथापि खुद्द राजाच्या भाषणांत असा उल्लेख आला कीं, ह्या कटावरून देशांत फार असंतोष उत्पन्न झाला आहे आणि तो दाबून टाकण्यासाठीं कडक कायद्यांचा उपयोग करणें जरूर आहे असें स्पष्ट दिसतें. बरें, ज्या एडवर्डसनें ह्या वेड्या पिरांस जणूं काय अपराधास प्रवृत्त केलें त्याचें काय झालें हें मुळींच समजत नाहीं. त्यावेळची

समजूत असले गुप्त हेर सरकारचें मोठें काम करितात व त्याबद्दल त्यांस बक्षिसी पाहिजे अशी असे. वास्तविक रीत्या पाहतां असल्या दंग्यांचें कारण लोकांस आपलीं राजकीय किंवा सामाजिक गाऱ्हाणीं प्रसिद्धपणें गाण्यास प्रतिबंध करणें हेंच होय. पण तेव्हांची समजूत कांहीं निराळी असे. तेव्हां लोकांस शिक्षण देणें हेंदेखील धोक्याचें समजत; आणि कायदेहि असें कांहीं क्रूर असत कीं, वित्तापहरणाला जीवितापहरणा-इतकीच कडक शिक्षा सांगितली असे.

हा क्रूरपणा कमी करण्यासाठीं प्रसिद्ध इतिहासकार, जगन्मित्र व तत्त्वज्ञ सर जेम्स म्यॅकिंटाश ह्यानें ह्या सुमारास फार खटपट केली. त्यानें कामन्स सभेपुढें असें एक बिल आणिलें कीं, पांच शिलिंग किंमतीचा माल कोणी चोरिल्यास त्याला जी देहान्त शिक्षा देतात ती रद्द करावी. ही शिक्षा दुसऱ्या असल्या बऱ्याच हलक्या गुन्ह्यांना कायद्यांत त्यावेळीं सांगितलेली असे; तीहि रद्द करावी अशी सर जेम्सची खटपट होती; पण ती आणखी एक दोन गुन्ह्यांपुरतीच कायती रद्द झाली.

लार्ड एल्डनसारख्या लोकांचीदेखील त्यावेळीं असल्या शिक्षांच्या-संबंधानें विलक्षण समजूत असे ह्याचा चमत्कार वाटतो. ह्या बिलावर वादविवाद चालला असतां लार्ड एल्डननें अशी भीति प्रदर्शित केली कीं, ही शिक्षा बारीक चोऱ्यांच्यासंबंधानें बंद केल्यास किराण्या जिनसांचीं सर्व दुकानें बंद पडतील! पण वास्तविक स्थिति अशी होती कीं, असल्या गुन्ह्यांस शिक्षा इतक्या कडक असल्यामुळें जुरी आरोपींस सोडून देत, किंवा चोरीचा माल पांच शिलिंगांहून कमी किंमतीचा आहे असें ठरवीत; आणि अशा रीतीनें कायद्याचा उद्देश विफल होत असे.

इकडे सर जेम्स म्यॅकिंटाश कायद्याचा फाजील कडकपणा ह्याप्रमाणें कमी करण्याची खटपट करीत असतां तिकडे हेन्री ब्रूहाम हा राष्ट्रीय शिक्षणाची जी लाजिरवाणी हेळसांड इंग्लंदांत त्यावेळीं होती तिजकडे पार्लमेंताचें व राष्ट्राचें लक्ष पोहोंचविण्याची खटपट करीत होता. ता० २८ जून १८२० रोजीं इंग्लंद व वेल्स यांस लागू करण्यासाठीं ब्रूहामनें

आपली पहिली विशिष्ट क्लप्ति कामन्ससभेपुढें आणिली. त्याच्यापूर्वीं कांहीं दिवस एक पार्लमेंतीय कमिटी बसलेली होती आणि देशांतील विशेष गरीब भागांतून शिक्षणाची स्थिति काय आहे याची चवकशी करीत होती. हीहि चवकशी अर्थात् ब्रूहामच्याच सूचनेवरून सुरू केलेली होती; पण तिच्यापासून फलनिष्पत्ति होण्याचा संभव नाहीं असें पाहून त्यानें ही क्लप्ति पुढें आणिली होती. ती अर्थात् यावेळीं मान्य झाली नाहीं हें सांगावयास नकोच. पण चमत्कार असा कीं, असली लोकशिक्षणाची पद्धति प्रशिया व इतर युरोपीय देशांतून आज कितीएक वर्षें अमलांत आलेली होती. असो; पण ब्रूहामनें जो हा विषय अशा रीतीनें पुढें आणिला त्याचा पुनःपुनः खल करण्याचें काम त्यानें आपल्या दीर्घ कारकीर्दीच्या अखेरपर्यंत सारखें चालविलें होतें.

याचवेळीं दुसऱ्या कित्येक बाबतींत दुसरे कित्येक लोक सुधारणा करूं पाहतच होते. उदाहरणार्थ, लार्ड जॉन रसेल यानें पार्लमेंताचे प्रतिनिधी निवडण्याच्या पद्धतीची सुधारणा करण्याची खटपट करण्याचे कामास एव्हांपासूनच सुरवात केली, आणि लांब्टन नामक एका गृहस्थानें (जो पुढें लार्ड डर्हम् ह्मणून प्रसिद्धीस आला) त्याच दिशेनें बरेच जोराचे यत्न करून पाहिले. यावेळीं दोघांपैकीं एकासहि यश आलें नाहीं. अजून त्या प्रश्नास तितकें निकडीचें स्वरूप आलें नव्हतें. तें पुढें थोडक्या वर्षांनीं यावयाचें होतें. पण एव्हांदेखील ही गोष्ट स्पष्ट दिसावयास लागली होती कीं, राजाची आज्ञा डोळे मिटून शिरसा वंद्य मानण्याचे दिवस निघून गेले आहेत. सुधारणावाद्यांच्या मागण्यांस जोर येण्यास यावेळीं दुसरें एक कारण असें झालें होतें कीं, शेतकऱ्यांची स्थिति बिघडलेली होती. शिवाय लढाईच्या वेळीं व्यापार व उदीम यांस जो अस्वाभाविक जोर आला होता तो जाऊन त्यांना आतां क्षीणावस्था आली होती. तात्पर्य देशाची स्थितिच अशी झालेली होती कीं, त्याची राजकीय व सामाजिक स्थिति समाधानकारक असती तरी सुधारणेच्या मागणीस जोर आला असता. ती असमाधानकारक असल्यामुळें तीस जास्तच जोर आला.

इकडे राजा आयर्लंद, हॅनोवर व स्काटलंद या देशांस थाटमाटाच्या भेटी देण्याच्या कामीं गुंतला होता. क्यॅरोलिन राणीच्या मरणामुळें आयर्लंदांतील त्याचें गमन त्यास कांहीं दिवस तहकूब करावें लागलें होतें हें वर सांगितलेंच. पण तो नंतर लवकरच तेथें गेला. तो पूर्वींचा फॉक्स व शेरिडन यांचा परम स्नेही असल्यामुळें आणि फॉक्स हा आयर्लंदाचा खरा हितचिंतक असल्यामुळें आयरिश लोकांस या भेटीपासून आपणास फार फायदा होईल असें सहजच वाटलें. आयरिश लोकांतील महावक्ता व स्वदेशभक्त डॅनियल ओकानेल यालाही फारच आशा वाटली, पण त्याची लवकरच चांगलीच निराशा व्हावयाची होती. गतशतकांतील मोठा आयरिश स्वदेशभक्त हेन्री ग्राटन हा त्याच्या सुदैवानें आधींच एक वर्ष मरून गेलेला होता. त्याला असले हे प्रसंग पाहवे लागले नाहींत हें त्याचें नशीबच होय.

आयर्लंदांत पोहोंचल्यावर खुद्द राजानें असें कांहीं वर्तन केलें कीं, तेणेंकरून आयरिश लोकांस फारच आशा वाटण्यास कारण झालें. ता० १२ आगस्ट १८२१ रोजीं त्यानें जेव्हां आयर्लंदांत प्रवेश केला व तेथें जेव्हां त्याचें उत्तम स्वागत झालें तेव्हां तो ह्मणाला, मला तुमच्या येथें येण्यास फारच आनंद वाटतो. माझ्या घराण्यांत मीच प्रथम येथें आलों याबद्दल मला अभिमान वाटतो. लहानपणीं आयर्लंदावर माझें फार प्रेम असे, ह्मणून माझ्या लाडक्या आयरिश मित्रांमध्यें मी आल्याबद्दल मला फार आनंद वाटतो इ० इ०. अशा थाटाचें त्याचें भाषण झाल्यामुळें आयरिश लोक साहजिकच त्यास अगदीं भाळले, आणि त्यांस आनंदाच्या गुदगुल्या होऊं लागल्या. ता० १७ रोजीं जेव्हां त्यानें मोठ्या थाटानें डब्लिन शहरीं प्रवेश केला, तेव्हां लोकांनीं केलेलें स्वागत पाहून त्यानें डोळ्यांतून अश्रुदेखील ढाळिले. तेव्हां लोकांची ह्याच्या चांगुलपणाबद्दल अगदीं पक्की खात्री झाली. ता० ३ सप्टेंबररोजीं त्यानें आयर्लंद सोडिलें; त्यावेळीं ओकानेलनें त्याच्यापुढें गुडघे टेंकून त्याला लारेलवृक्षाच्या पानांचा विजयदर्शक मुकुट अर्पण केला. तेव्हां त्यानें त्याच्या हातांत हात घालून त्या भेटीचा स्वीकार केला.

अशा रीतीनें दिलेल्या वचनांची आणि उत्पन्न केलेल्या आशांची प्रतीति पाहण्याचा लवकरच प्रसंग आला, आणि त्यासमयीं राजाचें खरें हृद्गत बाहेर पडलें. आयर्लंदच्या मुख्य बिशपाची जागा रिकामी पडली. तेव्हां ती भरण्याच्यासंबंधानें राजा लार्ड लिव्हरपूल यास लिहितो कीं, ती जागा आयरिश माणसास देणें माझ्या मनास बरें वाटत नाहीं! ती जागा आयरिश क्यॅथलिकास देण्याचा कांहीं येथें प्रश्न नव्हता, तर प्राटेस्टंटास. असें असूनही राजानें त्यासंबंधानें असें ह्मणावें ह्यावरून त्याच्या मनांत आयर्लंदाबद्दल खरी सहानुभूति किती होती हें स्पष्ट दिसतें.

असो. नंतर राजा हॅनोवर येथें गेला, व नंतर स्काटलंदांत जाऊन आला. हॅनोवर येथें जातांना त्यानें ब्रूसेल्सपर्यंत ड्यूक आफ् वेलिंग्टन यास आपल्याबरोबर घेतलें होतें, व त्याजबरोबर वाटर्लू येथें जाऊन ती लढाई त्यानें तेथें कशी जिंकिली हें त्याजपासून त्यानें नीट समजून घेतलें. आयर्लंदांत जो फार्स त्यानें केला होता तोच हॅनोवर येथें वठविला. तेथें पुनः आनंदाश्रू ढाळिले व मी तुमच्यावर फार प्रीति करितों असें त्यांस पुनःपुनः आश्वासन दिलें. पण इकडे जर्मन लोकांचा व विशेषतः हॅनोवर येथील लोकांचा मला फारच तिटकारा आला असें आपल्या अत्यन्त निकट मित्रांस सांगावयास त्यानें बिलकुल कमी केलें नाहीं.

नंतर तो स्कॉटलंदास गेला व तेथहि लीथ आणि एडिंबरो येथील लोकांनीं त्याचें उत्साहपूर्वक स्वागत केलें. लीथबंदरीं त्याला जे मोठमोठे स्कॉटिश गृहस्थ भेटावयास गेले त्यांत सर वाल्टर स्कॉट होता. राजानें त्याचें मनःपूर्वक अभिनंदन केलें, व तुलाच पाहण्यासाठीं मी मुद्दाम स्कॉटलंदांत आलों असें तो त्यास ह्मणाला. नंतर जेव्हां मद्यपानाची वेळ आली तेव्हां राजानें स्वतः ग्लास भरून त्यास अर्पण केला व स्कॉटनें त्या मद्याचाच केवळ स्वीकार केला असें नाहीं तर त्या गोष्टीच्या स्मरणार्थ तो पेलाहि ठेवून घेण्याची राजाशीं परवानगी मागितली. एकंदरींत राजा जेव्हां स्कॉटलंदांतून परत निघाला तेव्हां तो व स्कॉटिश लोक दोघेहि अगदीं खुश झालेले नजरेस आले.

---

## प्रकरण सविसावें.

# जार्ज क्यॅनिंग.



क्यॅरोलिन राणीवर खटला केल्यामुळें लिव्हरपूल प्रधानमंडळांतील अत्यन्त हुशार मनुष्यानें राजीनामा कसा दिला हें मागें सांगितलेंच आहे. हें त्याचें वर्तन पाहून राजास त्यावेळीं त्याचा फारच राग आला; आणि पुढें लवकरच त्यास पुनः अधिकारावर बोलावण्याचा जरी राजास प्रसंग आला तरी त्यानें या अपराधाबद्दल त्यास कधींहि क्षमा केली नाहीं.

दोघे पिट, बर्क, फॉक्स आणि शेरिडन यांच्या मागून इंग्लंदांत क्यॅनिंग हाच मोठा पार्लमेंतीय वक्ता व पुढारी राहिला होता. मुत्सद्दी या नात्यानें त्याची मोठी कीर्ति अद्यापि व्हावयाचीच होती. त्याची मूळची स्थिति फारशी चांगली नव्हती. त्याचा बाप एका जुन्या घराण्यांतील असून त्याचे संबंध मोठमोठ्या कुळांशीं होते. त्याला लेखनाचा थोडासा नाद पूर्वींपासून असे, व त्यामुळें तो आपल्या कुळाचें नांव चालवील असें त्याच्या आप्तांस वाटे. पण त्याला त्या गोष्टीचें अंग विशेषसें होतें असें दिसत नाहीं. त्यानें पुष्कळ धंदे करून पाहिले, पण त्यास कोणत्याच धंद्यांत विशेषसें यश आलें नाहीं. अखेरीस मुलगा जन्मास आल्यावर तो लवकरच निवर्तला ( १७२०-८७ ). त्यावेळीं जार्ज क्यॅनिंगची आई फार तरुण व सुंदर होती. ह्मणून ती मुलाचें व आपलें पोषण करण्यासाठीं नाटकांत शिरली; पण त्या धंद्यांत तीस फारसें यश आलें नाहीं. अखेरीस तिनें एका नाटक्याशीं लग्न केलें आणि तिचा अवतार संपला.

इकडे जार्ज क्यॅनिंगचा स्ट्राटफर्ड क्यॅनिंग ह्मणून एक श्रीमान् चुलता होता त्यानें त्याच्या शिक्षणाची तरतूद केली. त्यास त्यानें ईटन व

ऑक्सफर्ड येथें शिकावयास पाठविलें, आणि शेवटीं तो कायद्याचा अभ्यास करूं लागला. पण त्याचें वाङ्मय व राजकारण इकडे इतकें लक्ष्य होतें कीं, तो वकिलीचा धंदा मनःपूर्वक करील असा मुळींच रंग दिसेना. ऑक्सफर्ड येथें तो मोठा हृदयंगम कवि आणि विनोदी व जोरदार वक्ता ह्मणून प्रसिद्धीस आला, आणि शेरिडन व बर्क त्यास यांची ओळख झाली. बर्कनें त्याची पिटशीं ओळख करून दिली आणि शेरिडननें फॉक्सशीं करून दिली. असें ह्मणतात कीं, पिटनें सुचविल्यावरून तो पार्लमेंतांत शिरला. त्यानें एका श्रीमान बाईशीं लग्न केलें व कामन्स सभेंत प्रवेश केला. तेथें एक सेशन पुरें होईपर्यंत त्यानें तोंड उघाडिलें नाहीं. तर त्या सभेचे नियम, चाली व शिस्त याचें त्यानें बारीक रीतीनें निरीक्षण केलें. त्यावेळची रीतच अशी होती कीं, नव्या सभासदानें कांहीं दिवस मुळींच बोलावयाचें नाहीं. सभेचें काम कसें काय चाललें आहे तें मुकाट्यानें पहावयाचें. त्याचें पहिलें संभाषण फारच चांगलें वठलें. त्यानें त्या कामीं बर्कची आलंकारिक भाषणपद्धति उचलिली होती असें ह्मणतात. पण त्याचा गोड आवाज व सुंदर भाषासरणी यांस बाह्य साधनांची मुळींच जरूर नव्हती. त्याच्या पुष्कळ मित्रांस असें वाटलें होतें कीं, हा व्हिगपक्षास जाऊन मिळेल; पण तो एकदम टोरीपक्षास ह्मणजे पिटपक्षास जाऊन मिळाला. तो सार्वजनिक कामांत लवकरच पुढें आला. तो कामन्स सभेचा सभासद झाल्यापासून तीन वर्षांच्या आंतच अंडर सेक्रेटरी आफ स्टेट बनला. नंतर तो अरमार खात्याचा खजीनदार बनला, आणि १८०७ सालीं फॉरेन सेक्रेटरी झाला. पुढें वालशरन येथील स्वारीच्यासंबंधानें त्याच्यामध्यें व दुसरा सेक्रेटरी लार्ड क्यॅसलरी यांजमध्यें तंटा उत्पन्न झाला. तेव्हांच्या चालीप्रमाणें त्यांच्यामध्यें द्वंद्वयुद्ध ( इ. स. १८०९ ) होऊन क्यॅनिंग ह्यास जखम झाली.

क्यॅनिंगनें आपल्या फारेन सेक्रेटरीच्या जाग्याचा १८०९ सालीं राजीनामा दिला, आणि तो लिस्बन येथें कांहीं विशेष सरकारी कामावर

वकील ह्मणून गेला. नंतर तो ईस्ट इंडिया कंपनीच्या कारभारावर देखरेख करणाऱ्या बोर्ड आफ कंट्रोलचा प्रेसिडेंट झाला. तें काम त्यानें सरासरी चार वर्षेंपावेतों केलें. इतक्यांत त्यानें न्यूपोर्ट येथील आपल्या जागेचा राजीनामा देऊन तो त्यावेळीं भरभराटीस येणाऱ्या लिव्हरपूल शहराचा प्रतिनिधि झाला होता. इतक्यांत हिंदुस्थानच्या गव्हर्नर जनरलाची जागा रिकामी पडली; तेव्हां ईस्ट इंडिया कंपनीच्या डिरेक्टरांनीं ती महत्वाची जागा पत्करण्याविषयीं त्यास विनंति केली. क्यॅनिंगनें ती पत्करण्याचा लागलाच निश्चय केला. त्याच्या विलक्षण बुद्धिमत्तेस ती जागा फार मानवली असती. शिवाय राजा आपल्यावर रागावलेला असल्यामुळें आपल्यास सध्या तरी येथें मोठी जागा मिळण्याचा संभव नाहीं हें त्यास माहीत होतें. यूरोपची तेव्हांची स्थिति ध्यानांत आणून फॉरेन सेक्रेटरीच्या जाग्यावर याच्यासारख्या हुशार माणसाची योजना लवकरच करावी लागेल हें त्याच्या मित्रांस माहीत असल्यामुळें ते त्यास ही जागा पत्करूं नको ह्मणून सांगत होते; पण क्यॅनिंगनें आपला निश्चय कायम ठेविला, आणि हिंदुस्थानास निघण्याच्यापूर्वीं आपल्या निवडणारांचा निरोप घेण्यासाठीं लिव्हरपुलास तो गेला.

लिव्हरपूल येथें तेथील अत्यन्त श्रीमान् व्यापारी जॉन ग्लॅडस्टन याचे घरीं तो उतरला होता. हा जॉन ग्लॅडस्टन ह्मणशे अर्थात् अद्वितीय मुत्सद्दी विलियम ग्लॅडस्टन याचा बाप होय. विलियम् हा यावेळीं अगदीं लहान मुलगा असून क्यॅनिंग समुद्राकडे टक लावून पाहत असतां शेजारींच तो वाळूवर खेळत असे. या ठिकाणींच त्याच्या कानावर एक नवी वार्ता आली व ती ऐकून त्यानें आपला बेत एकदम फिरविला, आणि त्याच्या महायशस्वी कारकीर्दीस सुरवात झाली. त्याचा पूर्वींचा साथीदार व प्रतिस्पर्धी क्यॅसलरी हा मरण पावला; त्यानें आपल्या हातानेंच आपल्यास मारून घेतलें होतें (१८२२). त्यानें आत्महत्या कां केली ह्याचें विश्वसनीय कारण कांहींच समजत नाहीं. पण तें कांहीं असलें तरी तो पक्का स्वातंत्र्यशत्रु असल्यामुळें इंग्लंदांत व यूरोपांत

त्याच्या मरणाची वार्ता ऐकून कोणास वाईट वाटलें नाहीं, उलट बरेंच वाटलें.

कॅसलरी मेल्याचें समजल्याबरोबर सर्व लिबरल पक्षाचें असें मत पडलें कीं, क्यॅसलरीनें आपल्या कारभारानें यूरोपांत इंग्लंदची जी अब्रू घालविली ती परत मिळविण्याकरितां त्याच्या जागीं क्यॅनिंगचीच योजना करावी लागली. लार्ड लिव्हरपूलचीहि अशी खात्री झाली कीं, क्यॅनिंगला फॉरेन सेक्रेटरी नेमण्याविषयीं राजास शिफारस करण्याव्यतिरिक्त अन्य मार्ग नाहीं. राजा प्रथम या गोष्टीस कबूल होईना. त्याला वाटलें कीं, क्यॅनिंगनें आपल्याशीं फार कृतघ्नपणा केला आहे. शेवटीं पश्चात्ताप झालेल्यास क्षमा करण्याचा आपलाच अधिकार आहे अशी त्याची खुशामत करून लार्ड लिव्हरपूलनें त्याचें मन वळविलें. तेव्हां राजा क्यॅनिंग यास मोठ्या मिनतवारीनें जागा देण्यास कबूल झाला; पण क्यॅनिंग असल्या मिनतवारीच्या अटीवर जागा पत्करण्यास कबूल होईना. तेव्हां राजा घोड्यावरून अमळ खालीं आला, आणि क्यॅनिंग सेक्रेटरी होण्यास कबूल झाला.

एव्हांपासून क्यॅनिंगच्या नव्या कारकीर्दीस प्रारंभ झाला ह्मणून आम्हीं वर ह्मटलें. पण एव्हांपासून इंग्लंदच्याहि परराष्ट्रीयविषयक नव्या कारकीर्दीस प्रारंभ झाला असें ह्मणतां येईल. फ्रान्सांतील राज्यक्रांतीमुळें लोकसत्ताक राज्यव्यवस्थेविरुद्ध उत्पन्न झालेले मनोविकार आतां निमाले होते, आणि लोकांच्या लक्षांत आतां असें येऊं लागलें होतें कीं, स्वेच्छाचारी राजसत्ता स्थापिल्यानें लोकमताचें सांत्वन कधीं व्हावयाचें नाहीं. खुद्द क्यॅनिंगची अशीच स्थिति झालेली होती. तो लहानपणीं लोकमताचाच अभिमानी असून पार्लमेंतांत शिरला तेव्हां व्हिग पक्षास मिळेल असा अंदाज होता. पण इतर पुष्कळ लोकांप्रमाणें नेपोलियनची शुद्ध दांडगाईची नीति पाहून तो पिट पक्षास मिळाला होता. नंतर मग नेपोलियनचा पाडाव होऊन व्हियेना येथें यूरोपियन राष्ट्रांचें कांग्रेस भरलें, आणि नेपोलियननें जिंकलेले मुलूख फ्रान्सापासून घेऊन ज्या त्या राष्ट्रास परत

दिले; बोर्बनघराण्यास फ्रान्साच्या गादीवर पुनः बसविलें आणि यूरोपच्या सर्व राजांनीं मिळून असें ठरविलें कीं, कोणत्याहि राष्ट्रांतील लोक राजाचा अधिकार कमीकरून आपला अधिकार जास्त करावयास पाहूं लागल्यास त्यांस दाबून टाकण्यासाठीं इतर राजांनीं तेथील राजास साहाय्य करावें. या ठरावास ' होली अलायन्स ' किंवा पवित्र दोस्ती असें ह्मणतात.

लवकरच क्यॅनिंगच्या असें लक्षांत आलें कीं, यूरोपस्थ राजांनीं केलेला हा ठराव लोकस्वातंत्र्यास फार अपायकारक आहे, आणि कोणत्याहि देशाचा राज्यकारभार केवळ राजाच्या इच्छेवर अवलंबून न राहतां तेथील लोकांचे विचार, रीतिभाती आणि इच्छा यांच्या धोरणानेंहि चालला पाहिजे. तात्पर्य, लोकांचें अंग केवळ कायदे पाळण्याच्याच कामीं असून पुरे नाहीं, तर तें कायदे करण्याच्या कामींहि असलें पाहिजे. इतक्यांत स्पेन देशास राजापांशीं कांहीं हक्क मागण्यासाठीं लोकांनीं चळवळ सुरू केली. तें पाहून फ्रान्सचा बोर्बनवंशीय राजा घाबरला. त्याला वाटलें कीं, स्पेन आपला शेजारीं असल्यामुळें ही चळवळ कदाचित् आपल्यास भोंवेल. ह्मणून त्यानें आपल्या स्पेनदेशीय बंधूस असें स्पष्ट कळविलें कीं, तुझे लोक फारच गडबड करूं लागल्यास मीं तुला सैन्यानिशीं देखील मदत करीन. शिवाय यावेळीं पोलंदांतीलहि लोक आपल्या स्वातंत्र्यासाठीं बंड करून उठतील असा संभव दिसत होता, आणि ते उठले तर दुसरे कोण उठतील व कोण नाहीं असा यूरोपस्थ राजांस धाक पडला होता. ह्मणून त्यांनीं व्हेरोना येथें पुनः कांग्रेस भरून या गोष्टीचा बंदोबस्त करण्याचा ठराव केला.

आतां व्हियेना येथील कांग्रेसमध्यें इंग्लंदचें अंग प्रमुखत्वेंकरून असल्यामुळें या कांग्रेसास त्यास निमंत्रण करणें इतर राष्ट्रांस भागच पडलें. तेव्हां त्या कामावर इंग्लिश सरकारानें ड्यूक आफ वेलिंग्टन याची नेमणूक केली. याला या गोष्टीच्यासंबंधानें स्वतःचें मत असें कांहींच नव्हतें; पण तो वरिष्ठांच्या धोरणानें चालणारा माणूस होता. ह्मणून क्यॅनिंग फारेन सेक्रेटरी झालेला पाहून त्यानें त्यास स्पेनसंबंधीं प्रश्न

निघाल्यास काय करावयाचें ह्मणून विचारिलें. तेव्हां क्यॅनिंगनें त्यास स्पष्ट लिहून पाठविलें कीं, स्पेनमध्यें चाललेल्या चळवळीमध्यें कोणत्याहि प्रकारें हात घालण्याचा इतर राष्ट्रांचा कल दिसल्यास इंग्लंड त्यास कधींहि कबूल होणार नाहीं ह्मणून त्यांस आपण एकदम स्पष्ट कळवावें; कारण असें करणें जसें धोक्याचें आहे तसेंच निरुपयोगीहि आहे; शिवाय असें करणें इंग्लिश सरकारास नीतीच्या अगदीं विरुद्ध वाटतें. अशा रीतीनें क्यॅसलरीनें ( जो मरणापूर्वीं लार्ड लंडनडेरी बनला होता ) आजपर्यंत गिरविलेली नीति क्यॅनिंगनें एकदम बदलून टाकिली.

ड्यूक आफ वेलिंग्टनला ह्याप्रमाणें दिलेली सूचना त्यानें अक्षरशः पाळिली. स्पेनच्या घरगुती कामांत परकी राजे हात घालूं लागल्यास इंग्लंद त्यास आपली संमति कधीं देणार नाहीं असें त्यानें कांग्रेसच्या ध्यानांत स्पष्टरीत्या आणून दिलें; आणि आपलें कोणी ऐकत नाहीं असें पाहिल्याबरोबर तो कांग्रेसांतून एकदम निघाला. या इंग्लंदच्या कृतीचा यूरोपच्या नीतीच्या धोरणावर या आणीबाणीच्या प्रसंगीं असा कांहीं उत्तम परिणाम झाला कीं, त्याच्या महत्वाची अतिशयोक्ति करणें दुरापास्त आहे. चवथ्या जार्जाची कारकीर्द एवढ्या या कृत्यानें देखील संस्मरणीय झाली असती. क्यॅनिंगनें अशा रीतीनें घालून दिलेली जी परराष्ट्रविषयक नीति तिचें उघड रीतीनें उल्लंघन करण्याची नंतरच्या कोणत्याहि इंग्लिशमुत्सद्याची छाती झालेली नाहीं. जेव्हां फ्रान्सांत राज्यक्रान्ति झाली तेव्हांच इंग्लंदनें हें तत्त्व स्वीकारिलें असतें तर बरें झालें असतें. फ्रान्स व यूरोप ही दुही पुढें ज्या भयंकर लढाया झाल्या त्यांतून कदाचित् बचावली असती.

होली अलायन्सचे बेत लवकरच दृष्टोत्पत्तीस आले. फ्रेंच सरकारानें स्पेनच्या दुर्बल राजावर इतका कांहीं आपला पगडा बसविला कीं, त्यानें आपल्या प्रजेस राज्यकारभारविषयक जे हक्क दिले होते ते काढून घेतले. तेव्हां तेथें लोकांनीं बंड करण्याचा यत्न केला. पण फ्रान्साच्या साहाय्यानें तो त्या सरकारानें तेव्हांच दाबून टाकिला, आणि त्यांतील

पुढाऱ्यांना एकदम फांसांवर चढविलें. इंग्लंदच्या मदतीनें पोर्तुगाल देशांत ज्या स्वातंत्र्यसंस्था स्थापन झालेल्या होत्या त्या अद्यापि कायम होत्या, व तो देश स्वातंत्र्यपक्षाभिमानी होता. त्याजवर फ्रान्सचा डोळा होता. तेव्हां क्यॅनिंगनें कामन्स सभेंत स्पष्ट बोलून दाखविलें कीं, पोर्तुगाल देश जर स्वतः च होऊन फ्रान्साशीं लढाई करील तर इंग्लंद त्यास प्रत्यक्ष मदत करणार नाहीं. परंतु पोर्तुगालचा पाडाव करण्याकरितां स्पेन जर फ्रान्साची मदत घेईल किंवा मागेल तर इंग्लंद आपल्या जुन्या दोस्तास ( पोर्तुगाल देशास ) सैन्यानिशीं मदत करण्यास कमी करणार नाहीं.

शिवाय स्पेनच्या अमेरिकेंतील कित्येक वसाहती स्वतंत्र झालेल्या होत्या त्या पुनः जिंकण्यास त्या देशास मदत करून त्याबद्दल त्यांतल्या कांहीं आपण मिळवाव्या असें फ्रान्सच्या मनांत होतें. पण ह्या गोष्टीच्यासंबंधानें क्यॅनिंगनें कामन्स सभेंत अशी कांहीं स्पष्टोक्ति केली कीं, तेणेंकरून फ्रान्सचीही महत्त्वाकांक्षा तितकीच थांबली. तो ह्मणाला स्पेन जर ह्या वसाहती पुनः जिंकून घेण्यासाठीं स्वतः च खटपट करील, तर इंग्लंदला जरी तें करणें आवडलें नाहीं, तरी त्या कामीं तें हात घालणार नाहीं; पण फ्रान्साशीं संगनमत करून त्याला त्यापैकीं कांहीं वसाहती देण्याचें जर स्पेन मनांत आणील, तर त्या वसाहतींच्यातर्फे इंग्लंदास सैन्यानिशीं हात घालणें भाग पडेल. ह्या स्पष्टोक्तींमुळें फ्रान्स व स्पेन येथील बोर्बनवंशीय राजांचे बेत जेथल्या तेथेंच निमाले.

इंग्लंदनें अशा रीतीनें घालून दिलेल्या नीतीस युनैटेडस्टेट्सकडून उत्तम रीतीनें दुजोरा मिळाला. त्यावेळीं मनरो हा तेथील प्रेसिडेंट होता. त्यानें तेथील कांग्रेसास असें कळविलें कीं, यूरोपस्थ राजांनीं आपल्या स्वेच्छाचारी राज्यपद्धती अमेरिकेंत आणण्याच्या खटपटीस लागूं नये असा त्यांस इषारा देण्याचा माझा बेत आहे. तो ह्मणाला, अमेरिकेंत हल्लीं चालू असलेल्या राज्यपद्धतींत हात घालण्याचा युनैटेडस्टेट्स्चा मुळींच उद्देश नाहीं. पण एकाद्या वसाहतींतील लोकांच्या इच्छेविरुद्ध

तेथें आपल्या राज्यपद्धती युरोपस्थ राजे स्थापूं लागल्यास युनैटेड-स्टेट्स्‌च्या स्वतंत्र संस्थांस ती गोष्ट धोक्याची व भीतीची आहे असें त्या सरकाराला वाटेल. ह्या त्याच्या उक्तीस " मनरो डाक्ट्रिन " किंवा मनरो साहेबाचें मत असें ह्मणतात. हें मत त्यानें ह्यावेळीं जें प्रसिद्ध केलें त्या कामीं त्यास क्यॅनिंगकडून स्फूर्ति मिळाली हें निर्विवाद आहे.

पुढच्या शतकांतील युरोपस्थ राजे जर हा इषारा ध्यानांत ठेवते तर बरें झालें असतें. उदाहरणार्थ, फ्रान्सचा बादशाह लुई नेपोलियन ह्यानें जेव्हां मेक्सिकोमधील लोकसत्ताकास जिंकून त्या ठिकाणीं बादशाही राज्य स्थापण्याचें मनांत आणिलें, तेव्हां जर त्यास ह्या गोष्टीची आठवण झाली असती तर बरें झालें असतें. मग त्याचा जो अगदीं पराजय झाला तो झाला नसता, आणि त्यानें तेथें स्थापिलेला बाहुली बादशाह माक्सिमिलियन फांशी जाण्यापासून बचावला असता.

तें कसेंहि असो; ह्यावेळीं क्यॅनिंगच्या नीतीस पूर्ण यश आलें. व्हेरोनाचें कांग्रेस निष्फळ झालें आणि होली अलायन्समधील राजांस असें आढळून आलें कीं, आपलें आतां कांहीं चालावयाचें नाहीं, कारण जुन्या जगाच्या मदतीस नवें जग आलें होतें ( इंग्लंदच्या ह्मणण्यास अमेरिकेचा दुजोरा मिळाला ).

क्यॅनिंगची ही धिटाईची कृति पाहून राजा अमळ भ्याल्यासारखा दिसूं लागला. जार्जला मनःपूर्वक शांततेची आवड असे; ह्मणून त्यास प्रथम कांहीं दिवस अशी भीति पडली कीं क्यॅनिंगच्या ह्या धिटाईच्या बोलण्यानें चिडून जाऊन युरोपस्थ कांहीं राजे कदाचित् आपल्याशीं लढाईला येतील. अशी शंका मनांत येऊन तो अपरोक्ष रीतीनें क्यॅनिंगच्या विरुद्ध कुरकुर करूं लागला, आणि बाकीच्या प्रधानांचें आपल्याप्रमाणेंच क्यॅनिंगविरुद्ध मत बनविण्याच्या खटपटी करूं लागला. पण क्यॅनिंगला पक्कें माहीत होतें कीं, सध्याचा प्रसंगच असा आहे कीं आपण धिटाईनें बोललों तरच आपलें आणि शांततेचें दोघांचेंहि काम होणार आहे. क्यॅनिंगचें हें मत बरोबर आहे अशी राजाची पुढें लवकरच

खात्री झाली; आणि दक्षिण अमेरिकेंत नवीन स्थापिलेल्या एका लोकसत्ताकाचा सरकारी वकील जेव्हां इंग्लंदांत आला, तेव्हां त्याचा योग्य सत्कार करण्यास जार्जास भीति वाटली नाहीं. नंतर मग नवीन नीति कायमची स्थापन झाली, आणि तिचें उल्लंघन करण्याचें कोणीहि युरोपस्थ राजानें मनांत आणिलें नाहीं.

जो प्रधान राजाच्या विरुद्ध बोलेल त्याच्या कामांत हात घालूं पाहण्याची राजास फार संवय होती; आणि क्यॅनिंगला अशा प्रकारचा बराच त्रास सोसावा लागला. पण क्यॅनिंगनें आपलें ह्मणणें कधीं सोडिलें नाहीं, आणि राजास त्याच्याशीं उघड उघड रीतीनें विरोध करण्यास छाती होईना. सारांश, व्हिक्टोरिया राणीप्रमाणें इंग्लंदच्या ठरीव राज्यपद्धतीस अगदीं अनुसरून वागण्याची जार्ज राजाची अद्यापि तयारी झाली नव्हती. कदाचित् त्या पद्धतीस अगदीं अनुसरून वागणें ह्मणजे काय हें अद्यापि नक्की ठरलें नव्हतें असेंहि ह्मटल्यास चालेल. तें कसेंहि असो. राजाचे हेतू जरी उत्तम असत तरी तो कधीं कधीं आपल्या पूर्वजांचें अनुसरण करण्याच्या मोहांत पडत असे. जार्जास सरकारी खलिते लिहिण्याची फार हौस असे. त्यास वाटे कीं, आपणास ह्या बाबतींत विशेष समजतें. जार्ज पूर्वींप्रमाणेंच अजूनहि स्वभावतः आळशी व चैनी असे. असें असूनहि त्याला हीं कामें कशीं उरकत ह्याचा अमळ चमत्कार वाटतो. पण आपण खरे खरे राज्यकर्ते आहों, आणि माझ्याशिवाय तुमचें चालावयाचें नाहीं अशी प्रधानांची समजूत करून देण्याची त्यास फार हांव असे.

राजाचा मुख्य आवडता माणूस सर विलियम नायटन हा असे. हा प्रथम वैद्यकीचा धंदा करून त्या द्वारानें त्यानें राजदरबारांत प्रवेश करून राजाचा हळूहळू अत्यन्त स्नेह व विश्वास संपादन केला होता. त्यास राजानें कीपर आफ धि रायल पर्स ( राजाचा खाजगी खजीनदार ) ह्या हुद्यावर नेमिलें होतें. त्या बाबतींत जमा व खर्च ह्यांचीं तोंडें मिळवतीं ठेवून राजाची मर्जी त्यानें संपादिली होती. आतां त्याचा हा हुद्दा

मोठासा महत्वाचा होता असें नाहीं. पण राजाला जेव्हां एकाद्या प्रधानास कांहीं गोष्ट खाजगी रीतीनें सांगणें असे तेव्हां तो ह्याच्याकरवीं सांगत असे. त्यामुळें त्यास नसतें महत्व आलें होतें. ह्यावेळच्या सरकारी कागदपत्रावरून, क्यॅनिंगला आपली नवी नीति राजास संमत करण्यास किती प्रयास पडले हें स्पष्ट दिसतें.

ग्रीसची स्थिति ह्यावेळीं फार असमाधानकारक होती, तेव्हां ती सुधारण्यास काय करावें हा युरोपच्या मुत्सद्यास मोठा विचार पडला होता. तो देश ह्यावेळीं टर्कीच्या अमलाखालीं होता, आणि तेथील लोक वरचेवर बंडें करीत असत. ते लोक जात्या फार हुशार, चतुर व दीर्घोद्योगी असल्यामुळें, राष्ट्रीयदृष्ट्या जरी त्यांस ह्यावेळीं अगदीं नीचावस्था आली होती, तरी टर्कीच्या सुलतानाचे ते केवळ गुलाम होण्यास मुळींच राजी नव्हते. ते आपलें पूर्वीचें वैभव विसरले नव्हते; त्यामुळें त्यांस राष्ट्रीय स्वातंत्र्याचीं स्वप्नें नेहमीं पडत असत. ह्यावेळीं टर्कीच्या अमलाविरुद्ध त्या लोकांनीं मोठेंच बंड उभारिलें, आणि सर्व जगांतील स्वातंत्र्य-भक्तांच्या मनांत त्यांजबद्दल सहानुभूति उत्पन्न झाली. बायरन कवीनें त्यांचा पक्ष अत्यन्त उत्साहपूर्वक उचलिला आणि त्यांच्या वतीनें आपल्या देशबांधवांचीं अंतःकरणें जागृत करण्याचा खूप यत्न केला. पुष्कळ इंग्लिश लोक त्यांच्यासाठीं आपले जीव धोक्यांत घालण्यास मोठ्या खुशीनें तयार झाले. महाविख्यात नावाडी लार्ड कॉक्रेन हा त्या लोकांस आपल्या विलक्षण बुद्धिमत्तेचें आणि विलक्षण धाडसाचें साहाय्य देण्या-करितां ग्रीसकडे धांवला. राजघराण्यांतील लोकांनींदेखील पैसे गोळा करून ग्रीसच्या मदतीस शिपाई व खलाशी पाठविण्यास कमी केलें नाहीं. अशा प्रकारचे मदतनीस ग्रीक पुढारी बोझारिस व क्यॅनारिस ह्यांस साहाय्य करण्यासाठीं प्रत्येक सुधारलेल्या राष्ट्रांतून लोक गेले होते. पण टर्कीचें बळ फार मोठें होतें. ग्रीक लोकांचीं शस्त्रें, दारूगोळा, व इतर तयारी हीं अगदीं भिकार व अपुरीं होतीं, आणि त्यांस कवाईत व टापटीप ह्यांचें शिक्षण फारच बेताचें मिळालेलें होतें. त्यां लोकांनीं

समुद्रावर व खुष्कीवर मोठालीं शौर्याचीं कृत्यें केलीं, पण असें उघड उघड दिसूं लागलें कीं त्यांस एकाद्या परराष्ट्रानें जर प्रसिद्धपणें मदत केली नाहीं तर त्यांस लवकरच हार खावी लागणार. टर्कीच्या बाजूस मोठा लढवय्या ह्मटला ह्मणजे इब्राहिम पाच्छा हा होता. हा मेहेमेट अल्लीचा दत्तक पुत्र असून तो टर्कीच्या सुलतानाचा अंकित ह्मणून ईजिप्तचा कारभार करीत असे. त्याच्या अंगीं शिपाईगिरीचें मोठें कौशल्य असे; तो मोठा उत्साही, दीर्घोद्योगी आणि प्रसंगावधानी माणूस असे. तात्पर्य ही मोहीम चालविण्यास टर्कीच्या सुलतानास याच्याहून जास्त चांगला मनुष्य मिळणें अशक्य होतें. रशियाची सहानुभूति ग्रीसच्या बाजूस फार होती, किंवा कदाचित् असें ह्मणणें जास्त बरोबर होईल कीं, रशियाच्या एकंदर नीतीचें धोरण टर्कीविरुद्ध होतें. रशियन मुत्सद्यांची एकंदर कृति ग्रीसचे हात मजबूद करण्याच्या इच्छेनें होत आहे किंवा टर्कीची सत्ता दुर्बल करण्याच्या हेतूनें होत आहे ह्याबद्दल नेहमींप्रमाणें ह्यावेळींहि पश्चिमयुरोपांतील लोकांस संशय वाटूं लागला. क्यॅनिंगला ग्रीकलोकांबद्दल नेहमींच सहानुभूति वाटे. लहानपणीं त्याच्या ह्या सहानुभूतीस काव्याचें स्वरूप आलेलें होतें, आणि आतां तीस जास्त व्यावहारिक स्वरूप देण्याची संधि त्यास आलेली होती. ग्रीसला बंधमुक्त करण्यास रशियानें जर खटपट केली असती तर तो तीस अनुकूल झाला असता, पण त्यास अशी भीति वाटे कीं, हें काम जर एकट्या रशियाकडेच संपविलें तर कदाचित् युरोपांत एकादें मोठेंच रण माजेल, आणि तो तर मोठा शांतताभक्त होता. ह्मणून त्यानें फ्रान्स आणि रशिया यांचें मन इंग्लंदशीं असा तह करण्याकडे वळविलें कीं, पूर्व यूरोपांत काय चाललें आहे तें लक्षपूर्वक पहावयाचें, आणि तेथील युद्ध मनुष्यपणाच्या मर्यादेच्या पलीकडे जाणार नाहीं, आणि होईल तितकें लवकर संपेल, अशी खटपट करावयाची.

ह्या तहान्वयें तीनही राष्ट्रांनीं आपलीं आरमारें भूमध्य समुद्रांत पाठवून देऊन, टर्की व ईजिप्त येथील आरमारें ग्रीसवर हल्ला करण्याच्या

बेतांत होतीं त्यांच्या हालचालींवर नजर ठेवण्याचें काम त्यांस सांगितलें. ह्या स्वारीचा अधिपति ब्रिटिश ॲडमिरल सर एडवर्ड कॉड्रिंग्टन हा होता, व त्यास सरकारी रीतानें असा हुकूम दिलेला होता कीं, आपण काय कराल तें मोठ्या सावधगिरीनें व दूर दृष्टि देऊन करावें. पण त्यास ही सावधगिरी फार ठेवतां आली नाहीं. असें ह्मणतात कीं फारशी सावधगिरी करावयास नको असें त्यास खाजगी रीतीनें सांगण्यांत आलें होतें. तें असेंहि असो; लवकरच ह्यांच्या व टर्किश आरमाराची झटापट होऊन त्यांत टर्किश व इजिप्शन आरामाराचा चक्काचूर झाला. ह्या लढाईस नॅव्हॅरिनोची लढाई असें ह्मणतात इ. स. (१८२७). ह्या पराजयानें टर्की जेरीस आला व ग्रीस देश स्वतंत्र झाला. पण ही गोष्ट घडण्याच्या पूर्वींच क्यॅनिंग मरून गेला होता. ही गोष्ट सांगतां सांगतां ती पुरी करण्यासाठीं आह्मी जरा पुढें आलों आहों. ते आतां अमळ मागें जाऊं. कारण क्यॅनिंगच्या कारकीर्दीतील पुष्कळ गोष्टी अद्यापि सांगावयाच्या आहेत.

ग्रीसच्या स्वातंत्र्याबद्दलचा हा कलह इंग्लिशवाङ्मयांत नेहमीं संस्मरणीय राहणार आहे. कारण त्यांत इंग्लंदच्या आधुनिक कवींपैकीं एक अत्यंन्त जाडा कवि बळी पडला. ता. १९ एप्रिल १८२४ रोजीं बॉयरन कवि मिसालांघीच्या खाजणांत ताप येऊन निवर्तला. ग्रीसच्या मुख्य भागांत लढण्यासाठीं त्यानें तत्पूर्वी थोडकेच दिवस ग्रीक बेटें सोडिलीं होतीं. दुर्दैवानें हातांत तरवार घेण्याची त्यास संधि आली नाहीं. मरणाच्या पूर्वी त्यास नुक्तेंच ३७ वें वर्ष लागलेलें होतें. त्याच्या मरणाची वार्ता ऐकून इंग्लंदांतीलच काय, पण सुधारलेल्या जगांतील सर्व लोकांस वाईट वाटलें. असो. आतां आपण क्यॅनिंगच्या कारकीर्दीकडे वळूं.

क्यॅनिंगनें जेव्हां मागें सांगितलेली नवी नीति घालून दिली तेव्हां दुसरे बरेच घरगुती प्रश्न पुढें पुढें येऊं लागले होते, व त्यांच्यामुळें राजाचें मन बरेंच अस्वस्थ होत असे. इंग्लंदची जमाबंदीची पद्धति कांहीं

मुत्सद्यांच्या दूरदृष्टीमुळें बरीच सुधारत चालली होती. लार्ड लिव्हरपूल हा इतर बाबतींत जरी पक्का टोरी होता तरी ह्या बाबतींत तो बराच पुढें गेलेला होता हें वर सांगितलेंच आहे. पण ह्या कामीं मुख्य पुढारीपण क्यॅनिंग व त्याचा मित्र हस्किसन ह्यांच्याकडे होतें. हस्किसननें आजपर्यंत बरींच हुद्याचीं कामें केलेलीं होतीं. तिजोरीचा सेक्रेटरी, बोर्ड आफ ट्रेडचा प्रेसिडेंट, आणि वसाहतींचा सेक्रेटरी, अशा मोठमोठ्या बऱ्याच हुद्यांवर त्यानें कामें केलेलीं होतीं; आणि ह्या हुद्यांवर असतांना त्यानें इतर राष्ट्रांशीं होणाऱ्या वसाहतीच्या व्यापारावरचीं बरींच बंधनें काढून टाकिलीं होतीं, आणि त्यांच्या आयात मालावरील पुष्कळ जुन्या व भानगडीच्या जकाती कमी केल्या होत्या.

क्यॅनिंग व हस्किसन ह्यांची फार निकट मैत्री होती, व ते पुष्कळ वेळां जोडीनें प्रधानकीचे कामावर आलेले होते. त्या मुदतींत इंग्लिश व्यापारास अनिर्बंध व्यापाराचें स्वरूप देण्याची त्यांनीं बरीच तयारी करून ठेविली. निवडणुकींच्या बाबतींत सुधारणा करण्याचा प्रश्न पुढें येत होता, आणि त्या कामीं चार्लस ग्रे आणि हेन्री ब्रूहाम हे मुख्य पुढारी होते. बाकीच्या प्रश्नांच्यासंबंधानें क्यॅनिंग जरी पुढें गेलेला लिबरल होता, तरी ह्या पार्लमेंतीय सुधारणेच्या बाबतींत तो मागें होता. ड्यूक आफ वेलिंग्टन हा तर ह्या सुधारणेच्या अगदींच विरुद्ध होता. ह्या प्रश्नाच्यासंबंधांत त्याचें व क्यॅनिंगचें अगदीं एकमत होत असे. शिवाय इंग्लंद, स्काटलंद व आयर्लंद या तीन राष्ट्रांतील क्यॅथलिकांस राजकीय बाबतींत प्राटेस्टंटासारखे हक्क असावे हा वरच्यापेक्षांहि जास्त निकडीचा प्रश्न ह्यावेळीं राष्ट्रापुढें होताच. पुढें लवकरच टेस्ट अॅक्ट व कार्पोरेशन अॅक्ट हे दोन कायदे लार्ड जॉन रसेलच्या खटपटीनें रद्द झाले ( १८२८ ), व तेणेंकरून डिसेंटर लोकांस पार्लमेंतीय व म्युनिसिपल हुद्दे पत्करण्यास जो प्रतिबंध होता तो निघाला. पण रोमन क्यॅथलिकांवरील असलाच प्रतिबंध काढून टाकण्यास बरीच जास्त अडचण पडली.

हा कलह अर्थात् मुख्यत्वेंकरून आयर्लंदांत झाला; कारण तेथेंच कॅथलिक लोकांची वस्ती फार. आम्ही पूर्वी सांगितलेंच आहे कीं, कॅथलिकांस बंधमुक्ततेची आशा दाखवून पिटनें स्वतंत्र आयरिश पार्लमेंत बुडविलें होतें व तें इंग्लिश पार्लमेंतांस जोडिलें होतें इ. स. (१८०१). नंतर राजा ( तिसरा जार्ज ) त्याचें ऐकेना. तेव्हां त्यानें तो नाद अगदीं सोडून दिला. पण एकादा राजा फार दुराग्रही निघाला किंवा एकादा प्रधान फार मऊ निपजला ह्मणून असले प्रश्न कायमचे बंद पडत नाहींत. आणि आयर्यंदांत तर ⅚ प्रजा कॅथलिक असल्यामुळें आणि मोठाले प्राटेस्टंटधर्मीय, आयरिश लोकहि या बाबतींत त्यांच्या बाजूचे असल्यामुळें हा विषय दबून राहणें अशक्यच होतें. पण या सुमारास ( १८२७ ) आयरिश लोकांना त्यांच्याच धर्माचा ( कॅथलिक ) मोठा पुढारी मिळाला. त्याचें नांव डेनियन ओकॉनेल.

हा मोठा भरभराटीस आलेला वकील असून, सार्वजनिक वक्ता या नात्यानें आयर्लंदांत त्याच्या तोडीचा कोणीच नव्हता. कॅनिंग हा ह्या प्रश्नाच्यासंबंधानें पूर्वीपासून कॅथलिकांस अनुकूल होता. लार्ड लिव्हर्पूल हा अगदीं विरुद्ध होता. ड्यूक आफ् वेलिंग्टन हा बहुतेक शेवटपर्यंत विरुद्ध होता. चवथा जार्ज जरी फॉक्स व शेरिडन ह्यांच्या संगतींत वाढलेला होता तरी तोही आपण ह्या प्रश्नाच्या अगदीं विरुद्ध आहों असें आतां ह्मणूं लागला. ह्यावेळीं ह्यासंबंधाच्या भाषणांत जे प्रधान या प्रश्नास अनुकूल असतील त्यांस "कॅथलिक" प्रधान ह्मणत, व जे प्रतिकूल असतील त्यांस "प्राटेस्टंट" प्रधान ह्मणत. आर्थात् त्या शब्दांचा अर्थ ह्या ठिकाणीं त्या त्या धर्माचे असा घ्यावयाचा नाहीं. पण हल्लीं तो अर्थ अगदीं विसरून गेले आहेत. थोडे वर्षांपूर्वी प्रसिद्ध इतिहासकार लेकी ह्यानें जेव्हां हे शब्द ह्याच अर्थानें एका पार्लमेंतीय विवादांत योजिले तेव्हां कांहीं लोकांस तें कसेंसेंच वाटलें. शेवटीं त्यास आपण कोणत्या अर्थानें हे शब्द योजीत आहोंत हें स्पष्ट करून सांगावें लागलें.

इतक्यांत लार्ड लिव्हरपूल आजारी पडल्यामुळें एकदम मोठी अडचण येऊन पडली. त्याला जो रोग झाला होता त्यानें तो कांहीं दिवस

अगदीं बेशुद्धच झालेला होता; आणि पुढें जरी तो अर्धवट बरा झाला तरी त्याच्या हातून आतां राज्यकारभार रेटेल असें कोणासहि वाटत नव्हतें. तेव्हां अर्थात् त्याच्या जागीं कोणाची योजना करावी हा राजास व त्याच्या सभोवतालच्यांस मोठा विचार उत्पन्न झाला. सहजच प्रत्येकाची नजर क्यॅनिंगकडे वळली; कांहींकांची आशेनें आणि कांहीं-कांची भीतीनें. पुढें पुष्कळ वर्षांनीं लार्ड पामर्स्टन आपल्याविषयीं जें ह्मणाला तेंच ह्यावेळीं क्यॅनिंगला लागू होतें. त्याच्याशिवाय राजास किंवा राज्यास तरणोपाय नव्हता. त्याची कीर्ति सर्व सुधारलेल्या जगांत पसरलेली होती. त्याच्या नीतीनें इंग्लंड धाकट्या पिटच्या वेळानंतर कधींहि झालें नाहीं इतकें प्रबल झालें होतें. तेव्हां जार्ज राजासदेखील त्याला एकीकडे गुंडाळून ठेवण्याचें धैर्य होईना; आणि त्याचा त्याला मुख्य प्रत्यवाय हा होता कीं तो क्यॅथलिकांच्या मागण्यांस अनुकूल होता ह्मणून जार्जानें या गोष्टीचा कांहीं दिवस पोक्त विचार केला, आणि लार्ड एल्डन व इतर मंत्री ह्यांचा सल्ला घेतला; तेव्हां त्याच्या असें नजरेस आलें कीं, क्यॅनिंगखेरीज टिकाऊ प्रधानमंडळ बनविण्याची कुवत कोणामध्येंच नाहीं.

तेव्हां अर्थात् क्यॅनिंगला बोलावून नेणें त्यास भागच पडलें, तेव्हां कॅनिंगनें आपल्या मनांतील गोष्ट त्यास स्पष्टपणें सांगितली. तो राजास ह्मणाला, हल्लीं क्यॅथलिक प्रश्नास फारच जोर आलेला आहे; करितां आपण प्रधानमंडळ बनवावयाचें तें त्या बाबतींत आपल्याच मताचें बनवावें. तेव्हां राजानें त्यास उलट असें सांगितलें कीं, अशा मंड-ळाच्या हातून कारभार रेटेलसें मला वाटत नाहीं; मला तुझी परराष्ट्रीय नीति अगदीं पसंत आहे; तूं त्या कारभारावर आल्यापासून इंग्लंदचें परराष्ट्रांशीं वजन फार वाढलें हें मी जाणून आहे. असें राजानें ह्मटलें तेव्हां क्यॅनिंग प्रधानमंडळ बनविण्यास कबूल झाला. पण राजाशीं त्यानें असा स्पष्ट करार करून घेतला कीं, तुमचा माझ्यावर पूर्ण विश्वास आहे, व मला योग्य दिसेल तें करण्याची मला तुमची पूर्ण मुकत्यारी आहे असें लोकांस स्पष्ट समजलें पाहिजे. तात्पर्य, त्यास खरी प्रधा-नकी पाहिजे होती, नाहींतर तो पुनः स्वतंत्र बारगीर होण्यास तयार

होता. राजाला अन्य मार्ग उरला नसल्यामुळें तो अर्थात् त्याच्या ह्मणण्यास मुकाट्यानें कबूल झाला.

बाहेरून क्यॅनिंगला ह्या प्रधानमंडळांत थोडेसे फेरबदल काय ते करावयाचे होते; पण खरोखर पाहतां त्यास नवेंच मंडळ बनवावयाचें होतें. त्यास माहीत होतें कीं, ड्यूक आफ वेलिंग्टन आणि सर राबर्ट पील हे आपण बनवलेल्या मंडळांत जागा पत्करण्यास कधीं तयार व्हावयाचे नाहींत. ड्यूक आफ वेलिंग्टन हा क्यॅथलिकांच्या मागण्यांच्या अगदीं विरुद्ध असून शिवाय त्यास क्यॅनिंगची परराष्ट्रीय नीति कधींच पसंत पडलेली नव्हती. खरोखर पाहतां त्या दोघांमध्यें राजकीय बाबतींत सहानुभूति फारच थोडी होती, आणि शिवाय क्यॅनिंगची, सकारण ह्मणा किंवा निष्कारण ह्मणा, अशी पक्की समजूत झालेली होती कीं, आपण परराष्ट्रीय प्रधानकीच्या जाग्यावर असतां ह्यानें आपली पुष्कळ नालस्ती केलेली आहे. सर राबर्ट पीलची गोष्ट अमळ निराळी होती. तोदेखील क्यॅथलिक मागण्यांच्या विरुद्ध होताच; पण तो ड्यूक आफ वेलिंग्टनपेक्षां फार वरच्या वर्गांतील मुत्सदी होता. सार्वजनिक मताची बरोबर किंमत त्यास नेहमीं ओळखतां येत असे, आणि राजकीय सुधारणाविषयक एकादी चळवळ अत्यन्त जोरावर आली ह्मणजे तीस उगीच विरोध करणारा तो माणूस नव्हता. पण अजून त्यास क्यॅथलिक प्रश्न ह्या थरास आला आहे किंवा पुढें मागें कधींहि येईल असें वाटत नव्हतें. त्यानें आजपर्यंत प्रत्येक प्रसंगीं आपलें मत त्या प्रश्नाविरुद्ध दिलेलें होतें. तेव्हां ज्याचें मत त्या प्रश्नास उघड उघड अनुकूल आहे अशा मुत्सद्याच्या हाताखालीं नोकरी पत्करण्यास तो अर्थात् तयार नव्हता. पुढें त्याचें ह्या विषयाचेसंबंधानें मत कसें बदललें, आणि तोच मुख्य प्रधान असतां ह्या प्रश्नाचा निकाल कसा लागला हें आह्मांस सांगण्याचा प्रसंग लवकरच येणार आहे. पण सध्यां त्या मागणीस विरोध करणें हीच गोष्ट राजास व राज्यास दोघांसहि योग्य आहे असें त्यास मनःपूर्वक वाटत होतें. ह्मणून तो नव्या मंडळांत शिरला नाहीं. ह्याच मुद्यावर आणखी पांच प्रधानांनीं आपापल्या जाग्यांचे राजीनामे दिले. त्यांमध्यें ड्यूक आफ वेलिंग्टन व लार्ड चॅन्सेलर एल्डन हे अर्थात् होतेच. शिवाय प्रधानमंडळांत

नसलेल्या कांहीं वजनदार सरदारांनीं असें ध्वनित केलें कीं, क्यॅथलिक लोकांच्या मागण्या कदाचित् कबूल करील अशा मंडळास आपल्यास पाठिंबा देतां येणार नाहीं.

अशा प्रकारचे साथीदार व अशा प्रकारचे पाठिंबे ह्यांनीं आपल्यास सोडिलें हें पाहून कांहीं वेळ क्यॅनिंग निराश झाला यांत नवल नाहीं. तो राजाकडे पुनः गेला, आणि नवीन मंडळ बनविण्याच्या जबाबदारींतून मला मुक्त करावें ह्मणून त्यानें त्यास विनंति केली. पण एकंदर गोष्टी इतक्या थरावर आल्या असतां आतां असें करणें बरोबर होणार नाहीं असें कदाचित् राजास वाटलें असावें; किंवा कदाचित् वेलिंग्टन, पील व एल्डन ह्या माणसांनीं आपण आपली पसंती दाखविली असतांहि इतकें ओढून धरावें हेंहि त्यास आवडलें नसावें. तसेच क्यॅनिंगचें सामर्थ्य आणि त्याचें सुदैव यांच्यावरहि त्याचा आतां चांगला विश्वास बसला होता. तें कसेंहि असो; त्यानें क्यॅनिंगची विनंति कबूल केली नाहीं. ह्मणून क्यॅनिंग मुख्य प्रधान झाला, आणि तिजोरीचा पहिला लार्ड व फडणवीस हीं दोन कामें त्यानें आपल्या शिरावर घेतलीं.

सर जान कॉप्ले, ज्यास आतां लार्ड लिंढर्स्ट बनविलें होतें, त्यास लार्ड एल्डनच्या ऐवजीं लार्ड चॅन्सेलर बनविलें. हा पुढें लार्डांच्या सभेंतलि अगदीं पहिल्या प्रतीचा वक्ता बनला, आणि ब्रूहाम व लार्ड डार्बी यांचा बरोबरीचा प्रतिस्पर्धी झाला. लार्ड एल्डनच्यासंबंधानें विशेष गोष्ट ध्यानांत ठेवावयाची ही कीं मध्यें एक वर्ष खेरीजकरून तो आज २६ वर्षें लार्ड चॅन्सेलरच्या कामावर होता. हस्किसन हा नव्या प्रधानमंडळांत आरमाराचा खजीनदार आणि बोर्ड आफ ट्रेडचा प्रेसिडेंट झाला. लार्ड पामर्स्टन युद्धखात्याचा सेक्रेटरी झाला, आणि फ्रेडरिक राबिनसन जो हल्लीं लार्ड गोडरिश बनला होता तो वसाहतींचा सेक्रेटरी झाला. ह्या सर्व व्यवस्था १८२७ च्या एप्रिलांत पुऱ्या झाल्या.

नव्या मंडळास मोठमोठ्या बऱ्याच अडचणीशीं झगडावें लागलें. ब्रूहाम-सारख्या व्हिग लोकांचें कामन्स सभेंत त्यास पाठबळ होतें. पण लार्डांच्या सभेंत त्याचे पुष्कळ प्रबळ विरोधी होते, आणि त्यावेळीं हल्लींपेक्षां त्या सभेचें वजन फार अधिक असे. त्या ठिकाणीं मुख्यत्वेंकरून लार्ड ग्रे त्याला सारखा व जोरानें विरोध करी. यावेळीं तो पार्लमेंटीय सुधारणेच्या

मुख्य वाद्यांपैकीं एक होता, आणि क्यॅनिंगची त्या पक्षाला सहानुभूति मुळींच नव्हती. शिवाय क्यॅनिंग हा क्यॅथलिक मागण्यांनादेखील अंतःकरणपूर्वक अनुकूल नाहीं असें लार्ड ग्रेस वाटे, मग तें कशावरून तें नकळे. ह्मणून तो क्यॅनिंगवर व त्याच्या राजनीतीवर लार्डांच्या सभेंत वरचेवर हल्ले करूं लागला. लार्ड ग्रे हा जाडा वक्ता होता, आणि त्याची संभाषणशैली आणि त्याचें शील ह्यांचें सभेवर फार वजन पडे. इकडे क्यॅनिंग हा अगदीं कोमल स्वभावाचा माणूस होता. इतर पुष्कळ विनोदी वक्त्यांप्रमाणें तो अमळ पातळ कातडीचा आणि फार लवकर चिडणारा असा होता. पार्लमेंतांत समोरासमोर उभें राहून दोन हात करण्याची त्याची नेहमीं तयारी असे. पण आपणास उलट हल्ला करण्याची संधि न सांपडतां आपण मुकाट्यानें दुसऱ्याचे हल्ले सोसावे हें त्यास मुळींच साधत नसे. लार्ड ग्रेच्या हल्ल्यांनीं तो अत्यंत चिडल्यासारखा झाला, आणि असें ह्मगतात कीं, एका वेळीं हे हल्ले सव्याज परत करण्यासाठीं त्यानें सरदारी पत्करून लार्डांच्या सभेंत शिरण्याचेंदेखील मनांत आणिलें होतें; पण दैवानें त्याला अशी संधिच येऊं दिली नाहीं. त्याची प्रकृति नेहमींचीच कमजास्त प्रमाणानें नाजूक अशी होती, आणि तो तिची काळजी कधींच बाळगीत नसे. तो पिंडाचाच अगदीं हलका असे, आणि त्यास कपाळदुखी वगैरे मज्जातंतुविषयक आकस्मिक रोग व विकार वरचेवर होत. इ. स. १८२७ च्या प्रारंभीं ड्यूक आफ यार्कच्या सार्वजनिक प्रेतविधीस तो गेला असतां तेथें त्यास जबरदस्त शैत्य झालें.

ड्यूक आफ् यॉर्क तिसऱ्या जार्जाचा दुसरा पुत्र असून कांहीं दिवसपर्यंत गादीचा तो अप्रत्यक्ष वारस समजला जात असे. त्याची सार्वजनिक कारकीर्द बहुतेकांशीं अगदीं लज्जास्पद झालेली होती. तो जरी युद्धखात्याचा हुशार कारभारी होता तरी सेनापति या नात्यानें तो अगदीं नादान ठरलेला होता; आणि त्याचें खाजगी वर्तनहि तितकेंच नादान होतें. जानेवारींत तो मेला तेणेंकरून दोन भयंकर परिणाम झाले. एक हा कीं तेणेंकरून ड्यूक आफ क्लोरन्स हा गादीचा वारस झाला, आणि दुसरा हा कीं, त्यावेळीं क्यॅनिंगला जें शैत्य झालें त्यांतून तो कधीं उठला नाहीं.

ह्या शैत्यांतून क्यॅनिंग कांहीं दिवस बरा झाल्यासारखा दिसूं लागला. पण पुढें कांहीं महिनेपर्यंत त्याला जी सारखी काळजी वहावी लागली ती त्याच्या क्षीण झालेल्या मज्जातंतूंस आणि दुर्बळ झालेल्या शरीर-प्रकृतीस सोसली नाहीं. प्रधानमंडळ बनल्यानंतर पार्लमेंतास जी थोडी सुट्टी दिली होती त्या अवधींत त्याला विश्रान्ति मिळून तो पहिल्या-सारखा होईल अशी त्याच्या मित्रांस आशा वाटत होती. पण आतां क्यॅनिंगची प्रकृतिच अशी झाली होती कीं, तिला विश्रान्ति घेण्याची सोय नव्हती. दिवसाचें काम उरकलें म्हणजे स्वस्थ झोंपीं जावयाचें ही जी शक्ति त्याचे अंगीं एक वेळ होती ती निघून जाऊन पुष्कळ दिवस झाले होते; आणि अलीकडे असें झालें होतें कीं, तो निजावयास गेला तरी सरकारी कामाची काळजी त्याच्याबरोबर तेथें जात असे, आणि ती त्यास पुष्कळ वेळ जागृत ठेवी. इ. स. १८२७ त उन्हाळा लव-करच सुरू झाला, पण तेणेंकरून त्याच्या प्रकृतीस फायदा झाल नाहीं, आणि त्याच्या मित्रांस तेव्हांच त्याचें चिन्ह विपरीत दिसूं लागलें. त्याला मज्जातंतुविषयक दुःखाच्या भयंकर वेदना होऊं लागल्या आणि दिवसेंदिवस त्या जास्तच वाढूं लागल्या. अखेरीस ता० ८ आगस्ट १८२७ रोजीं तो मरण पावला. त्याच्या प्रेतयात्रेस राजापासून तो रंकापर्यंत सर्व प्रकारचे लोक जमले होते. ह्यावरून त्याच्या मरणानें इंग्लंडचें व शांतता आणि स्वातंत्र्य यांचें केवढें नुकसान झालेंसें सर्वांस वाटत होतें तें स्पष्ट दिसून आलें.

क्यॅनिंग मरण पावला तेव्हां त्यास नुक्तीं सत्तावन वर्षें पुरीं झालेलीं होतीं. ज्या वृद्ध मित्राच्या व साथीदाराच्या आकस्मिक आजारामुळें त्यास मुख्य प्रधानकी मिळाली होती त्याच्या पूर्वींच तो गेला; कारण लार्ड लिव्हरपूल पुढच्या वर्षाच्या डिसेंबर उजाडेपर्यंत मरण पावला नाहीं. इंग्लिश इतिहासांत क्यॅनिंगला कोणतें स्थान द्यावयाचें हें तो मेला तेव्हांपेक्षां आतां लोकांच्या लक्ष्यांत जास्त स्पष्टपणें आलें आहे. त्यानें परराष्ट्रविषयक कोणती महत्वाची नीति घालून दिली हें वर सांगितलेंच आहे; ती नीति इंग्लिश मुत्सदी अद्यापि गिरवीत आहेत. तद्वत्च इतर राष्ट्रांच्या कामांत केव्हां हात घालावा आणि केव्हां घालूं नये ह्याबद्दलहि त्याचें तत्त्व फार महत्वाचें होतें. तें तत्त्व असें होतें कीं, यूरोपांत

चाललेल्या कलहांत जेव्हां इंग्लंदच्या प्रत्यक्ष हिताहिताचा संबंध नसेल तेव्हां इंग्लंदनें जो पक्ष खरा असेल त्याच्यावतीनेंदेखील हात घालूं नये; मात्र दुसरें एकादें राष्ट्र त्याच्या हिताहिताचा त्या कलहांत संबंध नसतां जर खोट्या पक्षाच्या वतीनें हात घालील तर इंग्लंदनें खऱ्या पक्षास साहाय्य करावें. अर्थात् काब्डेन व ब्राईट ह्यांच्या एतद्विषयक तत्त्वाहून हें तत्त्व भिन्न होतें. कारण त्याचें मत इंग्लंदनें असा हात कधींच घालूं नये असें होतें. ह्याच तत्त्वावर त्यानें फ्रान्स व रशिया यांस ग्रीसच्या वतीनें इंग्लंदशीं तह करण्यास लाविलें होतें, आणि त्याचा परिणाम ग्रीसला त्याचें स्वातंत्र्य परत मिळालें हा झाला होता. तद्वत्च ह्याच तत्त्वाच्या अनुरोधानें स्पेनच्या अमेरिकन वसाहतींचें स्वातंत्र्य कायम राहील अशा अर्थाची आपली नीति त्यानें जाहीर केली होती.

तात्पर्य एकंदरींत क्यॅनिंगची गणना मोठाल्या लिबरल मुत्सद्यांमध्यें केली पाहिजे. तथापि तेव्हांचेहि कांहीं लिबरल मुत्सदी त्याच्यापलीकडे गेलेले होते. पार्लमेंतीय सुधारणेच्या विरुद्ध तो कां होता हें समजणें कठीण आहे; आणि क्यॅथलिकांस जे हक्क देण्याची त्याची तयारी होती तेच हक्क नानूकन्फॉर्मिस्ट किंवा डिसेंटर लोकांस देऊं नयेत असें तो कां ह्मणे हें समजणें त्याच्याहून जास्त कठीण आहे.

जमाबंदीखात्याचा सुधारक ह्या दृष्टीनें तो त्यावेळच्या मुत्सद्यापेक्षां स्पष्ट पुढें गेलेला होता; आणि सर राबर्ट पीलसारख्या लोकांनींदेखील त्या बाबतींत क्यॅनिंग व हस्किसन यांनीं जो मार्ग घालून दिला त्याचें भीत भीत अवलंबन केलें होतें. पार्लमेंतीय वक्ता या नात्यानें त्याची कीर्ति आतां सुनिश्चित झालेली आहे. एकावेळीं तो अगदीं पहिल्या प्रतीचा वक्ता ह्मणून समजला जात असे, आणि एकावेळीं तो केवळ नाटकी संभाषक ह्मणून समजला जात असे. पण वास्तविक रीत्या पाहतां तो ह्या कामीं जर कोणापेक्षां कमी योग्यतेचा असेल तर दोघे पिट आणि फॉक्स यांच्यापेक्षां अंमळ खालच्या प्रतीचा असेल; बाकीच्या समकालीन आणि पूर्वींच्या व नंतरच्या वक्त्यांच्या तो अगदीं तोडीचा होता. एकंदरींत त्याच्याबद्दल असें ह्मणतां येईल कीं, त्यानें इंग्लंदच्या राजकीय इतिहासास एकप्रकारचें नवें स्वरूप दिलें, आणि त्यानें घालून दिलेलीं तत्त्वें त्याचे देशबांधव आजमितीसहि गिरवीत आहेत.

---

प्रकरण सत्ताविसावें.

# अखेरच्या जार्जाचीं अखेरचीं वर्षे.

क्यॅनिंग मरावयास टेंकला असतां सर विलियम् नायरन यास भावी गोष्टीस अनुलक्षून तो शांतपणें ह्मणाला, " ही गोष्ट कदाचित् मला कठीण जाणार आहे, पण माझ्यापेक्षांही राजास जास्त कठीण जाणार आहे." ह्या त्याच्या ह्मणण्यांत कांहीं विशेष होतें. प्रथम अगदीं विरुद्ध असून सरते-शेवटीं राजा आपल्या बाजूचा पूर्णपणें कसा झाला ह्या गोष्टीनें क्यॅनिंग-च्या मनास विशेष द्रव आला होता. क्यॅनिंगच्या कांहीं अंशीं कविस्वरूप मनोवृत्तीस राजा ह्मणजे राज्यस्वरूप भासत असे, आणि त्याचा मुख्य प्रधान ह्मणजे केवळ त्याचा वाहिलेला नोकर वाटत असे. कांहीं दिवस तरी राजास क्यॅनिंगचें मरण दुःसह झालें ह्यांत शंका नाहीं. क्यॅनिंगनें इंग्लंडची काय व केवढी नोकरी बजाविली आहे हें त्याच्या आलीकडे पूर्ण-पणें लक्षांत आलें होतें. पुढें लवकरच क्यॅनिंगचे कांहीं अनुयायी प्रधान-मंडळांतून निघाले, त्यांस क्यॅनिंगाइटस असें ह्मणत. जार्ज आधींच " क्यॅनिंगाइट " बनला होता असें दिसतें.

नवीन प्रधानमंडळ बनविण्यास राजास बरेच आयास पडले. लार्ड गाड-रिश हा मुख्य प्रधान झाला, लार्ड लिंढर्स्ट पुनः लार्ड चॅन्सलर झाला, आणि हस्किसन वसाहतींचा सेक्रेटरी बनला. क्यॅनिंग जेव्हां मुख्य प्रधान झाला, तेव्हां लार्ड गाडरिश यांस सरदार बन-विलें हें वर सांगितलेंच आहे. तोंपर्यंत तो फ्रेडरिक जॉन राबिन्सन ह्या नांवानें प्रसिद्ध असून " प्रास्पेरिटी " ( भरभराट्या ) राबिन्सन असें त्यास टोपण नांव मिळालेलें होतें. ह्याचें कारण असें सांगतात कीं, तो बोर्ड ऑफ ट्रेडचा प्रेसिडेंट असतांना आणि विशेषतः जमा-बंदीकडील प्रधान किंवा फडणीस होता त्या मुदतींत देश अत्यन्त भर-

भराटींत आहे अशीं वर्णनें वारंवार करीत असे. शिवाय तो करांच्या ज्या ज्या नव्या क्लृप्त्या पुढें आणी त्यांबद्दल तो नेहमीं अशा बढाया मारीत असे कीं, त्यांचा स्वीकार केल्यानें राष्ट्र अवश्यमेव ह्याहूनही ज्यास्त भरभराटीस निःसंशय चढणार आहे. तो फडणीस झाल्यावर प्रथम प्रथम त्याच्या कांहीं क्लृप्त्यांस देशांत इतका जबरदस्त विरोध झाला कीं, त्यामुळें कांहीं ठिकाणीं दंगे धोपे आणि प्राणहानि देखील झाली. तरी त्याला नेहमीं भरभराटच दिसे, आणि ह्यामुळें वरीऊ टोपण नांव त्यास प्राप्त झालें होतें. लॉर्ड गाडरिश ह्याच्यामध्यें विशेष मुत्सदीपणा नव्हता; आणि त्याला बोलतां तर बहुतेक मुळींच येत नसे. त्यामुळें वर सांगितल्याप्रमाणें तो जेव्हां दांडगीं भविष्यें किंवा अचाट विधानें करी, तेव्हां मात्र मंडळीचें त्याच्याकडे लक्ष जाऊन सभेंत हंशा पिकत असे. त्याच्यामध्यें अहंकार मात्र विलक्षण असे. त्याला आपल्या बुद्धिमत्तेची अत्यन्त घमेंड असे. लोकांस जेथें केवळ अपयश दृश्यमान होईल त्याठिकाणीं देखील ह्यास यश आणि सिद्धि ह्या व्यतिरिक्त कांहींच दिसत नसे. अशीं माणसें प्रत्येक काळीं थोडींफार असतातच, आणि तीं कशातरी रीतीनें आपल्या पक्षास असें भासवून सोडितात कीं, आपल्याशिवाय आपल्या पक्षाचें चालावयाचेंच राहील. तथापि त्याच्या अंगीं सुधारण्याचें सामर्थ्य मुळींच नव्हतें असें नाहीं, आणि अलीकडे अलीकडे राजकीय आणि जमाबंदीच्या कामांत क्यॅनिंग पासून कांहीं शिक्षण त्यानें घेतलें होतें. ह्या सर्व गोष्टीवरून त्यास क्यॅनिंगच्या पश्चात् मुख्य प्रधान नेमणें हीच तडजोड राजास त्या वेळीं योग्य वाटली; पण त्याची ही बोलून चालून तोंडबुजवी नेमणूक फार वेळ टिकली नाहीं. त्याच्या ह्या कारकीर्दीत क्यॅनिंगच्या पर-राष्ट्रीय नीतीचें खरें फळ दृष्टीस पडलें. कारण त्याच वेळीं नोव्हॅरिनोच्या लढाईत टर्की व ईजिप्त ह्यांच्या आरमारांचा मागें सांगितल्याप्रमाणें पराजय होऊन सुलतानास ग्रीसचें स्वातंत्र्य कबूल करणें भाग पडलें.

जमाबंदीच्या संबंधानें क्यॅबिनेटांत किंवा अंतःप्रधानमंडळांत कांहीं मतभेद उत्पन्न झाले, आणि हस्किसन व त्याचे कांहीं साथीदार यांनीं

राजीनाम्याची भीति घातली. तेव्हां आपल्यास मुख्य प्रधानकी फार दिवस संभाळतां येण्याचा संभव दिसत नाहीं असें समजून लॉर्ड गाडारिशनें स्वतःच राजीनामा दिला. जार्जनें तो कबूल केला, आणि नंतर मग ड्यूक आफ वेलिंग्टन खेरीज करून मुख्य प्रधान होण्यास दुसरा कोणीच राहिला नव्हता. तेव्हां अर्थात् तो मुख्य प्रधान होऊन तिजोरीचा पहिला लार्ड बनला, आणि हस्किसन कांहीं वेळ पावेतों पूर्वीच्याच हुद्यावर राहिला (१८२८). ह्या कारकीर्दींत लार्ड जॉन रसेलनें टेस्ट व कार्पोरेशन अॅक्ट हे कायदे रद्द करण्याविषयीं पार्लमेंटापुढें सूचना आणिली. ह्या कायद्यांमुळें डिसेंटर लोकांस, इंग्लंदचें सरकारी धर्मसंस्थान धर्मदृष्ट्या सर्वांत श्रेष्ठ आहे अशी शपथ घेतल्याशिवाय सरकारी किंवा म्युनिसिपल कोणतीहि जागा पत्करतां येत नसे. ती त्याची सूचना १९३ विरुद्ध २३७ ह्या बहुमतानें कामन्स सभेंत पसार झाली, आणि नंतर ह्या सूचनेच्या तत्त्वावर रचलेलें बिल लवकरच दोन्ही सभांतून पसार झालें. धर्माच्या बाबतींत सर्वांस सारख्या रीतीनें वागवावयाचें हें जें तत्त्व पार्लमेंटानें हळूहळू कबूल केलें त्याचा हा पहिला महत्वाचा हप्ता होय असें ह्मटलें तरी चालेल. पूर्ण धर्मस्वातंत्र्य स्थापन होण्यास अद्यापि बराच काल जावयाचा होता; आणि चमत्कार असा कीं, प्रस्तुत कायद्यानें जर कांहींकांस धर्मस्वातंत्र्य मिळालें, तर दुसऱ्या कांहींकांचें निघून गेलें. कारण या कायद्याप्रमाणें घ्यावयाच्या शपथेंत "खिस्त्याच्या खऱ्या धर्माप्रमाणें" असे शब्द घातले होते. येणेंकरून ज्यू लोकांस व खिस्तीधर्मावर विश्वास न ठेवणाऱ्यांस पार्लमेंटाचे सभासद होतां येईनासें झालें. शिवाय क्याथलिकांस सभासद होतां येऊं नये अशी एक निराळी शपथ त्या बिलांत घातली होतीच. तात्पर्य, सर्व प्रकारच्या प्राटेस्टंटा व्यतिरिक्त इतर कोणाचा सरकारांत किंवा म्युनिसिपालिट्यांत प्रवेश होऊं नये असा प्रस्तुत कायद्याचा उद्देश होता.

तथापि पार्लमेंट एवढ्या तरी गोष्टीस कबूल झालें हें चांगलेंच ह्मणावयाचें; कारण तेणेंकरून धर्मस्वातंत्र्यतत्वाची एक प्रकारची स्थापनाच झाली. आतां लार्ड जॉन रसेलनें आणलेल्या बिलाचा वर सांगितल्यासारखा

उद्देश नव्हता हें उघडच आहे. हा फेरबदल लार्डांच्या सभेनें केला होता, आणि साधेल तेवढेंच साधून घ्यावें ह्या तत्त्वावर लार्ड जॉन रसेलनें तो कबूल केला होता. कामन्स सभेंत ह्या बिलास सर राबर्ट पील आणि हास्किसन ह्या दोघांनींहि जोराचा विरोध केला होता. उलट लार्डांच्या सभेंत कांहीं बिशप व आर्चबिशप यांनीं उदार मन करून या बिलास पाठिंबा दिला होता. तें पाहून लार्ड एल्डन यास मोठा विस्मय झाला होता. कारण त्याचें मत असें होतें कीं, सरकारी कामांत निःसीम प्राटेस्टंटांखेरीज इतर कोणाचा शिरकाव कधींहि होऊं देऊं नये. शिवाय त्यास अशी भीति होती कीं, आज डिसेंटर लोकांस हे हक्क दिल्यास उद्यां रोमन क्यॅथलिकांस द्यावे लागतील. ही त्याची भीति त्यानें सभेच्या पुस्तकांत नमूददेखील करून ठेविली होती. कारण लार्डांच्या सभेंतील सभासदांस पास झालेल्या एखाद्या सूचनेच्या विरुद्ध असलेल्या आपल्या मताचें कारण नमूद करण्याचा हक्क आहे. उलट पक्षीं लार्ड हालंद हा चार्लस जेम्स फॉक्स ह्याच्या तत्त्वांचा अभिमानी असल्यामुळें "ख्रिस्त्याच्या खऱ्या धर्माप्रमाणें" हे शब्द घालण्याच्या तो विरुद्ध होता, व त्याचें त्यानें असें कारण लिहून ठेविलेलें आहे. "राजकीय कर्तव्य योग्य रीतीनें बजावण्यासाठीं माणूस अमुक धर्माचा पाहिजे असा या शब्दांचा अर्थ होतो, आणि ही गोष्ट मला मनःपूर्वक खरी वाटत नाहीं." लार्ड एल्डनचें भविष्य मात्र लवकरच खरें व्हावयाचें होतें.

वरील कामासाठीं आयर्लंडांत क्यॅथलिक आसोशियेशन नांवाची एक मंडळी स्थापन झाली असून तिला अत्यन्त योग्य असा पुढारी मिळाला होता. तो अर्थात् ड्यॅनियल ओकॉनेल हा होय. त्याच्यामध्यें आणि तत्पूर्वींच्या ग्राटन, फिटजरल, टोन, एमेट इत्यादि आयरिश पुढाऱ्यांमध्यें मोठा भेद हा होता कीं, ते सर्व प्राटेस्टंट धर्माचे होते, आणि हा क्यॅथलिक धर्माचा होता. शिवाय त्याला फ्रान्सांतील राज्यक्रान्तीचीं तत्त्वें बिलकूल पसंत नव्हतीं. त्यानें लहानपणचीं आपलीं कांहीं वर्षें फ्रान्सांत घालविलीं होतीं, आणि तो तेथील अतिरेक पाहून बर्क इतकाच घाबरला होता. तो जमीनदारवर्गापैकीं होता, तरी त्याची सहानुभूति नेहमीं त्याच्या देशबांधवांच्या

ज्या राष्ट्रीय चळवळी चालत त्यांच्याशीं असे. तो वकिलीचा धंदा करीत असल्यामुळें त्याच्या संभाषणांत हुशार वकिलाचा सर्व कावेबाजपणा व धूर्तता हीं दिसत असत. त्याच्या अंगीं वक्त्याचे पुष्कळ गुण होते. त्याची आकृति भव्य असून त्याच्या आवाजांत माधुर्य आणि जोर ह्या दोहोंचेंहि संमेलन झालेलें असे. डिस्रायली व बुलवर लिटन अशा प्रसिद्ध वक्त्यांनींहि त्याच्या आवाजाची मोहकता मनःपूर्वक कबूल केली आहे. तो आयर्लंदाप्रमाणें स्काटलंद व इंग्लंद येथेंही मोठमोठाल्या सार्वजनिक सभांतून भाषणें करीत असे. त्याचीं मतें इंग्लंद व स्कॉटलंद येथील पुढें गेलेल्या लिबरल लोकांच्या मतांशीं बऱ्याच बाबतींत जुळत असत.

या क्यॅथलिक आसोशिएशनच्या विरुद्ध असा कायदा पार्लमेंटानें केला होता कीं, ती कायद्याविरुद्ध आहे. त्या कायद्याची मुदत आतां संपत आली होती. ह्मणून तो पुनः पास करणें किंवा तसाच अस्तित्वाच्या बाहेर जाऊं देणें ह्याचा काळ आला होता. प्रधानाच्या जाग्यावर एका सभासदाची नेमणूक नवीन झाल्यामुळें आयर्लंडांतील क्लेअर या कौंटींतील सभासदाची जागा रिकामी झाली होती; कारण अशी नेमणूक पत्करिली ह्मणजे सभासदीचा राजीनामा देऊन पुनः निवडणूक करून घ्यावी अशी चाल आहे. तेव्हां ओकानेल हाच स्वतः त्या जाग्याला उमेदवार होऊन पुढें आला. हें करणें अर्थात् फारच धिट्टाईचें होतें. कायद्याप्रमाणें क्यॅथलिकास पार्लमेंटाचा सभासद होण्याची प्रत्यक्ष मनाई नव्हती, तरी पार्लमेंटाच्या सभासदास जी शपथ घ्यावी लागते ती रोमन क्यॅथलिकास घेतां येत नसे. त्यामुळें त्यास उमेदवार होण्यास सरकारास मनाई करतां आली नाहीं, आणि तो फारच मोठ्या बहुमतानें निवडून आला. नंतर तो कामन्स सभेच्या टेबलापुढें आला, आणि त्यास रीतीप्रमाणें शपथ घ्यावयास सांगितलें तेव्हां त्यानें अर्थात् तसें करण्याचें स्पष्ट नाकारिलें. त्यावरून त्यास मागें जाण्यास सांगितलें. त्याप्रमाणें तो मागें झाला आणि त्याची जागा रिकामी आहे ह्मणून ठरविलें. ओकानेल पुनः त्याच जाग्यास उमेदवार ह्मणून उभा राहिला, आणि पुनः मोठ्या बहुमतानें

निवडून आला. तेव्हां आतां काय करावें हा राजास व त्याच्या मंत्र्यांस मोठाच विचार पडला. कारण पूर्वी अशी गोष्ट झालेली कोणास आठवत नव्हती.

ह्या सर्व गोष्टींचा ठसा होम सेक्रेटरी सर राबर्ट पील ह्याच्या मनावर फार जबरदस्त उमटत होता; आणि तो एकंदर प्रधानमंडळापैकीं अत्यंत होतकरू व वजनदार असा मुत्सदी होता. ह्या वेळीं हस्किसननें प्रधानकीचा राजीनामा दिलेला होता, कारण त्यानें लिव्हरपूल येथें असें बोलून दाखविले होतें कीं, डयूक ऑफ वेलिंग्टन हा क्यॅनिंगनें घालून दिलेल्या धोरणाप्रमाणें वागेल ह्या स्पष्ट समजुतीवर मी प्रधानकी पत्करलेली आहे. ही गोष्ट डयूकास आवडली नाहीं, व तो ह्मणाला कीं, मी असा कोणताही करार कोणाशीं केलेला नाहीं. पुढें कांहीं होय नाहीं होऊन शेवटीं हस्किसननें राजीनामा दिला. त्याच्या बरोबरच लॉर्ड पामर्स्टन व दुसरे कांहीं प्रधान ह्यांनींहि राजीनामे दिले. ह्या सर्वांनीं मिळून एक स्वतंत्र पक्ष बनविला व ते आपणास क्यॅनिंगाइटस ह्मणवूं लागले. ह्याच राजीनाम्यावरून ज्या नव्या नेमणुका झाल्या त्या वेळीं क्लेयर येथील जागा रिकामी पडली, व ओकानेल ह्यास उमेदवार होऊन निवडून येण्यास संधि सांपडली.

पीलच्या लक्षांत असें आलें कीं, डयूक ऑफ वेलिंग्टनचे बरेच वजनदार पाठिंबे त्याला सोडून गेले आहेत. दुसऱ्याही कांहीं गोष्टींवरून त्याचें लक्ष आयर्लंडांतील चळवळीकडे गेलें होतें. डयूक ऑफ वेलिंग्टनचा वडील भाऊ मार्किस ऑफ वेलस्ली हा आयर्लंडचा व्हाइसराय होता. हा फार नामांकित मुत्सदी असून तो जेव्हां हिंदुस्थानचा गव्हर्नर जनरल होता तेव्हां त्यानें धाकट्या भावाच्या मदतीनें मराठ्यांशीं युद्ध करून त्यांत यश संपादिलें होतें हें वाचकांस विश्रुतच आहे. तो जेव्हां आयर्लंडचा व्हाइसराय होऊन तेथें गेला, तेव्हां क्यॅथलिक मागण्यांच्या तो अगदीं विरुद्ध होता. पण तेथें जो त्यास अनुभव आला त्यावरून त्याची खात्री झाली कीं, आयर्लंडांत जर शांतता ठेवावयाची असेल तर तेथील लोकांच्या मागण्या

कबूल केल्याच पाहिजेत. ह्मणून ड्यूक ऑफ वेलिंग्टन मुख्य प्रधान झाल्यावर जेव्हां तो त्यांच्या मागण्या कबूल करीना, तेव्हां त्यानें आपल्या जाग्याचा राजीनामा दिला. त्याच्या मागून मार्किस ऑफ आंगलसी नामक एका सरदाराची त्या जाग्यावर नेमणूक झाली. त्यानें नेपोलियनशीं झालेल्या युद्धांत मोठें नांव मिळविलेलें असून तोहि क्यॅथलिक मागण्यांच्या अगदीं विरुद्ध होता. पण त्याचीहि तेथें गेल्यावर वेलस्ली प्रमाणेंच खात्री झाली, तेव्हां तो प्रधानांची समजूत बदलण्याची खटपट करूं लागला; पण त्याचा परिणाम इतकाच झाला कीं त्यासहि ती जागा सोडून परत यावें लागलें.

या सुमारास पार्लमेंटांत एक गोष्ट घडून आली, तिचा पीलच्या मनावर मोठा परिणाम झाला. सर फ्रान्सिस बर्डेट हा तेव्हांच्या सुधारकांपैकीं एक प्रसिद्ध पुढारी असून त्यानें १८२८ च्या आरंभीं कामन्स सभेपुढें अशी सूचना आणिली कीं, देशांत शांतता आणि एकचित्त हीं स्थिर राहतील अशा दृष्टीनें रोमन क्यॅथलिकांच्या संबंधाचे जे कायदे आहेत त्यांचा सभेनें विचार करावा. या सूचनेस ब्रूहामनें मोठें जोरदार भाषण करून आपलें अनुमोदन दिलें. त्यांत त्यानें सभेच्या दृष्टीस अशी गोष्ट आणून दिली कीं, जे लोक ह्या सूचनेच्या विरुद्ध बोलले त्यांनीं सद्यःस्थिति फार दिवस टिकेल असें कोणीहि ह्मटलेलें नाहीं, आणि क्यॅथलिकांच्या मुक्ततेसंबंधाच्या चळवळीस पार्लमेंटांत व इतरत्र फारच जोर येत आहे. ह्या कोटीचा पीलच्या मनावर मोठा ठसा उमटला, आणि शिवाय त्यानें असेंहि पाहिलें कीं, जे सभासद या सूचनेस अनुकूल आहेत ते सभेपैकीं अत्यंत हुशार व मोठे मुत्सद्दी असेच आहेत. ही सूचना २६६ विरुद्ध २७२ या अल्प बहुमतानें पसार झाली. पण हें बहुमत जरी अल्प होतें तरी त्यावरून या प्रश्नास कोणतें स्वरूप आलें आहे हें पीलसारख्या बुद्धिमान् माणसाच्या ताबडतोब ध्यानांत येण्यासारखें होतें.

पीलच्या विचारी व विशद मनावर या सर्व गोष्टींचा परिणाम काय होत होता हें त्याच्याच लेखांवरून स्पष्ट दिसतें. क्लेअर कौंटींत ज्याचा

पराजय करून ओकोनेल निवडून आला होता तो व्हेसी फिट्जरल आज पुष्कळ वर्षें तेथील प्रतिनिधि होता. शिवाय त्याचा बाप युनियन ॲक्ट नको ह्मणण्याच्या कामांत सर चार्लस पार्नेलचा व ग्राटनचा अनुयायी असून तो स्वतः क्यॅथलिक मागण्यांना अनुकूल होता. सारांश तो आयरिश लोकांमध्यें त्यावेळपर्यंत अत्यन्त लोकप्रिय होता. असें असून त्याला एकीकडे टाकून क्लेयरच्या लोकांनीं ओकोनेलास निवडिलें यावरून पार्लमेंट व प्रधानमंडळ यांस त्या मागण्या कबूल करण्यास किंवा लढाईस सिद्ध होण्यास लावावयाचें असा आयरिश लोकांनीं निश्चयच केला होता असें स्पष्ट दिसतें. ह्या सर्व गोष्टी पीलच्या स्पष्टपणें ध्यानांत आल्या, व त्याची खात्री झाली कीं मार्किस आफ आंगलसीचें मत बरोबर आहे, आणि क्यॅथलिकांच्या मागण्या कबूल करणें किंवा युद्धास सिद्ध होणें ह्याखेरीज अन्य मार्ग उरलेला नाहीं. ह्या प्रश्नाचा जसजसा त्यानें जास्त विचार केला तसतशी त्याची जास्त जास्त खात्री झाली कीं, आयरिश लोक बंड करून उठले व त्यांजवर गोळ्या घालण्यास जर आयरिश लष्करास हुकूम केला तर ते ऐकतीलच असें निश्चयानें सांगतां येत नाहीं. पील हा केवळ तत्त्ववेत्ता किंवा केवळ कल्पनाकाशांत भराऱ्या मारणारा नव्हता, तर तो व्यावहारिक मुत्सद्दी होता ह्मणून युद्धाची तयारी करण्याचा किंवा न्याय्य व योग्य अशा मागण्या कबूल करण्याचा जेव्हां प्रसंग आला, तेव्हां यांतील कोणती गोष्ट पत्करावयाची याबद्दल त्यास मुळींच संशय उरला नाहीं.

पीलची अशी खात्री झाली कीं, क्यॅथलिकांच्या मुक्ततेचा प्रश्न पार्लमेंटानें लवकरच हातीं घेतला पाहिजे, पण तें काम आपणच हातीं घेतलें पाहिजे, हें अद्यापि त्याच्या लक्षांत आलें नाहीं. त्यास वाटलें कीं आपण इतके दिवस त्या प्रश्नाच्या इतके विरुद्ध असल्यामुळें आतां आपण तो हातीं घेतल्यास आपल्या टोरी मित्रांपैकीं आपणास फारसे मदतनीस मिळणार नाहींत. त्याची अशी कल्पना होती कीं, लार्ड ग्रे हा सुधारक पक्षाचा अग्रणी असल्यामुळें तोच त्या कामास योग्य आहे. पण अगोदर ड्यूक आफ वेलिंग्टनची या कामीं खात्री करणें जरूर होतें. ह्मणून तो

प्रथम त्या कामास लागला. त्याची खात्री करण्यास त्यास अमळ प्रयास पडले, पण शेवटीं तो त्याच्या ह्मणण्यास कबूल झाला. कारण त्याची नेहमींच अशी समजूत असे कीं पीलला ह्या असल्या राजकीय गोष्टी आपल्यापेक्षां जास्त चांगल्या समजतात, आपण पडलों शिपाईगडी; तेव्हां असल्या बाबतींत त्याचेंच ऐकणें चांगलें. पण अशा रीतीनें क्यॅथलिकांच्या मागण्या लवकरच कबूल केल्या पाहिजेत, ही गोष्ट जरी डयूकास मानवली, तरी तें काम लार्ड ग्रे कडे संपविण्यास तो कबूल होईना. कारण लार्ड ग्रेचा राजा तिटकारा करितो हें त्यास चांगलें माहीत होतें; तेव्हां लार्ड ग्रेला तो कबूल करील असा संभव नव्हता.

तेव्हां डयूक आफ वेलिंग्टननें असें ठरविलें कीं ही गोष्ट जर करावयाची आहे तर ती आपणच करावी हें बरें. ह्मणून या प्रसंगीं आपणास न सोडण्याविषयीं त्यानें पीलची विनवणी केली. तीस पील कबूल झाला. पण राजाचें मन वळविण्याचें काम राहिलें; आणि तें काम फार अवघड होतें. तथापि डयूक निराश झाला नाहीं. राजाचा विरोध कसा काढून टावावा हें त्यास चांगलें माहीत होतें. त्याचा मार्ग असा होता कीं, राजाशीं कोटीक्रम मुळींच करावयाचा नाहीं, आपली बाजू होईल तितक्या थोडक्या शब्दांनीं त्याच्यापुढें मांडावयाची, आणि ह्या गोष्टीस मी कधींही कबूल व्हावयाचा नाहीं असें राजास मनमुराद ह्मणूं द्यावयाचें. राजास स्वताचें बोलणें ऐकण्याची फार हौस असे, आणि त्यास वाटे कीं आपण मोठे वक्ते आहों, पण आपणास पार्लमेंटापुढें किंवा एखाद्या सभेपुढें आपलें वक्तृत्व दाखविण्याची कांहीं संधि येत नाहीं, तेव्हां ते अशा प्रसंगीं दाखवावें. असो. अशा रीतीनें राजाचें बोलणें संपलें ह्मणजे डयूकानें मुकाट्यानें ह्मणावें कीं आपण ह्मणतां तें सर्व खरें; पण सध्याच्या ह्या अडचणींतून निघण्यास मी ह्मणतों ह्या व्यतिरिक्त अन्य मार्ग नाहीं. ह्मणजे मग राजा बहुधा बेतावर येत असे. आपल्या वक्तृत्वाच्या आवाजानें त्याचें समाधान होई, आणि मुख्या प्रधानाचें काम होई.

क्यॅथलिकांच्या मागण्यांच्या संबंधानें हाच मार्ग स्वीकारण्याचा त्यानें निश्चय केला. असें करणें राज्याभिषेकाच्या वेळीं घेतलेल्या शपथेच्या विरुद्ध होईल, ह्या मागण्या कबूल करण्यापेक्षां मी राज्य सोडून हॅनोवरला जाईन, मग इंग्लिश लोकांनीं क्यॅथलिकांस अनुकूल अशा ड्यूक ऑफ क्लारेन्सास खुशाल राजा करावें, इत्यादि राजाचें व्याख्यान त्यानें मुकाट्यानें ऐकिलें; आणि शेवटीं एवढेंच ह्मटलें कीं, कांहीं तरी करणें जरूर आहे; आणि आह्मी सांगतों त्याखेरीज दुसरें कांहीं करणें आह्मांस योग्य दिसत नाहीं. तेव्हां राजा अमळ ताळ्यावर आला, पण धर्माच्या बाबतींत राजा श्रेष्ठ होय, ही जी शपथ ती काढून टाकण्यास तो कबूल होईना.

ह्या विषयाच्या संबंधानें ड्यूक आफ वेलिंग्टन, लार्ड लिंढर्स्ट आणि सर राबर्ट पील ह्यांचें जें राजाशीं शेवटचें संभाषण झालें त्याविषयीं एक मजेदार हकीकत प्रसिद्ध आहे. राजाच्या श्रेष्ठत्वाविषयींची जी शपथ तींत बदल करणें अवश्यच होतें; ती क्यॅथलिकांनीं घेणें अशक्यच होतें, कारण ते धर्माच्या बाबतींत पोपास श्रेष्ठ मानितात हें सर्वांस ठाऊकच आहे. पण राजा त्यास मुळीं कबूल होईना; आणि तो प्रधानास विचारूं लागला कीं, तर मग तुह्मी काय करणार ? तेव्हां ते ह्मणाले, आह्मीं पार्लमेंतास जाऊन सांगणार कीं आह्मी आपल्या कामाचे राजीनामे दिले आहेत, राजानें तें त्यांचें बोलणें प्रथम मोठ्या शांतपणानें ऐकून घेतलें, व ह्मणाला मी तुह्मांस ह्या कामीं दोष देत नाहीं; इतकेंच नव्हे तर त्यानें त्यांस मोठ्या ममताळू-पणानें निरोप दिला, त्यांच्या प्रत्येक गालाचा एकेक मुका घेतला, आणि त्यांचे राजीनाम्यांचा स्वीकार केला. ही हकीकत त्या तिघांपैकींच एकानें स्वत: दिलेली आहे.

पण अशा रीतीनें हा चुंबनाविधि उरकल्यानंतर आणि हे तिघे मुत्सद्दी निघून गेल्यानंतर राजास असा विचार पडला कीं पुढें काय करावयाचें ? वेलिंग्टन लिंढर्स्ट, आणि पील अशा मुत्सद्यांशिवाय त्याला आवडेलसें प्रधानमंडळ बनविणें शक्य नव्हतें, आणि त्यानें ग्रेला जरी बोलाविलें, तरी क्यॅथलिकांची मुक्तता करावयाची नसल्यास तो प्रधानमंडळ

बनविण्यास कबूल होईल हेंहि संभवनीय नव्हतें. तात्पर्य, आपण स्वतःच राज्यकारभार हाकणार असें आपल्या प्रजेस जाहीर करणें किंवा चुंबन घेऊन घालविलेल्या प्रधानांस परत बलाविणें, ह्याखेरीज राजास दुसरा मार्गच राहिला नाहीं. तेव्हां काय करावयाचें ह्याबद्दल कांकूं करण्यास जागाच उरली नाहीं. ह्मणून त्यानें डयूक ऑफ वेलिंग्टनास बोलावणें पाठविलें, आणि राज्यकारभार हातीं घ्यावयास सांगून क्यॅथलिक प्रश्नाच्या संबंधानें योग्य दिसेल तें करावयास सांगितलें.

तेव्हां मग काय विचारतां ? क्यॅथलिकांच्या मुक्ततेचें बिल लागलेंच पुढें आणिलें. त्यामध्यें दुसरें कांहीं नव्हतें; तर एक नवीन शपथ घातली होती, त्या बिलानुरूप रीजंट, लार्ड चान्सलर, आणि आयर्लंडचा लार्ड लेफ्टेनंट ह्या तीन जागाखेरीज करून इतर पाहिजे त्या राजकीय किंवा दिवाणी जाग्यास आणि पार्लमेंतीय सभासदीस क्यॉथलिक लोक लायक ठरले गेले. तें बिल दोन्ही सभांतून झपाट्यानें पास होऊन निघालें. कामन्स सभेंत त्याचें तिसरें वाचन १४२ विरुद्ध ३२० या जंगी बहुमतानें आणि लार्डांच्या सभेंत १०९ विरुद्ध २१३ या मोठ्या बहुमतानें पसार झालें, आणि अशा रीतीनें ह्या मोठया वादाचा समाधानकारक रीतीनें निकाल लागला ( १८२९ ).

ओकानेल क्लेयर येथून दोनदां निवडून आला असतांही त्याला नव्या कायद्याप्रमाणें पार्लमेंतांत बसूं दिलें नाहीं. तर त्याला पुनः निवड करून घ्यावी लागली. वास्तविक पाहतां या खटपटीची कांहीं जरूर नव्हती. शिवाय आणखी एक कायदा असा पसार केला कीं तेणें करून आयर्लंडांतील जे चाळीस शिलिंग साऱ्याच्या जमिनीचे मालक होते, व ज्यांपैकींच पुष्कळांनीं ओकानेलला मत दिलें होतें, त्यांचा मतदानाचा हक्क काढून घेतला. पीलच्याच हातीं जर सर्व गोष्टी असत्या, तर त्यानें अशी क्षुद्रबुद्धि दाखविली नसती; पण त्यास लार्डांच्या टोरी सभेस शांत करावयाचें होतें, ह्मणून तो या गोष्टींस कबूल झाला.

ह्या कॅथलिक बंधविमोचनबिलाच्या संबंधानें एक चमत्कारिक गोष्ट घडली, ती येथें नमूद करण्यासारखी आहे. तिजवरून दुसरें कांहीं न दिसलें तरी तेव्हांच्या चालीरीतींत आणि हल्लींच्या चालीरीतींत केवढा फरक पडला आहे, हें तरी स्पष्ट दिसतें. हें बिल पास होण्याच्या अगोदर थोडे दिवस अर्ल आव् विंचिलसी ह्या सरदारानें एका वर्तमानपत्रास असें पत्र लिहिलें कीं, हें बिल पास करण्यास मदत करून डयूक आव् वेलिंग्टन हा इंग्लंडची धर्मसंस्था आणि राज्यव्यवस्था ह्या दोहोंचाहि अत्यंत मोठा घात करीत आहे. ह्यापत्राकडे डयूकानें ह्मटलें ह्मणजे फारसें लक्ष द्यावयास नको होतें. त्याचा लेखक मोठासा वजनदार माणूस होता, असें मुळींच नाहीं. पण त्याचा त्यास फार राग आला, आणि तेव्हांच्या शिस्तीस अनुसरून त्यानें त्यास द्वंद्व युद्धास आव्हान केलें. आतां असें करणें किती धोक्याचें आणि किती मूर्खपणाचें होतें, हें आपणास स्पष्ट कळतें. त्या युद्धांत डयूकाच्या जीवास जर अपाय होता, तर इंग्लंदचें केवढें नुकसान होतें हेंहि उघडच दिसतें. पण तेव्हांचे विचार निराळे असत. तथापि तेव्हांच्यादेखील कांहीं लोकांनीं डयूकाच्या ह्या कृतीबद्दल त्यास दोष दिलेला आढळतो. असो. शेवटीं नेमलेल्या दिवशीं नेमलेल्या ठिकाणीं दोघे आपल्या दुय्यमांसहित येऊन हजर झाले. पण वाटर्लूच्या विजेत्याच्या भाळीं त्या दिवशीं मारावयाचें किंवा मरावयाचें कांहींच लिहिलेलें नव्हतें. ते दोघे समोरासमोर उभे राहिल्यावर जेव्हां 'एक,' 'दोन,' 'तीन,' ह्मटलें तेव्हां अर्ल आव् विंचिलसीनें आपलें पिस्तुल प्रथम झाडलेंच नाहीं, आणि डयूकानें जरी आपलें झाडिलें तरी त्याची गोळी विंचिलसीच्या सरदारास कांहीं इजा न करतां जवळून निसटून गेली; नंतर मग त्या सरदारानें आपला बार हवेंत सोडिला, आणि मी आपले शब्द परत घेतले, व त्याबद्दल आपली माफी मागतों, असें डयूकास कळविण्यास आपल्या दुय्यमास सांगितलें. अर्थात ती गोष्ट वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झाली आणि हें प्रकरण आटोपलें.

हें बिल पास झाल्यावर ड्यूक आफ वेलिंग्टनास त्रास देण्यास बरींच कारणें उत्पन्न झालीं. इंग्लंडांत बऱ्याच ठिकाणीं लोक विपत्तींत होते, आणि विपत्तीच्या मानानें त्या त्या ठिकाणीं अस्वस्थताहि होती. शिवाय ह्यानें आपलें पूर्वींचें मत बदलून हें बिल पास करून घेतलें ह्याबद्दल त्याचे बरेच अनुयायी त्याजवर असंतुष्ट झालेले होते, व त्यांचा त्याजवरील विश्वास उडाला होता. शिवाय, आयर्लंडची स्थितिहि समाधानकारक नव्हती. ह्या बिलानें ओकानेल प्रभृति आयरिश पुढारी संतुष्ट न होतां त्यांनीं आतां अॅक्ट आफ युनियन हा कायदा रद्द करून आयरिश पार्लमेंट स्वतंत्र करण्याचीच खटपट आरंभिली होती. ड्यूकाच्या कांहीं अनुयायांस आतां असें वाटूं लागलें कीं पार्लमेंटाची सुधारणा करून ज्यास्त लोकांस मतदानाचा हक्क न दिल्यास क्यॅथलिक लोक प्राटेस्टंट धर्मसंस्था उलथून पाडतील. आतां वास्तविक स्थिति अशी आहे कीं लोकांच्या मागण्या अशा रीतीनें कबूल केल्यास ते जे जास्तच चळवळ करितात त्यास कारण त्या मागण्या आतां कबूल केल्या हें नसतें तर इतके दिवस केल्या नाहींत हें असतें. शहाण्या सरकारानें ह्मटलें ह्मणजे लोक इतके बेतावर येईतोंपावेतों त्यांची योग्य मागणी कबूल करण्याचें लांबणीवरच टाकूं नये.

इकडे देशाच्या बऱ्याच भागांत विपत्ति बरीच असल्यामुळें लोक नवे नवे गुन्हे करावयास लागले होते. गरीब बुभुक्षित लोक काम नसल्यामुळें धान्याच्या गंजी आणि शेतांतील पडळी जाळून फस्त करूं लागले. पारधीचे कायदे त्यावेळीं फार कडक असल्यामुळें त्यासंबंधानें बरेच मोठाले गुन्हे होत. पारधराखे ती चोरून मारणारांस ठार करीत, आणि चोर राखणारांस ठार करीत. प्रत्येक सेशनांत असले गुन्हेगार फार पुढें येत. दुसरा एक नवा गुन्हा यावेळीं सुरू होता तो असा कीं प्रेतें फाडून पाहणारांस तीं चोरून विकण्याचा धंदा सुरू झाला. आयात धान्यावर जकात फार असल्यामुळें धान्याचीही किंमत फार वाढली होती. पुष्कळ लोक अगदीं अडाणी असत, तरी लोकशिक्षणाची पद्धतशीर तजवीज अद्यापि कांहींच केलेली नव्हती. श्रीमंत फारच चैनीनें राहत, आणि त्यांस

राजा आणि त्याच्या वाड्यांतील लोक यांचें वर्तन पाहून जास्तच उत्तेजन येई. गत युद्धांमध्यें व्यापारास जी खोटी तेजी आली होती तिनें श्रीमान् लोक जास्त श्रीमान् झाले होते, आणि लढाईमुळें जे कर बसले होते त्यामुळें गरीब लोक ज्यास्तच गरीब झाले होते. पार्लमेंटीय सुधारणेबद्दल शिस्तवार चळवळ सुरू झाली. लार्ड जान रसेल व हेनरी ब्रूहाम हे त्याबद्दल पार्लमेंटांत व देशांत संभाषणें करूं लागले होते. डेनियल ओकानेल तर इतका पुढें गेला कीं, तो ह्मणूं लागला कीं सर्वांस मतदानाचा हक्क पाहिजे, पार्लमेंतें तीन तीन वर्षांनीं बदललीं पाहिजेत, आणि मतें गुप्त रीतीनें घेतलीं पाहिजेत. ह्या मागण्या ह्मणजे त्या वेळीं वेड्याचें बरळणें, किंवा राज्यक्रान्ति करूं पाहणाराचें ओरडणेंच समजत असत. पण ह्यांतल्या दोन गोष्टी आतां होऊनच गेलेल्या आहेत. तात्पर्य तेव्हांची वेळ धामधुमीची होती, आणि भावी फेरफारांच्या सांवल्या क्षितिजावर पडूं लागल्या होत्या.

एक मोठी क्रान्ति मात्र लवकरच घडून येणार असें सर्वांस वाटूं लागलें होतें. प्रस्तुत कारकीर्दीचा शेवट जवळ येत चालला होता आलीकडे राजाची प्रकृति व शक्ति हीं अगदींच ढांसळत चाललीं होतीं, आणि त्याचें आयुष्य फारसें वाढविणें हें वैद्यांच्या देखील हातीं राहिलें नव्हतें. तथापि एप्रिलांत (१८३०) पडणाऱ्या त्याच्या वाढ दिवसानिमित्त तयाऱ्या चालल्याच होत्या; आणि ता. १५ एप्रिलपर्यंत तो आजारी आहे, असें मुळींच प्रसिद्ध करण्यांत आलें नव्हतें. तेव्हां तरी त्यास पित्त झालें आहे एवढेंच जाहीर करण्यांत आलें. खुद्द राजास आपली प्रकृति फार बिघडली आहे ही गोष्ट मनांत आणणें मुळींच आवडत नव्हतें; तेव्हां ती जनांत तरी कशी यावी? अशा रीतीनें ता. २४ मेपर्यंत लोकांस संशयांत ठेविलें होतें. शेवटीं त्या दिवशीं दोन्ही सभांकडे राजाच्या नांवाचा असा निरोप आला कीं, राजास यापुढें सरकारी कागदांवर आपल्या हातानें सह्या करणें सोईवार वाटत नाहीं ह्मणून त्याबद्दल कांहीं तरी तजवीज करावी. तेव्हां असें ठरविलें कीं

सरकारी कागदांवर त्याचें सील त्याच्या समक्ष ठोकावें, व त्याबद्दल त्यानें अगोदर तोंडी हुकूम द्यावा; आणि अशा रीतीनें स्टांप पडलेल्या कागदावर प्रिव्हीकौन्सिलच्या तिघां सभासदांनीं सह्या कराव्या. ह्या सर्व गोष्टींसाठीं अर्थात् कायदा करावा लागला, व तो ता. २८ मेपासून अमलांत आला. तो फार दिवस अमलांत राहिला नाहीं. कारण ता. २६ जून रोजीं पहांटेस तीन वाजतां राजा वारला. त्यास मरण फार एकाएकीं आलें. त्या दिवशीं त्याची प्रकृति पूर्वींपेक्षां जास्त बिघडली होती असें नाहीं. तो नेहमींप्रमाणें बिछान्यावर बसला होता; इतक्यांत त्यास एकाएकीं घेरी आली, आणि सर्व कारभार आटोपला. मरणसमयीं त्यास ६८ वें वर्ष होतें.

जार्जच्या एकंदर कारकीर्दींत संस्मरणीय असें थोडेंच आहे. तो सर्वदा आपल्या चैनीकडे लक्ष देत असे. आतां मोठेपणीं तो दुर्गुणांत शिरला, त्यास कारण लहानपणीं त्याला फार नियंत्रण असे, हें कदाचित् असेल. लहानपणीं त्यानें मोठमोठ्या बुद्धिमान् व उदात्त मनाच्या लोकांशीं बिकट स्नेह केला होता खरा, पण पुढें ह्या स्नेहाचा त्याच्या मनावर कांहीं संस्कार शिल्लक राहिलेला दिसत नसे. तथापि असे स्नेह जमण्यास त्याच्या अंगीं कांही तरी गुण असले पाहिजेत. बर्क वगैरेच्या मतावरून त्याच्या अंगीं कांहीं संभाषणचातुर्य होतें असें स्पष्ट दिसतें.

जार्ज स्वतः जरी मोठा नव्हता तरी त्याच्या कारकीर्दीत पुष्कळ मोठाल्या गोष्टींस सुरवात झाली. त्याच्या वेळीं पुष्कळ धर्मार्थ संस्था सुरू झाल्या, पुष्कळ शास्त्रीय उद्योग सुरू झाले, आणि सामाजिक व राजकीय ह्याहि सुधारणांस आरंभ झाला. त्याच्या कारकीर्दीत लोकांस शिक्षण देण्याच्या पद्धतशीर यत्नांचा उपक्रम झाला, बिशप हीबर १८२६त निवर्तला. बायरनच्या मरणाचा आधीं उल्लेख आलाच आहे; पण त्याच्याहि अगोदर वाग्देवीच्या आकाशांतील अगदीं पहिल्या प्रतीचे दोन तारे, किट्स् व शेले या दोन कवींच्या मरणानें अस्तंगत झाले होते. ग्यारिकच्या नंतरचा व एडमंड कीनच्या आधींचा अत्यंत मोठा नाटकी जो जान केम्बाल तो ह्याच

कारकीर्दीत निवर्तला. तद्वत्‌च सर टॉमस लॉरेन्स, फ्लाक्समन, वगैरे कलाभिज्ञ मरण पावले. सर हम्फ्री डेव्ही, डुगल्ड स्टुअर्ट आणि पेस्टालोझी हे शास्त्रज्ञ मरण पावले. ह्याच कारकीर्दीत " रॉयल सोसायटी आव् लिटरेचर" ह्मणून एक वाङ्मयाच्या उत्तेजनार्थ नवी सभा स्थापन झाली, व तीस राजानें स्वतः उत्तेजन दिलें; तद्वत्‌च " मेक्यानिक्स् इन्स्टिटयूट " वगैरे शास्त्रीय संस्था, आणि मोठालीं वनस्पत्युद्यानें व पशुपक्षिसंग्रहालयें यांच्या स्थापना होऊं लागल्या; उपयुक्त ज्ञानाच्या प्रसारार्थ जी एका सभेची स्थापना या राज्यांत झाली, ती मुख्यत्वेंकरून हेनरी ब्रूहामच्या खटपटीनें झाली.

ह्या राज्यांत नव्या परराष्ट्रीय नीतीची स्थापना कॅनिंगनें कशी केली, आणि तिजपासून काय फायदे झाले हें मागें सांगितलेंच. तद्वत्‌च अप्रतिबंध व्यापार स्थापन करण्याच्या चळवळीची स्थापनाहि याच वेळीं झाली, आणि इंग्लंद व वसाहती ह्यांच्यांतील व्यापारालाही कांहीं अगदीं जुने व व्यापाराचे हात आंखडणारे प्रतिबंधहि याचवेळीं कमी झाले. गुलामगिरी आणि गुलामांचा व्यापार ह्यांच्या विरुद्ध खटपटीसहि जोराचा प्रारंभ ह्याच वेळीं झाला. ज्या राजकीय तत्त्वांस लिबरल ह्मणून आह्मी ह्मणतों त्यांनाही ह्याच राज्यांत जोर आला. लोकांची हितकारी अशी स्वेच्छाचारी सत्ता असली तरी ती चांगली नाहीं, आणि उत्तम राज्यव्यवस्था ह्मटली ह्मणजे जी केवळ लोकांसाठींच नव्हे तर लोकांकरवीं असेल तीच होय, ह्या तत्त्वांचें प्रतिपादन ज्यास्त ज्यास्त जोरानें व ज्यास्त ज्यास्त मोठ्यानें ह्याच कारकीर्दीत होऊं लागलें.

आतां ह्या सर्व चळवळींत राजाचें अंग फारच स्वल्प होतें हें उघड आहे. ह्यावरून असें स्पष्ट होतें कीं इंग्लंदसारख्या देशांत चांगला राजा असेल तर तो तेथील बुद्धिविषयक, सामाजिक आणि राजकीय चळवळींची प्रगति करण्याच्या कामीं जरी मदत करितो, तरी अगदीं वाईट राजा देखील त्यांना फारशी अडचण करूं शकत नाहीं.

असो. अशा रीतीनें चवथे जार्ज होऊन गेले होते. एकाच कुळांतील आणि एकाच नांवाच्या चार राजांनीं इंग्लंडवर क्रमशः राज्य केलें होतें. वास्तविक रीत्या पाहतां ह्या चवघांचा इतिहास ह्मणजे इंग्लंडचा अठराव्या शतकांतीलच इतिहास होय. आन राणीची कारकीर्द म्हणजे जशी सतराव्या शतकांतून अठराव्या शतकांत ओढलेली शिलक बाकी होती, तशीच चवथ्या जार्जची कारकीर्द ह्मणजे अठराव्या शतकांतून एकोणिसाव्या शतकांत ओढलेली शिलक बाकी ह्मणतां येईल. त्या दीर्घ आणि कृत्यमय शतकांत जे अनेक फेरफार घडून आले त्यांपैकीं एक फार संस्मरणीय व महत्वाचा आहे. चवथ्या जार्जाचा निपणजा इंग्लंडवर राज्य करण्याकारितां जेव्हां जर्मनींतून मोठ्या नाखुषीनें आला, तेव्हांपेक्षां घराण्याची स्थिति आतां अगदीं भिन्न झालेली होती. हानोवरचा इलेक्टर जेव्हां इंग्लंडचा राजा झाला, तेव्हां स्टुअर्ट पक्ष इंग्लंडांत अद्यापि प्रबल असा राजकीय पक्ष होता. आणि पुष्कळ इंग्लिश लोकांस स्टुअर्ट राजे परत राज्य करूं लागतील अशी फार आशा होती. पहिल्या व दुसऱ्या जार्जाच्या कारकीर्दीत ब्रन्सविक घराण्यांविरुद्ध स्टुअर्टपक्षानुयायी जे धक्के देत होते, त्यामुळें राजाचें सिंहासन हालत असे, ह्या गोष्टीची चवथ्या जार्जाच्या कारकीर्दीतील लोकांस कल्पना करणें अमळ कठीण जात असेल. तिसरा जार्ज गादीवर आला तेव्हां देखील कांहीं आशेविरुद्ध आशा करणारास समुद्रापलीकडचा राजा ( यूरोपांत भटकणारा दुसऱ्या जेम्सचा नातू ) पुनः इंग्लंडवर राज्य करावयास येईल अशीं स्वप्नें पडत, पण तो जेव्हां रोममध्यें १७८८ च्या सुमारास दीनावस्थेंत मेला, तेव्हांच ती आशा निघून गेली, व त्य गोष्टीस आतां सरासरी अर्धे शतक होऊन गेलें होतें.

---

### प्रकरण अठ्ठाविसावें.

## चवथ्या विलियमाच्या कारकीर्दीस आरंभ.

डयूक आव् क्लॅरेन्स जो आतां आपल्या भावाच्या मागून चवथा विलियम ह्मणून गादीवर बसला, त्यास यासमयीं ६५वें वर्ष लागलेलें होतें. त्याला आज पुष्कळ दिवस आपण बहुधा गादीवर बसणार हें माहीत होतें, तरी त्यानें आपल्या राजकीय कर्तव्यांचा कांहींच विचार केलेला नव्हता. तो नावाड्याच्या धंद्यांत शिरलेला होता, आणि त्यानें अमेरिका व वेस्ट इंडीज ह्या ठिकाणीं आरमारावर लढाई केलेली होती; पण अर्थात् तो राजपुत्र असल्यामुळें त्यास लार्ड हाय आडमिरल ह्या अत्यन्त मोठया हुद्यापर्यंत बढती सहज मिळालेली होती. नाव्हारिनोची जी लढाई झाली ती घडवून आणण्यांत ह्याचें कांहीं अंग होतें असें ह्मणतात. सर एडवर्ड काड्रिंग्टन यास सावधगिरीबद्दल लार्ड हाय आडमिरल या नात्यानें निरोप पाठवितेवेळीं त्याच्या शेवटीं त्यानें त्यास कांहीं उत्तेजनपर शब्द खरडले होते असें ह्मणतात. तें कसेंहि असो; तेथें लढाई झाली, टर्कीचा पराभव झाला, आणि ग्रीसला स्वातंत्र्य मिळालें, या गोष्टी मात्र निर्विवाद आहेत.

या गोष्टीव्यतिरिक्त डयूक आव् क्लारेन्सच्या कारकीर्दींत लोकप्रियता संपादण्यासारखें कांहीं एक नव्हतें. प्रसिद्ध नाटकवाली मिसेस जोर्डन हिच्याशीं त्यानें आज पुष्कळ वर्षें बहुतेक उघड रीतीनें व्यवहार ठेविला होता, व तिला त्याजपासून दहा मुलें झालीं होतीं. तथापि ब्रिटिश लोक हें सर्व विसरण्यास तयार झाले. चवथ्या जार्जाच्या हातून आपलें फारसें हित होण्याचा संभव नाहीं, असें पाहून ते याच्याकडे पूर्वींपासूनच जास्त जास्त वळूं लागले होते. शिवाय तो खलाशी होता, आणि इंग्लिश लोकांना खलाशी राजा नेहमींच आवडतो. त्यानें १८१८ सालीं डयूक आव् साक्स मेनिंजेन या जर्मन संस्थानिकाच्या मुलीशीं लग्न केलें होतें, तिच्यापासून

त्याला दोन मुली झाल्या होत्या, पण त्या दोघीहि अगदीं तान्ह्या असतांच निवर्तल्या होत्या.

विलियम गादीवर बसला तोंपर्यंत तो व्हिग किंवा लिबरल पक्षास अनुकूल आहे, अशी समजूत होती. त्याच्या रीतीभाती स्पष्टवक्तेपणाच्या, सलगीच्या आणि अमळ दांडगाईच्या अशा असत. त्याला दरबारी भपका फारसा आवडत नसे, आणि तो सामान्य माणसाप्रमाणें खाकेंत छत्री मारून रस्त्यांतून फिरावयास मुळींच लाजत नसे. हें अर्थात् सामान्य जनास फार आवडे, व त्यामुळें तो लोकप्रिय झाला होता. तथापि ही वेळ अमळ चळवळीची व घोंटाळ्याचीहि होती. फ्रान्सांत १८२०त पुनः स्थापिलेलें जें राजघराणें तें जाऊन त्याच्या ऐवजीं नव्या घराण्याची स्थापना झाली होती. दहावा चार्लस पदच्युत होऊन त्याच्याबद्दल लुई फिलिपि हा गादीवर आला होता. दोघेहि बोर्बनवंशीय होते, पण शाखा निराळ्या. नव्या राजास फ्रान्साचा राजा न ह्मणतां फ्रेंचांचा राजा ही पदवी मिळाली. अशा रीतीनें दहावा चार्लस हा फ्रान्सांतील शेवटचाच कायदेशीर राजा होय. कारण त्याचें घराणें वडील होतें.

ह्या घडामोडीचा इंग्लंडच्या लोकमतावर मोठा परिणाम झाला. चार्लस राजा व त्याचे प्रधान तेव्हांच्या कालमाहात्म्याच्या अनुरोधानें वागण्यास असमर्थ असल्यामुळें खालीं आले; ही गोष्ट उघड झाली, तेव्हां इंग्लंदांतील सुधारणेच्या अग्रणींनीं हा धडा लोकांच्या मनावर ठसविण्यास कमी केलें नाहीं. चवथ्या जार्जाच्या दुबळ्या कारकीर्दीत देखील बरेच मोठाले फेरफार घडून आले होते. धर्मविषयक बाबतींत सर्वांस सारखें वागविण्याचे संबंधानें बरीच सुधारणा झाली होती. निदान रोमन कॅथलिक व डिसेंटर या दोन लोकांवरील तरी धर्मविषयक प्रतिबंध निघालेले होते. तेव्हां चोहोंकडे राजकीय सुधारणेबद्दल ओरडा सुरू झाला. देशाची स्थिति हळू हळू बदलत चालली होती. इंग्लंद देश केवळ शेतीचा देश ह्मणून नाहींसा होऊन जास्त जास्त कळाकुसरीचा देश बनूं लागला होता. म्यांचेस्टर, लीड्स, लिव्हरपूल, बर्मिंघाम, व शेफील्ड इत्यादि विशाल शहरें उत्तर व

मध्य इंग्लंदांत उदयास येऊं लागलीं होतीं. असें असून अद्यापि पार्लमेंतास प्रतिनिधी पाठविण्याचा हक्क त्या शहरांना नसे; तो हक्क कौंटींना व ज्यांना खिशांतील गांव ह्मणून म्हणत अशा लहान खेड्यांनाच काय तो असे. याबद्दल कल्पना अशी असे कीं, सल्ला मसलत घेण्यासाठीं पाहिजे त्यांस पार्लमेंटांत बलावण्याचा राजास हक्क आहे. कांहीं वेळ असें होई कीं, एखादें गांव पूर्वी भरभराटींत असून आतां तें अगदीं मोडकळीस आलेलें असे, व तेथील लोकवस्ती अगदीं कमी झालेली असे तरी त्याला सभासद पाठविण्याचा हक्क असेच. अशीं गांवें अर्थात् मोठमोठ्या जमीनदारांच्या बगलेंत असत, शिवाय जमीनदार या नात्यानें कौंटींवर त्यांचा ताबा असे तो निराळाच. अशा रीतीनें कामन्स सभेचे बरेच प्रतिनिधि निवडण्याचा हक्क वस्तुतः या जमीनदारांच्या हातीं असे, ही स्थिति शिक्षणाचा हळू हळू होणारा प्रसार, आणि सुधारणेबद्दल लोकांमध्यें उत्पन्न झालेली कळकळ ह्यांच्याशीं जुळण्यासारखी नव्हती.

चवथा जार्ज मरून चवथा विलियम गादीवर आला तेव्हां अर्थात् ड्यूक आव् वेलिंग्टनच मुख्य प्रधान होता. नवा राजा लिबरल मतांचा आहे अशी समजूत असल्यामुळें तो नवीन प्रधान नेमील असें लोकांस वाटलें; पण त्यानें तसें कांहीं एक केलें नाहीं. त्यानें ड्यूकास बलावून सांगितलें कीं मला तूं फार आवडतोस, तेव्हां तुझ्याचकडे मी कारभार ठेवणार. एणेंकरून लोकांचीं निराशा झाली. बरें, राजाचें पहिलें संभाषण झालें तेंही निराशा उत्पन्न करणारेंच होतें. यावेळीं जिकडे तिकडे विपत्ति फार होती. युद्धांमुळें वाढलेलें कराचें ओझें अद्यापि तसेंच होतें. शेतकीची स्थिति चांगली नव्हती, आणि पुष्कळ ठिकाणीं दुष्काळ पडण्याची भीति होती, व्यापारहि मंदावला होता. तेव्हां लोकांस अशी आशा होती कीं राजाच्या संभाषणांत या गोष्टींचा कांहीं तरी उल्लेख येईल, व उपायांचीहि दिशा दाखविलेली असेल; पण त्या भाषणांत याबद्दल एक शब्दहि नव्हता.

दुसरी एक गोष्ट निराशाजनक होती ती अशी कीं राजा एकाएकीं आजारी पडल्यास किंवा मेल्यास रीजंट कोणास नेमावयाचें याबद्दल

कांहींच उल्लेख त्या भाषणांत नव्हता. राजा म्हातारा असल्यामुळें, व त्याचें तारुण्य फारशा सुनीतींत गेलेलें नसल्यामुळें, तो फार दिवस जगेल असा कोणास भरंवसा नव्हता. बरें, याच्यामागूनची गादीची मालकीण प्रिन्सेस व्हिक्तोरिया हिला नुक्तें अकरावें वर्ष असल्यामुळें ती गादीवर आल्यास तिचा चुलता डयूक आव् कंबर्लंद हा तिचा पालक होण्याचा संभव होता; आणि तो तर अत्यन्त अप्रिय माणूस होता. त्याच्याबद्दल लोकांस अशी भीति वाटे कीं हा गादी मिळण्यासाठीं काय पाहिजे तें करण्यास तयार होईल. दुःखांत सुख एवढेंच होतें कीं तो त्याचवेळीं हानोव्हरचा राजा होण्याचा संभव होता, कारण त्या गादीवर बायका बसूं शकत नाहींत. तरी पण राजानें ह्या सर्व गोष्टींबद्दल कांहीं तरी व्यवस्था करावी, असें लोकमत होतें.

पण राजास असें बिलकूल वाटत नव्हतें. मी एकाएकीं मरेन अशी लोकांस भीति कां वाटावी हेंच त्याच्या लक्ष्यांत येईना. त्यावेळीं अशी चाल होती कीं एक राजा मरून दुसरा गादीवर बसला म्हणजे लागलेंच नवें पार्लमेंत भरावयाचें. हल्लीं तो कायदा बदलला आहे; त्यामुळें व्हिक्टोरिया राणी निवर्तली तेव्हां नवें पार्लमेंत भरलें नाहीं. असो. राजा यावेळीं नवें पार्लमेंत भरण्यास उत्सुक झाला होता. मग चालू प्रधानमंडळाचें देशांत वजन कसें काय आहे तें त्यास पाहावयाचें होतें कीं काय नकळे. त्या वेळचे पुढारी प्रधान म्हटले म्हणजे डयूक आव् वेलिंग्टन व सर राबर्ट पील होते. विरुद्ध पक्षाचे अग्रणी म्हटले म्हणजे लार्डांच्या सभेंत अर्ल ग्रे, आणि कामन्स सभेंत लार्ड जान रसेल आणि हेन्री ब्रूहाम हे होते. हस्किसन व त्याचे मित्र कोणत्या बाजूस मिळतील हें निश्चित नव्हतें. कोणी म्हणत ते वेलिंग्टनच्या पक्षास मिळतील. पण इतक्यांत हस्किसनचा निकाल लागला. तो अपघातानें मरण पावला. इंग्लंदांत पहिला आगगाडीचा रस्ता लिव्हरपूलपासून म्यांचेस्टरपर्यंत तयार केला; आणि तो उघडण्याचा समारंभ तारीख १५ सपटंबर १८३० रोजीं झाला. त्यावेळीं जी बडीबडी मंडळी जमली होती त्यांत डयूक, पील व हस्किसन हे होते. डयूकाचे व हस्किसनचेहि मित्र यांची अशी इच्छा होती कीं, या प्रसंगीं दोघांचा राजकीय

बाबतींत नाहीं तरी निदान खाजगी बाबतींत तरी समेट करून घ्यावा. गाडी एका स्टेशनावर थांबली, डयूक व हस्किसन दोघेही खालीं उतरले, आणि ते दोघे एकमेकांच्या हातांत हात घालावयास पुढें सरसावत होते. इतक्यांत तिकडून एक गाडी आल्याची ओरड झाली. तेव्हां सगळे आपल्या गाडीकडे धांवले, आणि त्या गर्दीत हस्किसनला चालू गाडीच्या एका उघड्या राहिलेल्या दाराचा धक्का असा कांहीं जोरानें लागला कीं, तो बहुतेक तेथल्या तेथेंच मेला. जमाबंदीच्या कामांत हस्किसन अगदीं पहिल्या नंबरचा मुत्सद्दी होता, आणि त्याच्या एकंदर मतांचा कल क्यॅनिंग प्रमाणेंच लिबरल होता.

हेन्री ब्रूहामनें कामन्स सभेंत अशी नोटीस दिली कीं पार्लमेंटीय सुधारणेच्या प्रश्नाचा विचार करण्याविषयीं लवकरच सूचना पुढें आणण्याचा माझा विचार आहे. त्या वेळेस ब्रूहाम ह्मणजे सुधारणेचा अगदीं कट्टा अभिमानी ह्मणून समजला जात असे. लार्ड जान रसेल यास आपण सुधारणेचे केवढे निःसीम भक्त आहों हें दाखविण्याची अद्यापि संधि आली नव्हती. शिवाय ब्रूहामसारखें त्याच्या अंगीं जबरें वक्तृत्वही नव्हतें. ब्रूहामचें भाषण ह्मणजे जोराचें, आरडाओरडीचें, आणि हातवाऱ्याचें असें असे. तो सुधारकांचा ह्यावेळीं अगदीं लाडका बनलेला होता. म्हणून त्यानें जेव्हां वरच्यासारखी नोटीस सभेपुढें आणिली, तेव्हां आतां ह्या प्रश्नासंबंधानें चांगलीच चकमक उडणार अशी सर्वांची खात्री झाली. तितक्यांत फ्रान्सांत झालेल्या क्रांतीची बातमी येऊन थडकली, आणि तेणेंकरून लोकांच्या आशेस ज्यास्तच अंकुर फुटला.

ह्या सूचनेकरितां विरुद्धपक्षानें एक दिवसाची फुरसत प्रधानांजवळ मागितली होती, पण ती प्रधानांनीं दिली नाहीं, आणि त्या प्रश्नावर जेव्हां मतें घेतलीं तेव्हां दोन्ही सभागृहांत प्रधानांस अनुकूल असेंच बहुमत पडलें. नंतर थोडक्याच दिवसांनीं पार्लमेंट बरखास्त केलें, आणि नव्या निवडणुकींची धामधूम सुरू झाली. त्यावेळीं निवडणुकींची बरीच दंगल उडत असे. मतदारांपासून मतें मिळण्याकरितां त्यांस लांच देणें, आशा

दाखविणें, आणि जरब घालणें हे सर्व प्रकार फार चालत. असो. नव्या निवडणुकींच्या एकंदर धोरणावरून असें व्यक्त झालें कीं राजास डयूक आव् वेलिंग्टन आणि पील ह्यांस फार दिवस प्रधानकीवर ठेवतां येणार नाहीं. हल्लीं कामन्स सभेंत ज्या पक्षाचें प्राबल्य असेल त्यापैकींच प्रधान राजानें नेमावयाचे हें अगदीं ठरल्यासारखें झालें आहे. तसा तेव्हां प्रकार नसे. तथापि पार्लमेंटांतील बहुमत आणि लोकमताचा कल ह्यांना अगदीं झुगारून देऊन राजानें वाटेल त्यास प्रधानकी द्यावी हेंहि दिवस आतां निघून गेले होते.

नवें पार्लमेंत ता. ९ नवंबर रोजीं भरलें, आणि त्यावेळीं राजाचें जें भाषण झालें तें सुधारकांस समाधानकारक असें मुळींच नव्हतें. त्यांत सुधारणेच्या प्रश्नाचा मुळींच उल्लेख नव्हता, उलट असें म्हटलें होतें कीं हल्लींची प्रतिनिधि निवडण्याची व्यवस्था फारच उत्तम आहे. तेव्हां राजास मानपत्र देण्याच्या संबंधानें जो वादविवाद झाला तो चालला असतां लार्ड ग्रेनें सुधारणेच्यासंबंधानें आपला काय विचार आहे असें प्रधानांस स्पष्ट विचारिलें. तेव्हां डयूक आव् वेलिंग्टनानें उठून धिमेपणानें असें सांगितलें कीं हल्लींची प्रतिनिधि व्यवस्था जितकी सर्वांगसुंदर आहे तितकी उत्तम व्यवस्था कोणाहि राजकीय तत्त्ववेत्त्यास बनवतांच यावयाची नाहीं. तो ह्मणाला हल्लीं जितकी स्वतंत्रता दिलेली आहे तितकी त्यांस अगदीं बस्स आहे; हल्लीं सर्वांच्या हक्कांचें सारखें संरक्षण होत आहे, आणि त्यापासून सर्वांना सुखहि सारखें होत आहे; तेव्हां शहाणे असतील त्यांनीं सद्यःस्थितीकडे नीट डोळे उघडून पहावें; ह्मणजे सध्याची व्यवस्था आपल्या सुदैवानें किती उत्तम आहे हें त्यांच्या स्पष्ट लक्ष्यांत येईल. त्यानें शेवटीं असें सांगितलें कीं सुधारणा करण्याच्या हेतूनें हल्लींच्या पवित्र राज्यव्यवस्थेस आपले ओंवळे हात लावण्याचा माझा मुळींच विचार नाहीं इतकेंच नव्हें, तर जो कोणी तसें करण्याचा प्रयत्न करील त्यास होईल तितका विरोध करण्याचा मी निश्चय केलेला आहे. आतां एथें एवढेंच लक्ष्यांत ठेवावयाचें कीं डयूकाचे असेच केवळ शब्द होते असें नाहीं, तर असा त्याचा मतलब होता.

या नव्या पार्लमेंतापुढेंहि ग्रूहामनें आपली पूर्वीची सूचना आणिलीच; आणि अशा रीतीनें दोन्ही पक्ष जणूं काय लढाईस सिद्ध झाले. पण प्रस्तुत प्रधानमंडळ हालल्याशिवाय सुधारणावाल्यांस कांहींच आशा नव्हती. बरें, त्यावेळीं पार्लमेंताचीहि स्थिति अशी नव्हती कीं प्रधानांवर आमचा विश्वास नाहीं, अशी सूचना आणिल्यास ती म्हणजे खात्रीनेंच पास होईल. पण इतक्यांत अशी एक गोष्ट घडून आली कीं तेणेंकरून प्रधानमंडळ अजमासापेक्षाहि ज्यास्त लवकर खालीं आलें. सर हेन्री पार्नेल नामक गृहस्थानें अशी सूचना आणिली कीं राजाच्या खाजगी खर्चाकरितां जी रकम राजानें मागितली आहे ती योग्य आहे किंवा नाहीं ह्याची चवकशी करून रिपोर्ट करण्याकरितां एक कमिटी नेमावी. ह्या सूचनेस लिबरल पक्षाच्या पुढाऱ्यांनीं आपला पाठिंबा दिला, आणि प्रधानांनीं जबरदस्त विरोध केला. आतां प्रधानांनीं असें केलें यांत कांहीं नवल नाहीं. कारण एकंदर खर्चाचे अंदाज त्यांनींच केलेले असतात; तेव्हां ते बरोबर आहेत किंवा नाहींत हें पाहण्याकरितां तिऱ्हाईत कमिटी नेमावी, ही गोष्ट त्यांस आवडण्याचा संभवच नसतो. पण या वादविवादाचा विशेष महत्वाचा परिणाम होईल व तो तावडतोबच होईल असें कोणास वाटलें नव्हतें.

सर हेन्री पार्नेल हा फार हुशार व सभ्य माणूस होता, व जमाबंदीच्या कामाची त्यास विशेष माहिती होती. स्विफ्ट व पोप यांचा स्नेही जो पार्नेल कवि त्याच्या वंशजांपैकीं तो एक होता, व पुढें त्यास लार्ड कांगल्टन ही सरदारी पदवी प्राप्त झाली. पुढें पुष्कळ वर्षांनीं दुसरा एक पार्नेल ( चार्लस स्टुअर्ट पार्नेल ) असाच पार्लमेंतांत प्रसिद्धीस आला, आणि आयरिश लोकांचा अग्रणी बनला, हें वाचकांस विश्रुतच आहे. असो. सर हेन्रीची सूचना कामन्स सभेंत २९ च्या बहुमतानें पसार झाली. आतां असल्या सूचनेच्या संबंधानें प्रधानांचा पराजय झाला ह्मणून त्यांनीं राजीनामा दिलाच पाहिजे होता असें नाहीं. त्यांनीं मुकाट्यानें कमिटी नेमिली असती ह्मणजे काम भागलें असतें. पण कधीं कधीं प्रधानमंडळें आपली कशी तरी सुटका होईल ह्मणून वाट पाहत असतात. थोडे वर्षांपूर्वीं रोजबेरी प्रधानमंडळानें

अशाच क्षुल्लक बाबीवरून राजीनामा दिला हें वाचकांस आठवत असेलच. तसेंच प्रस्तुत मंडळानेंही ह्यावेळीं केलें. त्यांनीं गेल्या निवडणुकींत निदान उत्तर इंग्लंडांत तरी लोकमत सुधारणेस किती अनुकूल झालेलें आहे हें पाहिलेलें होतें. तद्वतच क्यॅथलिकांची वगैरे बंधमुक्तता आपण नाहीं नाहीं ह्मणतां शेवटीं केल्यामुळें आपल्याच पक्षाचे लोक आपल्यावर किती रुष्ट झालेले आहेत हेंही त्यांच्या लक्ष्यांत चांगलें आलेलें होतें. ह्मणून त्यांनीं राजीनामा दिला.

ह्या राजीनाम्यास आणखीही एक क्षुल्लक कारण झालें. लंडनचा लार्ड मेयर व कार्पोरेशन यांनीं गिल्डहाल येथें राजास व राणीस ता. ९ नवंबर रोजीं जेवावयास बोलाविलें होतें; आणि ड्यूक आव् वेलिंग्टनादि प्रधानहि त्यावेळीं तेथें यावयाचे होतेच. पण त्या दिवसाच्या अमळ अगोदर लार्ड मेयरानें ड्यूकास असें लिहून पाठविलें कीं तुमच्यावर त्या दिवशीं कोणी गुप्तरीतीनें हल्ला करणार आहे, अशी गुप्त बातमी मला मिळाली आहे; तर आपण त्या दिवशीं रस्त्यांतून चांगला बंदोबस्त ठेवण्याची तजवीज ठेवावी. आतां असल्या बातम्यांस ड्यूक भिणारा होता असें मुळींच नाहीं; पण नवा राजा प्रथमच मेयराकडे जेवावयाचा त्या दिवशीं असा बंदोबस्त करावा लागावा हें त्यास बरोबर वाटलें नाहीं; ह्मणून त्यानें ती मेजवानी तहकूब करावयास सांगितलें. तेव्हां शहरांत कांहीं अनिश्चित भीति सर्वत्र पसरली, आणि सरकारी ठेवीचा भाव भयंकर रीतीनें उतरला.

ड्यूक आव् वेलिंग्टननें राजीनामा दिला तेव्हां लार्ड ग्रेस बलावून त्याला प्रधानमंडळ बनवावयास सांगणें या खेरीज राजास अन्य मार्गच उरला नाहीं. लार्ड ग्रे त्या गोष्टीस तयारच होता व आज कांहीं दिवस त्या गोष्टींसंबंधानें त्याचा विचारही चाललेला असावा. कांहीं नेमणुकां- बद्दल कांहीं अडचण नव्हती. लार्ड मेलबर्न, लार्ड आल्थॉर्प व लार्ड जान रसेल यांना प्रधानमंडळांत घ्यावयाचें हें तर ठरल्यासारखें झालेलें होतें. पण ब्रूहामचें काय करावयाचें हा अंमळ विचार होता. त्याला कोणती तरी जागा दिली पाहिजे ह्याबद्दल संशयच नव्हता कारण निदान उत्तर इंग्लंदांत तरी

सुधारणेच्या संबंधानें तो देव बनलेला होता. पण त्याला योग्य असून त्याच्या सांथीदारांनाही योग्य अशी जागा कोणती हा अमळ विचार होता. तेव्हां त्याला प्रथम अटर्नी जलरलची जागा देऊं केली. कारण ही जागा जरी लहान असली तरी पुढें असला माणूस लार्ड चिफ जस्टीस किंवा लार्ड चान्सलर बनण्याचा संभव असतो पण ती त्यानें साफ नाकारिली. नंतर मग त्यास मास्टर आव् धि रोल्स ही जागा देण्याचा विचार केला, व यानें कामन्स सभेंतच बसावें अशी व्यवस्था करण्याचें मनांत आणिलें; पण राजास तें रुचलें नाहीं. तेव्हां त्यानें लार्ड ग्रेस सुचविलें कीं तूं त्याला लार्ड चान्सलरचीच जागा दे; ह्मणजे तो संतुष्ट होईल आणि कामन्स सभेंतून आयताच निघून जाईल, ही गोष्ट ग्रेस फार पसंत पडली, कारण ती त्याच्याहि ध्यानांत आली होतीच; पण राजास ती कदाचित् पसंत पडणार नाहीं अशी त्यास भीति होती. असो. पण ही जागा जेव्हां त्यास देऊं केली तेव्हां ती त्यानें कुरकुर केल्याशिवाय पत्करिली असें नाहीं. तेव्हांपासून त्याचें वजन कमी झालें. त्याची सुधारक या नात्यानें जी शक्ति ती निघून गेली, आणि त्यास अत्यन्त प्रिय अशा एक दोन प्रश्नांचा निकाल लागल्यानंतर तो सुधारणेच्या चळवळींत मन घालीनासा झाला.

लार्ड आल्थार्प हा फडणवीस झाला. पूर्वी त्यानें फडणिशीचें काम करून कामन्स सभेच्या अग्रणीचेंहि काम केलेलें होतें. तो मासलेवाईक असा जमीनदार होता, पण त्याला राजकीय विषयांची फारशी गोडी नव्हती. त्याला बोलतांहि बेताचेंच येत असे, पण त्याचें वजन मात्र बरेंच असे. तो पराकाष्ठेचा प्रामाणिक व स्पष्टवक्ता असे, व त्यास लोभ मुळींच नसे. लार्ड मेलबर्न यास होम सेक्रेटरी केलें. लार्ड जान रसेल ह्यास क्याबिनेटांत न घेतां केवळ पे मास्टर आव् धि फोर्सेस (फौजेचा पगारदार) ह्याच हुद्यावर नेमिलें. लार्ड जान रसेल पार्लमेंतांत शिरला तेव्हांपासूनच त्यानें पार्लमेंतीय सुधारक ह्मणून आपलें नांव प्रसिद्ध केलें होतें. प्रथम याबद्दलची सूचना त्यानें १८१९त आणिली होती, व तेव्हांपासून प्रत्येक वर्षी तो ती सूचना पुनः पुनः आणीत असे. क्यॅथलिक व डिसेंटर या दोन्ही लोकांची

बंधमुक्तता करण्याच्या कामीं तो प्रथमपासून अनुकूल होता. त्याचें सगळें लहानपण मुत्सद्दीपणाचा धंदा शिकण्यांत गेलेलें होतें. पंडित व तत्त्ववेत्ते, कवि आणि इतिहासकार, इत्यादिकांशीं त्याचा स्नेह झालेला होता. नेपोलियनशीं लढाई चाललेली असतां तो स्पेनमध्यें जाऊन आलेला होता आणि एल्बा येथें नेपोलियनची त्यानें गांठ घेतली होती. तात्पर्य पुढें पुष्कळ वर्षांनीं डिस्रायलीनें ह्मटल्याप्रमाणें त्यानें फाक्सच्या पायांशीं शिक्षण घेतलेलें होतें, आणि क्यानिंगशीं दोन हात केलेले होते. लार्ड पामर्स्टन हा ह्या मंडळांत प्रथमच फारेन सेक्रेटरी बनला. तो पूर्वी आरमारखात्यावरील दुय्यम लार्डाच्या जागयावर होता, व नंतर लष्करी खात्याचा सेक्रेटरी बनला होता; पण तो जेव्हां ह्या वेळीं फारेन सेक्रेटरी बनला तेव्हां तो पुढें एकोणिसाव्या शतकांतील अत्यन्त जोरदार मुत्सद्यांपैकीं एक होणार आहे हें थोडक्यांच्याच लक्ष्यांत आलें असेल. सर जेम्स ग्रेहाम हा आरमारावरील मुख्य प्रधान बनला, आणि लार्ड ग्रेचा जांवई लार्ड डर्हम हा प्रिव्ही सील या नांवाच्या हुद्यावर गेला. या वेळीं लार्ड डर्हम हा हुशार पण अम्मळ विक्षिप्त माणूस आहे अशी त्याची प्रसिद्धि होती; पण पुढें कानडामध्यें जी त्यानें विलक्षण बुद्धिमत्ता व दूरदृष्टी दाखविली तिचा या समयीं कोणास अंदाज नव्हता. मि. स्टान्ले ( पुढचा लार्ड डर्बी ) हा आयर्लंदच्या लार्ड लेफ्टेनंटाचा चीफ सेक्रेटरी बनला, आणि लार्ड प्लंकेट हा त्या देशाचा लार्ड चान्सलर बनून अत्यन्त मोठा पार्लमेंतीय वक्ता ह्मणून प्रसिद्धीस आला.

---

## प्रकरण एकोणतिसावें.

# पार्लमेंतीय सुधारणेचें बिल.

सारांश, नवें प्रधानमंडळ सुधारणेची लढाई चालविण्यास योग्य असेंच होतें. लार्ड ग्रेनें असें ठरविलें कीं लार्ड जॉन रसेल जरी क्याबिनेटांत नसला तरी कामन्स सभेंतून सुधारणेचें बिल पार पाडण्यास तोच अत्यन्त योग्य माणूस आहे. प्रधानमंडळाची रचना पुरी झाल्याबरोबर लार्ड डर्हम व लार्ड ज्यान रसेल यांचा बिलासंबंधानें पत्रव्यवहार सुरू झाला. डर्हमनें रसेलला असें लिहिलें कीं हें बिल तयार करण्यासाठीं एक लहानशी कमिटी नेमावी असें लार्ड ग्रेच्या मनांत आहे. ही गोष्ट रसेलला पसंत पडली, आणि तदनुसार तो, डर्हम, सर जेम्स ग्रेहाम आणि लार्ड डंकानन, ह्या चवघांची कमिटी नेमिली. नंतर डर्हमनें ह्या बिलासंबंधाची आपली स्थूल कल्पना कागदावर लिहून काढण्यास रसेल यास सांगितलें, असें कीं तेणेंकरून कमिटीस त्या प्रश्नाचा पहिल्याच बैठकीस विचार करण्यास ठीक पडावें.

त्याप्रमाणें त्यानें बिलाचा एक कच्चा खर्डा तयार केला, व तो लार्ड डर्हम यास दाखविला. त्यामध्यें डर्हमनें कांहीं फेरफार सुचविले. रसेलची पहिली सूचना अशी होती कीं अगदीं आलीकडच्या खानेसुमारीप्रमाणें अत्यन्त अल्प लोकवस्ती असलेल्या अशा पन्नास गांवांचा पार्लमेंतास प्रतिनिधि पाठविण्याचा हक्क मुळींच काढून घ्यावा. ही सूचना डर्हमला अगदीं पसंत पडली, आणि त्यानें असा अंदाज केला कीं अशा रीतीनें १४०० शेंहून जास्त वस्ती नाहीं अशा सर्व गांवांचा प्रतिनिधि पाठविण्याचा हक्क निघून जाईल. रसेलची दुसरी सूचना अशी होती कीं वर सांगितलेल्या गांवांहून वरच्या दर्जाच्या पण एकंदरींत लहान लोकसंख्येच्या पन्नास शहरांना एकच प्रतिनिधि पाठविण्याची परवानगी असावी ही सूचनाहि लार्ड डर्हम यास पसंत पडली, व त्यानें असा अंदाज केला कीं, तीन हजारांहून जास्त लोकवस्ती नाहीं, अशा शहरांस ती लागू

पडेल. लार्ड जान रसेलची आणखीं एक सूचना अशी होती कीं, ज्या ज्या लोकांच्या अंगीं ज्यूरर होण्याची पात्रता असेल त्यांस मतदानाचा हक्क असावा; पण ती लार्ड डर्हम यानें नापसंत केली रसेलची चवथी सूचना अशी होती कीं एकादा मनुष्य घरवाला असून तो वर्षाची दहा पौंड पट्टी देत असल्याविना, आणि पूर्वीं तीन वर्षें अशी पट्टी दिली असल्याविना आणि तो विशिष्ट शहरीं किंवा गांवीं पूर्वीं सहा महिने राहिल्या असल्याविना त्यास त्या शहरांत किंवा गांवांत मतदानाचा हक्क असूं नये. त्याची आणखीं एक सूचना अशी होती कीं लंदनच्या ज्या भागांस हल्लीं प्रतिनिधि पाठविण्याचा हक्क नाहीं त्यांस चार किंवा सहा सभासद निवडण्याचा हक्क द्यावा, आणि अठरा शहरांस तो हक्क अगदीं नव्यानें द्यावा, आणि वीस कौंटींनीं पूर्वींपेक्षां दोन दोन जास्त सभासद निवडून पाठवावे. लार्ड जान रसेलच्या सर्व सूचना एथें सांगत बसण्याची जरूरी नाहीं; त्यांतील विशेष महत्वाच्या एथें वर नमूद केल्या आहेत, आणि त्यांवरून प्रतिनिधि निवडण्याच्या संबंधानें तेव्हांची स्थिति काय होती हें वाचकांच्या स्थूलमानानें लक्षांत येण्यासारखें आहे. बराच खल करून ह्या सर्व सूचना कमिटीनें पसंत केल्या.

एक महत्त्वाची सूचना लार्ड डर्हमनें पुढें आणून ती कमिटीनें रीतीप्रमाणें पसंत केली, पण तीस लार्ड जान रसेल अगदीं विरुद्ध होता. मतें गुप्तरीतीनें घ्यावीं अशा अर्थाची ती सूचना होती. पण बिल जेव्हां क्याबिनेटापुढें गेलें, तेव्हां त्यांनीं ही सूचना काढून टाकिली. एवढी महत्त्वाची सुधारणा करण्याचा वेळ अद्याप आलेला नव्हता. इंग्लिश लोकांस ह्या खबरदारीची जरूरी भासण्यास आणखीं चाळीस वर्षें जावयास पाहिजे होतीं. उघड रीतीनें मतें दिल्यानें जमीनदार व इतर श्रीमान् लोक मतदारांस अमुकच उमेदवारास मतें देण्याचा आग्रह किंवा जबरी कशी करितात व त्यामुळें मतदानाच्या हक्काची पायमल्ली किंवा थट्टा कशी होते हें इंग्लिश मुत्सद्यांच्या अद्यापि बरोबर ध्यानांत आलेलें नव्हतें. चार्टिस्ट लोक त्या वेळींहि ह्या सुधारणेबद्दल ओरड करीतच होते; आणि त्या चळवळीपैकीं अत्यन्त लोक-

प्रिय असा वक्ता हंट हा नुक्ताच स्टान्लेचा पराभव करून प्रेस्टन एथून निवडून आलेला होता. डेनियल ओकानेलहि ह्या सुधारणेस अनुकूल होताच; कारण त्यास माहीत होतें कीं एरवीं आयरिश कुळांना आपल्या जमीनदारास मत द्यावें लागेल किंवा शेत सोडावें लागेल. परंतु त्यावेळीं मुत्सद्दी लोकांमध्यें व सामान्य लोकांमध्यें अशी समजूत बनलेली होती कीं गुप्तरीतीनें मत देणें हें जरासें इंग्रजाच्या ब्रीदाच्या विरुद्ध आहे; आणि ते असें ह्मणत कीं इंग्रजांच्या अंगीं, कोण रागावेल याचा विचार न करतां, निवळ सदसद्विवेकबुद्धि सांगेल त्याप्रमाणें मत देण्याइतकें नैतिक धैर्य असलेंच पाहिजे. जबरीच्या लोकशिक्षणाबद्दल देखील इंग्लिश लोकांची परवापर्यंत अशीच समजूत होती, व तिच्यांत कांहीं अर्थ नाहीं असेंहि नाहीं.

ह्याखेरीज कमिटीच्या बाकीच्या सर्व सूचना क्याबिनेटानें पसंत केल्यानंतर तें बिल राजास दाखविलें, व राजानेंहि त्यास एकदम आनंदपूर्वक आपलें अनुमोदन दिलें. ह्या संबंधानें तेव्हांच्या कांहीं लोकांची अशी समजूत होती कीं राजानें हें बिल आनंदानें पसंत केलें होतें, कारण तें पुढें आणिलें ह्मणजे प्रधानमंडळ आपोआप खालीं येईल अशी त्यास खात्री वाटत होती हें होय. तें कसेंहि असो; त्यानें त्यास आपली पूर्ण संमति दिली ह्यांत बिलकूल संशय नाहीं; आणि प्रधानांनीं तें पुढें आणण्याचा निश्चय केला.

बिल पुढें आणण्याच्यासंबंधानें अशी व्यवस्था केली होती कीं तें लार्ड जान रसेलच्या हातीं द्यावें. याबद्दल पार्लमेंतांत व इतरत्र बरीच प्रतिकूल टीका झाली. विरुद्ध पक्षाचे बरेच पुढारी असें ह्मणूं लागले आणि लोकांची अशी समजूत करून देऊं लागले कीं, ह्यावरून क्याबिनेटाला सुधारणेबद्दल वास्तविक उत्सुकता नाहीं असें दिसून येतें. ते ह्मणूं लागले कीं क्याबिनेटास जर तशी उत्सुकता असती, तर त्यांनीं आपल्यापैकीं कोणाची तरी तें पुढें आणण्याच्या कामीं योजना केली नसती काय ? लार्ड जान रसेल क्याबिनेटांत नसून त्यास त्यांनीं हें काम सांगितलें ह्यावरून त्यांच्यापैकीं कोणीहि हें काम शिरावर घेण्यास खुष नाहीं असें दिसत नाहीं काय ? आतां वास्तविकरीत्या पाहतां या तर्कांत किंवा कुतर्कांत कांहीं एक

हांशील नव्हतें. लार्ड जान रसेल याच्या हातीं हें काम देण्याचें पहिलें कारण हें होतें कीं तो त्या कामास अत्यन्त योग्य होता. दुसरें कारण असें कीं तो अत्यन्त मोठ्या अशा एका सरदारघराण्यापैकीं होता, आणि त्या लोकांसच ह्या बिलानें आपली सत्ता कमी होईल अशी भीति फार वाटत होती. शिवाय असें कीं हें बिल प्रथम कामन्स सभेपुढेंच आणणें इष्ट असल्यामुळें लार्ड ग्रेला तें स्वत: आणण्याची सोय नव्हती, कारण तो लार्डांच्या सभेंत होता. ब्रूहामची तीच स्थिति झालेली होती. लार्ड आल्थापच्या हातीं अद्यापि सरदारी आली नसल्यामुळें तो रसेलप्रमाणें कामन्स सभेंतच होता हें खरें आहे; पण वर सांगितल्याप्रमाणें त्यास तोंड मुळींच नव्हतें. तेव्हां रसेलशिवाय दुसरा योग्य माणूसच नव्हता. शिवाय त्यानें मोठा पार्लमेंतीय वक्ता ह्मणून जरी कीर्ति संपादन केली नव्हती व तशी कीर्ति त्याची कदापिच झाली नाहीं, तरी अतिशय संकीर्ण गोष्ट अगदीं फोडून कशी सांगावी आणि वादविवादांत जी जी शंका निघेल तिचें निरसन कसें करावें हें चातुर्य त्याच्या अंगीं फार होतें.

मंगळवार ता. १ मार्च १८३१ हा दिवस हें बिल सभेपुढें आणण्यासाठीं नेमिला होता. तोंपर्यंत प्रधानांखेरीज बिलाचा मतलब कोणासहि समजलेला नव्हता. प्रधान बहुतकरून गुप्त गोष्टी कधीं फोडीत नाहींत; पण कधीं कधीं त्या फुटल्याशिवाय राहत नाहींत. कारण प्रधानांना बायका असतातच, आणि बोलतां बोलतां असल्या विषयाच्या संबंधानें नवऱ्यांच्या तोंडून चुकून एखादा शब्द निघाल्यास सुतानें स्वर्गास कसें जावें हेंहि त्यांस चांगलें माहित असतें. शिवाय बायकांच्या तोंडीं गुप्त गोष्ट राहावयाची नाहीं हेंहि प्रसिद्धच आहे. असो. पण प्रस्तुत बिलाच्या संबंधानें असें कांहीं एक झालेलें नव्हतें. कोणी कदाचित् असें म्हणेल कीं परराष्ट्रांचा संबंध ज्यांत आहे असें बिल किंवा करांच्या वगैरे संबंधाचें बिल हीं पुढें आणीपर्यंत अगदीं गुप्त ठेवावीं हें ठीक आहे; कारण पहिल्या प्रकारचें बिल फुटल्यास परराष्ट्राशीं बिघाड होण्याचा संभव असतो, व दुसऱ्या प्रकारचें फुटल्यास व्यापारास वगैरे धक्का बसण्याचा संभव असतो. पण

सुधारणाबिलासारख्या बिलाबद्दल इतकी खबरदारी कशाला ? यास उत्तर एवढेंच कीं असल्या ज्या बातम्या त्या बहुधा अर्धवट असतात; त्यांत कल्पनेचा भाग बराच असतो; आणि त्यामुळें लोकांचा विनाकारण गैरसमज होण्याचा संभव फार असतो. ह्यावेळीं प्रधानांस दोन प्रकारच्या परस्परविरुद्ध मताच्या लोकांपासून भीति होती. एक, सुधारणा मुळींच नको म्हणणारे, व दुसरे, एकदम क्रान्ति करून टाकिली पाहिजे असें म्हणणारे; शिवाय तिसरा राजा. कारण राजानें जरी आपली पूर्ण संमति दिली होती तरी त्याची खरी इच्छा व हेतु काय आहेत हें समजण्याचा मार्ग नव्हता. ह्याचें कारण असें कीं राजाचे विचार दिवसादिवसास, कधीं कधीं तर तासातासास बदलत असत. म्हणून सुधारणाद्वेष्ट्यांस अगदीं प्रतिकूल वाटणाऱ्या बिलाच्या एकाद्या भागाची जर अर्धवट बातमी अगोदर पसरली असती, व त्यांनीं त्याबद्दल खूप चळवळ केली असती, तर राजा कदाचित् भिऊन सगळेंच बिल मागें घेण्यास सांगता. तद्वत्च सुधारणेच्या अंध अभिमान्यांस जर आपण मागतों त्यांतील अर्धे देखील प्रधान देण्यास कबूल नाहींत अशी कांहीं अर्धवट कुणकुण लागती, तर तेहि ओरडा सुरू करते, आणि राजा कदाचित् ह्मणता कीं जर ह्या बिलानें कोणीच संतुष्ट होत नाहीं तर सध्या हा खटाटोप तरी कशाला ? लोकमत जरा ताळ्यावर आल्यावर पाहतां येईल. तात्पर्य, अखेरपर्यंत बिल अगदीं गुप्त ठेवणें हाच शहाणपणाचा व सावधगिरीचा मार्ग होता, व त्याची ह्या प्रसंगीं आवश्यकताहि होती.

ता. १ मार्च हा दिवस कामन्ससभेंत व सभोंवतीं अत्यंत चळवळीचा दिवस होता. असें सांगतात कीं सभागृहाच्या सज्जांत बसावयास जागा मिळण्यासाठीं या दिवशीं जसा कलह झाला तसा पूर्वी कधींच झाला नव्हता. सभेच्या कामास सुरवात होणाच्या अगोदर किती तरी तास सर्व सभागृह भरून गेलें. त्यावेळीं हल्लीं इतके सभासद नव्हते हें खरें आहे. पण हल्लींप्रमाणें तेव्हांहि सर्व सभासदांस बसावयास जागा नव्हती; आणि पार्लमेंटांत इतकी सुधारणा झाली आहे तरी प्रत्येक सभासदास एक एक

खुर्चीची तजवीज करणें जरूर आहे हें समजण्याची अक्कल त्यास अद्यापि आलेली आहे. त्यामुळें अशा महत्वाच्या प्रसंगीं केवळ प्रेक्षकांसच नव्हे तर प्रत्यक्ष सभासदांस जागा मिळण्यासाठीं आधींपासून धडपड करावी लागते. प्रस्तुत प्रसंगीं सज्जांतून एकदां अशी गडबड सुरू झाली कीं, ती बंद न झाल्यास मला सर्वांस हाकलून द्यावें लागेल अशी धमकी देण्याचा स्पीकरास प्रसंग आला, तेव्हां ती गडबड बंद झाली, आणि नंतर मग लार्ड जान रसेल सुधारणेचें बिल सभेपुढें मांडण्याकरितां पुढें आला. ती वेळ अर्थात् खऱ्या ऐतिहासिक महत्वाची होती.

त्यावेळच्या श्रोत्यांनीं दिलेल्या हकीकतीवरून असें दिसतें कीं लार्ड जान रसेलनें आपल्या संभाषणास नेहमींपेक्षाहि जास्त शान्त, हलक्या, आणि भिडस्त अशा सुरानें सुरवात केली. त्याची नेहमींचीच भाषण शैली अशीच थंडी व दबलेली असे, आणि त्याच्या वक्तृत्वांत उत्साहाचा भाग फार कमी असे. त्याच्या मनोवृत्ती फार खोल व त्याच्या मनोलहरी फार उमाळ्याच्या असत यांत बिलकूल संशय नाहीं. पण सार्वजनिक ठिकाणीं काय व खाजगी ठिकाणीं काय त्याच्या वर्तनांत एक प्रकारचा असा कांहीं थंडेपणा असे कीं, त्यावरून हा आपल्या सरदारीच्या अहंकारानें असा दूरदूर राहतो असा गैरमाहीत माणसाचा गैरसमज होई. पार्लमेंटीय वादविवादांत त्याचें संभाषण अगदीं स्पष्ट, मुद्देसूद आणि मनःपूर्वक असें असे. त्याला नवे शब्दसंयोग बनविण्याची हातोटी फार उत्तम साधलेली होती, आणि त्याचीं कांहीं ठसकेदार वाक्यें अद्यापि लोकांच्या संभाषणांत येतात; मात्र तीं प्रथम कोणी प्रचारांत आणलीं हें त्यांच्या स्वप्नींही नसतें. त्याचें प्रस्तुत प्रसंगीं भाषण असेंच नमुनेदार होतें. त्यासंबंधानें हेंही येथें सांगण्यासारखें दिसतें कीं, व्हिग पक्षास रिफार्मर आणि टोरी पक्षास कान्झर्व्हेटिव्ह हीं नावें ह्याचवेळीं यानें प्रथम लाविलीं.

प्रतिनिधिद्वारा राज्य करणें हें इंग्लिश राज्यपद्धतीचें मुख्य मूलतत्व कसें आहे हें स्पष्ट करून सांगून लार्ड जान रसेलनें आपल्या भाषणास सुरवात केली. त्यानें असें स्पष्ट करून दाखविलें कीं, पार्लमेंटाची जेव्हां प्रथम स्थापना झाली

तेव्हां कांहीं दिवसपर्यंत हें तत्व चांगलें ओळखलें जात असे; व त्याप्रमाणें प्रत्यक्ष व्यवहारही होत असे. नंतर मग कोणत्या ठिकाणांनीं व कोणत्या लोकांना किति प्रतिनिधि पाठवावे हें ठरवितांना ह्या मूलतत्त्वाची ओळख कसे विसरत गेले, आणि शेवटीं लोकसंख्या व प्रतिनिधिसंख्या ह्यांच्यामध्यें प्रमाण कसें नाहींसें झालें, आणि प्रतिनिधि निवडावयाचे कशाकरितां ह्याची देखील विस्मृति कशी पडत चालली, हेंहि त्यानें स्पष्ट करून सांगितलें. इकडे अशी स्थिति होत चालली असतां हळूहळू प्रतिनिधि निवडण्याची सत्ता व मालकी जमीनदारांच्या हातीं कशी जाऊं लागली, हेंहि त्यानें स्पष्ट करून दाखविलें. अशा रीतीनें प्रतिनिधि निवडण्याच्या पद्धतीची मूलतत्त्वापासून फारकत कशी झाली ही गोष्ट त्यानें कांहीं साधीं पण उचित अशीं उदाहरणें घेऊन व्यक्त केली. तो ह्मणाला, असें समजा कीं एकादा चौकस परकी गृहस्थ इंग्लंदच्या संस्था पाहण्यास आला आहे. त्यास त्याच्या माहितगारानें असें सांगितलें कीं इंग्लदची राज्यपद्धति प्रतिनिधिविषयक तत्त्वावर रचलेली आहे; आणि कामन्ससभा जी भरते ती लोकांची स्थिति, त्यांच्या गरजा, व त्यांच्या इच्छा ह्यांच्यासंबंधानें राजास उत्तम सल्लामसलत देण्यासाठीं भरते.

तो ह्मणाला, नंतर मग आपण असें समजूं कीं कोण कसे प्रतिनिधि निवडतो अशी त्या तिऱ्हाइतानें पृच्छा केली. तेव्हां त्यास प्रथम एका लहानशा गवताळ उंचवट्यावर नेलें, तेथें किंवा सभोंवार वस्ती मुळींच नव्हती, आणि सांगितलें कीं हा उंचवटा दोन प्रतिनिधी सभेस पाठवितो. नंतर त्यास तीन कोनाडीं असलेल्या एका दगडी भिंतीपाशीं नेलें, आणि सांगितलें ह्या तीन कोनाड्यांना दोन सभासद पाठविण्याचा हक्क आहे. लार्ड जान रसेलनें अशा कित्येक ठिकाणांचें ठसकेदाररीतीनें आणि आणि फार विनोदपूर्वक वर्णन केलें. त्यांपैकीं प्रत्येक वर्णन अर्थात् वस्ती नसलेल्या पण एक किंवा अधिक प्रतिनिधी पाठविणाऱ्या कोणत्या ना कोणत्या तरी ठिकाणास लागू होतें. नंतर मग लार्ड जान रसेलनें उलट तऱ्हेचे कांहीं दृष्टान्त दिले. तो ह्मणाला, असें समजा कीं त्या नवल्या गृह-

त्याला कांहीं मोठालीं व्यापाराचीं व कारखान्यांचीं शहरें पाहण्यास नेलें. तेव्हां इतका वेळ बुचकळ्यांत पडलेल्या त्या गृहस्थास साहजिक असें वाटलें कीं त्या भरभराटींत असलेल्या व भर लोकवस्तीच्या शहरांनीं प्रतिनिधि पाठवावे हें अगदीं योग्य दिसतें. ह्मणून तो त्याविषयीं उत्सुकतेनें व भरंवशानें चवकशीं करूं लागला; तेव्हां त्यास सांगितलें कीं ह्या शहरांना एकहि प्रतिनिधी पाठविण्याचा हक्क नाहीं. हें पाहून अर्थात् तो ज्यास्तच बुचकळ्यांत पडला. इ. इ.

अशा रीतीनें प्रस्तुत पद्धतींतील व्यंगें मजेदार रीतीनें दाखविल्यानंतर तीं काढून टाकण्याची प्रस्तुत बिलांत काय योजना केली आहे, हें त्यानें फोड करून सांगितलें. तो ह्मणाला आह्मी ज्या सुधारणा करण्याचें मनांत आणिलें आहे त्या सर्वांच्या बुडाशीं असें तत्व आहे कीं जो कर बसविण्याच्या व वसूल करण्याच्या कामीं नागरिकांची प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीत्या संमति घेतली नसेल असा कोणताहि कर देण्यास त्यास भाग पडूं नये. तो ह्मणाला, आपणाला जीं मुख्य व्यंगें काढून टाकावयाचीं आहेत तीं तीन आहेत. एकेकट्या गृहस्थानें ( जमीनदारानें ) सभासद नेमणें हें पहिलें; पाहिजे त्यास प्रवेश नाहीं अशा नियमित मंडळ्यांनीं प्रतिनिधि नेमणें हें दुसरें; आणि उघड उघड रीतीनें लांचलुचापतीची वहीवाट सुरू झाल्यामुळें निवडणुकीचा खर्च अत्यंत वाढला आहे, हें तिसरें. पहिलें व्यंग काढून टाकण्यासाठीं त्यानें अशी योजना केली होती कीं ज्या ठिकाणीं पूर्वीं कधीं वस्ती होती पण हल्लीं मुळींच नव्हती अशीं जीं नांवाचीं गांवें त्यांचा प्रतिनिधि हक्क मुळींच काढून घ्यावयाचा. हें सर्व १८२१ च्या खानेसुमारीवर ठरवावयाचें होतें, आणि रसेलची अशी सूचना होती कीं ज्या गांवांतून २००० हून वस्ती कमी असेल त्यांनीं मुळींच प्रतिनिधि पाठवूं नये. चार हजारांहून ज्यास्त वस्ती नाहीं अशा गांवांस एक प्रतिनिधि द्यावा. एकेरी व्यक्ति किंवा नियमित मंडळी यांनीं सभासद पाठवूं नये; आणि शहरांतून घरावर दहापौंड कर देणाऱ्या घरवाल्यांस मतदानाचा हक्क असावा. कौंटीं मधून ( ह्मणजे शहरें

खेरीज करून सभोंवारच्या खेडे गांवांतून ) ज्या शेतकऱ्यापाशीं दहा पौंड वार्षिक उत्पन्नाची मालकीची जमीन असेल, किंवा जे एकवीस वर्षेपर्यंत वर्षास पन्नास पौंड सारा देऊन जमीन लावीत असतील त्यांस मतदानाचा हक्क द्यावा.

अशा रीतीनें लहान व बिन वस्तीचीं गांवें ह्यांचा प्रतिनिधि हक्क गेल्या मुळें १६८ जागा रिकाम्या व्हावयाच्या होत्या. त्या सगळयाच भरण्याची प्रधानांची इच्छा नव्हती; कारण सभासदांची संख्या फारच मोठी असल्यामुळें काम करण्यास अडचण पडते असें त्यांचें मत होतें. पण रिकाम्या झालेल्यापैकीं कांहीं जागा ज्या शहरांना आजपर्यंत हा हक्क मुळींच नव्हता त्यांस द्यावयाच्या होत्या. सात मोठ्या शहरांना प्रत्येकीं दोन दोन आणि वीस लहान शहरांना प्रत्येकीं एक एक सभासद पाठविण्याचा हक्क देण्याची योजना केली होती. मोठीं सात शहरें ह्मटलीं ह्मणजे म्यांचेस्टर, बर्मिंघाम, लीडस, ग्रीनिज, वुल्व्हर हाम्प्टन, शेफिल्ड आणि संडर्लंड हीं होतीं. लंदन शहरास आणखीं आठ प्रतिनिधि देण्याचें प्रधानांनीं योजिलें होतें. तद्वत्च यार्क कौन्टीला सहा जास्त प्रतिनिधि आणि दुसऱ्या २६ कौंटींना त्यांच्यामध्यें दीड दीड लाखाहून ज्यास्त वस्ती असल्यामुळें आणखीं दोन दोन सभासद निवडण्याचा हक्क द्यावयाचा होता.

स्काटलंद व आयर्लंद ह्या देशांमध्यें मतदानाचा हक्क कोणास द्यावा या बद्दलचे नियम अमळ निराळे होते, पण त्यांच्या बुडीं तत्त्व हेंच होतें कीं मतदानाचा हक्क मिळण्यास जमिनीची किंवा घराची मालकी पाहिजे, किंवा जमिनीचा वापर पाहिजे. तद्वतच पूर्वी प्रतिनिधी हक्क नसलेल्या शहरांस नवा हक्क देण्याचेंहि तत्त्व तेथेंहि अमलांत आणिलेंच. अशा रीतीनें तिन्ही देशांत मिळून सरासरी पांच लाख नवे मतदार बनले. निवडणुकींचे अतोनात खर्च कमी करण्यासाठीं अशी तजवीज केली कीं मोठाल्या कौंटींतून एके वेळीं निरनिराळ्या ठिकाणीं मतें गोळा करण्याची तजवीज करावी, आणि कोणाहि मतदारास मत देण्यासाठीं गांव सोडून १५ मैलांपलीकडे जावयास लागूं नये. तद्वतच निवडणुकी पुऱ्या करण्याची मुदतहि पूर्वींहून

फार कमी केली. पण ह्या ठिकाणीं हेंहि सांगितलें पाहिजे कीं अशा रीतीनें निवडणुकीच्या खर्चांत सांगण्यासारखी कांहीं एक कमतरता झाली नाहीं. कारण खर्च जो ज्यास्ती होई तो मतदारांस वगैरे लांच दिल्यामुळें होई व त्याबद्दल बिलांत कांहींच तजवीज नव्हती. ही गोष्ट आणखी एक पिढी अशीच चालावयाची होती. पुढें तिच्या संबंधानें सुधारणा झाली. तथापि एकंदरींत प्रस्तुत बिलानें प्रतिनिधि राज्यव्यवस्थेच्या खऱ्या तत्वाची इंग्लंदांत स्थापना झाली, ह्यांत बिलकूल संशय नाहीं.

ह्या बिलावर जो वादविवाद झाला त्यांमध्यें अर्थात् कांहीं संभाषणें फार लक्ष्यांत ठेवण्यासारखीं झालीं. त्यांपैकीं तीन भाषणें इतिहासाचा अभ्यास करणारानें विशेषतः ध्यानांत ठेवण्यासारखीं आहेत. पहिलें भाषण सर राबर्ट हारी इंग्लिस ह्याचें होय. हा जुन्या तऱ्हेचा टोरी असून आक्सफर्ड युनिव्हर्सिटीचा प्रतिनिधि होता. तो चांगला शिकलेला माणून असून अगदीं प्रामाणिकही होता. पण ह्या प्रश्नासंबंधानें त्याचीं मतें अगदीं ठरलेलीं होतीं. तो ह्मणाला, प्रतिनिधितत्व हें पार्लमेंटाच्या निवडणुकींत मानिलेंच पाहिजे असें इंग्लिश राज्यपद्धति मुळींच सांगत नाहीं. तो ह्मणाला, पाहिजे त्या ठिकाणाहून पाहिजे तो प्रतिनिधि निवडण्याचा राजांस पूर्ण अधिकार आहे. व हा अधिकार राजास पाहिजे त्या सभासदांस किंवा गृहस्थास आपल्या वतीनें देतां येईल. तो ह्मणाला, लहान खेड्यांपाड्यांपेक्षां मोठाल्या शहरांस प्रतिनिधि पाठविण्याचा ज्यास्त हक्क आहे ह्या ह्मणण्यांत बिलकूल अर्थ नाहीं; ही सर्व राजाच्या विचाराची गोष्ट आहे. तो ह्मणाला, लहान गांवांचा प्रतिनिधि हक्क काढून घेण्याची योजना अगदीं चुकीची आहे; कामन्ससभेंतील कांहीं अत्यंत हुशार व बुद्धिमान् असे सभासद असल्याच खेड्यांच्या मालकांनीं निवडिलेले आहेत; आणि ते जर त्यांनीं निवडिले नसते तर त्यांचा सभेंत कधींच प्रवेश झाला नसता, कारण त्यांस निवडणुकींचा भयंकर खर्च मुळींच झेपला नसता.

हा शेवटचा कोटीक्रम प्रत्येक सुधारणेच्या विरुद्ध येत असतो. पण त्यासंबंधानें इतकेंच ध्यानांत ठेवावयाचें कीं जगांत इतकी वाईट गोष्ट

कोणतीच नाहीं कीं जिच्यापासून कांहीं तरी फायदा होत नाहीं. दुसरें असें कीं निवडणुकींचे खर्च ह्मणजे कमी करतां येण्यासारखे नव्हते असें नाहीं. तिसरें असें कीं लोकशिक्षण व लोकांची सामान्य समज ह्यांची जशी अभिवृद्धि होत जाईल तसे हुशार पण गरीब प्रतिनिधि मोठाल्या शहरांतून निवडून येण्याचाच जास्त संभव होता.

सर राबर्ट इंग्लिसनें आणखी एक कोटी अशी पुढें आणिली कीं, सामान्य लोकांना ही सुधारणा मुळींच नको आहे, ते सुखी व संतुष्ट असे आहेत. हल्लीं जी कित्येक ठिकाणीं गडबड व चळवळ दृष्टीस पडते त्यास कारण लोकांच्या सभा भरवून त्यांस चिथविणारे व त्यांच्या मनांत भलत्याच कल्पना भरवून देणारे हे लुच्चे आपणास लोकाग्रणी ह्मणवणारे समूहसंभाषक (Mob-orators) होत; ह्यांचीं जर तोंडें कोणी बंद करील तर सर्व गोष्टी अगदीं सुरळीत चालतील.

आतां हीहि कोटि अगदीं नेहमीचीच आहे. क्याथलिक बंधमुक्ततेच्या वेळीं तिचा उपयोग नुक्ता झालेलाच होता, आणि पुढें अप्रतिबंध व्यापार, गुप्तमतदानपद्धति आणि सर्वांसच मतदानाचा अधिकार देणें ह्या प्रश्नाच्या संबंधानें तिचा उपयोग व्हावयाचा होताच. तात्पर्य, जोंपर्यंत ह्मणून कांहींहि सुधारणा व्हावयाची राहील तोंपर्यंत हिचा उपयोग होणारच. आतां हें ध्यानांत ठेवावयाचें कीं समूहसंभाषक हें निंदाव्यंजक विशेषण इंग्लिसच्या मतें कोणास लावावयाचें तर टोरी सरदारांना जीं तत्त्वें मान्य नसतील तीं प्रतिपादन करणारांना, एकादा टोरी जमीनदार अत्यन्त अडाणी लोकांच्या समूहापुढें कितीही मूर्खपणाचें पांडित्य ओंकला तरी त्यास समूहसंभाषक ह्मणायाचें नाहीं, तर त्यास मोठा सभ्य इंग्रज समजून तो गरिबांस बऱ्याचा मार्ग दाखवीत आहे असें समजावयाचें! सर राबर्ट इंग्लिसनें असेंहि आणखी भविष्य केलें कीं, हें बिल पास झाल्यास इंग्लंदचें मोठें नुकसान होणार आहे. श्रीमान् आणि कुळंदाज लोक यांचें वजन अगदीं कमी होईल, शिकलेल्यांचें कोणी ऐकणार नाहीं, आणि कामन्स सभेंत पदव्या, शिक्षण,

आणि मुत्सद्दीपणा ह्यांचे भोक्ते येण्याच्या ऐवजीं हे सामान्यजनपंडित भरूं लागतील. हा एक नमुना झाला.

ह्या वादविवादांत दुसरें नमुनेदार भाषण ह्मटलें ह्मणजे सर राबर्ट पील याचें झालें. तेंहि अर्थात् बिलाला प्रतिकूल असेंच होतें; पण तें सर राबर्ट इंग्लिसच्या भाषणासारखें खचीत नव्हतें. कारण किती झालें तरी पील खरा मुत्सद्दी होता. निरुपाय झाला ह्मणजे मग कोणतीहि गोष्ट अंगावरच घेऊन करावयाची, असा त्याचा स्वभाव होता. शिवाय तो मोठा विचारी होता. पण एकंदरींत निरुपाय होईपर्यंत आहे ती वस्तुस्थिति कायम ठेवावी असा त्याच्या मनाचा कल असे. लहान लहान गांवाचा प्रतिनिधि हक्क काढून घेतल्यास बर्क, शेरिडन, क्यानिंग, प्लंकेट यांसारखे लोक निवडून यावयाचे नाहींत असें त्याचेंहि मत होतेंच. एकंदरींत त्यानें टोरीपक्षाच्या ह्मणण्याचें जितकें उत्तम समर्थन करतां येईल तितकें केलें, ह्याबद्दल बिलकूल संशय नाहीं.

तिसरें संस्मरणीय भाषण डेनियल ओकॉनेल याचें झालें. तें अर्थात् बिलास अगदीं अनुकूल असेंच होतें, पण त्यामध्यें आणखीहि सुधारणा पाहिजे होत्या, हें दाखविण्यास त्यानें बिलकूल कमी केलें नाहीं. त्याच्या मतें मतदारांची संख्या आणखी वाढवावयास पाहिजे होती. प्रत्येक सज्ञान माणसास निदान प्रत्येक घरटीस तरी मतदानाचा हक्क असावा, असें त्याचें मत होतें. तद्वतच मतें गुप्त रीतीनें द्यावीं, लांचलुचापतीचा ज्यास्त बंदोबस्त करावा, आणि नवीं पार्लमेंतें ज्यास्त जास्त लवकर करावीं ह्याहि सुधारणा त्यास पाहिजे होत्या. तात्पर्य, त्याचीं मतें राडिकल किंवा अगदीं पुढें गेलेलीं अशीं होतीं.

बिल पुढें आणण्याबद्दल परवानगी मागण्यासाठीं जी ही सूचना रसेलनें सभेपुढें आणिली तिच्यावर पुष्कळ दिवसपावेतों वादविवाद सुरू राहिला. तथापि कामन्ससभेच्या नेहमीच्या पद्धतीस अनुसरून या सूचनेवर मतें न घेतां बिलाचें पहिलें वाचन झालें. वरील परवानगी मागणें आणि बिलाचें पहिलें वाचन हीं वस्तुतः एकच होत आणि याच्यावर लांब वादविवाद

बहुधा होत नसतो. पण विषय जेव्हां फारच महत्त्वाचा असेल तेव्हां कांहीं वादविवाद किंवा संभाषण होत असतें, पण तें इतकें लांब कधींच नसतें. तथापि पहिल्या वाचनाच्यावेळीं इतका वादविवाद झाल्याचा एक परिणाम असा झाला कीं दुसऱ्या वाचनाच्या वेळीं तो बराच आंखूड झाला, कारण सभासदांस ह्मणावयाचें फारसें राहिलेंच नव्हतें.

दुसऱ्या वाचनावर जेव्हां मतें घेतलीं तेव्हां त्या वाचनास अनुकूल असें एकच मत कायतें जास्ती पडलें. तेव्हां लार्ड ग्रे व त्याचे साथीदार यांचे लक्ष्यांत ताबडतोब असें आलें कीं हें बिल लार्डांच्या सभेंतून पार पडण्याचा संभव मुळींच दिसत नाहीं. तेव्हां त्यांनीं प्रस्तुत पार्लमेंत बरखास्त करून नवें पार्लमेंत भरविण्याचा विचार मनांत आणिला. देशांत सर्वत्र सुधारणेबद्दल बरीच चळवळ झाली होती, आणि आलीकडे ज्या कांहीं तुटक्या निवडणुकी झाल्या होत्या त्यांवरून राष्ट्राचा कल कोणीकडे आहे हें स्पष्ट दिसत होतें. पुढें हें बिल कमेटीपुढें वादविवादास न्यावें ह्मणून जेव्हां सूचना आणिली तेव्हां लिव्हरपूलचा एक प्रतिनिधि जनरल ग्यासकाइन यानें अशी उपसूचना पुढें आणिली कीं सभासदांची संख्या बिलांत सुचविल्याप्रमाणें कमी करूं नये; आणि ही उपसूचना आठांच्या बहुमतानें पसार झाली. आतां ही उपसूचना फारशी महत्वाची होती असें नाहीं. ह्मणून प्रधानांनीं एवढ्यावरून पार्लमेंत बरखास्त करावयास पाहिजे होतें असें नाहीं. पण ह्यावरून वारा कसा वाहात आहे हें प्रधानांनीं चांगलें ओळखलें, व त्यांच्या लक्ष्यांत आलें कीं बिल पुढें तसेंच चालविल्यास त्यांत टोरी लोक पाहिजे तसे फेरबदल करून टाकतील, आणि सुधारणेचा हेतु मुळींच सिद्धीस जाणार नाहीं. ह्मणून त्यांनीं पार्लमेंत बरखास्त करून लोकमत पुनः घेण्याचा निश्चय केला.

पण ह्या गोष्टीस राजाची संमति अवश्य पाहिजे; आणि ती मिळते किंवा नाहीं हा प्रश्नच होता. तेव्हां त्या कामावर लार्ड चान्सलर, लार्ड ब्रूहाम याची योजना केली. तो ह्मणजे या कामाला मोठासा योग्य होता असें नाहीं. कारण त्याच्या वाणींत मृदुपणा किंवा त्याच्या वर्तनांत

नम्रताही बेताचीच होती. पण तो धीट तरी होता, आणि लार्ड चान्सलर या नात्यानें राजाच्या सदसद्विवेक बुद्धीचा तो संरक्षक ( Keeper of the king's Conscience ) होता. राजानें प्रथम नाहीं ह्मटलेंच; आणि पाहिजे असल्यास प्रधानांनीं राजीनामे द्यावे असेंही तो बोलून गेलाच; पण शेवटीं तो कबूल झाला. इतक्यांत काय झालें कीं राजा पार्लमेंत बरखास्त करावयास जाईल तेव्हां त्यास बरोबर लाइफ् गार्ड्स् ह्मणून जें सैन्य जात असतें त्यास हजर राहण्यास प्रधानांनीं हुकूम सोडिला. तेव्हां आपल्यास विचारल्याशिवाय असा हुकूम प्रधानांनीं कां दिला ह्मणूनच राजानें त्यांजवर घुस्सा केला. पण त्याचा परिणाम असा झाला कीं अशा रीतीनें राजाच्या रागास वहावण्यास एकदां रस्ता मिळाल्यामुळें तो निवाला, व नंतर मग राजा ताळ्यावर आला, आणि त्यानें पार्लमेंत बरखास्त केलें, आणि नव्या निवडणुकीचे हुकूम सुटले.

ही बातमी ऐकून राष्ट्रांतील सर्व सुधारकांस फार आनंद झाला. लंदनमध्यें बहुतेक घरांतून दीपोत्साह केले, आणि ज्या घरांनीं केले नाहींत त्यांच्या खिडक्या फुटल्या. ड्यूक आव् वेलिंग्टन हा एकंदर सुधारणेच्या विरुद्ध असल्यामुळें त्याच्यावर लोकांची विशेषच मर्जी होती, ह्मणून त्याच्या घराच्या खिडक्या विशेष फुटल्या. इकडे राजा सुधारणेस अनुकूल आहे असें लोकांत समजल्यावरून त्याची लोकप्रियता फारच वाढत चालली. तो गादीवर बसला तेव्हां 'खलाशी राजा' असें त्यास लाडकें नांव लोकांनीं दिलें होतें, ते आतां त्यास 'स्वदेशाभिमानी राजा' ह्मणून लडिवाळपणानें ह्मणूं लागले. नव्या निवडणुकी लवकरच सुरू झाल्या, आणि त्यांच्यांत दोन्ही पक्षांनीं यथेष्ट पैसा खर्च केला. त्यावेळीं असल्या कामांत लांच देणें किंवा घेणें ह्यांचें बहुतेक लोकांस कांहींच वाटत नसे. ते ह्मणत आपण लांच देऊन मतदारांस वश करून न घेतलें तर दुसरे घेणार; मग आपण तरी कमी कशास करा? बरें, अशा प्रकारचीं मतें मिळवून निवडून आलेल्या सभासदांची पार्लमेंतांत कमी योग्यता समजत असत असेंहि नाहीं. असो. अशा रीतीनें निवडणुकी पुऱ्या होऊन ता. २१ जून १८३१ रोजीं

नवें पार्लमेंत उघडलें. तें राजानें स्वतः उघडिलें. त्या वेळीं त्याचा मोठाच जयजयकार झाला. ता. २४ जून रोजीं लार्ड जान रसेलनें आपलें दुसरें सुधारणाबिल सभेपुढें आणिलें. तें सरासरी पहिल्यासारखेंच होतें. तथापि दुसऱ्या वाचनाच्या वेळीं त्याच्यावर पहिल्या इतका लांब नाहीं तरी तितक्याच कडाक्याचा वाद झाला. ह्या वादविवादांत अर्थात् नवें कांहींच निष्पन्न झालें नाहीं, आणि दुसऱ्या वाचनावर चवथ्या जुलईला जो वाद सुरू झाला, तो तीन रात्रींतच आटोपला. दुसऱ्या वाचनास ३६७ अनुकूल व २३१ प्रतिकूल मतें पडलीं, ह्मणजे १३६च्या बहुमतानें तें पसार झालें. तेव्हां अर्थात् सर्वांची खात्री झाली कीं कामन्ससभेंतून तरी हें बिल खचीत पार पडणार.

मतें घेतलीं तेव्हां पहांट झाली होती; त्या पहांटेस अटर्नी जनरल यास निजावयास फारशी फुरसत मिळाली नसेल. कारण प्रधानांनीं त्या वेळच्या एका प्रसिद्ध माणसावर ह्या वेळीं खटला केला होता, व तो सकाळीं निघावयाचा होता. हा गृहस्थ विलियम कॉबेट होय. ह्याची इंग्रजींत उत्तम गद्य लेख लिहिल्याबद्दल फार प्रसिद्धि आहे, व ती नेहमीं कायमच राहणार आहे. त्याजवर खटला करण्याचें कारण असें झालें होतें कीं त्यानें आपल्या ‘ पोलिटिकल रजिस्टर ’ नामक वर्तमानपत्रांत असा लेख लिहिला होता कीं लोक गवताच्या गंजी व पडळी जाळतात त्यास कारण आहे. कॉबेट स्वतः एका सामान्य शेतकऱ्याचा मुलगा होता. त्याची आजपर्यंतची कारकीर्द विविध झालेली होती. लहानपणीं शेतावरून पळून लंदनास आला होता. प्रथम तो एका वकिलाच्या हपीसांत अगदीं कमी दर्जाचा कारकून ह्मणून राहिला होता; आणि नंतर एका पायदळाच्या रेजिमेंटांत शिरला होता. हें रेजिमेंट एक वर्ष चाटाम येथें ठेविलें होतें; तेथें तो फावल्या वेळांत सारखें वाचीत असे; आणि हा त्याचा नाद जन्मभर कायम राहिला. अशा रीतीनें त्यानें शेजारच्या एका लायब्ररींतील सर्व पुस्तकें संपविलीं; कारण कांहीं न वाचण्यापेक्षां कांहीं तरी वाचणें बरें असें त्याचें मत असे. त्याला इतिहास आणि शास्त्रें यांवरील ग्रंथ

विशेष आवडत, तरी तो ह्याच्यापेक्षां डोक्यास कमी त्रास देणारे ग्रंथ वाचीत नसे असें नाहीं; विशेषतः स्विफ्टच्या ग्रंथाचें त्यानें मोठ्या उत्साहानें पारायण केलें होतें; व त्याचीच लेखनशैली त्यानें उचलली होती. पुढें त्याचें रेजिमेंट अमेरिकेंत गेलें, आणि तेथें अनेक ठिकाणीं राहून शेवटीं फिलाडेल्फिया एथें आलें. तेथेंच तो ग्रंथकार ह्मणून पुढें प्रथम प्रसिद्धीस आला तो प्रथम टोरीमतांचा प्रतिपादक ह्मणून पुढें आला होता, पण होतां होतां तो राडिकल बनला. त्याची भाषासरणी सोपी व जोरदार अशी असे, आणि स्विफ्टला वगळल्यास त्याच्याहून अधिक स्पष्ट असें इंग्रजी कोणीच कधीं लिहिलें नसेल. त्याची पार्लमेन्तांत शिरण्याची खटपट दोनदां व्यर्थ जाऊन अखेरीस तो ओल्डाम एथून निवडून आला होता. आणि मरेपर्यंत तो तेथलाच प्रतिनिधि राहिला. त्यानें वर सांगितलेलें वर्तमानपत्र सुरू केलें होतें, व त्यांत तो राडिकल मतांचें मण्डन असें कांहीं जोरानें व हुशारीनें करीत असे कीं, तेणेंकरून तो तेव्हांच्या माणसांत फार प्रसिद्धीस आलेला होता.

लार्ड ग्रेला याजवर फिर्याद करण्याची फारशी हौस होती असें नाहीं. पण त्याजवर कानाडोळा केल्यास सुधारणेचीं तत्त्वें अशीं आहेत, व तिचे परिणाम असें होतील असें सुधारणाशत्रु कदाचित् ह्मणूं लागतील अशी त्यास शंका वाटली. ह्मणून पूर्वीच्या डिसेंबरांत छापलेल्या लेखाबद्दल त्यांनीं आतां याजवर खटला केला. कॉबेटनें आपल्या वतीनें लार्ड ग्रे, लार्ड ब्रूहाम लार्ड आल्थार्प, व लार्ड डर्हम अशी बडीबडी धेंडें साक्षीस बोलाविलीं होतीं, त्यामुळें खटल्यास ज्यास्तच महत्व आलें. पण लार्ड ब्रूहामच्या साक्षीपासून फारसें निष्पन्न न झाल्यामुळें बाकीच्यांस त्यानें कोर्टांत आणिलें नाहीं. वास्तविक मुद्दा विशिष्ट लेखाचें स्वरूप काय होतें हें ठरवणें हाच होता. त्याजवर जूरीस १५ तास कोंडून ठेविलें तरी तिचें एकमत होईना, तेव्हां तीस घालवून दिलें आणि खटला संपला. तेव्हां जमलेल्या मंडळीनें टाळ्यांचा एकच गजर केला, आणि अशा रीतीनें कॉबेट पूर्वीपेक्षांही जास्त लोकप्रिय झाला.

---

## प्रकरण तिसावें.

# सुधारणेचा विजय.

दुसऱ्या सुधारणाबिलाचें दुसरें वाचन फार मोठ्या बहुमतानें कामन्स सभेंत पसार झालें हें गेल्या प्रकरणांत सांगितलेंच. त्यावरून त्याचा अखेरीस विजय होणार ही गोष्ट ठरल्यासारखीच झाली. कारण असल्या बिलांच्या संबंधानें अशी गोष्ट आहे कीं, तीं एकाद्या चांगल्या तत्त्वावर रचलेलीं असलीं आणि त्यांना लोकमताचा जोर भरभक्कम असला, ह्मणजे लार्डांच्या सभेनें तीं एकदोनदां नापास केलीं तरी अखेरीस विजयी व्हावयाचींच. ही गोष्ट ह्या वेळीं ह्या बिलाच्या संबंधानें निदान हुशार कान्सर्व्हेटिव्हांस तरी दिसत नव्हती असें नाहीं, तरी त्यास होईल तितका विरोध करण्याचा, निदान विलंब लावण्याचा त्यांनीं निश्चय केला. लार्डांच्या सभेपुढें तें गेलें ह्मणजे ते तें उडवून टाकतील हें ठरल्यासारखेंच होतें, तरी कामन्स सभेंत त्यास आणवतील तितके अडथळे आणण्याचें त्यांनीं ठरविलें; आणि अशा रीतीनें पुढें पार्नेलच्या वेळीं आयरिश लोकांनीं ज्या अडथळ्याच्या पद्धतीस इतकें व्यवस्थेशीर स्परूप आणिलें आणि जी बहुतेक परवांपर्यंत अगदीं पूर्ण अमलांत होती, तिचा कान्सर्व्हेटिव्हांनीं यावेळीं पहिला कित्ता घालून दिला.

ही पद्धति ह्मणजे काय आहे किंवा होती ह्याची वाचकांस चांगली ओळख करून देणें इष्ट दिसतें. कामन्ससभेची जेव्हां कमिटी बनते तेव्हां तर अडथळा करण्यास ज्यास्तच साधनें उत्पन्न होतात, कारण त्या वेळीं प्रत्येकास एकाच प्रश्नावर पाहिजे तितके वेळां बोलण्याची परवानगी असते. किंवा निदान परवांपर्यंत होती. एकाद्या बिलाचें पहिलें व दुसरें वाचन झालें ह्मणजे त्याचें मुख्य तत्त्व ठरल्यासारखें होतें, आणि नंतर मग त्यांतील विशिष्ट कलमांचा व इतर बारीक सारीक गोष्टींचा विचार करावयाचा राहतो. तो करण्यासाठीं ही कमिटी भरत असते. हिचे सभासद

ह्मणजे सभेचे सर्व सभासद हेच असतात. फरक इतकाच कीं स्पीकर अध्यक्षस्थानीं नसतो, तर त्याच्याऐवजीं कमिट्यांचा चेअरमन ह्मणून एक हुद्देदार असतो तो अध्यक्ष होतो, आणि तो स्पीकराच्या सिंहासनासारख्या मुख्य खुर्चीवर न बसतां तिच्यापुढील टेबलाजवळ जी लहान खुर्ची असते तिजवर बसतो. आतां अडथळ्यास कशी सुरवात होते, ती पहा.

सभेची कमिटी बनण्यास जी सूचना आणावी लागते तिलाच प्रथम अडथळा आणतां येतो. कारण अशी सूचना आल्याबरोबर एकाद्यास अशी उपसूचना आणतां येते कीं सभेचें काम आतां उद्यांपर्यंत तहकूब ठेवावें. या उपसूचनेच्या मण्डनार्थ त्यास अर्थात् लांबलचक भाषण करतां येतें; नंतर पहिली सूचना आणणारा तिच्या पुष्टीकरणार्थ आपलीं कारणें देतो, आणि नंतर उपसूचना आणणाराचे मित्र त्यास पाठिंबा देऊन आपापलीं कारणें देत बसतात. अशा रीतीनें सभेचा बराच वेळ घेतां येतो. नंतर मग समजा कीं ही उपसूचना नापसंत झाली, आणि मूळ सूचनेवर मतें घेण्याची पाळी आली. असें झाल्याबरोबर दुसरा एकादा पहिली उपसूचना आणणाराचा मित्र उठतो, आणि अशी उपसूचना आणतो कीं हा वादविवाद उद्यांपर्यंत तहकूब ठेवावा. ही उपसूचना अर्थात् पहिलीहून भिन्न असल्यामुळें हिच्यावर पुनः वादविवाद सुरू करतां येतो, आणि त्यांत पुष्कळ वेळ खातां येतो. समजा कीं हीहि उपसूचना नापसंत झाली. तरी तसें झाल्याबरोबर पुनः तिसऱ्यास सभेचें काम उद्यांपर्यंत तहकूब ठेवावें अशी उपसूचना आणतां येते. कारण ह्याच अर्थाची पहिली उपसूचना (रात्रीं) बारा वाजतां आणलेली सभेनें नामंजूर केली ह्मणून आतां (पहांटेस) चार वाजतां ती ती नापसंत करील असा कांहीं नेम नसतो. हिच्यावर अर्थात् पूर्ववत् वादविवाद लांबवितां येतो, आणि नंतर पुनः दुसरी उपसूचना आणतां येते. इ. इ.

कोणी ह्मणेल कीं ही निवळ कल्पना आहे, शहाणेसुर्ते सभासद असें कसें करतील ? तर त्यास एवढेंच सांगावयाचें कीं अशी प्रत्यक्ष गोष्ट प्रस्तुत बिलाच्याच संबंधानें घडून आली. कारण स्पीकरनें आतां उठावें अशी जेव्हां दुसऱ्या वाचनानंतर सूचना आली, तेव्हां एका टोरी सभासदानें अशी उपसूचना

आणिली कीं आपण ज्या शहरांतून आलों आहों तेथील खानेसुमारीच्या एका पत्रकांत चुकी झालेली आहे, करितां आपल्या मतदारास ती दुरुस्त करण्याकरितां स्वतः किंवा वकीलामार्फत सभेपुढें बोलण्याची परवानगी असावी, तशी चूक झाली असावीसें वाटतें असें लार्ड जान रसेलनें लागलेंच कबूल केलें. पण तो हेंहि ह्मणाला कीं, असला प्रश्न पुढें आणण्याची ही वेळ नव्हे. आतां ही उपसूचना या वेळीं आणण्यांत त्या टोरी सभासदाचा काय उद्देश होता हें प्रत्येकास माहीत होतें, तरी तिच्यावर कांहीं वेळ वादविवाद होऊन शेवटीं ती ९७ च्या बहुमतानें नापास झाली. पण तेवढ्यानें फारसा फायदा झाला नाहीं. कारण मूळ सूचना अद्यापि पास व्हावयाची होतीच. तिच्यावर सभा उद्यांपर्यंत तहकूब ठेवावी अशा अर्थाच्या अनेक उपसूचना आल्या, व त्यांपैकीं प्रत्येकीवर विरुद्ध पक्षाच्या कित्येक मुख्य मुख्य सभासदांनाहि किती वेळ तरी वादविवाद चालविला. आतां स्पीकरानें खुर्चीवरून उठावें ही सूचना पास होईपर्यंत सभेची कमिटी बनत नसते, आणि ह्मणून तोंपर्यंत एका विषयावर एका सभासदास एकापेक्षां अधिक वेळां बोलतां येत नाहीं; तरी देखील ह्या सूचनेस इतका अडथळा आल्याशिवाय राहिला नाहीं.

शेवटीं सकाळीं साडेसात वाजतां सभा थकून जाऊन कंटाळून उठली, त्या वेळीं धूम पाऊस पडत होता. तें पाहून सर चार्लस वेदरेल नामक एका टोरी सभासदानें सणसणीत शपथ घेऊन असें ह्मटलें ह्मणून ह्मणतात कीं हें जर मला अगोदर समजतें तर मी आणखीं कांहीं उपसूचना आणिल्या असत्या असो. शेवटीं एकदा सभेची कमिटी बनली आणि नंतर मग अडथळ्याचें काम पुनः जारीनें सुरू झालें. कमिटीमध्यें असें करण्यास पुष्कळ संधी होती. कारण ज्या ज्या गांवचे सभासद कमी केले होते किंवा मुळींच काढून टाकले होते त्या प्रत्येकाबद्दल निरनिराळी चर्चा करणें जरूरच होतें. तेव्हां मग काय विचारता भाषणेंच भाषणें झालीं. होईल तेवढा अडथळा व्यवस्थेशीर रीतीनें करण्यासाठीं टोरीनीं एक कामिटीच बनाविली होती, आणि तिचा अध्यक्ष कोण होता ह्मणाल तर त्यावेळीं अत्यंत होतकरू मुत्सद्दी ह्मणून

ठरलेला, व पुढें मुख्य प्रधान होणारा, सर राबर्ट पील. पीलचींच ह्या वादविवादांत फार भाषणें झालीं, आणि ह्या बाबतींत त्याच्यावर कडी करूं पाहणारे ह्मटले ह्मणजे वर सांगितलेला सर चार्लल वेदरेल, आणि पुढें मेकॉलेनें खरपूस समाचार घेतलेला जान विल्सन क्रोकर हे होत.

इकडे हा वादविवाद एकेक दिवस जसजसा लांबत जाई तसतशी लोकांची चळवळ वाढत चाललीच होती. कांहीं मोठमोठ्या शहरांनीं प्रधानांस वरचेवर मोठमोठ्या सभा भरवून अशा विनंत्या केल्या कीं, तुह्मी अगदीं दम सोडूं नका, आणि विरुद्धपक्षाला काडीभरही हार जाऊं नका. लोकांना अशी भीति उत्पन्न झाली कीं लार्ड ग्रे कांहीं कलमांच्या संबंधानें विरुद्ध पक्षाचें ह्मणणें कबूल करून बाकीचीं कलमें कदाचित् पास करून घेईल. तेव्हां देशाच्या सर्व भागांतून प्रधानांच्या कानीं ओरडा येऊं लागला कीं, प्रस्तुत बिल सगळेंच्या सगळें आणि जसें आहे तसेंच पास करून घेतलें पाहिजे; ह्यांत कांहीं फरक करतां कामा नये. त्यावरून लार्ड आल्थार्पनें असें प्रसिद्धपणें सांगितलं कीं, प्रधानांनीं पार्लमेंट येत्या दिजंबरपर्यंत आणि जरूर पडल्यास त्याच्या पुढच्या दिजंबरपर्यंतहि उघडें ठेवण्याचा निश्चय केला आहे. ह्या जोराच्या बोलण्याचा अर्थात् अडथळेवाल्यांवर कांहीं तरी परिणाम झालाच. तथापि कांहीं वेळपर्यंत त्यांनीं आपलें काम तसेंच चालविण्यांत बिलकूल कसूर केली नाहीं. तेव्हां लोकांचा उतावीळपणा व राग हीं जास्तच वाढत चाललीं. ह्या वेळीं, सुधारकपक्षापैकीं एकाद्या सभासदानें एकाद्या टोरी सभासदाच्या उपसूचनेस एकाद्या प्रसंगीं आपलें अनुमोदन दिल्यास त्याचे मतदार नको नकोसें करीत असत, आणि पुनः असें करणार नाहीं असें त्याजकडून वचन घेत तेव्हां त्यास सोडीत.

शेवटीं एकदा कमिटींतून बिल निघालें, आणि तें प्रधानाच्या दृढ निश्चयामुळें व दीर्घ श्रमामुळें त्यांस पाहिजे होतें तसेंच वस्तुतः निघालें. नंतर मग तिसऱ्या वाचनास सुरुवात झाली. या वेळींही लांबलचक वादविवाद होईल असें प्रत्येकास वाटत होतें. पण हेंच तें वाचन लवकर पार पडण्यास का-

रण झालें. कारण जो तो वादविवाद लांबणार ह्मणून सावकाशीनें आला, आणि असें झालें कीं तिसऱ्या वाचनाची सूचना आली तेव्हां सभेंत फारच थोडे टोरी हजर होते. तेव्हां सुधारकांनीं एकच गिल्ला करून लवकरच मतें घेण्याविषयीं ओरडा सुरू केला हें पाहून हजर असलेले कांहीं टोरी सभासद घाबरले, आणि त्यांनीं फारसा अडथळा केला नाहीं. शेवटीं सर राबर्ट पील, सर चार्लस वेदरेल इत्यादि विरुद्ध पक्षाचीं धेंडें सभेस येण्याच्या अगोदरच तिसऱ्या वाचनाची सूचना बहुमतानें पसार झाली. तरी एवढ्यानें बिलासंबंधानें कामन्स सभेंतील काम आटोपलें असें नाहीं. कारण हें बिल पास करावें अशी एक सूचना अद्यापि पास व्हावयाची होती. तेव्हां मध्येंच जरासा थिजलेला अडथळ्याचा लोंढा पुनः जोरानें वाहूं लागला आणि पुनः पुनः तेच तेच आक्षेप येऊं लागले. तरी टोरीपक्षाची आतां खात्री झाली कीं, आतां या बिलास या सभेंत अडथळा करण्यांत कांहीं हांशील नाहीं; तर आतां काय करावयाचें तें लार्डांच्या सभेंत केलें पाहिजे. आणि अशा रीतीनें कामन्स सभेंतून तें बिल एकदाचें पार पडलें.

नंतर मग सहजच जो तो विचार करूं लागला कीं लार्डांची सभा बिलासंबंधानें काय करणार? पण लवकरच सुधारक मोठमोठाल्या सभा भरवून असा प्रश्न करूं लागले कीं, लार्डांच्या सभेचें काय करावयाचें? तात्पर्य, लार्डांची सभा ह्मणजे सर्व सुधारणेचा शत्रु होय, करितां तिलाच खो दिला पाहिजे, असा जिकडून तिकडून ध्वनि निघूं लागला तरी लार्डांच्या सभेनें बिलकूल पर्वा केली नाहीं. कारण लार्डांची तेव्हांपर्यंत अशी समजूत होती कीं जे युनिव्हर्सिट्यांतून निघालेले नाहींत, त्यांच्या ह्मणण्याकडे ह्मणजे सामान्य लोकांच्या ह्मणण्याकडे, लक्ष्य देण्याचें बिलकूल कारण नाहीं. ही चळवळ अगोदर पासूनच सुरू होती, ह्मणून ता. २२ सपटंबर १८३१ रोजीं जेव्हां बिल कामन्स सभेंत पास झालें तेव्हां त्याच संध्याकाळीं तें लार्डांच्या सभेपुढें नेलें, आणि त्याच रात्रीं त्याचें पहिलें वाचन झालें. त्या वेळीं नेहमीच्या शिस्तीप्रमाणें, प्रत्यक्ष मतें वगैरे कांहीं एक घेतलीं नाहींत. नंतर मग दुसरें वाचन ता. ३ आक्टोबर रोजीं आलें. त्या वेळीं लार्ड ग्रेनें

कर चित्तवेधक व ठसकेदार असें भाषण त्याच्या पुष्टीकरणार्थ केलें, आणि लार्डांस व विशेषतः बिशप व आर्चबिशप या लोकांस त्यानें निक्षून असें सांगितलें कीं ही सुधारणेची मागणी बहुजनाकडून आलेली आहे, तेव्हां तिचा निषेध करण्याच्या अगोदर अशा करण्यापासून काय काय परिणाम घडतील याचा चांगला विचार करा.

लार्ड ग्रेची संभाषण शैली धिम्म्या प्रकारची होती. त्याच्या अंगीं फाक्सचें तेज आणि राग हीं नव्हतीं; तद्वतच त्याच्या ठिकाणीं पिटची चक्क करून सोडणारी विलक्षण बुद्धिमत्ताही नव्हती, किंवा ब्रूहामचा आरडाओरडा हाहि नव्हता. तर त्याची एकंदर धाटणी मोठेपणाची असे, त्याचा आवाज शांत, स्पष्ट आणि भिनणारा असा असे, आणि त्याची भाषणशैली अत्यन्त सुधारलेली आणि उद्देशसिद्ध्यर्थ अत्यन्त योग्य अशी असे. तात्पर्य, त्याच्या भाषणाचा रोंख लोकांचे मनोविकार, त्यांचे पूर्वग्रह आणि त्यांचा पक्षाभिमान यांस चेतवण्याकडे नसून, त्यांची तात्त्विक बुद्धि, विचारशक्ति आणि न्यायबुद्धि यांना जागृत करण्याकडे असे. ह्या वेळच्या भाषणासारखें दुसरें त्याचें भाषण कोणतेंच वठलें नव्हतें असें म्हणतात. पण लार्डांची सभा या वेळीं प्रमाणें आणि विचार यांना वळण्यासारखी नव्हती, तर काय करावयाचें याचा तिनें अगोदरच निश्चय करून ठेविला होता. म्हणून लार्ड व्हार्नक्लिफनें अशी उपसूचना एकदम आणिली कीं हें बिल नापसंत करावें. तेव्हां त्याची कोणी अशी कानउघाडणी केली कीं असली सूचना पास करणें म्हणजे कामन्स सभेचा प्रत्यक्ष अपमान करण्यासारखें होईल. त्यावरून त्यानें आपल्या उपसूचनेचें स्वरूप बदललें, आणि असें सुचविलें कीं ह्या बिलाचें दुसरें वाचन आणखी सहा महिन्यांनीं हातीं घ्यावें. याचा अर्थ बिल नापसंत करावें असाच वस्तुतः असतो; कारण कोणतेंहि प्रधानमंडळ आपल्या महत्वाच्या बिलासंबंधानें अशी सूचना पास झाल्यास राजीनामा दिल्याशिवाय राहणार नाहीं. असो. पुढें जो वादविवाद झाला त्यांत ड्यूक आव् वेलिंग्टनानें बिलाविरुद्ध चरचरीत भाषण केलें, आणि ता. ८ आक्टोबर रोजीं ह्या उप-

सूचनेवर जेव्हां मतें घेतलीं तेव्हां तीस अनुकूल १९९ मतें पडलीं, आणि प्रतिकूल १५८ पडलीं, म्हणजे दुसऱ्या वाचनाविरुद्ध ४१ मतें पडलीं म्हणावयाचीं. तेव्हां अर्थात् सर्वच बिल हाणून पडलें, आणि वर्षभर त्याजबद्दल केलेली मेहनत फुकट गेली.

हें पाहून पार्लमेंटास लागलीच कांहीं दिवस सुटी दिली, आणि सुधारणेचे मित्र देशांत सर्वत्र पसरून लार्डांच्या ह्या कृतीविरुद्ध जोराचीं भाषणें करूं लागले. सुधारणेच्या बिलाच्या संबंधानें लोकांची उत्सुकता पूर्वीपेक्षांहि ज्यास्त वाढली, आणि कांहीं ठिकाणीं लोक त्या बिलाच्या शत्रूंवर अगदीं हमरी तुमरी करून उठूं लागले. लंडनमध्यें असले लोक गाड्यांतून चालले असतां लोक त्यांच्या सभोंवती जमत आणि त्यांची हुऱ्यो हुऱ्यो करीत; आणि नवीनच नेमलेल्या पोलीसाचा बंदोबस्त जर चांगला नसता तर याच्या पलीकडेहि ते गेले असते. कांहीं ठिकाणीं तर मोठाले दंगेच झाले. डार्बी शहरीं जे दंगे झाले ते कांहीं दिवस सारखे चालू होते. नाटिंघाम शहरीं तर ह्यापेक्षांहि ज्यास्त दंगा झाला. तेथला किल्ला डयूक आफ न्यूकासलचा असल्यामुळें तो त्यांनीं जाळून फस्त केला. ब्रिस्टल शहरीं ह्याच्यापेक्षांहि ज्यास्त भयंकर दंगे झाले. तेथला सर चार्लस वेदरेल हा प्रतिनिधि होता, व तो बिलाच्या अगदीं विरुद्ध होता; त्यामुळें तेथें बराच दंगा झाला. कित्येक घरें पडलीं आणि रस्त्यांतून लष्करी शिपाई व लोक ह्यांजमध्यें कित्येक दिवस झटापटी चालू राहिल्या. सर चार्लस वेदरेल मोठ्या शर्थीनें बचावला. ह्या दंग्याबद्दल कित्येकांस जबरदस्त शिक्षा झाल्या. हें सांगावयास नकोच. बरेचजण फांशी गेले, व इतरांस इतर शिक्षा झाल्या. बिशप व आर्चबिशप लोक बिलाविरुद्ध असल्यामुळें त्यांचीं ठाण्याचीं शहरें बरेच दंगे पाहतीं झालीं. हें पाहून कान्सर्व्हेटिव्ह पक्षाचे कांहीं सरदार शुद्धीवर आले, आणि त्यांचा वेव्हरर्स (अनिश्चित) म्हणून एक नवा पक्ष बनला. त्यांचें म्हणणें असें होतें कीं सगळेंच बिल पसंत किंवा नापसंत न ठरवतां त्याच्या प्रत्येक भागाचें थंड डोक्यानें परीक्षण करावें, आणि जे उचित वाटतील ते भाग पसंत करावे, व बाकीचे नापसंत करावे.

लार्ड ग्रेनें तिसरें रिफार्म बिल ता. २७ मार्च १८३२ रोजीं लार्डांच्या सभेपुढें आणिलें. पहिलें वाचन तर मतें घेतल्याशिवाय रीतीप्रमाणें पास झालेंच. पण दुसऱ्या वाचनाला काय तीं नऊ मतें ज्यास्त मिळालीं, ह्मणजे १८४ अनुकूल आणि १७५ प्रतिकूल तेव्हां लार्ड ग्रे आणि त्याचे साथीदार यांच्या स्पष्ट लक्ष्यांत आलें कीं लार्डांच्या सभेची स्थिति चांगली बदलल्याशिवाय हें बिल तेथें पार पडण्याचा संभव नाहीं; आणि ती गोष्ट त्यांच्या लवकरच निदर्शनासहि आली. कारण कमिटीपुढें बिल गेल्याबरोबर लार्ड लिंढर्स्टनें अशी उपसूचना आणिली कीं जुन्या गांवांचे प्रतिनिधिहक्क काढून घेण्याच्या अगोदर नव्या कोणत्या गांवांना ते हक्क द्यावयाचे याचा विचार व्हावा. आतां या सूचनेंत कांहीं फारसें गैर होतें असें नाहीं, पण ती कबूल केल्यास दुसऱ्या पाहिजे तशा सूचना येणार, आणि बिलाचें एकंदर स्वरूप बदलून जाणार.

लार्ड लिंढर्स्ट हा मोठा हुशार, बोलका, आणि धूर्त असा मुत्सदी होता. पार्लमेंतीय वावदूक या नात्यानें त्याची ब्रूहामशीं चढाओढ असे. लिंढर्स्टचें भाषण नेहमी सुसंस्कृत, कोणास न झोंबणारें, आणि सभ्य असे; आणि त्याच्या भाषणांत अशी कांहीं प्रमाण शृंखला दृष्टीस पडे कीं तेणेंकरून ऐकणारांची खात्री व्हावी; पण त्याच्यामध्यें मनोवृत्तींस जागृत करणारें फारच थोडें असे. इकडे ब्रूहामचें भाषण जोराचें, चेतवणारें, आणि ऐकणारास डुंबवून टाकणारें असें असे; त्यांत अतिशयोक्ति बरीच असे, त्यांत नेहमीची बोलण्याची रीत किंवा शब्दांची ठेवण यांची बिलकूल पर्वा केलेली नसे, आणि विरुद्ध पक्षाला बोलण्यानें बैलाच्या ढुशीसारखी ढुशी बसे. लिंढर्स्टची उपसूचना विशेषतः वेव्हरर्स लोकांना आपल्या बाजूस आणण्यास योग्य अशी होती; त्याजमुळें तिजवर जेव्हां ता. ७ मे रोजीं मतें घेतलीं तेव्हां तीस १५१ अनुकूल मतें पडलीं, आणि ११६ प्रतिकूल पडलीं; ह्मणजे ३५ मतें प्रधानांविरुद्ध पडलीं म्हणावयाचीं, कारण त्यांनीं तीस कसून विरोध केला होता.

तेव्हां राष्ट्राच्या एकदम लक्ष्यांत आलें कीं, वेळ मोठी आणीबाणीची आली आहे, आणि तीस एकच उपाय आहे. तो हा कीं, टोरी सरदारांचें न्यून मत होईल इतके नवे व्हिग सरदार बनवावयाचे. पण राजा प्रथम ह्या गोष्टीस मुळींच कबूल होईना. तेव्हां प्रधान राजीनामा द्यावयास तयार झाले. तो राजानें नाहीं होय ह्मणून शेवटीं कबूल केला. नंतर त्यानें लार्ड लिंढर्स्ट यास बलावून त्याच्याशीं पुष्कळ खलबत केलें. तेव्हां त्यानें त्यास डयूक आव् वेलिंग्टनास बोलावण्याची सल्ला दिली. पण डयूक आव् वेलिंग्टन राजाचें संकट निवारण्यास फारसा समर्थ झाला नाहीं. त्यानें पाहिलें कीं, पार्लमेंतीय सुधारणा न केल्यास कांहीं तरी मोठी क्रान्ति उत्पन्न होणार; व आपण ह्या सुधारणेस इतका विरोध केला असल्यामुळें स्वताच ती करणें बरोबर दिसणार नाहीं. म्हणून त्यानें सर राबर्ट पील यास बोलावण्यास राजास सांगितलें. पण तोहि धूर्त माणूस असल्यामुळें आणि सुधारणेस प्रतिकूल असल्यामुळें सुधाणानुकूल प्रधानांव्यतिरिक्त काम निभावणार नाहीं हें त्याच्या लक्ष्यांत येऊन त्यानें लार्ड ग्रे व सर जान रसेल यांसच पुनः बोलावण्याची राजास सल्ला दिली.

इकडे देशांत सुधारणेबद्दल ज्यास्त ज्यास्त चळवळ चालूच होती, आणि सुधारणेस जसजसें ज्यास्त ज्यास्त विघ्न येईल तसतशी ती ज्यास्तच वाढूं लागली. बर्मिंघाम येथें आजपर्यंत कधीं भरल्या नव्हत्या एवढाल्या मोठया जंगी सभा भरूं लागल्या, आणि त्या ठिकाणीं बहुतेक क्रान्ति करावी अशा अर्थाचे ठराव पास होऊं लागले. पुष्कळ शहरांतून ब्यांकांवर हल्ला करण्याबद्दल इशारती येऊं लागल्या. खुद्द लंदन शहरांत एक जंगी सभा भरून तिनें असा ठराव पास केला कीं राजा व्हिग मुत्सद्यांच्या ह्मणण्याप्रमाणें नवीन सरदार तयार करण्यास जर कबूल नसेल तर कामन्स सभेनें त्याची पोटगीच बंद करावी. कांहीं व्हिग सरदार तर इतके घाबरले कीं राजानें न ऐकिल्यास जर बंड झालें तर आपण काय करावयाचें याचा देखील ते विचार करून ठेवूं लागले. पण राजा इतक्यांत शुद्धीवर आला, व तसा तो आला हें बरेंच झालें. कारण तो पुनः आतां

अगदीं अप्रिय होऊं लागला होता. रस्त्यांतून लोक त्याची हुर्यो करावयास लागले होते, आणि वर्तमानपत्रांतून त्याच्यावर भयंकर हल्ले येऊं लागले होते.

तात्पर्य लार्ड ग्रे व त्याचे साथीदार यांस राजानें परत बोलाविलें, व तो नवे सरदार करण्याची परवानगी देण्यास कबूल झाला. ती रीतीप्रमाणें लार्ड ब्रूहामनें लेखी मागितली, तेवढ्यावरूनच त्याची पुनः मर्जी गेली. तो ह्मणाला, माझ्या शब्दावर तुमचा एवढा विश्वास नाहीं कीं काय? तेव्हां ब्रूहामनें त्यास सर्व समजून सांगितलें. तेव्हां त्यानें चिटोरें खरडून दिलें व एवढीच अट घातली कीं नवे सरदार बनवावयाचे ते प्रथम सरदारांच्या वडील मुलांपैकीं बनवावे; असें कीं ते पुढें सरदार व्हावयाचेच अल्सयामुळें सरदारांची संख्या कायमची फाजील वाढूं नये. ही अट शहाणपणाचीच होती, व ह्मणून ती प्रधानांस कबूलच होती.

या परवानगीनें काम भागलें. कारण कसें तरी बिल पास होणार अशी जेव्हां टोरी सरदारांची खात्री झाली, तेव्हां त्या बिलास विरोध करण्याचें त्यांनीं मुकाट्यांनीं कमी केलें. तेव्हां बिल फारसा वादविवाद किंवा शिवीगाळ न होतां लवकरच लार्डांच्या सभेंतून निघालें. त्याचें तिसरें वाचन ता. ४ जून १८३२ रोजीं झालें, आणि त्यास राजसंमति ता. ७ जून रोजीं मिळाली. त्यांत तरी राजानें आपला आंबटपणा दाखविलाच. कारण ती संमति त्यानें स्वतः न देतां त्या कामावर एक कमिटी नेमून तिच्या मार्फत दिली. नंतर मग स्काटलंद व आयर्लंद यांच्यासंबंधानें जी सुधारणा बिलें कामन्स सभेंत आधींच पास झालेलीं होतीं, तीं लार्डांच्या सभेंतहि पास झालीं, आणि अशा रीतीनें सुधारणेचा अखेरीस विजय झाला.

हें बिल पास झाल्याबद्दल समाधान दर्शवितांना लार्ड जान रसेलनें कांहीं शब्दांची योजना केली तेणेंकरून बरेच दिवस मोठा वादविवाद माजून राहिला होता. जे लोक सुधारणेला फार भीत होते व अशींच बिलें आतां सारखीं येत राहतील अशी ज्यांस धास्ती पडली होती त्यांस अनुलक्षून

त्यानें असें ह्मटलें कीं हें बिल शेवटचें आहे. यावरून कित्येक सुधारणाभक्तांचा गैरसमज होऊन त्यांनीं त्याजवर अंमळ घुस्सा केला. आतां त्याच्या म्हणण्याचा अर्थ पुढें सुधारणा कधींच करावयास नको असा नव्हता, तर सध्या कांहीं वर्षें केलेली सुधारणा बस्स आहे असा होता; आणि त्याप्रमाणेंच झालें कारण पुढचें सुधारणाबिल एका पिढीवर वर्षें झाल्यानंतर आलें. असो.

पास झालेल्या सुधारणाबिलांत एक मोठी उणीव राहिली होती. ती ही कीं मतदानाचा हक्क अमुक एक कर किंवा सारा देणारासच असावा अशी जी मर्यादा केली होती ती फार जबर असल्यामुळें शहरांतील सामान्य कारागीर किंवा गांवढ्यांतील सामान्य कामकरी यांस मतदानाचा कोणासच हक्क मिळालेला नव्हता. उलट, पूर्वींच्या पद्धतीप्रमाणें कांहींकांना असलेला निघून गेला होता. आतां या वेळेस एकदम एवढी उडी मारिली नाहीं ही कदाचित् शहाणपणाचीच गोष्ट केली असेल, पण हें बिल पास झाल्याबरोबर त्या लोकांची मोठी निराशा झाल्यासारखी दिसूं लागली, यांत बिलकूल संशय नाहीं.

हें प्रकरण पुरें करण्यापूर्वीं एका गोष्टीस उल्लेख करणें इष्ट दिसतें. ती ही कीं या बिलावर जे वादविवाद झाले त्यांमध्यें वाङ्मय आणि राजकारण या दोन्ही बाबतींत पुढें फार प्रसिद्धीस येणाऱ्या एका गृहस्थास प्रथमच पुढें येण्यास चांगली संधि सांपडली. टॉमस बाबिंग्टन मेकॉले हा लार्ड जान रसेलनें जेव्हां सुधारणाबिल पुढें आणिलें तेव्हां कामन्स सभेंत नुक्ताच प्रतिनिधि निवडून आला होता. गुलामाचा व्यापार आणि गुलामगिरी यांजविरुद्ध एवढी जबरदस्त खटपट करणारा जो झशारी मेकाले त्याचा तो मुलगा असून लहानपणापासूनच त्याची विलक्षण बुद्धिमत्ता व चतुरस्रपणा हीं दृग्गोचर व्हावयास लागलीं होतीं. जेव्हां तो पार्लमेंतांत शिरला तेव्हां त्याच्या अगोदरच त्याची कीर्ति तेथें जाऊन पोहोंचलेली होती, पण तो कवि होणार, का निबंधकार होणार, का इतिहासकार होणार, का राजकीय वक्ता होणार, ह्याबद्दल त्याच्या मित्रांस अद्यापि कांहींच खात्री नव्हती. पण पुढें

हळूहळू त्यांच्या असें निदर्शनास येऊं लागलें कीं तो फार मनोवेधक कविता रचूं शकतो, कादंबरीपेक्षां ज्यास्त चटकदार निबंध लिहूं शकतो, प्रत्येक जणास वाचावासा वाटेल असा इतिहास बनवूं शकतो; आणि अत्युत्तम प्रकारचीं भाषणें पार्लमेंतांत करूं शकतो, अशा प्रकारच्या चार निरनिराळया गोष्टी उत्तम रीतीनें करणें हें फार थोडक्यांसच साधत असेल. सध्या आपल्याला प्रस्तुत वादविवादांत त्यानें केलेल्या भाषणांचाच विचार कर्तव्य आहे. त्यासंबंधानें पाहतां असें दिसतें कीं प्रथमच त्याची छाप पडली नाहीं. तो फार जलद बोले ही त्याच्यांत एक मोठी उणीव होती. तो आपलीं संभाषणें पाठ करीत असे, आणि त्याची स्मरणशक्ति फार विलक्षण असल्यामुळें तीं इतक्या घाईनें बोलून जाई कीं त्याचें भाषण लक्ष्यपूर्वक ऐकण्यास फार श्रम पडत, आणि तीं उतरून घेण्यास रिपोर्टरांस मोठी पंचाईत पडे. शिवाय त्याच्या संभाषणांतून निरनिराळ्या ग्रंथांना, ग्रंथकारांना, आणि ऐतिहासिक गोष्टींना इतके कांहीं उल्लेख येत कीं त्यामुळें ही अडचण ज्यास्तच भासे. पण ह्या सर्व उणीवा असूनहि तो पार्लमेंतांत इतका लोकप्रिय झाला कीं, तो बोलावयास आतां उठणार आहे असा सुगावा लागल्याबरोबर सभागृह उत्सुक श्रोत्यांनीं अगदीं गच्च भरून जाई.

सुधारणाबिलाच्या वर्षांत अशी एक गोष्ट घडून आली कीं तिजमुळें वाङ्मयाच्या इतिहासांत तें वर्ष नेहमींच संस्मरणीय राहणार आहे. ती गोष्ट म्हणजे सर वाल्टर स्काटचा मृत्यु होय. स्काटच्या कारकीर्दींतील शेवटचीं कांहीं वर्षें त्याच्या प्रकाशकांचें दिवाळें निघाल्यामुळें, व त्यामध्यें त्याचा हात गुंतलेला असल्यामुळें, ह्यास फारच दुःखाचीं गेलीं हें सुप्रसिद्धच आहे. त्यामुळें जें कर्ज त्याच्या अंगावर आलें, तें फेडण्याकरितां त्यास अतोनात लेखनश्रम करावे लागले. त्या त्याच्या दुःखांत भर पडण्यास त्याची प्रियपत्नी त्याच सुमारास निवर्तली. त्यामुळें त्यास अत्यन्त दुःख झालें. ह्या दोन्ही गोष्टींनीं त्याची प्रकृति फार बिघडली. शेवटीं तो मित्रांच्या सल्ल्यानें ती सुधारण्याकारितां ह्मणून इटालीच्या उबदार हवेंत गेला, पण त्याचा कांहींएक उपयोग झाला नाहीं. त्याचें दुखणें केवळ शारीरिक

नव्हतें, तर त्यांत मानसिक दुःखाचाच भाग फार होता. त्यामुळें नुसती हवा बदलून फायदा होण्यासारखा नव्हता. स्काट मेला तेव्हां त्यास नुक्तीं साठांवर वर्षें झालेलीं होतीं. या वयांत तिकडच्या हल्लींच्या आयुर्मर्यादेच्या मानानें पाहतां माणसाच्या शक्ती व त्याच्या हातून होणाऱ्या गोष्टींचा संभव यांची कडेलोट कचित्च झालेली असते. जगाच्या वाङ्मयांत त्यानें एका नव्या भागाची भर घातली यांत बिलकूल शंका नाहीं. तो मेल्यापासून वाग्देवीच्या राज्यांतील शास्त्यांमध्यें पुष्कळ क्रान्त्या होऊन गेल्या आहेत, पण तो अद्यापि पदच्युत झालेला नाहीं.

---

## प्रकरण एकतिसावें.

# गुलामांची बंधमुक्तता.

ज्या मुत्सद्यांनीं सुधारणाबिल पास करून घेतलें होतें त्यांच्या लवकरच असें नजरेस आलें कीं आपण हें बिल पास करून घेऊन मोठीच जबाबदारी आपल्या शिरावर घेतली आहे. त्यांनीं एवढा मोठा जय मिळविला होता कीं ते पाहिजे ती गोष्ट करूं शकतील असा बहुतेकांचा समज होऊन गेला. ह्या ठिकाणीं हें लक्ष्यांत ठेविलें पाहिजे कीं त्यांनीं आपल्या वर्तनानें एका मोठ्या तत्वाची कायमची स्थापना केली होती. तें हें कीं प्रधानांच्या सल्ल्यास न जुमानतां इंग्लंदच्या राजास केवळ स्वेच्छेनें पाहिजे ती गोष्ट करतां येत नाहीं. ह्या महत्तत्त्वाची स्थापना आजपर्यंत बरोबर झालेली नव्हती. तिसऱ्या जार्जाच्याच कारकीर्दींत ही गोष्ट आपल्या नजरेस आली कीं धाकट्या पिटला आपली विचारशक्ति व आपली सदसद्विवेकबुद्धि यांस एकीकडे गुंडाळून ठेवून कॅथलिक लोकांस त्यांचे न्याय्य हक्क देण्याच्या कामीं अखेरीस राजाच्या हट्टास हार जावें लागलें. पण प्रस्तुत प्रसंगीं लार्ड ग्रे आणि त्याचे साथीदार यांनीं राजास सयुक्तिक गोष्ट मान्य करण्यास भाग पाडिलें होतें; आणि अशा रीतीनें जें तत्त्व त्यांनीं स्थापिलें होतें त्याचें पूर्ण महत्त्व त्यावेळीं कदाचित् त्यांच्याहि लक्ष्यांत आलें नसेल. पण लोकांचा समज साहजिक असा झाला कीं ज्या प्रधानांनीं एवढाल्या मोठ्या गोष्टी केल्या आहेत ते यांपेक्षांही ज्यास्त मोठ्या गोष्टी सहज करतील.

अशी आशा लोकांमध्यें उत्पन्न होण्यास व ती सफलहि होण्यास ही वेळ मोठी अनुकूल होती. आतां सुधारलेल्या जगामध्यें नवीन युगाची सुरवात झाली होती. आजपर्यंत ज्या राजकीय आणि सामाजिक संस्था आमच्या पूर्वजांनीं फार शहाणपणानें रचल्या आहेत असें समजून सुधारलेले लोक पूज्य मानीत असत, व त्यांत हात घालणें पाप समजत असत, त्यांच्या योग्यतेबद्दल व पवित्रतेबद्दल नवीन कल्पना लोकांच्या डोक्यांत भरू

लागल्या. अद्यापि बहुजन समाजामध्यें शिक्षणाचा जरी फार प्रसार झालेला नव्हता, तरी, लोकांना शिक्षण देणें फार फायद्याचें आहे अशी शहाण्या माणसांची समजूत व्हावयास लागली होती. हल्लींप्रमाणें तेव्हांहि एकादा प्रश्न कामन्ससभेनें हातीं घेण्याच्या योग्यतेचा होण्यापूर्वी लोकांस त्याची सार्वजनिक रीतीनें फार चर्चा करावी लागे, व त्यास व्यवस्थित स्वरूप आणून द्यावें लागे. लार्ड ग्रेच्या कायद्याप्रमाणें सुधारलेल्या पार्लमेंतास जें पहिलें मोठें काम हातीं घ्यावें लागलें तें गुलामगिरी काढून टाकणें हें होय. इंग्लंदांत गुलामगिरी किंवा गुलामांचा व्यापारही बंद होऊन किती तरी दिवस होऊन गेले होते. पण पुष्कळ समजंस, शिकलेल्या आणि क्रूर अंतःकरणाच्या मुळींच नव्हे अशा पुष्कळ इंग्लिश लोकांस वसाहतींतून चालू असलेली गुलामगिरी ह्मणजे कांहीं निराळ्या प्रकारची संस्था आहे असें वाटे. सामान्य इंग्रजास असें वाटे कीं आपल्या इतर संस्थांचें जें स्वातंत्र्य त्याला गुलामगिरी ही अगदीं विरुद्ध असल्यामुळें इंग्लंदांत ती असणें हें अगदीं गैर आहे, आणि आफ्रिकेच्या किनाऱ्यावरून जबरदस्तीनें पुरुष व स्त्रिया यांस ओढून आणणें आणि गुलाम म्हणून विकणें हें सुधारणा आणि खिस्ती धर्म ह्या दोहोंच्याहि अगदीं विरुद्ध आहे. तथापि ह्याच सामान्य इंग्रजाला वेस्टइंडीज वगैरे वसाहतींतून चालू असलेल्या गुलामगिरींत हात घालण्यास हें कारण बस्स आहे असें वाटत नसे. तो म्हणे, आह्मी ही पद्धति त्या देशांत कांहीं नवीन घातलेली नाहीं; तेथें ती पूर्वीचीच होती; तेथले लोक ह्मणतात ती पद्धति अमलांत ठेवल्याशिवाय साखर वगैरे उत्पन्नाचे पदार्थ तयार व्हावयाचे नाहींत, आणि ते पदार्थ उत्पन्न केल्याविना लोकांस सुखानें राहतां येणार नाहीं. पण कांहीं सुसंस्कृतमनाचे सुधारक वसाहतींतील गुलामगिरी काढून टाकण्यासाठीं जी खटपट आज कांहीं वर्षें करीत होते, आणि तसें करणें जरूर आहे हें सिद्ध करण्यकरितां जीं प्रमाणें दाखवीत व ज्या विनवण्या करीत होते, त्यांनीं सामान्य इंग्रजाच्या मनास बराच चटका बसावयास लागला होता. ह्या माणसांपैकीं कांहींकानीं आपली कीर्ति इंग्लंदच्या इतिहासांत अमर करून ठेविली आहे, ह्यांपैकींच झशारी मेकाले

हा एक होता. त्याचा पूर्वी उल्लेख आलाच आहे. तो वेस्ट इंडीज़मध्यें एका मोठ्या इस्टेटीचा व्यवस्थापक होऊन तिकडे गेलेला होता, पण गुलामगिरीची पद्धति त्याच्या सदसद्विवेकबुद्धीस मान्य होईना; म्हणून तो तिकडून नोकरी सोडून परत आला, आणि तो आपल्या तनमनधनाचा व्यय त्या पद्धतीमुळें गुलामांस भोगावे लागणारे जे हाल ते लोकांच्या नजरेस पूर्णपणें आणण्याच्या कामीं करूं लागला. ब्रूहाम, फावेल बक्स्टन, व्हिटब्रेड इत्यादि याच कामीं अश्रांत श्रम करणारीं जीं इतर माणसें त्यांना याबद्दल विश्वसनीय माहिती याच्याचकडून मिळत असे. गुलामगिरीच्या पद्धतींत ज्या कांहीं वाईट गोष्टी होत्या त्यांत अत्यंत वाईट ही होती कीं त्यांना अतिशय क्रूरपणानें वागवीत, त्यांना चाबकाचा मार देत, त्यांना छिन्न भिन्न करीत, आणि बायका, पुरुष आणि मुलें, या सर्वांनाच डाग देत. ही गोष्ट तेथील प्रत्यक्ष माहिती आपणास आहे असा बाणा करणारे लोक वरचेवर नाकबूल करीत, आणि म्हणत कीं अंतःकरणाच्या सदयतेमुळें नसलें तरी निदान स्वहित साधण्यासाठीं गुलामांचे मालक असें करीत नसतील. कारण गुलामांस छिन्न भिन्न केल्यास ते काम करण्यास नालायक किंवा कमी लायक व्हावयाचे नाहींत काय, आणि अशा रीतीनें मालकांचेंच नुकसान व्हावयाचें नाहीं काय ?

पण वास्तविक स्थिति काय आहे, हें सिद्ध करण्याकरितां विल्बर फोर्स वगैरे मंडळी हवा तेवढा पुरावा आणूं शकत होती. ते असें दाखवूं शकत होते कीं पुरुष व स्त्रिया यांस फटके मारणें ही गोष्ट प्रत्येक मळ्यावर बहुतेक प्रत्येक दिवशीं होत असते. आणि डाग जे देत ते केवळ शिक्षेसाठींच नव्हत, तर हे आपले गुलाम म्हणून त्यांस ओळखण्यासाठीं देखील देत, एकादी गुलाम स्त्री जर पळून जाण्याचा यत्न करूं लागली तर तिचा धनी ती पळाल्यास सहज ओळखतां यावी म्हणून तिच्या स्तनावर लोखंड लालभडक तापवून त्यानें डाग देत असे. पळालेल्या स्त्री गुलामांच्या मालकांनीं वर्तमान पत्रांतून दिलेल्या पुष्कळ जाहिराती अशा आढळून आल्या कीं, "त्या शोधून काढून बक्षीस मिळवूं इच्छिणारांस त्या

सहज ओळखतां येण्यासारख्या आहेत, कारण त्यांच्या दोन्ही थानांवर डाग दिलेले आहेत!" या पद्धतीमध्यें आणखी जे कांहीं क्रूरपणाचे प्रकार त्या सर्वांचें वर्णन एथें करण्याचें कारण नाहीं. तसे प्रकार होते यांत मात्र बिलकूल शंका नाहीं.

या वसाहतींतील गुलामगिरी विरुद्ध मनःपूर्वक खटपट करूं लागणारा पुढारी इंग्रज म्हटला म्हणजे ब्रूहाम हा एक होता. त्यानें याच्या अगोदर किती वर्षां पूर्वीं तरी ही पद्धति फार क्रूर असल्यामुळें कायद्यानें बंद करून टाकावी अशा आशयाची सूचना पार्लमेंतापुढें आणिली होती. पुष्कळ दिवसपर्यंत निरनिराळ्या प्रधानांची मजल गुलामांच्या संबंधाच्या कायद्यांत कांहीं अल्पस्वल्प सुधारणा करण्याच्या पलीकडे गेली नाहीं. पण कांहीं वसाहती स्वतंत्र असल्यामुळें त्या प्रधानांच्या कह्यांत नसत; त्यामुळें त्या ह्या सुधारणांस जुमानीत नसत. तेथील कायदे करणाऱ्या सभांना विलायत सरकार आपल्या कारभारांत अशा रीतीनें हात घालूं पाहतें याचा मोठा राग येई, आणि तेथील गुलामांचे मालक अर्थात् त्यांच्याच वतीनें ओरडा सुरू करीत.

हे मालक आणि त्यांचे इंग्लंदांतील अनेक पाठिंबे असें म्हणत कीं साखर करण्याचे जे कारखाने आहेत ते गुलामांखेरीज चालवतां यावयाचे नाहींत, आणि गुलामांना कधीं कधीं मारल्याशिवाय ते कधीं काम करावयाचे नाहींत. ते ह्मणत कीं विलायतचें पार्लमेंत आपणास मुक्त करण्याची खटपट करीत आहे असें जर या गुलामांस एकदां समजलें तर ते एकदम बंड करून उठतील, आणि आपले मालक आणि त्यांचीं बायकामुलें यांचा सर्वांचा संहार करून टाकतील. पण असल्या ह्या दांभिक बोलण्यांनीं मेकाले, विल्बरफोर्स वगैरे माणसें फसणारीं नव्हतीं; असल्या ह्या ओरडण्यांनीं ब्रूहामसारखीं माणसें घाबरणारीं नव्हतीं. म्हणून ही पद्धति बंद करून टाकण्याविषयींची चळवळ दिवसें दिवस ज्यास्त वाढत चालली.

जमेका बेटांतील कायदे सभेनें विलायत सरकारच्या अत्यंत आग्रहावरून गुलामांवर होणारा जुलूम कमी करण्याच्या उद्देशानें एक कायदा पसार

केला; पण त्याजपासून फारच अल्प फायदा होण्याचा संभव होता. विलायत सरकारचा मुख्य आग्रह असा होता कीं स्त्री गुलामांना चाबकानें मारण्याची चाल अजीबाद बंद करून टाकावी. पण त्याबद्दल या कायद्यांत कांहींएक तरतूद केलेली नव्हती. इकडे तेथील मळेवाले विलायतसरकारनें आपल्या कामांत हात घातल्याबद्दल अगदीं खवळून गेले, आणि बंड करून उठण्याचा आव घालूं लागले. डेमेरारा बेटांत गुलामामध्यें अशी बातमी पसरली कीं विलायतचा राजा व प्रधान आपणास दास्यमुक्त करण्याच्या विचारांत आहेत; तेव्हां तेथील एका मळ्यावरील गुलामांनीं काम करण्याचें नाकारिलें. ह्या त्यांच्या नाकारण्यास बंडाचें स्वरूप देण्यांत आलें, आणि त्यांना मोठाल्या शिक्षा दिल्या. जान स्मिथ नांवाचा तेथील एक पाद्री गुलामांचा फार कळकळा करीत असे; त्याच्यावर असा आरोप ठेविला कीं यानें त्यांस बंडास प्रवृत्त केलें, आणि त्यास तुरंगांत टाकून अतिशय क्रूरपणानें वागविलें. नंतर त्याची कांहीं तरी चवकशी केल्यासारखें करून त्याला देहांतशिक्षा सांगितली; तरी देखील जूरीनें अशी शिफारस केली होती कीं आरोपीचें पूर्वींचें वर्तन चांगलें होतें ही गोष्ट ध्यानांत आणून त्याजवर दया करावी; पण ही त्यांची शिफारस अमलांत येण्याच्यापूर्वींच त्याला तुरंगांतील हाल सहन न होऊन तो मरून गेला.

ह्या गोष्टीबद्दल इंग्लंदांत अर्थात् मोठा गवगवा होऊन गेला. ही चवकशी व ही शिक्षा हीं दोन्ही अगदीं गैर झालीं असें ब्रूहाम, बक्टत, इतिहासकार व तत्वज्ञ सर जेम्स म्याकिंटाश, आणि दुसरे पुष्कळ गृहस्थ यांचें मत पडलें, आणि तें ऐकून हा गवगवा, ज्यास्तच वाढला. प्रधानांनीं तेथील अधिकाऱ्यांस या कृत्याबद्दल दोष दिला, आणि त्यांनीं सांगितलेली शिक्षा रद्द केली. नंतर १८३० च्या मे महिन्यांत लंदनमध्यें एक जंगी सभा भरली, आणि तिनें असा ठराव पास केला कीं सरकारानें गुलामगिरींत केवळ सुधारणाच न करतां ती अजीबाद रद्द करून टाकावी. या सभेचें अध्यक्षपण या कामांतील अग्रणी विल्बर फोर्स यानें स्वीकारिलें होतें, तत्पूर्वीं तो आजारी होता, आणि आजारांतून उठल्यावर पाहिलें सार्वजनिक

कृत्य जें त्यानें केलें तें हेंच होय. वरचा ठराव बक्स्टन यानें सभेपुढें आणिला, व त्यास फार जोराची संमति मिळाली. नंतर मग त्याच-अर्थाची ब्रूहामनें कामन्स सभेपुढें सूचना आणिली. त्यावेळीं त्यानें अत्यंत जोराचें भाषण केलें, तरी सूचना नापसंत झाली हें सांगावयास नकोच, कारण सभेंत मळेवाल्यांचे स्नेही, आप्त वगैरे फार होते. शिवाय ती सूचना प्रधानांपैकीं एकाद्यानें आणिलेली नव्हती, तर साध्या सभासदानें आणिलेली होती. पण ह्याच्यासंबंधानें असें लक्ष्यांत ठेवावयाचें कीं प्रत्येक सुधारणेच्या संबंधानें पार्लमेंतांत अशीच स्थिति होत असते; ह्मणजे तिजबद्दलची खटपट प्रधानमंडळांत नसणारेच किंवा "खाजगी" सभासद ज्यांस ह्मणतात तेच प्रथम करीत असतात, आणि लोकमताचा फार जोर होऊन प्रधानांचा अगदीं निरुपाय झाला ह्मणजे मग ते ती हातीं घेतात, आणि नंतर मग तीस यश येतें.

पुढच्या सेशनांत बक्स्टननें पुनः तोच प्रश्न सभेपुढें आणिला; तेव्हां लार्ड आल्थार्प प्रधानांच्या तर्फेनें उठून अशी तडजोड सुचवूं लागला कीं ज्या वसाहती आपल्यांतील गुलामांस चांगल्या रीतीनें वागवतील त्यांच्या साखरेवरील जकात कमी करून त्यांस तसें करण्याबद्दल उत्तेजन द्यावें. पण ही चळवळ आतां इतकी वाढलेली होती कीं लोक असल्या नरम गरम तडजोडीस कबूल होण्यासारखे मुळींच नव्हते; आणि सुधारणाग्रणी तर त्याच्यापेक्षांहि नव्हते. त्यांस गुलामगिरीची पद्धति अजीबाद काढून टाकावयाची होती, व राष्ट्राचेंहि मत तसेंच व्हावयास लागलेलें होतें.

नंतर मग प्रधानांची खात्री झाली कीं, यासंबंधानें कांहीं तरी निश्चित मार्ग स्वीकारणें आपणास अवश्य झालें आहे, आणि तो मार्ग म्हणजे गुलामगिरी काढून टाकणें हाच होय. तात्पर्य या गोष्टीचा आतां वेळ आला होता, व तो साधून घेणाराहि मनुष्य पार्लमेंटांत हजर होता. तो कोण म्हणाल तर लार्ड स्टान्ले हा होय. हा प्रधान मंडळांत असून पूर्वीं आयर्लंडच्या लार्ड लेफ्टेनंटाचा सेक्रेटरी होता, आणि आतां तो वसाहतींचा सेक्रेटरी झालेला होता. पुढें हाच गृहस्थ लार्ड डार्बी म्हणून

प्रसिद्धीस येऊन टोरीपक्षास जाऊन मुख्य प्रधान देखील बनला. पण या वेळीं हा व्हिग पक्षास असून मोठा सुधारकहि असे; आणि पार्लमेंटीय सुधारणेचें बिल पास करण्यांतहि यानें लार्ड ग्रेस फार उत्सुकतेनें मदत केलेली होती. हा ग्लाडस्टन व ब्राइट यांच्या तोडीचा वक्ता असे. तेव्हां प्रधानांनीं वसाहतींचा सेक्रेटरी या नात्यानें आणि त्याची योग्यता जाणून गुलामगिरीच्या संबंधानें त्यांचें बिल सभेंपुढें आणण्याचें काम त्याच्यावर संपविलें. तेव्हां तें पुढें आणण्याच्या प्रसंगीं त्यानें जें संभाषण केलें त्यामध्यें विचार आणि विकार यांचें कांहीं मजेदार संमेलन झालेलें होतें, त्यांतील प्रमाणशृंखला इतकी कांहीं मजबूद आणि घट्ट होती, आणि त्यांतील वक्तृत्व असें कांहीं स्फुरण उत्पन्न करणारें होतें, कीं, तें ज्यांनीं ऐकिलें त्यांस हा कांहीं जोराचें आणि व्यापक बिल पुढें आणणार आहे असें साहाजिक वाटलें. पण जेव्हां त्यानें आपली कृति प्रत्यक्ष पुढें आणिली तेव्हां सुधारकांची एक प्रकारची निराशा झाली. त्यानें बिल म्हणून पुढें न आणितां कांहीं ठराव सभेपुढें मांडिले. त्यांचें तात्पर्य गुलामगिरी एकदम रद्द न करतां पायरीपायरीनें रद्द करावी असें होतें. ह्मणजे त्यांत असें सुचविलें होतें कीं आजपासून पंधरा वर्षांनीं गुलामांस अजीबाद मुक्त करावें. तोंपर्यंत त्यांनीं असतील त्याच मळ्यांवरून काम करावें. मात्र ही मुदत जसजशी ज्यास्त भरत जाईल तसतशी त्यांच्या-वरची कैद व सक्ती हीं कमी करावीं, आणि पंधरा वर्षांनीं ते पूर्ण मुक्त व्हावे; गुलामांचीं सहा वर्षांपेक्षां लहान असणारीं मुलें व त्यांस यापुढें होणारीं मुलें यांस ही अट लागू करावयाची नव्हती; ह्मणजे ते एकदम मुक्त समजावयाचे या सर्व तडजोडीच्या मुळीं कल्पना अशी होती कीं गुलामांस एकदम मुक्त केल्यास ते अगदीं घाबरून जातील, आणि एकदम मिळालेल्या स्वातंत्र्याचें काय करावें हें त्यांस समजणार नाहीं. तात्पर्य, माणसानें पोहावयास शिकण्याच्या अगोदर पाण्यांत शिरूं नये अशा मासल्याची ही कृति होती. शिवाय, प्रधानांनीं असें सुचविलें होतें कीं गुलामांवरील सक्ती कमी केल्यामुळें व पुढें त्यांस मुक्त केल्यामुळें त्यांच्या मालकांचें जें कांहीं नुकसान

होईल तें भरून येण्यासाठीं त्यांस दीड कोटी पौंड सरकारी तिजोरींतून कर्जाऊ द्यावें.

प्रधानांनीं पुढें आणिलेले ठराव फार संकुचित आहेत असा बहुतेक सुधारकांचा समज झाला. ह्मणून बक्स्टननें अशी उपसूचना आणिली कीं गुलामगिरी एकदम रद्द करावी, आणि तीस डेनियल ओकानेलनें अनुमोदन दिलें. पण प्रधानांनीं बक्स्टनच्या मनांत असें भरवून देण्याची खटपट केली कीं बहुमताचा दुजोरा आपणास मिळावा एतदर्थ आह्मी ही तडजोड सुचविली आहे, पण आमचाहि उद्देश गुलामगिरी अजीबाद रद्द करून टाकावी असाच आहे; याकरितां तुह्मी आपली सूचना मतें घेण्यापर्यंत लांबवूं नये, तर नुसता वादविवाद करून परत घ्यावी. बक्स्टन या गोष्टीस निरुपायास्तव कबूल झाला पण ओकानेल होईना; त्यानें तिजवर मतें घेण्याचा आग्रह धरिला, आणि ती नापसंत झाली; तरी पण त्याच्या बतीनें ज्यांनीं मतें दिलीं ते अगदींच थोडके होते असें नाहीं. पुढें सरकारी बिलावर वादविवाद चालला असतां प्रधानांनीं सुधारकांच्या आणखी कांहीं सूचना कबूल केल्या; ह्मणजे पंधरा वर्षांची मुदत त्यांनीं सातांवर आणिली, आणि गुलामांना त्या मुदतींत कसें वागवावें याबद्दलहि बिलांत ज्यास्त सुधारणा केल्या. शिवाय त्यांनीं मळेवाल्यांच्या तर्फेनेंहि एक महत्वाची गोष्ट कबूल केली. त्यांच्या मित्रांनीं सरकारास असें दाखविलें कीं तुह्मी जें त्यांना कर्ज ह्मणून देणार तें त्यांना परत करतां येईल असा मुळींच संभव दिसत नाहीं. शिवाय त्यांनीं असें दाखविलें कीं त्यांनीं जिकडे तिकडे गुलामगिरी चालू असतां जर हे गुलाम पैसे देऊन विकत घतेलले आहेत, आणि तुह्मी आतां तुमचीं मनें ज्यास्त कोमळ व सुसंस्कृत झालीं ह्मणून जर ही पद्धति मोडीत आहां, तर त्याबद्दल त्यांचें पैशाचें नुकसान कां व्हावें हें समजत नाहीं. तेव्हां सरकारानें त्यांचें तें बोलणें मान्य करून त्यांस दीड कोटी पौंड कर्जाऊ देण्याच्या ऐवजीं दोन कोटी पौंड कायमचेच देण्याचें ठरविलें. यास अर्थात् थोडासा विरोध झालाच, पण शेवटीं ही सूचना कबूल झाली, आणि नंतर मग हें बिल

फारसा विरोध न होतां दोन्ही सभांतून पार पडून अखेरीस त्यास राजाची सम्मति मिळाली (आगस्ट, १८३३). ही सम्मति त्यानें मोठ्या खुशीनें दिली असें नाहीं, कारण तो ह्या गोष्टीच्या अगदीं विरुद्ध होता. तथापि प्रधानांनीं फारच ओढून धरल्यास शेवटीं त्यांच्या म्हणण्यास रुकार द्यावयाचा हा जो त्याच्यांत एक गुण होता त्याचा उपयोग याही प्रसंगीं झाला, आणि एक मोठी अन्यायाची व क्रूरपणाची चाल मोडून गेली.

पुष्कळ वसाहतींनींही या वेळीं मोठा शहाणपणाच दाखविला; कारण त्यांनीं सात वर्षांच्या मुदतीचा फायदा कांहीं एक न घेतां गुलामांस एकदम मुक्त केलें. कोठें कांहीं दंगा धोपा, किंवा गडबड, किंवा खून वगैरे कांहीं एक झालें नाहीं. आतां आह्मांला या गोष्टी अगदीं सामान्यशा वाटतात; पण या गोष्टींत इंग्लिश लोकांनीं मोठी भूतदया आणि मोठें औदार्य दाखविलें यांत बिलकुल शंका नाहीं. कारण यानंतर किती वर्षें तरी युनैटेड-स्टेट्सूच्या संस्थानांत गुलामगिरी तशीच राहिली होती, आणि तीस निघण्यास शेवटीं यादवी युद्ध करावें लागलें तेव्हां ती मोडली. यावरून इंग्लिश लोकांच्या या कृत्याचें महत्त्व चांगलें ध्यानांत येणार आहे.

ज्यावर्षी हा वसाहतींतील गुलामगिरीच्या विरुद्ध कायदा पसार झाला त्याचवर्षी जीस घरगुती गुलामगिरी म्हणतां येईल अशा एका पद्धती विरुद्ध कायदा पास झाला. तो कायदा ह्मणजे गिरण्या व इतर कारखाने यांतून काम करणाऱ्या मजुरांच्या संबंधानें होय. हे कारखाने आलीकडेच विशेष वाढत चाललेले होते, आणि त्यांच्या वाढींत व्यत्यय येऊं नये म्हणून कारखानदार आणि कामकरी यांच्या परस्परव्यवहारांत हात घालणें योग्य नाहीं अशा प्रकारची एक सामान्य समजूत बनून गेलेली होती. हल्लीं हा सर्व वाद मिटून गेलेला आहे, आणि असें ठरून गेलेलें आहे कीं कामकऱ्यास मालकापासून आपलें संरक्षण करतां येत नाहीं अशी जेथें स्थिति असेल तेथें कायद्यानें कामकऱ्याच्या संरक्षणार्थ त्यांच्या व्यवहारांत हात घातला पाहिजे. पण ही हल्लींची गोष्ट आहे. आह्मी ज्या वेळासंबंधानें

एथें बोलत आहों, त्या वेळीं मोठाल्या कारखान्यांतून मजुरांनीं किती तास काम करावें किंवा कोणत्या अटींवर करावें याबद्दल कांहींएक निर्बंध नव्हता. कारखान्यांची ही पद्धत सामान्यतः नवीच असल्यामुळें त्यांत काम करणारीं पुरुष, बायका, आणि मुलें यांस कारखान्याचे मालक आपल्या अकले-प्रमाणें आणि मर्जीप्रमाणें वागवीत असत. यास कारण अर्थात् मजुरांची संख्या फार असे, आणि धंदे कमी असत. आतां मालक सदय अंतः-करणाचा किंवा न्यायी किंवा निदान दूरदृष्टि असला तरी तो आपल्या मजुरांस न्यायानें वागवीत असे, आणि त्यांची प्रकृति बिघडून जाईल किंवा त्यांस त्रास होईल अशा रीतीनें त्यांच्याकडून काम घेत नसे. पण तो जर आपस्वार्थी किंवा निष्काळजी माणूस असेल तर तो आणि त्याच्या हाताखालचे लोक हे मजुरांस तीं केवळ फायद्याचीं यंत्रें या दृष्टीनें वागवीत असत; मग ते लवकर थकून जातील किंवा अशक्त होतील याबद्दल मुळींच पर्वा करीत नसत. कारण जुने मजूर थकल्यास पाहिजे त्या अटींवर त्यांचें काम पत्क-रण्यास नवे मजूर पाहिजे तितके तयार असतच. लार्ड आश्लेनें हा सर्व विषय कामन्ससभेपुढें आणिला; तेव्हां कारखान्यांत काम करणाऱ्या पुरुष, स्त्रिया व मुलें यांच्या स्थितीची चवकशी करण्याकरितां एक कमिशन नेमलें. त्या कमिशननें लवकरच पुष्कळ माहिती गोळा केली. त्यावरून असें दिसून आलें कीं स्त्रिया व मुलें यांची स्थिति सुधारण्यासाठीं कांहीं तरी कायद्याचें बंधन करणें अवश्य आहे. त्याप्रमाणें १८३३ सालीं पार्लमेंतानें एक कायदा पसार केला; त्यांत लार्ड आश्लेच्या मर्जीप्रमाणेंच सर्व बंदोबस्त केला होता असें नाहीं, तरी या कामांत कायद्याला हात घालण्याचा हक्क आहे ह्या तत्त्वाची कायद्यानें स्थापना झाली. त्यांत मुलांच्या संबंधानें असें ठरविलें होतें कीं त्यांना रोज आठ तासांच्यावर काम सांगूं नये; आणि अठरा वर्षांच्या आंतील तरुण माणसांस आठवड्यांतून ६९ तासांवर काम देऊं नये. कारखानेविषयक सुधारणेचा हा कायदा ह्मणजे केवळ प्रारंभ होय.

लार्ड आश्लेचाच पुढें लार्ड शाफ्टस्बरी बनला, आणि त्यानें आपलें सर्व दीर्घ आयुष्य कामकऱ्यांचीं दुःखें व कष्ट कमी करण्यांत घालविलें. तो

मोठासा मुत्सद्दी होता असें नाहीं, त्याला अतिशय किंवा बहुविध माहिती होती असेंहि नाहीं, तो मोठा पंडित होता असें नाहीं, तो मोठा वक्ता होता असेंहि नाहीं; किंवा तो मोठा तत्त्वविवेचक होता असेंहि नाहीं. पण जें तत्त्व मोठाल्या तत्त्वज्ञांच्याहि लक्ष्यांत तोंपर्यंत आलें नव्हतें तें त्यानें जणूंकाय आपल्या उपजतबुद्धीच्या जोरावर शोधून काढिलें होतें. त्याच्या कारकीर्दीचा इतिहास ह्मणजे आलीकडच्या कारखान्यांच्या सुधारणेचाच इतिहास होय. कारण कारखाने आणि खाणी ह्यांतून खपणाऱ्या लोकांच्या शिक्षणाकरितां आणि संरक्षणाकरितां तो एकामागून एक खटपटी करीत होता, व त्यांत त्यास यशहि आलें.

ह्या कायद्याबरोबर कारखान्याच्या संबंधानें आणखी दोन सुधारणा अमलांत आणिल्या. एक ही कीं कारखान्यांतून कामें कशीं काय चालतात, व त्यांत काय काय सुधारणा करतां येण्यासारख्या आहेत हें सरकारास कळविण्याकरितां, आणि प्रस्तुत कायद्याची अंमलबजावणी बरोबर होत आहे किंवा नाहीं. हें पाहण्याकरितां कांहीं गिरण्यांच्या इनस्पेक्टरांची किंवा तपासणीदारांची नेमणूक करण्यांत आली. दुसरी सुधारणा ही कीं कारखान्यांतून मुलांचा कांहीं वेळ शिक्षणाकडे खर्च करावा, अशी व्यवस्था करण्यांत आली. तेणेंकरून मुलें ही केवळ माल तयार करण्याचीं आणि मजुरी मिळविण्याचीं यंत्रेंच आजपर्यंत समजलीं जात, त्यांत सुधारणा होऊन, त्यांना योग्य असें शिक्षण मिळून त्यांच्या बुद्धी विकास पावण्याचें साधन प्राप्त झालें. पुढें पुष्कळ वर्षांनीं ( १८७० सालीं ) जा राष्ट्रीय शिक्षणाची पद्धति इंग्लंदांत सुरू झाली त्याचा हा प्रारंभच समजला असतां चालेल. लार्ड आश्लेच्या हातून अद्यापि पुष्कळ मोठाल्या कामगिऱ्या व्हावयाच्या होत्या, पण त्या जरी झाल्या नसत्या तरी एवढ्यावरून देखील त्याचें नांव चिरस्मरणीय झालें असतें. सुधारलेल्या पार्लमेंताला अद्यापि पुष्कळ गोष्टी करावयाच्या होत्या; पण या कृतीवरून त्यानें सुरवात बरी केली आहे असें स्पष्ट दिसत होतें, आणि पुढें तें जें उत्तम काम करणार होतें, त्याचा हा चांगलाच पूर्वमासला होता.

---

## प्रकरण बत्तिसावें.

# आयर्लंदांतील सरकारी धर्मसंस्था.

या वेळीं आयर्लंदांतील सरकारी धर्मसंस्थेविषयींचा प्रश्न पुढें आला. ही धर्मसंस्था इंग्लिश लोकांनीं विजेते ह्मणून आयर्लंदावर लादलेली होती. आयर्लंदांतील पांच षष्ठांश प्रजा रोमन क्याथलिक धर्माची असून तिला आपल्या धर्माचा फार मोठा अभिमान असे. पण ही सरकारी संस्था प्राटेस्टंट धर्माची होती, आणि तिचा फायदा बाकीच्या एक षष्ठांश प्रजेला देखील होत नसे. तरी तिचा खर्च सर्व प्रजेवर लादला जात असे. या धर्मसंस्थेला एक विशेष हक्क असा असे कीं तिच्यांतील धर्मोपदेशकांच्या पोषणाकरितां शेतकऱ्यांपासून त्यांच्या शेताच्या उत्पन्नाचा एक दशांश घ्यावा. आतां आयर्लंद हा बहुतेक शेतीचाच देश आहे, आणि आयर्लंदाचे लीस्टर, मन्स्टर, अल्स्टर आणि कनॉट हे जे चार भाग किंवा प्रांत त्यांतील अल्स्टर खेरीज करून बाकीच्या तीन प्रांतांतील शेतकरी कॅथालिक असून ते आपल्याच देवळांतून प्रार्थना करीत असत. त्यांचा प्राटेस्टंट देवळांशीं कांहीं एक संबंध नसे. ह्मणून ते हा दशांश देण्यास सहजच अगदीं नाखुश असत. ह्मणून असा हा कर जबरीनें सरकार आपल्याकडून घेतें ही एक त्यांची कुरकूर होती; आणि ती विचार करून पहातां अगदीं योग्यच होती. कारण त्यांस आपल्या धर्मसंस्था खाजगी रीतीनें पाळाव्या लागत असून शिवाय ही परकी संस्था, जीस ते पाखंडी ह्मणून समजत ती जबरीनें पाळावी लागत असे.

याचा परिणाम असा होत असे कीं हा दशांश देणारे आणि तो वसूल करणारे यांमध्यें एक प्रकारची यादवी नेहमी आयर्लंडांत चालू असे. कधीं कधीं हा विरोध फारच शिखरास जाई. कारण शेतकरी जमाव करून दशांश देईनासे झाले ह्मणजे तो वसूल करणारांबरोबर सरकार

शिपाई पाठवी; आणि नंतर मग दोन्ही पक्षांची शुद्ध लढाईच जुंपत असे. ह्या लढायांतून भरपूर रक्तस्राव होई, आणि ही गोष्ट इतकी नेहमीची झाली होती कीं त्याबद्दल कोणास कांहीं विशेष वाटत नसे. सिडने स्मिथ एकदां असें ह्मणाला कीं या दशांश वसूलाचे बाबतींत आयर्लंडांत निदान दहा लाख माणसें मेलीं असतील. पोलीस, पायदळ, आणि घोडेस्वार यांना याप्रमाणें नेहमीच हा उद्योग करावा लागत असे; आणि पुनः इतकें करून कांहीं सांगण्यासारखा फायदा होत असे असेंहि नाहीं. कारण अशा रीतीनें शेतकरी आणि त्यांचे मित्र यांच्याशीं लढाई करून पोलिसानें शेतकऱ्यांचीं गुरें ढोरें एकदां पकडलीं, आणि तीं लष्करी बंदोबस्त करून एकदां जबरीनें मार्किटांत नेलीं, ह्मणजे तेवढ्यानें कांहीं धर्मोपदेशकाचा फायदा होत नसे. कारण गुराढोरांचा त्याला स्वतः कांहीं फारसा उपयोग होण्याचा संभव नसे. तेव्हां तीं दुसऱ्या कोणाला तरी विकलीं पाहिजेत. पण तीं घेणार कोण ? पोलीस आणि लष्कर तर घेत नाहींत ना ? बरें, गांवांतील लोक तर सगळे एक असल्यामुळें कोणी तिकडे ढुंकूनहि पहावयाचा नाहीं. धर्मोपदेशकाचा गांवांतील एकादा स्नेही कदाचित् तयार झालाच तर त्यास गांवांतील इतर लोक नको नकोसें करावयाचेच. अशी स्थिति असे. कधीं कधीं गुरांचें सार्वजनिक लिलांव झालें तर दुसऱ्या कोणाची पुढें येण्याची छाती किंवा इच्छा नसल्यामुळें त्यांचा मालकच तीं स्वल्प किमतीला पाडून घेई, आणि मग तीं आनंदानें घरीं परत घेऊन जाई; इकडे धर्मोपदेशकास मुकाट्यानें चुरमुरे खात घरीं जावें लागे. अशा रीतीनें शेतकऱ्यांनीं मुकाट्यांनीं विरोध मांडिला होता; आणि असलाच विरोध मांडणें ज्यास्त कठीण असतें. शेतकरी जर प्रत्यक्ष दंगा करावयास लागते, तर त्यांजवर पोलीस किंवा लष्कर पाठवून त्यांचा बंदोबस्त सहज करतां आला असता; कारण थोड्याशा गोळ्या घातल्या ह्मणजे झालें. पण लोक जर करच देण्यास नाकारूं लागले, तर तेथें काय करावयाचें? प्रत्येक प्रांतांत कित्येक कॅथलिक असे असत कीं ते या सगळ्या गोंधळांत पडण्यापेक्षां मुकाट्यानें प्राटेस्टंट धर्मोपदेशकांस दशांश देते. पण त्यांना

त्यांच्या शेजाऱ्यांचा त्रास सोसेनासा होई. कारण पुष्कळांपुढें थोड्यांचें काय चालतें ? ते त्यांस नको नकोसें करीत. या वेळीं आयर्लंडांत राजकीय कामाबद्दल सार्वजनिक सभा भरणें कायद्याविरुद्ध असे; तरी या दशांशाविरुद्ध त्या देशांत मोठाल्या सभा भरत. त्या बाहेरून एक प्रकारचा खेळ खेळण्यासाठीं ह्मणून भरत. पण त्यांचा उद्देश दशांशासाठीं गुरें धरलीं जाऊं नयेत हा असे. कारण जेथें अशी धराधर होण्याची बातमी असेल त्याच्या शेजारींच अशी गर्दी जमे; आणि मग त्यांच्या समक्ष ही धराधर करण्याची तेथील अल्प पोलीसास छाती होत नसे.

आतां ही दशांश पद्धति ह्मणजे सगळ्याच प्राटेस्टंट धर्मोपदेशकांस पसंत होती असें नाहीं. पुष्कळ धर्मोपदेशकांस ती क्याथलिकांइतकीच नापसंत असे. त्यांत कित्येक गरीब धर्मोपदेशक देखील असत. ते हा दशांश अशा जुलमानें वसूल करण्यापेक्षां गरीबींतच राहण्यास तयार होत. इंग्लदांतील प्रसिद्ध धर्मोपदेशक सिड्ने स्मिथ हा त्याच्या विरुद्ध होता, हें वर सांगितलेंच. तो फार विनोदी लेखक व भाषक असे. तो एकदां असें ह्मणाला होता कीं, "ह्यासारखा अन्याय सगळ्या यूरोपांत नसेल, सगळ्या आशियांत नसेल, आफ्रिकेच्या शोधून काढिलेल्या सगळ्या भागांत नसेल, आणि तिंबक्तूबद्दल जें कांहीं आपण ऐकतों त्यांतही नसेल." हें त्याच्या नेहमींच्या विनोदी सरणीस अनुसरून होतें, पण खरोखर पाहतां त्याच्यांत कांहीं एक अतिशयोक्ति नव्हती. मोठमोठाले इंग्लिश लेखक आणि भाषक ह्या पद्धतीचा निषेध करूं लागले होते. मेकाले तर तिला सिडने स्मिथ इतक्याच शिव्या देई आणि प्रसिद्ध इतिहासकार ग्रोट जो या वेळीं पार्लमेंटचा सभासद होता तो तर या दशांशपद्धतीसच केवळ नव्हे तर सगळ्याच आयरिश धर्मसंस्थेस शिव्या देई. पुढें गेलेल्या कांहीं सुधारकांनीं तो प्रश्न पार्लमेंतापुढें कित्येक वेळां आणिला होता; आणि आतां तर आयर्लंदांत त्या संबंधानें जे दंगे होत त्यांच्या बातम्या तिकडील अधिकाऱ्यांकडून वरच्चेवर येऊं लागल्यामुळें हा विषय पार्लमेंताच्या नजरेपुढें दर आठवड्यासच यावयास लागला होता.

लार्डांच्या सभेनें ह्या सगळ्या प्रश्नाचा विचार करण्याकरितां एक कमिटी नेमिली होती त्या कमिटीनें असा रिपोर्ट केला कीं, ही एकंदर दशांशपद्धति मोडून टाकणें जरूर आहे, आणि तें आयर्लंदच्याच फायद्यासाठीं नव्हे तर धर्मसंस्थेच्याही फायद्यासाठीं होय. त्याबद्दल त्यांनीं अशी सूचना केली कीं हा दशांश शेतकऱ्यांपासून किंवा कुळांपासून वसूल न करतां जमीनदारांपासून करावा. तेव्हां जमीनदार अर्थात् कुळापासून जास्त सारा घेणार हें ठरलेंच. इकडे कामन्स सभेनेंही या विषयाच्या संबंधानें एक कमिटी नेमिली होती तिनेंही असाच रिपोर्ट केला.

तेव्हां सरकारानें तो प्रश्न हातीं घेतला, आणि १८३२ त लार्ड आल्थार्पनें असें जाहिर केलें कीं या प्रश्नाचा तात्पुरता निकाल करण्यासाठीं एक कृप्ति सध्यां पुढें आणावी, आणि नंतर कायमचाच निकाल होईल असें कांहीं बिल सभेपुढें आणावें असा प्रधानांचा विचार आहे. प्रधानांची ही कृप्ति अशी होती कीं ज्या धर्मोपदेशकांना त्यांचा योग्य दशांश मिळाला नसेल त्यांना सरकारनें कांहीं पैसे द्यावे; आणि नंतर धारण करणारांपासून हें ओझें निघून जमीनदारांच्या डोक्यावर बसेल अशी कांहीं योजना करावी. तात्पर्य प्रधानांनीं असें कबूल केल्यासारखें केलें कीं सध्या आपल्यास कांहीं योग्य उपाय सुचत नाहीं; पुढें आपण त्याचा योग्य विचार व तोपर्यंत मागची बाकी चुकती करून देऊन राहिलेला वसूल करण्याची खटपट करूं. सारांश, दशांश वसुलाचें काम इतके दिवस जें धर्मोपदेशकांकडे होतें तें आतां सरकारानें आपल्या शिरावर घेतलें; त्यांत त्यांस फारसा जय आला नाहीं हें सांगावयास नकोच कारण सरकार तरी वसूल कसा करणार? ते पोलिसाची आणि सोजिरांचीच मदत घेणार, आणि त्यापासून काय निष्पन्न होतें, तें मागें आपण पाहिलेंच. मागणी धर्मोपदेशकांकडून येण्याच्या ऐवजीं लार्ड लेफ्टेनंटाकडून आली ह्मणून शेतकरी ती ज्यास्त मान्य करतील असें थोडेंच होतें.

दिवसें दिवस असें जास्त जास्त व्यक्त होऊं लागलें कीं आयर्लंदांतील सगळ्याच सरकारी धर्मसंस्थेच्या प्रश्नाचा निकाल लावल्याखेरीज या दशांशाच्या प्रश्नाचा योग्य निकाल लागणें नाहीं; कारण एक प्रश्न दुसऱ्याचा केवळ अंगभूत होता. या वेळेला देखील पार्लमेंतांत बुद्धिमान् आणि दूर दर्शी लोकांचा एक पक्ष असा बनावयास लागला होता कीं त्यांना आयर्लंदांत प्राटेस्टंट चर्च सरकारी खर्चानें चालविणें ह्मणजे शुद्ध अन्याय व अनुचित गोष्ट होय असें स्पष्ट दिसू लागलें होतें. ता. २७ मे १८३४ रोजीं हेन्री वार्ड नांवाच्या एका फार विचारी व पुढें गेलेल्या सुधारकानें आयर्लंदांतील सरकारी चर्च व त्याचें उत्पन्न याजवर कामन्ससभेपुढें वादविवाद सुरू केला. हा हेन्री वार्ड याच पार्लमेंतांत प्रथम निवडून आलेला होता. पुढें कांहीं दिवस अयोनियन बेटें इंग्लंदच्या ताब्यांत होतीं तेव्हां यास तेथील सुभेदार नेमिलें होतें पण त्याचें नांव सध्यांच्याच यत्नाच्या संबंधानें इतिहासांत जिवंत राहणार आहे. त्यानें जो ठराव आतां सभेपुढें आणिला, त्यांत इतकेंच ह्मटलें होतें कीं आयर्लंदांतील सध्याचें प्राटेस्टंट धर्मखातें तेथील प्राटेस्टंट प्रजेच्या जरूरीपेक्षां जास्त आहे, ह्मणून त्या खात्यास लावून दिलेलें उत्पन्न कमी करावें, आणि पार्लमेंताच्या सल्ल्याप्रमाणें असें करणें हा सरकारचा हक्क आहे. पण यामध्यें महत्त्वाची गोष्ट ही होती कीं प्राटेस्टंट धर्मखातें प्राटेस्टंटांकरितांच आहे ह्या तत्त्वाची त्यामध्यें गोंवणी झाली होती. कारण त्या खात्यासंबंधानें आजपर्यंतची कल्पना अशी होती कीं तें आयर्लंदांतील कॅथलिकांस प्राटेस्टंट बनविण्यासाठीं स्थापिलेलें आहे. ह्या गोष्टीची आयरिश लोकांस अर्थात् मोठी चीड होती. यानंतर कांहीं वर्षांनीं, जो मुत्सद्दी पुढें ही संस्था मोडून टाकणार होता त्यानें आपल्या अगदीं पहिल्या ग्रंथांत असें प्रतिपादन केलें कीं आयर्लंदांत जितके प्राटेस्टंट कमी असतील तितका तेथें त्या धर्मसंस्थेवर सढळ हातानें खर्च करण्याची जास्त जरूरी आहे; कारण तितकी इतर प्रजेस प्राटेस्टंट बनविण्याची आवश्यकता जास्तच वाढते. असो. हेन्री वार्डनें ह्या वेळच्या आपल्या संभाषणांत असें स्पष्ट

करून दाखविलें कीं आयर्लंदांत हल्लीं जे दंगेधोपे होत आहेत त्यांस कारण ह्या दशांशाचा वसूल हाच होय. त्यानें प्रत्यक्ष आंकडे घेऊन असें सिद्ध करून दाखविलें कीं हा दशांश देण्यास केवळ तेथील कॅथलिकच नाखुश आहेत असें नाहीं, तर डिसेंटर्सहि तितकेच नाखुष आहेत; आणि हा विरोध जो उत्तर आयर्लंदांत ( प्रॉटेस्टंट वस्तीच्या अल्स्टर प्रांतांत ) आजपर्यंत फारसा दिसत नव्हता तो आतां दिसूं लागला आहे. त्यानें असेंहि दाखविलें कीं इंग्लंदास हिंदुस्थानचें राज्य संभाळण्यासाठीं जितकें सैन्य ठेवावें लागतें त्यापेक्षां आयर्लंदांत हा दशांश वसूल करण्याकरितां जास्त ठेवावें लागत आहे; आणि इतकें असूनहि वसूल बरोबर होत नाहीं तो नाहींच. शिवाय त्यानें असेंहि दाखविलें कीं तेथील धर्मखात्याच्या उत्पन्नाची वांटणी कोणत्याहि न्याय्य व योग्य तत्त्वावर केलेली दिसत नाहीं; कारण वरवरच्या कांहीं धर्माध्यक्षांस अतिशय उत्पन्न लावून दिलेलें आहे; ते वस्तुतः काम कांहींच करीत नाहींत; आणि जे गरीब बिचारे लहानसहान धर्मोपदेशक खरें काम करितात, त्यांस निर्वाहापुरतेंहि उत्पन्न मिळत नाहीं. शिवाय हे वरिष्ट धर्माधिकारी दोन दोन हजारांचें वार्षिक उत्पन्न खाऊन पुनः आयर्लंदांत हजरहि नसत; तर लहानसहान क्यूरेटांकरून ते काम करीत; आणि त्यांस तर वीसांपासून साठ पौंडापर्यंत कायतो (वार्षिक) पगार असे. तात्पर्य, त्याचें सर्व भाषण सुधारलेल्या पार्लमेंताच्या विचारी सभासदांच्या मनावर ठसा उत्पन्न करण्यासारखें होतें.

ह्या सूचनेस अनुमोदन देणारा मनुष्य फार विलक्षण असून त्यानें भाषणहि विलक्षणच केलें होतें. ग्रीस देशाचा उत्तम इतिहास लिहून पुढें प्रसिद्धीस येणारा जार्ज ग्रोट हा या वेळीं पार्लमेंतांत नवीनच शिरलेला होता. ज्यांस त्या वेळीं फिलासफिकल राडिकल्स किंवा तत्त्वज्ञ राडिकल असें ह्मणत अशा थोडक्या लोकांपैकीं तो एक होता. तो बेन्थामचा शिष्य होता. बाप लेंक मिल्ल यांचा तो मित्र व सहकारी होता. त्याचा धंदा सावकारीचा असे; त्याचा व्यासंग ग्रंथकर्तृत्वाचा असे; आणि तो कर्तव्य समजून पार्लमेंताचा सभासद बनलेला होता. त्याचीं मतें किंवा त्यानें

काढिलेले सिद्धान्त जरी कधीं कधीं चुकीचे असले, तरी त्याची विचार करण्याची दिशा बर्क बद्दल मेकाले ह्मणाला त्याप्रमाणें नेहमीं शुद्ध असे. कोणतीही कायद्याची योजना योग्य किंवा अयोग्य ठरवावयाची ती, तिजपासून समाजाचें शिक्षण, त्याचें सुख शांतता यांत भर पडेल किंवा कमतरता येईल हें पाहून तो ठरवीत असे. मतदारांनीं मतें गुप्तपणें द्यावीं असें आग्रहपूर्वक प्रतिपादणारांपैकीं तो एक होता, आणि तो थोडकीं वर्षें पार्लमेंतांत होता तोंवर दर वर्षी त्यासंबंधानें तो कामन्स सभेपुढें सूचना आणीत असे. तो जरी मोठासा बोलका नव्हता तरी त्याच्या भाषणाचा सभेवर नेहमीं ठसा उमटत असे. त्याची भाषणसरणी ह्मटली ह्मणजे टाळ्या मिळविण्याची किंवा मतें मिळविण्याची नसे; तर मिल्लप्रमाणेंच मनांतल्या मनांत विचार करण्याच्या ऐवजीं मोठ्यानें विचार करण्याची असे. ग्रोटनें आपल्या भाषणांत एक विशेष गोष्ट व्यक्त केली. जे लोक आयर्लंदांतील प्राटेस्टंट चर्च मोडून टाकण्याच्या विरुद्ध असत त्यांपैकीं कांहीं ह्या मुद्यावर विरुद्ध असत कीं तेथील तो चर्च मोडिल्यास तेणेंकरून इंग्लंदांतील प्राटेस्टंट चर्चास ही भीति उत्पन्न होईल. ग्रोटनें असें स्पष्ट करून दाखविलें कीं, ही भीति अगदीं निराधार आहे; कारण ज्या मुद्यावर इंग्लंदांत प्राटेस्टंट धर्मसंस्था असणें योग्य त्याच मुद्यावर ती आयर्लंदांत असणें गैर ठरतें. इंग्लंदांत प्राटेस्टंटाची वस्ती अतिशय असल्यामुळें तेथें तो चर्च असणें ठीकच आहे. आयर्लंदांत क्याथलिक व डिसेंटर्स वगैरे वजा करतां एक बारांश प्रजा प्राटेस्टंट असेल नसेल. तेव्हां तेथें तो योग्य कसा ठरावा ?

ह्या सर्व वादविवादानें सरकार ( प्रधानमंडळ ) अगदीं घाबरून गेलें. लार्ड ग्रे हा थंडा व धिमा सुधारक होता. तो राडिकल लोकांची सगळीच घाई पाहून अगदीं गोंधळल्यासारखा झाला. तरी पण कांहीं तरी करणें जरूर होतें. त्यास कांहीं अगदीं जुन्या पद्धतीच्या टोरीप्रमाणें या बाबतींत मुळींच नको सुधारणा असें ह्मणण्याची सोय नव्हती. पण इकडे कांहीं करावें तर कांहीं प्रधान घाबरणार; आणि त्याप्रमाणें झालेंच. लॉर्ड स्टान्ले आणि

सर जेम्स ग्रेहाम यांनीं आपल्या जाग्यांचे राजीनामे दिले. यानंतर ग्रेहाम कांहीं लिबरल प्रधानमंडळांतून शिरला, पण स्टान्ले मात्र एव्हांपासून पक्का टोरी बनला. पार्लमेंतीय सुधारणेच्या संबंधानें तो यापूर्वी व या पुढेंहि लिबरल मताचा असे, इतर सर्व बाबतींत अस्सल टोरी. या ठिकाणीं ही गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे कीं राडिकल पक्ष ह्मणून जो लिबरलपक्षापासून भिन्न पक्ष बनला तो एव्हांपासून होय. सुधारणाबिलानें जसे टोरी आणि व्हिग यांचे लिबरल आणि कान्सर्व्हेटिव्ह बनले, तसे आयरिश चर्चच्या संबंधानें झालेल्या वादविवादांमध्यें व्हिगांचे लिबरल आणि राडिकल बनले.

इकडे गरीब बिचारा वृद्ध विलियम राजा आयरिश धर्मसंस्थेवर होणारे जे हे हल्ले त्यांनीं अगदीं चिंताक्रान्त होऊन गेला होता. विलियम राजाच्या ठिकाणीं एक प्रकारची साधी धर्मभक्ति असे; आणि डाक्टर जान्सन एका गृहस्थासंबंधानें ह्मणे तशी त्याची कदाचित् स्थिति असे. ह्या गृहस्थाच्या अंगीं इतर कांहींहि दोष असोत, तो कोणत्याहि देवळावरून गेला ह्मणजे टोपी उचलल्याखेरीज कधीं रहात नसे. विलियमराजास आयरिशचर्चबद्दल किती माहिती होती कोणास ठाऊक; पण तो चर्च आहे या दृष्टीनें त्याला पाहून टोपी उचलीत होतासें दिसतें; इतकेंच नव्हे तर त्याच्या पाठीस इतके शत्रू लागले आहेत हें पाहून तो अश्रू देखील ढाळी. त्यानें आपल्या एका वाढदिवशीं, आयरिश चर्चच्या बिशपांचें एक डेप्युटेशन आलें होतें त्याची भेट घेतली, आणि त्यांस असें आश्वासन दिलें कीं कांहीं झालें तरी त्या चर्चास त्याच्या पाखंडी शत्रूच्या हवालीं मी कधीं करणार नाहीं. तो ह्मणाला मी आतां वृद्ध होत चाललों आहें आतां माझी वेळ लवकर यावयाची आहे, तेव्हां आतां प्राटेस्टंट राजा या नात्यानें जीं माझीं कर्तव्यें त्यांव्यतिरिक्त मला कांहीं एक करावयाचें राहिलेलें नाहीं; आणि आतां माझ्या डोळ्यांतून जे अश्रू गळत आहेत ते खरोखरच दुःखाचे अश्रू आहेत. असें होतें तरी प्रधानांबरोबर या बाबतींत तो कांहीं भांडला नाहीं, आणि ते जे जे कागद त्यासंबंधानें आणीत त्यांजवर तो मुकाट्यानें सही करी,

आणि अश्रू ढाळून ती कधीं पुसून टाकीत नसे. ड्यूक आव् कंबर्लंद देखील आयरिश चर्चच्या बाजूनें शेवटपर्यंत भांडत होता, आणि त्याच्या संबंधानें लार्डांच्या सभेनें जे कांहीं ठराव पास केले त्या विरुद्ध आपल्या मतांची सभेच्या कागदपत्रांत नोंद करतांना त्यानें असें नमूद केलें कीं राजानें असल्या ठरावांना संमति देणें ह्मणजे अभिषेकाच्या वेळीं घेतलेल्या शेपथेच्या विरुद्ध वागणें आहे. हा शपथेचा बागुलबुवा तिसऱ्या जार्जाच्या वेळीं वरचेवर दाखविण्यांत येत असे. पण तो जीवंत करण्यास कंबर्लंद फारसा योग्य नव्हता. असो. यावेळीं प्रधानांनीं इतकेंच केलें कीं दशांशाच्या ओझ्याच्या संबंधानें व तो वसूल करण्याच्या संबंधानें चवकशी करण्यासाठीं त्यांनीं एक कमिशन नेमण्याचें कबूल केलें. ह्यापलीकडे ते ह्या वेळीं गेले नाहींत; आणि पुढें जो दशांशविषयक प्रश्नाचा निकाल लागला तो इंग्लंदसंबंधानें आधीं लागला, व मागून आयर्लंदसंबंधानें लागला.

---

## प्रकरण तेतिसावें.

# गरीबाच्या कायद्याची सुधारणा.

हा काळ सुधारणेचा असल्यामुळें लार्ड ग्रेच्या प्रधानमंडळास आणखीहि दिशांनीं सुधारणा करणें भाग पडत होतें. वसाहतींतील गुलामगिरी मोडून टाकणें, कारखान्यांतून काम करणारांच्या स्थितीची सुधारणा करणें, आणि दशांश वसूल करण्याची पूर्वींपेक्षां कांहीं बरी पद्धति ठरविणें, इतक्या सुधारणा आतांपर्यंत होऊन गेल्या होत्या. आतां गरीबाच्या कायद्याची सुधारणा करण्याची वेळ येऊन ठेपली होती. ह्या संस्थेची स्थिति इंग्लंदांत सर्वत्र अशी कांहीं शोचनीय झाली होती कीं तिजकडे तेथील पुष्कळ परोपकारी, विचारी आणि व्यवहारज्ञ माणसांचें लक्ष्य जावयास लागलें होतें. इलिझाबेथ राणीच्या कारकीर्दींत जो गरीबांचा कायदा प्रथम पास झालेला होता त्याच्याच सामान्य तत्त्वावर आजपर्यंत गरीबांस मदत करणाऱ्या संस्था मदतीचें काम करीत होत्या. तें तत्त्व हें होतें कीं जे जे गरीब लोक आश्रयास पात्र असतील त्यांस मुख्य सरकारनें किंवा निदान गांवअधिकाऱ्यांनीं साहाय्य करणें हें त्यांचें कर्तव्य होय. ह्मणून अशा योग्य गरीबांस मदत करण्याचें काम गांवचीं कामें पाहणारे जे धर्माधिकारी आणि म्याजिस्ट्रेट त्यांजकडे आलेलें होतें. यासाठीं गांवच्या लोकांवर एक विशिष्ट कर बसविला जात असे, आणि कोणास किती मदत करावयाची हें गांवांतील वजनदार गृहस्थ ठरवीत असत. पण लोकमताचा जिच्यावर दाब राहील अशी ह्या कामासाठीं एकादी नियमित कमिटी किंवा मंडळी नेमिलेली किंवा निवडलेली नसे, किंवा गांवचें अथवा जिल्ह्याचें लोकमत समजण्याचा योग्य मार्गहि नसे. त्यामुळें हलवायाच्या दुकानावर कृष्णार्पण अशा प्रकारचा परोपकार सहजच फार माजला होता. बायका किंवा पुरुषांनीं जाऊन आपण फार विपत्तींत आहों असें ह्मणण्याची फुरसत कीं, लागलाच गांवांतील कोणी तरी वजनदार गृहस्थ त्यांना मदत करावी ह्मणून ग्रामाधिकाऱ्यांवर हुकूम सोडीत

असे; आणि आपण मोठें परोपकाराचें कृत्य केलें, ह्मणून संतोष मानीत असे. ही मदत दोन तऱ्हांनीं करण्याची रीत असे. एक कंगाल माणसास द्रव्याच्या किंवा धान्याच्या रूपानें मदत करणें, आणि दुसरें, त्याला ठेवून घेऊन त्याच्या करवीं काम करवून त्यास खावयास घालणें. एका पद्धतीस "औट डोर रिलीफ" किंवा सुकी भिक्षा असें ह्मणत असत, आणि दुसरीस " इंनडोर रिलीफ " किंवा गृहभिक्षा ह्मणत असत. या गृहास वर्कहौस किंवा कार्यगृह ह्मणत, व तें वस्तुतः तुरंगासारखेंच असे. एकदां माणूस किंवा कुटुंब ही मदत मिळवावयास लागलें, ह्मणजे त्याचा तो एक हक्कच बनून जात असे; आणि तो एकाच पिढीला नव्हे तर पिढ्यानुपिढ्याहि चालत असे. अशा रीतीनें ह्या भिक्षेच्या जातीच्या जातीच देशांमध्यें उत्पन्न होऊं लागल्या; कारण एका भिक्षेकरी कुटुंबापासून अनेक भिक्षेकरी कुटुंबें उत्पन्न होऊं लागलीं. अशा रीतीनें आळस आणि निरुद्योग हे भिक्षेकरी बापापासून भिक्षेकरी मुलांच्या अंगीं उतरूं लागले. सामान्य प्रतीच्या माणसास उद्योग किंवा दृढ प्रयत्न करण्यास कांहींच जरूरी भासत नाहींशी होऊं लागली. आपण भिकारी झालों तरी कसें तरी खावयास मिळणारच असें सामान्य माणसास वाटे; मग तो कामधंदा कशास पाहतो ? शिवाय कामधंद्याचीहि स्थिति चांगली नसे. पुष्कळ काम करूनहि चांगलें पोटभर अन्नवस्त्र मिळण्याची मारामार पडे, तेव्हां निष्काळजीनें वागण्यास जास्तच मोह उत्पन्न होई. सारांश, पुढें पुष्कळ वर्षांनीं जान स्टुअर्ट मिल्ल आयर्लंदांतील कॉटियर कुळांसंबंधानें ह्मणाला तशी इंग्लंदांतील प्रामाणिक कामकऱ्यांची स्थिति हल्लीं झाली होती. ह्मणजे त्यानें उद्योग केला तर त्याचा फायदा होत नसे, आणि न केला तरी नुकसान होत नसे.

स्त्रियांवर तर या पद्धतीचा फारच अनिष्ट परिणाम होत असे. कारण जी स्त्री लग्न न करतां मुलांची आई बनेल तिला सढळ हातानें या फंडांतून मदत देत असत. तिचें तारुण्य, तिच्या हातून घडलेली चुकी, आणि तिला फसविणारानें अखेरीस तिला सोडून देणें, ह्या सर्व गोष्टींमुळें तिच्याबद्दल सह-

ञच करुणा उत्पन्न होई. मला फसवून कोणीं फशीं पाडिलें असें एकाद्या तरुणीनें ह्मटलें पुरे, त्याच्यावर सहजच विश्वास बसे, मग ती खरें सांगते का ढोंग करिते, ती चुकून फसली का उघड्या डोळ्यांनीं फुसलावून घेती झाली, याचा कोणी विचार करीत नसे. तात्पर्य, कष्ट करणाऱ्या कामकऱ्या बायकोपेक्षां लग्न न करतां आई बनलेल्या स्त्रीची स्थिति जास्त चांगली असे.

शिवाय, ह्या फंडाची व्यवस्था करणारे गांवकामगार, आणि तेथील व्यापारी व इतर मजूर लावणारे, यांजमध्यें एक प्रकारची लांचलुचापत चाले. हे कारखानदार ह्या कामगारांना लांच देऊन त्यांच्याशीं गुप्त रीतीनें असा करार करीत कीं जेव्हां या धंदेवाल्यांना मजुरांची जरूरी नसेल तेव्हां त्यांस गरिबांच्या फंडांतून मदत करावी. अशा रीतीनें धंदेवाले फंडाच्या खर्चानें आपला फायदा करून घेत. शिवाय, कोणत्या मर्यादांतील गरीबांचें पोषण कोणत्या गांवच्या फंडांतून व्हावयाचें हें बरोबर ठरलें नसल्यामुळें श्रीमान् गांव आपल्यांतील गरीबांचें पोषण करण्याचें ओझें शेजारच्या गरीब गांवावर कधीं कधीं ढकलूं शकत. पुष्कळ प्रांतांतून अशी स्थिति होती कीं गरीबांच्या पोषणार्थ कर देणारे मजूर लोक आणि तो खाणारे भिकारी ह्या दोघांच्या स्थितींत फारच अल्प फरक दृष्टीस पडे. पुष्कळ गरीब कुटुंबें हा कर वाढल्यामुळें तो देण्यास असमर्थ होऊन दरिद्री होत; आणि अशा रीतीनें भिकाऱ्यांची संख्या वाढत असे.

अशा रीतीनें ही पद्धति इतकी बिघडून गेली होती कीं लार्ड ब्रूहाम, मि. नॉसा सीनियर, मिस मार्टिनो सारखी परोपकारी पण विचारी मंडळी निराश होऊन असें ह्मणण्याच्या बेतांत आली कीं ही पद्धति सुधारण्याचा उत्तम उपाय ह्मटला ह्मणजे ती अजीबात मोडून टाकणें हाच होय. ते ह्मणूं लागले कीं, असें झालें ह्मणजे जे खरेखुरे दरिद्री असतील त्यांस त्यांचे परोपकारी शेजारी पाजारी खाजगी रीतीनें मदत करितीलच. ते ह्मणत धर्माचा खरा उपयोग लोकांस केवळ पोसणें हा नव्हे, तर त्यांस स्वतःचा उदरनिर्वाह करण्याचें साधन प्राप्त करून घेण्यास मदत करणें

हा होय, आणि तो असल्या खाजगी धर्मादाय पद्धतीनें जसा साधेल तसा ह्या सार्वजनिक पद्धतीनें साधणार नाहीं. जमीनदाराला त्याच्या इस्टेटीवर राहणाऱ्या लोकांपैकीं खरा विपन्न कोण आहे हें समजण्याला जितकीं साधनें असतात, तितकीं इतरांस नसतात; ह्मणून त्यानें अशास त्यांच्या विपत्तींत हातभार लावावा, ह्मणजे मग त्यांचा आजार किंवा इतर विपत्तिप्रसंग संपला ह्मणजे त्यांस पुनः कामास लागण्यास पहिल्याप्रमाणें शक्ति येईल. इकडे हल्लींच्या पद्धतीनें आळसास व अप्रामाणिकपणास उत्तेजन दिल्यासारखें होतें, आणि जो प्रामाणिकपणानें पोट भरण्याची खटपट करील त्याच्यावर या आळशांचें ओझें पडून त्यास आळशी होण्याचा जबर मोह उत्पन्न होतो व प्रसंगहि येतो. असा एकंदर मिस मार्टिनो वगैरे खऱ्या परोपकारी पण विचारी माणसांच्या ह्मणण्याचा रोंख होता.

या वेळीं अर्थशास्त्राचें अध्ययन राष्ट्रीय कामांत लक्ष्य घालणारे लोक काळजीपूर्वक करावयास लागले होते. सामान्य लोकांमध्येंहि या शास्त्राचा अभ्यास ज्यास्त ज्यास्त पसरावयास लागला होता. लार्ड ग्रेच्या प्रधानमंडळापैकीं कांहींनीं अर्थशास्त्रविषयक कांहीं प्रश्नांवर बराच विचार केलेला होता. सुधारणेचें बिल पसार झाल्यावर लवकरच गरीबांच्या मदतीचे फंड आणि त्यांचा व्यय हा सर्व विषय त्यामंडळापुढें आला. तेव्हां त्याविषयाच्या संबंधानें कांहीं तरी करणें जरूर आहे असें स्पष्ट दिसूं लागलें. पण त्या वेळीं त्यांस इतर कामें फार होतीं. ह्मणून त्यांनीं या सर्व प्रश्नाचा विचार करण्याकरितां व रिपोर्ट करण्याकरितां एक कमिशन नेमिलें. या कमिशनपैकीं नॉसा सीनियर हा एक होता. हा फार हुषार माणूस असून याला माहिती फार असे. यानें अर्थशास्त्र व इतर पुष्कळ विषयांवर ग्रंथ लिहून प्रसिद्धि मिळविलेली होती. दुसरा एक कमिशनर मि॰ एडविन शाडविक हा होता. त्यानें आपलें आयुष्य समाजशास्त्राचें ज्ञान प्रसृत करण्यांत घालविलें होतें, व त्याचे लेख मिल्ल यास देखील पसंत असत.

या कमिशनानें ही पद्धति एकंदर कशी काय चालते याबद्दल फार काळजीपूर्वक चवकशी केली, व रिपोर्ट केला. या एकंदर चवकशीवरून कमिशनची अशी खात्री झाली कीं, हल्लींची गरीबाच्या कायद्याच्या बजावणीची जी पद्धति आहे तिजमुळें भिकार वाढलें आहे, आणि लोकांच्या संवयी बिघडून गेल्या आहेत. त्यांनीं आपलें असें मत दिलें कीं, या पद्धतीमुळें गरीब लोक आळशी होतात, लुच्चे होतात, आणि अविचारी बनतात; श्रीमान् लोक गरीब बनतात व अप्रामाणिक बनतात; आणि सर्वांच्याच सुखास व स्नेहास विघ्न येतें. ते आणखी असें ह्मणाले कीं, असल्या फंडाचा उद्देश जे अगदीं गरीब, दुबळे असतील व वयातीत झाले असल्यामुळें ज्यांच्याकडून श्रम होण्याचा संभव नसेल अशांस कायमची मदत करण्याचा असावा; आणि जे आजारामुळें किंवा दुसऱ्या कांहीं कारणामुळें विपत्तींत पडलेले असतील, पण ज्यांस हातभार लाविल्यास ते पुनः निर्वाह्याचें साधन मिळवूं शकतील अशांस हंगामी मदत करण्याचा असावा. कमिशनरांचें ह्मणणें असेंच केवळ नव्हतें कीं, जे प्रामाणिकपणें मेहनत करीत असतांही विपत्तींत सांपडले असतील तेवढ्यांसच मदत करावी; तर त्यांचें असेंही ह्मणणें होतें कीं, जे आळसामुळें किंवा निष्काळजीमुळें गरीबीस पोहोंचले असतील त्यांसही हातभार लावावा; कारण तसें न केल्यास ते एक उपाशी मरणार किंवा चोऱ्यामाऱ्या करावयास लागणार. पण कोणासही मदत करावयाची ती गरजेपुरतीच करावयाची, पुनः त्यास आपल्या पायांवर उभें रहातां यावें अशा दृष्टीनें करावयाची, आणि त्याला मदत करण्यासारखे कोणी आप्तसोयरे नसतील तर करावयाची, हीं तत्त्वें ह्या फंडाचा विनियोग करतांना नेहमीं ध्यानांत वागविलीं पाहिजेत, ह्यावर त्यांनीं विशेष जोर दिला. सध्याच्या पद्धतींतील व्यंगें दाखवितांना त्यांनीं असें नमूद केलें कीं प्रस्तुत पद्धतीनें मजूर जेथें काम नसेल तेथें उगीच थबकून राहतात; तेणेंकरून त्यांची संख्या वाढून त्यांस पोसणारें भांडवल कमी होत जातें; लोकांची काळजीपूर्वक वागण्याची संवय मोडून जाते; आणि दिवसेंदिवस ही सर्व अनिष्टें वाढत जाऊन तीं सुधारण्याचा

संभव कमी होत जातो. जे लोक काम करण्यास समर्थ असून उद्योग नसल्यामुळें फंडाची मदत मागण्यास आले असतील त्यांच्यासंबंधानें त्यांनीं असें सुचविलें होतें कीं, त्यांच्याकडून योग्य काम घेऊन मग त्यांस खाऊं घालावें, ह्मणजे मग जे मजूर स्वातंत्र्येच्छू असतील ते अगदीं निरुपाय झाल्याशिवाय मदत मागण्यास येणार नाहींत, आणि अशा रीतीनें मदत मागणारांची संख्या हळूहळू कमी होत जाईल. ती कमी झाली ह्मणजे अर्थात् ह्या कराचें ओझेंहि कमी होईल, व तेणेंकरून मजुरांना ज्यास्ती मजुरी द्यावयास धनिकांस सामर्थ्य येईल. शिवाय त्यांनीं असें सुचविलें होतें कीं ह्या सर्व व्यवस्था नीट चालण्यासाठीं एक मुख्य अधिकारी नेमून त्यास मोठा अधिकार द्यावा, आणि त्याच्या हाताखालीं विशेष व्यवस्था पाहण्यासाठीं बारीक सारीक पगारी नोकर नेमून त्यांच्यावर ह्या मुख्य कारभाऱ्यानें देखरेख ठेवावी.

कमिशनरांच्या ह्या शिफारशींच्या अन्वयें नवीन कायदा रचण्यांत आला. त्या कायद्यानें पहिली गोष्ट ही केली कीं, ह्या कायद्याच्या बजावणीसाठीं देशाचे सरासरी सारखे असे विभाग केले; असे कीं, ह्या कराचें सर्वांवर सारखें ओझें पडावें; दुसरी व्यवस्था अशी केली कीं, ही सगळी व्यवस्था गांवांतील धर्माधिकाऱ्यांनीं किंवा म्याजिस्ट्रेटांनीं न करतां लोकांनीं निवडलेल्या पंचांनीं करावी; आणि ह्या ग्रामसंस्थांवर योग्य देखरेख ठेवण्याकरितां एक मोठा मुख्य बोर्ड नेमलेला असावा. तात्पर्य, अशा रीतीनें निवडणुकीचें तत्त्व, जें सुधारणा बिलाचेंहि मुख्य तत्त्व होतें, तें ह्या बाबतींतही लागू केलें.

हें बिल जेव्हां पार्लमेंतापुढें आलें, तेव्हां त्यास जबरदस्त विरोध झाल्याविना राहिला नाहीं हें सांगावयास नकोच. तो प्रथम कामन्स सभेंत, आणि नंतर लार्डांच्या सभेंत. ह्यापैकीं बराच विरोध जुन्या मताच्या लोकांनीं अर्थात् केला, ज्यांस पूर्वापार जें कांहीं चाललेलें असेल त्यांत सुधारणा मुळींच नको असते; पण कांहींकांनीं विरोध केला तो ह्या मुद्यावर केला कीं तेणेंकरून कदाचित् मदत घेण्यास योग्य अशा गरीबांस विनाकारण त्रास होईल, काम करण्यास योग्य कोण आणि अयोग्य कोण

ह्याबद्दल विशेष चवकशी करून तसा गरीबांचा विभाग केल्यास नवरा-बायकोस व आईबाप आणि मुलांस कदाचित् भिन्न भिन्न ठिकाणीं राहण्याचा प्रसंग येईल, आणि फुसलावून नेलेल्या गरीब अविवाहित स्त्रीस आपल्या अविचाराचें बेअब्रूरूपी आणि पोषणरूपी सर्वच ओझें सोसावें लागेल. आतां दोन्ही बाजूंनीं ह्या बिलावर काय कोट्या करण्यांत आल्या हें एथें सविस्तर सांगण्याची जरूरी नाहीं. कोणत्याहि कायद्यापासून कोणास तरी थोडा बहुत विनाकारण त्रास व्हावयाचाच; मुद्दा इतकाच आहे कीं नवीन कायद्यापासून एकंदरींत अनिष्टोत्पत्ति पूर्वीपेक्षां कमी होईल किंवा जास्त होईल; आणि दुसरें असें पहावयाचें कीं कायद्याची अंमलबजावणी कायद्याच्या मुख्य हेतूस विघातकरीतीनें होत आहे किंवा साधकरीतीनें होत आहे. ह्या दोन्ही दृष्टींनीं पाहतां नवा कायदा जुन्या कायद्यापेक्षां किती तरी चांगला होता. तेणेंकरून गरीबांच्या पोषणार्थ बसवलेल्या करांचें ओझें कमी होऊन भिकाराची संख्या कमी होत गेली, आणि फंडाची व्यवस्था पहिल्यापेक्षां चांगल्या रीतीनें होऊं लागली.

असो. इतका विरोध झाला तरी प्रस्तुत बिल कामन्स सभेंत मोठ्या बहुमतानें पसार झालें; आणि लार्डांच्या सभेंत कसून लढाई करून पास करून घ्यावें लागलें; आणि नंतर मग त्यास राजाची संमति मिळाली ( आगष्ट, १८३४ ). डयूक आव् वेलिंग्टनच्या पक्षाचे बरेच लोक जरी बिलास विरुद्ध होते, तरी त्यानें मोठ्या शहाणपणानें प्रस्तुत बिलास मनःपूर्वक आश्रा दिला. या कायद्यापासून एकंदरींत वर सांगितल्याप्रमाणें फार फायदा झाला. मुख्य फायदा असा झाला कीं भिक्षा मागण्याचा जो एक धंदाच बनावयास लागला होता तो मोडून गेला, आणि मनःपूर्वक स्वतःचें पोषण करूं पहाणारांस मदत मिळूं लागली. शिवाय ह्या फंडाचा विनियोग करण्याचें काम लोकनियुक्त मंडळ्यांच्या हातीं जाऊन त्यांच्यावर सार्वजनिक मताचा दाब बसूं लागला.

ह्या सुधारणेच्या युगांत आणखी एक सुधारणा ही केली कीं ईस्ट इंडिया कंपनीची सनद ताजी करण्याचा जेव्हां समय आला तेव्हां एकंदर

लोकांच्या हितास अनुकूल असे तिच्यांत बरेच फेरफार केले. ही सनद वीस वीस वर्षांनीं नवी करण्याचा प्रसंग येत असे. पूर्वीं १८१३ साली ती नवी केली होती; ह्मणून आतां १८३३ सालीं, ती पुनः देण्याचा प्रसंग आला. हा प्रसंग पार्लमेंत सुधारल्यावर आला ह्मणून बरें झालें, नाहीं तर जुन्या पद्धतीप्रमाणें कंपनीच्या डिरेक्टरांचे वगैरे स्नेही "कुजट" (अगदीं अल्प वस्तीच्या किंवा मुळींच वस्ती नसलेल्या) गांवांतून निवडून येऊन सनदेंत सुधारणा करतां आली नसती.

ह्या वेळेपर्यंत ईस्ट इंडिया कंपनीच्या हातीं हिंदुस्थानचा पूर्ण राज्यकारभार असून शिवाय हिंदुस्थान व चीन ह्यांच्याशीं व्यापार करण्याचा पूर्ण मक्ता होता; ह्मणजे त्या देशाशीं कंपनी व्यतिरिक्त इतर कोणा इंग्रजास व्यापार करण्यास परवानगी नव्हती. ही गोष्ट अर्थशास्त्रदृष्ट्या अगदीं गैर होती; कारण तेणेंकरून इतर व्यापाऱ्यांचें केवळ नुकसान होत होतें असें नाहीं; तर हिंदुस्थानांतील जे हा विलायतचा माल विकत घेणारे लोक त्यांचेंहि नुकसान होत होतें; कंपनीस कोणाच्याहि चढाओढीची भीति नसल्यामुळें तीस आपला माल पाहिजे त्या दरानें विकतां येत असे. त्यामुळें अर्थात् गिऱ्हाइकास तो एरवींपेक्षां महाग पडत असे. तेव्हां इंग्लिश व्यापाऱ्यांनीं ह्या गैर स्थितीविरुद्ध मोठी चळवळ सुरू केली. ही चळवळ लिव्हरपूल मुक्कामीं सुरू झाली, व तिचा मुख्य चालक विलियम् राथबोन नामक तेथील एक प्रसिद्ध व परोपकारी व्यापारी होता. लंदनांत ही चळवळ सुरू होण्याचा फारसा संभव नव्हता, कारण तेथें कंपनीच्या स्नेह्यांचा भरणा फार होता. ह्या चळवळीचा परिणाम असा झाला कीं कंपनीची सनद ताजी करते समयीं कंपनीचा हा विशेष हक्क काढून घेण्यांत आला, आणि ह्या दोन देशांशी व्यापार करण्याची मोकळीक सर्वांसच दिली. ह्या बिलास दोन्ही सभांतून पास होतांना फारसा विरोध झाला नाहीं.

याच सेशनांत ब्यांक आव् इंग्लंद या प्रसिद्ध पेढीची सनद ताजी करण्यासाठीं बिल आणिलें होतें. त्याचेंहि एकंदर धोरण व्यापारास उत्तेजन द्यावें आणि व्यापाऱ्यांची सोय करावी हेंच होतें.

---

## प्रकरण चवतिसावें.

# म्युनिसिपालिट्यांची सुधारणा.

लार्ड ग्रेला आतां राज्यकारभाराचा कंटाळा यावयास लागला होता. त्याचे कांहीं अत्यन्त हुशार साथीदार त्यास सोडून गेले होते; आणि त्यास असें वाटूं लागलें होतें कीं लोक आपल्या हातून फारच जास्त सुधारणांची अपेक्षा करीत आहेत ह्मणून १८३४ सालीं त्यानें राजीनामा देण्याची परवानगी मागितली, आणि राजानें ती दिली. तेव्हां त्यानें राजीनामा दिला, आणि तेव्हांपासून त्याचा इतिहासाशीं संबंध तुटला. तो मोठा मुत्सद्दी होता असें नाहीं; कारण त्यानें ज्या सुधारणा केल्या त्यांची क्लृप्ति इतर डोक्यांतून निघालेली होती तथापि तो बऱ्यापैकीं मुत्सद्दी होता ह्यांत शंका नाहीं, आणि जें काम त्याच्या हातून झालें त्यास तो विशेष योग्य होता. कारण तो सरदार घराण्यापैकीं असून त्या वर्गासच सुधारणेची भिति फार वाटत होती. त्याच्यामागून पूर्वी होम सेक्रेटरी असलेला लार्ड मेलबर्न याची मुख्य प्रधानाच्या जागीं राजानें योजना केली. हा गृहस्थ अगदीं निष्काळजी व कदाचित् सुस्तही होता. त्याला बुद्धि नव्हती असें नाहीं; तो बराच शिकलेला होता. त्याला वाचनाची फार आवड असे, आणि पुस्तकांची त्याच्याहूनही जास्त असे; आणि राजकीय काम व राजकीय वाद सोडून देऊन पुस्तकीविषयांवर गप्पागोष्टी सांगणें त्याला फार आवडे. त्याला मंडळीची मोठी हौस असे, बायकांना तो प्रिय असे, आणि बड्या कुळांतील चालू बिंगांची त्यास ताजी माहिती असे.

या एकंदर स्थितीवरून हा प्रधान विलियमचा आवडता बनला असेल असें कदाचित् कोणास वाटेल. पण तशी स्थिति नव्हती. याचें खरें कारण असें होतें कीं राजास आतां व्हिग प्रधानांचा कंटाळा आला होता; आणि ह्मणून तो कांहीं तरी कुचाळी काढून त्यांस घालवून देण्याची संधि पाहात होता. लार्ड ग्रे सारख्या वजनदार माणसासच अशा रीतीनें काढून

टाकावें हें कदाचित् त्यास बरें वाटलें नसेल. पण लार्ड मेलबर्न जेव्हां आला तेव्हां त्यास इतकें भिण्याचें कारण नाहीं असें कदाचित् त्यास वाटलें. तें कसेंहि असो, व्हिग प्रधानास अर्धचंद्र देण्याची राजास लवकरच संधि सांपडली. लार्ड आल्थार्पचा बाप अर्ल स्पेन्सर हा एकाएकीं निवर्तल्यामुळें तो लार्डांच्या सभेंत गेला. तेव्हां त्याच्या फडणिशीच्या जाग्यावर दुसऱ्या कोणाची नेमणूक करणें आवश्यक झालें. कारण करांबद्दलचें सर्व काम कामन्स सभेंतच प्रथम होणें जरूर असल्यामुळें त्यांची व्यवस्था करणारा प्रधान त्याच सभेंत असणें अवश्यच आहे. ह्मणून त्यासंबंधानें बोलणें करण्याकरितां लार्ड मेलबर्न जेव्हां राजाकडे गेला तेव्हां त्यानें त्यास स्पष्टपणें सांगितलें कीं मला आतां सगळेंच प्रधानमंडळ बदलावयाचें आहे. तेव्हां अर्थात् लार्ड मेल्बर्न यास त्याचें ह्मणणें मुकाट्यानें कबूल करावें लागलें. तो माणूस असल्या गोष्टीबद्दल मनास फारसें वाईट वाटूं देणारा नव्हता. मुख्य प्रधानकीविना जगांत इतर सुखें कांहींच नाहींत असें समजणारा तो माणूस नव्हता. त्यानें लागलाच राजीनामा दिला.

राजानें सर राबर्टपील यास बलावूं पाठवून त्याचे हातीं कारभार देण्याचा निश्चय केला. त्यानें प्रथम ड्यूक आव् वेलिंग्टनास निमंत्रण दिलें होतें, पण त्यानें मोठ्या शहाणपणानें राजास असें सांगितलें कीं, ह्या समयीं कामन्स सभेंत नसलेल्या माणसास मुख्य प्रधानकी पत्करण्यास सांगणें व्यर्थ आहे. तेव्हां तसा मनुष्य अर्थात् पील हाच होता. पण पील त्या वेळीं इंग्लंदांत नव्हता. तो त्या वेळीं सकुटुंब इतालींत हवा खाण्यास गेला होता, आणि त्यास इतक्यांत प्रधानान्तर होईल असें मुळींच वाटलेलें नव्हतें. तेव्हां अर्थात् त्याच्याकडे एक हेर मुद्दाम पाठविण्यांत आला. तो त्या वेळीं रोममध्यें होता. तो तेथून नेपल्स एथें जाण्याच्या विचारांत होता. पण राजाचा निरोप ऐकून त्यानें तो बेत अर्थात् रहित केला, व तो इंग्लंदकडे येण्यास परतला. त्या वेळीं हा प्रवास हल्लींसारखा सुखकर किंवा सोईवार नसे. तेव्हां आगगाड्या नव्हत्या. शिवाय परकी

देशांतून जावयाचें ह्मणजे त्या त्या देशांतील राजांचे परवाने घ्यावे लागत. रात्रंदिवस प्रवास करूनहि त्यास डोव्हर एथें पोहोंचण्यास बारा दिवस लागले. तेथून तो तसाच लंदनास निघाला आणि ता. ९ दिजंबर १८३४ रोजीं सकाळींच येऊन दाखल झाला. तो राजास जाऊन भेटला, तेव्हां त्यानें त्याचें मनःपूर्वक स्वागत केलें. पीलनें प्रधानकी पत्करण्याचें कबूल केलें, त्यावरून त्या स्वागतास विशेषच मनःपूर्वकता आली. तथापि मेलबर्न यास राजानें काढून दिलें ही गोष्ट पील यास पसंत नव्हती. शिवाय, कामन्स सभेंत विरुद्ध पक्षाचें प्राबल्य असल्यामुळें आपल्याला कारभारांत यश येईल असाहि त्यास भरंवसा नव्हता. तथापि कर्तव्य समजून त्यानें हें काम पत्करिलें.

त्याला माहीत होतें कीं डयूक आव् वेलिंग्टन आपणास मनःपूर्वक मदत करील; ह्मणून त्यानें त्यास फारेन सेक्रेटरीची महत्वाची जागा देऊं केली, व ती त्यानें लागलीच पत्करिली. नंतर त्यानें सर जेम्स ग्रेहाम व लार्ड स्टान्ले यांस लिहिलें, पण दोघांनींही नाकारिलें. तथापि सर जेम्सनें आपल्या मतानुरूप होईल तितकी मदत करण्याचें आश्वासन दिलें. लार्ड स्टान्लेनें लांबलचक पत्र लिहून नाकारण्याचीं कारणें दिलीं. तो ह्मणाला कीं लार्ड ग्रेशीं माझा एकाच प्रधानाच्या संबंधानें मतभेद होऊन जर मीं राजीनामा दिला तर तुमच्याशीं त्या प्रश्नाव्यतिरिक्त सर्वच बाबतींत माझा मतभेद असल्यामुळें तुमच्या मंडळांत मला शिरतां येत नाहीं. लार्ड स्टान्ले ह्राच लार्ड डर्बी बनून कान्सरव्हेटिव्ह पक्षाचा ह्मणून तीनदां मुख्य प्रधान होऊन आला, ही गोष्ट ध्यानांत आणिली ह्मणजे ह्या वेळीं त्या पक्षाकडे जाण्यास तो इतका अनुत्सुक कसा होता ह्याचें अंमळ आश्चर्य वाटतें.

असो हे दोघे न मिळाल्यामुळें पील यास साधेल तसें प्रधानमंडळ बनवावें लागलें. त्यानें लार्ड लिंढर्स्ट यास लार्ड चान्सलर बनविलें, आणि त्यामुळें त्याला लार्डांच्या सभेंत चांगलाच पाठिंबा मिळाला. कारण तो बोलकाही तसाच होता, व वकीलही चांगला होता. एथें आह्मीं बाकीच्या सगळ्याच प्रधानांचीं नांवें देत बसत नाहीं. फक्त दोन तीन ध्यानांत धर-

ण्यासारखीं आहेत तेवढीं सांगतों. एक विलियम ईवार्ट ग्लाडस्टन तो या वेळीं तिजोरीचा दुय्यम प्रधान ह्मणून पुढें आला त्याच्याबद्दल जास्त सांगावयास नको. तो जगप्रसिद्धच आहे. दुसरा सिड्ने हर्बर्ट. हा पुढें पुष्कळ वर्षेपर्यंत पार्लमेंतांत असून मोठा वावदूक व हुशार माणूस होता. तो वयातीत होण्याच्या पूर्वींच मेला, त्यामुळें तो चढावा तितका चढला नाहीं. एरवीं तो कदाचित् मुख्य प्रधानदेखील होता. तिसरा विन्थ्रांप म्याक्वर्थ प्रीड. हा पुढें फार आनंददायक कवितांचा कर्ता ह्मणून प्रसिद्धीस आला. या दोघांस इस्ट इंडिया कंपनीच्या कारभारावर देखरेख करण्याकरितां नेमिलेल्या बोर्ड आव् कंट्रोलचे संयुक्त सेक्रेटरी नेमिलें.

प्रधानमंडळी बनविल्यानंतर पीलचें असें मत झालें कीं नव्या निवडणुकी करणें बरें; कारण तसें केलें ह्मणजे नवीन मंडळासंबंधानें लोकमत काय आहे हें कदाचित् सहजच समजेल. त्याप्रमाणें पार्लमेंत बरखास्त केलें, आणि नव्या निवडणुकीस सुरवात झाली. त्या वेळीं त्यानें आपल्या टामवर्थ येथील मतदारांस अनुलक्षून जें विनंतिपत्र काढिलें तें फार महत्वाचें आहे. कारण पील जरी सुधारणाबिलास प्रतिकूल होता तरी एकापक्षीं पार्लमेंत व प्रधान आणि दुसऱ्यापक्षीं लोक व पार्लमेंत ह्यांमध्यें पूर्ण मतैक्य असल्याविना राज्यकारभार सुरळीत रीतीनें चालविणें आतां शक्य नाहीं, हें तो पक्कें जाणून होता. धाकट्या पिटनें पार्लमेंतांतील बहुमत अनुकूल नसतांहि केवळ राजाच्या आधाराच्या जोरावर जसा कांहीं दिवस कारभार हांकिला तसा हांकण्याचे दिवस आतां कायमचे निघून गेले हें त्यानें ओळखिलें होतें. ह्मणूनच त्यानें आतां नव्या निवडणुकी करविल्या, आणि सर्वांनीं वाचावें अशा प्रकारचें विनंतिपत्र आपल्या मतदारांस अनुलक्षून काढिलें. त्यांत त्यानें प्रथम असें कबूल केलें कीं आपण जरी पूर्वीं सुधारणेस प्रतिकूल होतों तरी १८३२ च्या कायद्यानें जी सुधारणा झाली आहे ती उलथून पाडण्याचा आपला बिलकूल विचार नाहीं. अशा रीतीनें जे कोणी अगदीं जुन्या काळचे टोरी

होते, व ज्यांस कदाचित् पील पुनः पूर्वस्थिति आणण्याची खटपट करील अशी आशा वाटत होती, त्यांच्या महत्वाकांक्षेस त्यानें शेवटचें विरजण घातलें.

असो. नव्या निवडणुकींपासून पील यास फायदा झाला नाहीं. कान्सर्व्हेटिव्हांना पूर्वींपेक्षां बऱ्याच जास्त जागा मिळाल्या, तथापि त्यांचें न्यून मत अद्यापि कायमच होतें. पूर्वींच्या पार्लमेंतांत त्यांच्याविरुद्ध तीनशें वर बहुमत होतें, तें आतां शंभरांवर आलें होतें खरें, तथापि बहुमत विरुद्ध होतेंच, आणि शंभरांचें बहुमत ह्मणजे कांहीं अगदींच लहान नव्हे. पीलच्या पूर्णपणें लक्षांत आलें कीं आपल्या मंडळाचें जीवित सर्वस्वी विरुद्ध पक्षाच्या मर्जीवर अवलंबून रहाणार. त्यांनीं मनांत आणिलें ह्मणजे ते आपल्यास पाहिजे तेव्हां खालीं ओढूं शकतील. तथापि तो निराश झाला नाहीं. त्यानें तसेच निघतील तेवढे दिवस युक्तीनें व धिमेपणानें काढण्याचा निश्चय केला.

नवें पार्लमेंत ता. १९ फेब्रुवारी १८३५ रोजीं भरलें. नवीन स्पीकर नेमण्याच्या प्रसंगींच परीक्षेची वेळ आली व तींत पील यास हार खावी लागली. पूर्वींच्याच स्पीकरची पुनः निवडणूक करावी असें प्रधानांनीं सुचविलें; तरी ती सूचना दहांच्या बहुमतानें नापसंत ठरली. स्पीकरच्या निवडणुकीच्या संबंधानें असा मतभेद हल्लीं कधींही उत्पन्न होत नाहीं. दोन्ही पक्षांस मानवेल असाच उमेदवार पुढें आणावयाचा व त्याची सर्वानुमतें निवड करून घ्यावयाची अशी हल्लींची चाल आहे, व ती योग्यच आहे. कारण स्पीकरचें कर्तव्य पक्षांकडे न पहातां निःपक्षपातानें आपलें काम करावयाचें हें असतें, तेव्हां असल्या हुद्यावर येणारा माणूस सर्वानुमतें योजिलेला असावा हें ठीक दिसतें. पण तसें या ठिकाणीं झालें नाहीं. तरी या प्रसंगीं ओकानेलचे अनुयायी आयरिश सभासद यांनीं लिबरल लोकांशीं संगन मत केल्यामुळें हा पराजय झाला हें ध्यानांत आणून पीलनें त्यांतच समाधान मानून घेतलें.

पण सेशन चालू असतां आणखीहि कांहीं मानखंडना पीलच्या वांट्यास आल्याच. कधीं कधीं जमाखर्चाच्या संबंधानें लिबरल लोकांचें साहाय्य

मिळून त्याचा बचाव होत असे. कारण त्या बाबतींत तो स्वपक्षीय पुष्कळ लोकांपुढें गेलेला असल्यामुळें ते लोक त्याच्या विरुद्ध जात; पण तीं त्याचीं मतें व तदनुसार कृति हीं लिबरलांस पसंत असल्यामुळें ते त्याला मदत करीत.

अशा रीतीनें जरी कांहीं दिवस निभावले तरी आणीबाणीचा प्रसंग अखेरीस आलाच. पीलनें कधीं कधीं पराजय होत तेव्हां असें ह्मटलें होतें कीं, असल्या किरकोळ गोष्टींत पराजय झाल्यानें मी कधीं राजीनामा द्यावयाचा नाहीं. मी राजीनामा द्यावा अशी विरुद्ध पक्षाची जबरच इच्छा असल्यास माझ्यावर पार्लमेंताचा विश्वास नाहीं अशा अर्थाची जोर असल्यास विरुद्ध पक्षानें मजविरुद्ध सभेपुढें सूचना आणावी, व तींत मला पराजित करावें; ह्मणजे मग अर्थात् राजीनामा देणें भागच पडेल. विरुद्ध पक्षाचा अग्रणी लार्ड जान रसेल यानें तसें करण्याचें नाकारिलें. तो ह्मणाला तुह्मी सुधारणेचीं काय बिलें पुढें आणितां हें आह्मी पाहूं, आणि मग काय करावयाचें तें करूं. या वेळीं धर्मसंबंधी कोर्टें, आणि धर्माधिकाऱ्यांच्या वर्तनाचे नियम या संबंधानें कांहीं सुधारणा करण्याचा सरकारचा विचार होता, आणि दशांशाचें ओझें कुळांवरून काढून जमीनदारांवर लादावें अशा आशयाचें बिल सर राबर्ट पीलनेंच स्वतः पुढें आणिलें होतें. तेव्हां ते काय करितात हें पाहणें साहजिकच होतें. पण लिबरलपक्षाचे लोक उतावीळ झाले. तेव्हां लार्ड जान रसेलला ता. ३० मार्च १८३९ रोजीं एक परीक्षेचीच सूचना पुढें आणणें भाग पडलें.

ती सूचना अशी होती कीं, आयर्लंदांतील धर्मसंस्थेच्या उत्पन्नाचा अंदाज करून त्यांतील कांहीं सर्व धर्मांच्या लोकांच्या शिक्षणाकरितां देण्यासारखें आहे किंवा नाहीं ह्याचा विचार करण्याकरितां सभेची कमिटी बनावी. ह्या प्रश्नाच्या संबंधानें टोरी व व्हिग ह्यांच्यामध्यें अर्थात् अत्यन्त विरोध होता. टोरी लोकांस धर्मसंस्थेच्या उत्पन्नाचा कोणताहि भाग धर्माव्यतिरिक्त इतर कामास लावावा ही गोष्ट बिलकूल कबूल नव्हती. तेव्हां ही सूचना ह्मणजे परीक्षेची आहे खरी हें प्रधानांनीं तेव्हांच ओळखिलें.

ह्या सूचनेवर जो वादविवाद झाला तो चार दिवस चालला होता. सर राबर्ट पील, लार्ड स्टान्ले, सर जेम्स ग्रेहाम, वगैरे जी जी मंडळी ह्या सूचने-विरुद्ध बोलली त्या सर्वांचा मुद्दा असा होता कीं, अशा रीतीनें आयरिश धर्मसंस्थेच्या उत्पन्नास जर हात लावण्याची आपण आज परवानगी दिली तर उद्यां त्या संस्थेवरच धक्का येईल. दुसरें त्याचें असें ह्मणणें होतें कीं आयरिश लोकांस तुह्मी अशा रीतीनें कितिहि सवलत दिली तरी ते कधीं संतुष्ट व्हावयाचे नाहींत. त्यांस एक गोष्ट दिली ह्मणजे ते दुसरी मागूं लागतात.

ह्या सगळ्या भाषणांत ग्लाडस्टनचें भाषण ध्यानांत धरण्यासारखें होतें. तो ह्मणाला प्रस्तुत सूचना मान्य केल्यास अखेरीस क्याथलिक धर्म हा आयर्लंदचा राष्ट्रीय धर्म होय हें आपणास कबूल करावें लागेल; ह्मणजे, प्राटेस्टंट धर्मसंस्था आपणास तेथून उठवावी लागेल. असें जर करावयाचें असेल तर इंग्लंद व आयर्लंद ह्या दोन देशांस संयुक्त करणारा कायदा रद्द करून त्या देशास स्वातंत्र्यच कां देऊं नये? तो ह्मणाला, प्राटेस्टंट धर्मसंस्था जी तेथें ठेवावयाची ती सत्य शिकविते ह्या मुद्यावर ठेवावयाची. ह्मणून हा मुद्दा ध्यानांत ठेवून पार्लमेंतानें ह्या सूचनेस आपली संमति कधीं देऊं नये. शिवाय त्यानें असेंहि दाखविण्याचा प्रयत्न केला कीं आयर्लंदांत ह्मणतात इतके प्राटेस्टंट कमी नाहींत. हें दाखवितांना अर्थात् त्यानें डिसेंटर लोकांची देखील प्राटेस्टंटांत गणना केली; पण त्यांना सरकारी धर्मसंस्थेचा उपयोग क्याथलिकांइतकाच होत होता. पुढें ती संस्था ग्लाडस्टननेंच मोडली, आणि आयरिश होम रूल बिलें त्यानेंच आणिलीं ही गोष्ट ध्यानांत आणिली ह्मणजे सध्यांचीं त्याचीं मतें किती भिन्न होतीं व पुढें तीं पूर्णपणें कशीं बदललीं हें स्पष्ट दृष्टीस पडतें.

सर राबर्ट पीलच्या भाषणाचा मुख्य मुद्दा हा होता कीं विरुद्ध पक्षानें ही जी सूचना आणिली आहे तींत त्यांचा हेतु सुधारणा करण्याचा नाहीं, तर प्रधानमंडळास हांकलून देण्याचा आहे. कारण तसें असतें तर आह्मीं जीं बिलें याचसंबंधानें आणिलीं आहेत त्यांतून काय निष्पन्न होतें हें त्यांनीं

अगोदर पाहिलें असतें; तो आणखी असेंहि ह्मणाला कीं विरुद्ध पक्षाचा मी ह्मणतों हाच जर उद्देश असेल तर त्यांनीं अविश्वासाची प्रत्यक्ष सूचना पुढें आणावयाची होती. अशी ही आडून गोळी कशाला? ह्या एकंदर भाषणांचा कांहीं एक उपयोग झाला नाहीं, आणि ता. ३ एप्रिल रोजीं पहांटेस तीन वाजतां जेव्हां मतें घेतलीं तेव्हां लार्ड जानच्या सूचनेस ३२२ मतें अनुकूल पडलीं, आणि २८९ प्रतिकूल पडलीं; ह्मणजे प्रधानांचा ३३ मतांनीं पराजय झाला. तेव्हां अर्थात् ता. ८ रोजीं सर राबर्ट पीलनें राजीनामा दिला, आणि अशा रीतीनें त्याची पहिली मुख्य प्रधानकी चार महिन्याच्या आंतच आटोपली. ह्या सगळ्या घोंटाळ्यास कारण अर्थात् राजा होता. जुन्या प्रधानांस विनाकारण हांकलणें, पील यास इतालींतून हवा खात असतां विनाकारण बोलावून आणणें, आणि राष्ट्रावर नव्या निवडणुकीचा खर्च व त्रास विनाकारण लादणें, ह्या सर्व गोष्टींचें पाप त्याच्याच माथ्यावर होतें, व त्याचें त्यास लवकरच प्रायश्चितहि भोगावयास लागलें. कारण ज्या लार्ड मेलबर्नास त्यानें इतक्या शिरजोर रीतीनें हाकून लाविलें होतें, त्यासच पुनः मुकाट्यानें बलावण्याचा त्यास प्रसंग आला. लार्ड ग्रेस बलावण्याची खटपट त्यानें अगोदर करून पाहिली पण तीस यश आलें नाहीं. तेव्हां लार्ड मेलबर्न व त्याचे साथीदार पुनः विराजमान झाले.

नवीन प्रधानमंडळ सरासरी पूर्वीचेंच होतें, मात्र त्यांत कांहीं नवीं नांवें झळकत होतीं, आणि एक मोठें धेंड गाळलेलें दिसत होतें. लार्ड ब्रूहामचें नांव या नव्या मंडळांतून वगळलेलें होतें. यास कारण त्याचा रागीट स्वभाव, त्याची स्वेच्छाचारवृत्ति, त्याचें घटकेंत बदलणारें मन, त्याचा विलक्षण अहंकार हीं होतीं. एरवीं तो मोठा जबरदस्त वक्ता होता, पण या त्याच्या स्वभावामुळें तो केव्हां काय करील वा बोलेल, आणि प्रधानमंडळास कोणत्या घोंटाळ्यांत घालील याचा कांहीं नेम नव्हता. तेव्हांपासून पुढें लार्ड ब्रूहाम जरी पुष्कळ वर्षें लार्डांच्या सभेंत होता, तरी तो कधीं कोणत्याही प्रधानमंडळांत शिरला नाहीं. तथापि त्याचीं सभा-

षणें नेहमीं जोरदार व ठसा उमटविणारीं अशीं असत. पण राजकीय पुढारी या नात्याची त्याची कारकीर्द एथेंच संपली. त्याच्याऐवजीं कांहीं दिवसांनीं लार्ड काटेन्हाम यास लार्ड चान्सलर नेमिलें. लार्ड जान रसेल होम सेक्रेटरी झाला, आणि लार्ड पामर्स्टन फारेन सेक्रेटरी झाला. नवीन मंडळामध्यें सर हेन्री पार्नेल पे मास्टर जनरल झाला आणि सर जार्ज ग्रे वसाहतींचा अंडर सेक्रेटरी बनला. हा पुढें पुष्कळ प्रधानमंडळांतून मोठमोठे हुद्दे पटकावता झाला, आणि एकवेळ सर्व सभेंत अत्यन्त जलद बोलका ह्मणून प्रसिद्धीस आला.

कांहीं दिवसपर्यंत नव्या प्रधानांशीं सलगीनें वागण्याचें राजाच्या मोठें जिवावर आलें. तो त्यांच्याशीं केवळ कामापुरताच बोलत असे. त्यानें त्यांस कांहीं दिवस जेवावयास देखील बोलाविलें नाहीं. पण कांहीं दिवसांनीं तो अमळ सइलावला, तो त्यांस जेवावयास बलावूं लागला. आणि जेवणाच्या चिठ्यांतून तुह्मी निदान दोन बाटल्या तरी झोकल्या पाहिजेत अशा शिफारशी करूं लागला. प्रधानमंडळाची रचना पुरी झाल्यावर ता. १८ एप्रील रोजीं पार्लमेंत भरलें. पण त्या सभेंत सांगण्यासारखें कांहीं एक झालें नाहीं. कारण नवीन नेमिलेल्या प्रधानांनीं नेहमीच्या पद्धतीप्रमाणें पुनः आपली निवडणूक करून घ्यावी, एतदर्थ कांहीं दिवस पार्लमेंत बंद ठेवावें लागलें. ह्यापैकीं कांहींनीं जेव्हा पुन्हां निवड करून घेण्याची खटपट केली तेव्हां त्यांस यश आलें नाहीं. उदाहरणार्थ, लार्ड जान रसेलचा दक्षिण डेव्हनमध्यें एका टोरी उमेदवारानें पराजय केला, तेव्हां स्ट्रौड येथें त्यास जागा रिकामी करून द्यावी लागली. लार्ड पामर्स्टनची तीच स्थिति झाली, आणि त्यास टिव्हर्टन येथील सभासदानें आपली जागा रिकामी करून दिली. तेथूनच पुढें मरेपर्यंत तो निवडून येत होता. व त्यामुळें ह्या जाग्यास एक प्रकारचें महत्व आलें. अशाच प्रकारची दुसऱ्या कांहीं ठिकाणीं स्थिति झाली, व त्यावरून सुधारणेविरुद्ध कांहीं खटपट अद्यापि सुद्धां आहे असें दिसत होतें. तथापि एकंदरींत सुधारणेचाच अद्यापि जोर होता; व तो लार्डमेलबर्न यास त्याच्या इच्छेविरुद्ध पुढें पुढें ओढीत होता; आणि लार्ड जान रसेल हा मनःपूर्वक सुधारक असल्यामुळें तीस ज्यास्तच जोर येत होता.

या वेळीं एक मोठी सुधारणा व्हावयाची राहिली होती, आणि ती पार्लमेंतीय सुधारणेचे मागून होणें जरूरच होतें. ती सुधारणा म्युनिसिपालिट्यांची होय. ह्या संस्थांमध्यें या वेळीं फार अव्यवस्था झाली होती. पुष्कळ ठिकाणीं पैसे खाण्याचेंहि बंड बरेंच माजलेलें होतें. पार्लमेंताच्या सभासदांच्या निवडणुकींत जशा भानगडी उत्पन्न झाल्या होत्या तशा म्युनिसिपालिट्यांच्या निवडणुकींतहि उत्पन्न झाल्या. म्युनिसिपालिट्यांची व्यवस्था इंग्लंदांत जी मूळ उत्पन्न झाली, ती फ्यूडल पद्धतीला बंधन घालण्यासाठीं ह्मणून उत्पन्न झाली. जमीनदार व त्यांच्या हाताखालचे शेतकरी ह्यांखेरीज प्रत्येक गांवांत जे थोडेसे व्यापारी ह्मणून असत त्यांनीं आपला व्यापार, आपला माल, आणि आपलें जीवित ह्यांच्या संरक्षणासाठीं ही पद्धति प्रथम सुरू केली. ह्या हेतूनें गांवोगांवच्या उदमी लोकांनीं आपलीं गिल्ड्स् किंवा मंडळें बनविलीं. ते आपला व्यापार पाहिजे त्या रीतीनें करण्याचा आपला हक्क सांगूं लागले. त्यांचें एक मोठें तत्त्व असें होतें कीं शेतावर काम करणारे जे सर्फ किंवा गुलाम असतील त्यांस व्यापार करूं देऊं नये, आणि त्यांस जर हा हक्क द्यावयाचा असेल, ह्मणजे त्यांस फ्रीमेन किंवा स्वतंत्र माणूस करावयाचें असेल, तर तें ह्या व्यापारी मंडळांनींच करावें. हा स्वतंत्रतेचा हक्क लवकरच वंशपरंपरेनें जाऊं लागला, आणि स्वतंत्र माणसाचे मुलगे स्वतंत्र ह्मणून समजले जाऊं लागले. पुष्कळ गांवांतून स्वतंत्र माणसाच्या मुलीशीं लग्न करणारा दास स्वतंत्र समजला जाऊं लागला. अशा रीतीनें स्वतंत्र समजला जाणारा मनुष्य विवक्षित ठिकाणीं राहणाराच असला पाहिजे, अशी कांहीं अट नसे. वरील मंडळास पाहिजे त्यास हा हक्क समर्पण करतां येई. ही जुनी चाल हल्लीं कोणा मोठ्या माणसास एकाद्या शहरची कार्पोरेशन जेव्हां त्या शहरची फ्रीडम किंवा स्वतंत्रता ही मोठी पदवी ह्मणून अर्पण करिते, तेव्हां दृष्टीस पडते, व तिचें आपणास मोठें कौतुक वाटतें. पण प्राचीन काळीं हिच्यापासून गैरफायदा असा होई कीं तेणेंकरून ज्यांचा गांवाशीं राहण्यासंबंधानें किंवा इस्टेटीसंबंधानें कांहीं बरावाईट संबंध नाहीं, अशा लोकांस स्थानिक कारभारांत हात घाढून, पाहिजे ती ढवळाढवळ करितां येई, आणि तेथील

म्युनिसिपालिटींचे सभासदही होतां येई, कारण स्थानिक व्यापाऱ्यांनीं स्थानिक कारभार चालविण्यासाठीं अशा कमिट्या नेमण्यास लवकरच सुरवात केली होती, व त्यांचे ते स्वतःच कोणी न निवडतां सभासद होऊं लागले होते. ते अर्थात् जन्मभर सभासद रहात, व त्यांच्या करण्यावर कोणाकडे अपीलही करितां येत नसे. कांहीं ठिकाणीं ह्या कमिट्या कायदे करीत, आणि त्यांप्रमाणें चवकशी करून शिक्षाहि देत. कधीं कधीं आपल्या कोर्टांवर त्या रेकार्डवर ह्मणून मुख्य न्यायाधीश नेमीत, पण त्यास कायद्याचें ज्ञान असलेंच पाहिजे अशी अट नसे. त्या पाहिजे त्यास पाहिजे त्या कामावर नेमीत, आणि कमिटीच्या उत्पन्नाचा पाहिजे तो व्यय करीत; सार्वजनिक मालमत्ता त्या आपलीच ह्मणून आपल्या ताब्यांत घेत. त्या पाहिजे ते हक्क बळकावून बसत, आणि त्यांचें लिलांव करून जो जास्त पैसे देईल त्यास त्या ते विकीत. त्यांच्या ह्या झोटिंगपाच्छाईविरुद्ध बहुधा कोणाचें कांहीं चालत नसे, पण एकादा तसाच वस्ताद त्यांस भेटल्यास त्यास त्या आपल्यांत ओढून घेऊन त्याचें तोंड बंद करीत.

ह्या म्युनिसिपालिट्यांचा फायदा निरनिराळ्या शहरांतून निरनिराळे राजकीय पक्ष घेऊं लागले, हें सांगावयास नकोच. जेथें जो पक्ष प्रबळ असेल तेथें तो तेथील निवडणुकीसंबंधाची सर्व सत्ता तेथील कोणत्या तरी एका बड्या माणसाच्या हातीं देऊं शके. अशा रीतीनें एकाच्या हातीं सत्ता गेली ह्मणजे अर्थात् सार्वजनिक पैशाचा हवा तसा चकाचूर होऊं लागे. ह्या सर्व अनिष्टाकडे देशांतील विचारी व स्वदेशहितचिंतक लोकांचें आज कित्येक दिवस लक्ष्य गेलेलें होतें. पार्लमेंतीय सुधारणेचें बिल पास झाल्यावर लवकरच म्युनिसिपालिट्यांच्या एकंदर इतिहासाची, ह्मणजे त्यांची वाढ व काम करण्याची पद्धति ह्यांची चवकशी करण्यासाठीं लार्ड आल्थार्पनें एक कमिशन नेमिलें होतें. त्या कमिशनच्या रिपोर्टाअन्वयें पुनः स्थानापन्न झालेले लिबरल प्रधान आतां बिल आणण्यास तयार झाले. हें काम लार्ड मेल्बर्ननें लार्ड जान रसेलला सांगितलें. तो त्या कामास अगदीं योग्य असून शिवाय कामन्स सभेचा या वेळीं तो अग्रणी होता. त्यानें आपल्या बिलास अशी व्यवस्था सुचविली होती कीं सध्याच्या ह्या स्वयंनियुक्त म्युनिसिपा-

लिटया रद्द कराव्या आणि त्यांच्या ऐवजीं लोकांनीं निवडलेल्या लोकांच्या बनवाव्या; आणि हा निवडणुकीचा हक्क कांहीं विशिष्ट कर देणारांसच असावा. तात्पर्य, म्युनिसिपालिट्या कामन्स सभेप्रमाणेंच लोकानियुक्त केल्या. म्युनिसिपालिट्यांचीं जीं कोर्टें होतीं त्यांचीहि त्यानें अगदीं निराळीच व्यवस्था सुचविली; आणि त्यांच्यावर रेकार्ड नेमण्याचा हक्क गादीकडे दिला. हा रेकार्डर बारिस्टर असून जो जो गांव त्याच्या पगाराची तरतूद करूं शकेल त्या त्या गांवीं एकेक नेमावा असें ठरविलें. धर्मादाय फंडाची योग्य व्यवस्था करण्यासाठींहि त्यानें योग्य तजवीजी सुचविल्या होत्या.

हें बिल लंदनव्यतिरिक्त १८३ शहरांस व गांवांस लागू करावयाचें होतें, व त्यांची सरासरी वस्ती प्रत्येकीं ११००० होती. मोठमोठ्या शहरांचे निरनिराळे वार्ड किंवा भाग करायाचे होते; आणि पुष्कळ ठिकाणीं पार्लमेंतीय निवडणुकींसाठीं ठरविलेल्या ज्या गांवमर्यादा त्यांचाच या निवडणुकींच्याहि संबंधानें उपयोग करावयाचा होता. प्रत्येक म्युनिसिपालिटीचा अधिकार एक मेयर व कांहीं कौन्सिलर ह्यांच्या हातीं द्यावयाचा असून कौन्सिलरांची निवडणूक गांवांत राहणाऱ्या व गांवकर देणाऱ्या लोकांकडून व्हावयाची होती. चालू हक्कांची अगदींच पायमल्ली होऊं नये ह्मणून असें ठरविलें होतें हल्लीं कीं फ्रीमेनचे हक्क ते मेरपर्यंत चालवावे, व असले हक्क नव्यानें कोणास देऊं नये, किंवा वंशपरंपरेनें जाऊं नये. तद्वतच व्यापारसंबंधानें जे व्यापारीमंडळाचे विशेष हक्क होते तेही काढून टाकिले. लार्ड जान रसेलनें पार्लमेंतापुढें आणिलेलें बिल इंग्लंद व वेल्स यांनाच लागू करावयाचें होतें पण डेनियल ओकॉनेल ह्मणाला, आयर्लंदांतही तें लागू करावें. तेव्हां शेवटीं असें ठरविलें कीं आयर्लंदसाठीं असलेंच एक निराळें बिल आणावें आणि स्काटिश लोकांची इच्छा असेल तर त्यांचीं जरूर तीं कलमें स्काटिश सभासदांनीं आपल्या देशास लागू करण्याची तजवीज करावी.

सर राबर्ट पीलनें या बिलास सगळ्याच्या सगळ्यासच विरोध केला नाहीं, तथापि त्याच्या कांहीं कलमांवर कडक टीका करण्यास त्यानें बिलकूल कमी केलें नाहीं तरी त्याच्या एकंदर भाषणाचा झोंक अशा प्रकारचें

कांहीं सामान्य बिल पाहिजेच होतें अशा प्रकारचा होता. ह्या त्याच्या उदाहरणाचा सहजच बऱ्याच कान्सरव्हेटिव्हांवर योग्य परिणाम झाला, आणि कांहीं अगदीं जुन्या तऱ्हेच्या कान्सरव्हेटिवांनीं तेवढा बिलास फारसा विरोध केला. म्युनिसिपालिटयांनीं निवडणुकींत मतें गुप्त रीतीनें द्यावीं असा बूट ग्रोट साहेबानें पुढें आणिला, पण तो मान्य झाला नाहीं हें सांगावयास नकोच. अशा रीतीनें बिलाच्या स्वरूपांत फारसा बदल न होतां तें कामन्स सभेंतून पार पडलें. पण तें जेव्हां नंतर लार्डांच्या सभेपुढें गेलें, तेव्हां त्याचा तेथें बराच चेंदामेंदा उडाला. सर राबर्ट पीलनें बिलाचें तत्त्व मान्य केलें असल्यामुळें सगळेंच बिल नापसंत करण्याचा लार्डांस धीर झाला नाहीं. पण त्यांनीं तें होईल तितकें निष्फळ करण्याची खटपट आरंभिली. ह्या कामीं लार्ड लिंढर्स्टनें पुढाकार घेतला, आणि तो फार हुशार होता तरी पाहिजे तेव्हां वाटेल तितका आखूड मनाचा टोरी बनूं शकत असे. त्याच्या चिथावणीनें लार्डांनीं बिलांत असे कांहीं फेरफार केले कीं मूळ बिल ओळखण्याची देखील पंचाईत पडावी. जुनीं जीं एकंदर अनिष्टें त्यांपैकीं बहुतेक त्यांनीं बिलांत गोंवून दिलीं; इतकेंच नव्हे तर कांहीं नवीं अनिष्टें त्यांनीं त्यांत स्वतःच्या अकलेनें ढकलून दिलीं.

अशा रीतीनें बिलाचें स्वरूप बदलल्यामुळें पुनः तें कामन्स सभेकडे पाठविणें अवश्यच झालें. कामन्स सभेंत नवीन फेरफार कबूल झाले नाहींत हें सांगावयास नकोच. तेव्हां पीलनें मोठा मुत्सद्दीपणा दाखवून लार्डांस अशी विनंति केली कीं तुह्मीं सुचविलेल्या फेरफारांबद्दल आग्रह धरूं नये. ड्यूक आव् वेलिंग्टननेंहि पीलचें धोरण पाहून नेहमीच्या शिरस्त्याप्रमाणें लार्डांस तोच उपदेश केला; तेव्हां लार्ड लिंढर्स्ट फार धूर्त व व्यावहारिक माणूस असल्यामुळें त्यानें तो इशारा घेऊन आपला विरोध कमी केला. इकडे लार्ड जान रसेलनेंहि लार्डांची समजूत करण्याकरितां कामन्स सभेस त्यांचें ह्मणणें कांहीं बारीक सारीक गोष्टींत कबूल करण्याविषयीं विनंति केली. आणि अशा रीतीनें त्याचीं तिन्ही वाचनें सुरक्षित रीतीनें पार पडून त्यास ता. ७ सपटेंबर १८३५ रोजीं कायद्याचें स्वरूप आलें.

---

## प्रकरण पसतिसावें.

# आणखी सुधारणा.

ह्या सर्व गोष्टी चालल्या असतां इकडे शिक्षणाच्या प्रसारार्थ चळवळी चालल्याच होत्या. ह्या चळवळींबद्दल चवथ्या विल्यमाची कारकीर्द नेहमींच संस्मरणीय राहणार आहे. ह्यापैकीं एक चळवळ ह्मटली ह्मणजे लंदन युनिव्हर्सिटीची स्थापना ही होय. आक्सफर्ड व केंब्रिज येथील जुन्या युनिव्हर्सिट्या आणि ही युनिव्हर्सिटी ह्यांच्यामध्यें मुख्य भेद हा होता कीं, या युनिव्हर्सिट्या आपल्या पदव्या स्थापित व प्राटेस्टंट धर्माचे जे लोक त्यांसच देत असत. त्यामुळें त्यांजकडून शिकविण्याचा हक्क त्या लोकांनाच तेवढा मिळे. ही नवी युनिव्हर्सिटी आपल्या परीक्षांना पाहिजे त्या पंथाचे व बिनपंथाचेहि लोक घेऊं लागली, आणि अशा रीतीनें तिनें वरिष्ट शिक्षणाचा मार्ग सर्वांस खुला करून दिला. या युनिव्हर्सिटीला एक कालेज जोडून त्यास लंदन युनिव्हर्सिटी कालेज असें नांव दिलें या कालेजामुळें देशांत सर्वत्र मध्यम व कनिष्ट प्रतीच्या लोकांमध्यें शिक्षणाचा प्रसार होण्यास फार मदत झाली. ह्या कामीं हेन्री ब्रूहामनें फार पुढाकार घेतला, त्याबद्दल त्याचें नांव चिरस्मरणीय राहणार आहे. तद्वतच उपयुक्त ज्ञानाच्या प्रसारार्थ "पेनी एन्सैक्लोपीडिआ" (पेनी किमतीचे सर्व ज्ञानसंग्रहाचे अंक) ह्मणून जो या वेळीं निघूं लागला त्याच्या उत्पादकांपैकीं हा एक होताच. हा उपक्रम पाहून तेव्हांच्या कांहीं इंग्रजांस आनंद वाटला, कांहींकांस आश्चर्य वाटलें, आणि इतरांस भीति उत्पन्न झाली. ते ह्मणूं लागले कीं गरिबांस इतकें शिकविल्यानें ते असंतुष्ट होतील, आणि आपलीं कामें पूर्ववत करणार नाहींत. लंडन युनिव्हर्सिटीस विल्यमनें १८३९ सालीं सनद दिली.

शास्त्रीय ज्ञानाच्या वृद्धीकरितां सर डेव्हिड ब्रूस्टर, सर रॉड्रिक मर्चिसन, वगैरे प्रसिद्ध प्रसिद्ध शास्त्रवेत्यांनीं व पंडितांनीं १८३१ सालीं ब्रिटिश असोशिएशन नांवाची जी सभा स्थापन केली तिच्यांत ब्रूहामचें

प्रमुखपणें अंग होतेंच. तेव्हांपासून ही मंडळी दरवर्षी इंग्लंदांतील कोणत्याना कोणत्या तरी मोठया गांवीं क्रमाक्रमानें सभा भरवीत असते; आणि त्या ठिकाणीं निरनिराळ्या शास्त्रीय विषयांवर त्या त्या विषयांत पारंगत असलेले लोक पेपर वाचीत असतात. हें काम आजपर्यंत अव्याहत चाललें आहे, आणि तें पुढें तसेंच चालण्याचा संभवहि आहे. " The school master is abroad " " शाळामास्तर बाहेर पडला आहे, " ही जी ह्मण हल्लीं प्रचारांत दिसते ती प्रथम ब्रूहामनें सुरू केली. स्वतः विल्यम राजाचें ह्या सर्व गोष्टींत फारसें अंग नव्हतें हें सांगावयास नकोच. तथापि तो त्यांच्या आड आला नाहीं हेंही खरें आहे. इतकेंच नव्हे तर तो योग्य प्रसंगीं त्यांस एकादा उत्तेजनपर शब्द बोलण्यासहि कांकू करीत नसे.

ह्या सुधारणेच्या राज्यांत आणखी एक सुधारणा झाली. ती ही कीं सरकारी आरमारावर जबरीनें लोक धरून नेण्याची चाल रद्द केली. ती क्रूर चाल आज कित्येक शतकें अमलांत होती. सन १३७८ च्याहि पूर्वी ती चालू होती ह्याबद्दल लेखी पुरावा सांपडतो. १६४१ सालीं ती पार्लमेंतानें गैर कायदेशीर ठरविली होती हें खरें आहे; पण त्या ठरावाचा कांहीं एक उपयोग झाला नाहीं, आणि ती तशीच चालू राहिली. लढाईच्या वेळीं आरमारावर खलाशांची वाण पडली कीं लागलाच तिचा उपयोग केला जात असे. अशा वेळीं असें करीत कीं बंदरगांव पाहून त्या ठिकाणीं एकादा हपीसर आणि कांहीं खलाशी एका लढाऊ जहाजांतून एकदम उतरत; कोळी, व्यापारी गलबतावरील खलाशी, किंवा दुसरे कोणी मजबूत तरुण बांड जे तेथें सांपडतील त्यांना एकदम धरून आपल्या गलबतावर कैदी करून नेत; आणि तेथें त्यांच्याकडून पाहिजे तितके दिवस जबरीनें नोकरी घेत.

बरें, अशा जबरदस्तीनें केलेल्या खलाशांना पगारही भिकारीच देत असत; व इतर रीतीनेंहि त्यांचे फार हाल करीत. उलट पक्षीं अशा रीतीनें हीं धरलेलीं माणसेंहि फारशीं चांगलीं नसत. तीं बहुधा बदमाष

वर्गापैकींच असावयाचीं. तेव्हां तीं गलबतावर नेलीं ह्मणजे स्वतः काम न करून आणखीं इतरांस बिघडवीत. त्यासाठीं मग त्यांना फटके खावे लागत; आणि शिवाय गलबताची नुकसानी होई ती होईच.

शांततेच्या वेळीं ही जबरदस्ती करीत नसत. त्या वेळीं समुद्रकांठच्या व नदीकांठच्या अमुक गांवानें अमुक लोक पुरवावे असे हुकूम सुटत, व त्यांची अंमलबजावणी करण्याकरितां जबरीचा उपयोग न करतां सामदामाचा करीत, परंतु लढाईची वेळ आली ह्मणजे मग ही चाल आपलें स्वरूप धारण करी. फ्रान्सांतील राज्यक्रांतीनंतर जी पुष्कळ वर्षें लढाई चालली होती त्या वेळीं तीस फार जोर आला होता. त्या वेळीं लढाऊ गलबतें व्यापारी गलबतांवरून जबरदस्तीनें खलाशी धरून नेत. एकादें व्यापारी गलबत चाललें असलें आणि त्यास लढाऊ गलबतानें या हेतूनें केलेली खूण कदाचित् न समजली तर लागलाच त्याच्यावर तोफेचा गोळा येत असे, आणि मागोमाग लढाऊ लोक येत असत. कधीं कधीं अशा प्रसंगीं दोघां जहाजांमध्यें लढाईहि जुंपे व त्यांत अर्थात् व्यापारी जहाजास शेवटीं हार खावी लागे.

ही कधीं कधींची गोष्ट झाली. पण सामान्यतः वर सांगितल्याप्रमाणें लढाऊ जहाजावरील लोक बंदर शहरीं उतरत, आणि तेथें योग्य दिसतील तीं माणसें पकडीत. पाहिजे तितकीं माणसें जमत तोंपर्यंत पकडलेल्यांस कैदेंत ठेवीत. आणि अशा देखील गोष्टी सांगतात कीं अशा लोकांच्या बायकांनीं किंवा आयांनीं कोंडवाड्यापाशीं जावें आणि त्याच्या गरादींतून हात घालून आपल्या नवऱ्यांच्या किंवा मुलांच्या बोटांना अशा कांहीं जखमा कराव्या कीं तेणेंकरून ते निरुपयोगी ठरून त्यांची सुटका व्हावी! कधीं कधीं हे लोक एकाद्या बंदरांत उतरले ह्मणजे त्यांस प्रतिबंध करण्याकरितां तेथील सर्व लोक एकत्र जमत; त्यांत बायकाहि असत. मग कधीं कधीं मारामारीहि होई. खिडक्यांतून धोंडे येत, आणि गोळीबारहि होई. पोर्ट स्मिथ वगैरे बंदरांतून असे देखावे वरचेवर दृष्टीस पडत.

आज पुष्कळ दिवसपर्यंत ही जबरीची पकड आणि चाबकाचा मार ह्यांच्याविरुद्ध जगन्मित्र आणि सुधारक बरीच चळवळ करीत होते. त्यांना नेहमीं ठरीव उत्तरें मिळत. ह्या पद्धतीचे पुरस्कर्ते असें दाखवीत कीं हीं चाल रद्द केल्यास सरकारी आरमारास खलाशी मिळावयाचे नाहींत, आणि त्यांना चाबकाखालीं न बडविल्यास ते हुकमांत रहावयाचे नाहींत. सुधारकांना असा प्रश्न होई कीं ह्या गोष्टी तुह्माला ज्यास्त समजतात, किंवा आरमारावर ज्यांचा जन्म गेला त्यांना ज्यास्त चांगल्या समजतात? इतकेंच नाहीं तर अशा सुधारणेच्छूंस स्वदेशाभिमानशून्य व इंग्लंदद्वेष्टे अशींहि विशेषणें मिळत. तथापि हा सुधारणेचा काळ होता, आणि सुधारलेल्या पार्लमेंतांत बरेच लोक असे आले होते कीं ते असल्या कोट्यांना समर्पक उत्तरें देण्यास तयार असेच होते. ह्मणून १८३५ सालीं लार्ड मेलबर्नच्या प्रधानमंडळानें ही चाल रद्द करण्याकरितां, आणि जहाजावरील जबरदस्तीच्या नोकरीची मुदत पांच वर्षांचीं करण्याकरितां एक बिल आणिलें. ह्या बिलापासून फार फायदा झाला, व फटके मारण्याची चाल बंद होण्यास तेणेंकरून मार्ग खुला झाला. तरी ही दुसरी सुधारणा होण्यास पुष्कळ वर्षें लोटावीं लागलीं. इतर सुधारणांच्या संबंधानें अनिष्टाचीं भीति घालणारांचीं भविष्यें जशीं खोटीं ठरलीं, तशींच ह्या संबंधानेंहि ठरलीं. जबरदस्ती काढून टाकल्यामुळें सरकारी आरमारास खलाशी मिळण्यास कधींच पंचाईत पडलेली नाहीं.

ता. १६ आक्टोबर १८३४ रोजीं लार्डांच्या व कामन्सच्या सभा पूर्वी ज्या गृहांतून भरत असत तीं सभागृहें जळून खाक झालीं. आग अशी कांहीं अकस्मात् लागली व ती इतक्या कांहीं जलद पसरली कीं सभागृहांतील कारकून, कामकरी वगैरे मंडळीस जीव घेऊन बाहेर पडण्यास देखील मोठे प्रयास पडले. जवळच असलेला वेस्टमिन्स्टर हॉल हा भव्य दिवाणखाना देखील अग्नीस आहुति पडणार अशी भीति उत्पन्न झाली; आणि नंतर त्याच्याच जवळचें वेस्टमिन्स्टर आबे हें प्राचीन देऊळ त्याच पंथास कदाचित् जाईल असेंहि वाटूं लागलें. तेव्हां हल्लींसारखीं आगी विझविण्याचीं साधनें नव्हतीं; त्यामुळें कांहीं वेळपर्यंत जमलेल्या मंडळींस एकमेकांस अड-

चण करण्यापलीकडे कांहीं करतां आलें नाहीं. शिवाय, नदीला ( टेम्स नदीला ) त्यावेळीं ओहोटी होती; त्यामुळें पुन: भरती चढेपर्यंत कांहीं करतां येईना. भरती चढल्यावर मग हॉल व आबे, ज्या हॉलमध्यें विल्यम वालेस, पहिला चार्लस, सोमर्स आणि वारन हेस्टिंग्स यांचे खटले चालले, व इतक्या राजांना राज्याभिषेक झाले, आणि ज्या आबेमध्यें इतक्या प्रसिद्ध पुरुषांना पुरलेलें आहे, तीं सुरक्षित राहण्याचा संभव दिसूं लागला. सभागृहें आणि त्यांच्या सभोंवतालचीं सर्व हपीसें व वसतिस्थानें हीं मात्र पार उडालीं.

कांहीं दिवसपर्यंत या आगीच्या संबंधानें अशी कल्पना होती कीं हें काम कोणी तरी आगलाव्यानें मुद्दाम केलें असलें पाहिजे. पण तें एका कामकरी मजुराच्या निष्काळजीपणाचें फळ होतें. तो कांहीं मोडकेंतोडकें लांकडी सामान जाळीत होता. तें लवकर संपविण्यासाठीं त्यानें एक भली मोठी रास करून तीस आग लावून दिली, तिची झळा खोलींतील इतर सामानास लागून हा अनर्थ उद्भवला.

जुनें सभागृह लहान असे, व फारसें सुंदरहि नसे. त्यामुळें तें जळाल्याबद्दल लोकांस विशेष वाईट वाटलें नाहीं. नंतर मग नवें गृह बांधण्याचा विचार करण्यासाठीं सभेनें एक कमिटी नेमिली, आणि तिनें अशी शिफारस केली कीं हें काम कंत्राटानें करवावें. ही कल्पना त्या वेळीं नवीन होती, ह्मणून कित्येकांस कसेंसेंच वाटलें, तथापि ती अमलांत आणिली, आणि त्याप्रमाणें निरनिराळ्या इंजिनेरांकडून गृहाचे नमुने आणि खर्चाचे अंदाज कमिटीनें मागविले. त्यांत बारीनामक एका साहेबाचा नमुना तीस पसंत पडला; व त्यासच तें कंत्राट दिलें.

त्याप्रमाणें नवें सभागृह जें तयार झालें तें पुढें व्हिक्टोरिया राणीच्या कारकीर्दींत झालें. तें देखील जुन्याप्रमाणेंच लहान आहे. सगळ्या सभासदांना त्यांत बसण्यास जागा पुरत नाहीं. सभोंवतीं मोठाल्या ग्यालऱ्या सोडलेल्या आहेत; पण त्यांत सभासदांस बसून वादविवाद करतां यावयाचा नाहीं. ह्मणून मोठाल्या प्रसंगीं जेव्हां बहुतेक सर्व सभासद हजर असतात तेव्हां

सर्वांस बसण्यास जागा मिळण्याची पंचाईत पडते. कोणी ह्मणतात, आहे ही व्यवस्था ठीक आहे; सभागृह मोठें केल्यास वादविवाद करण्यास तें अयोग्य होईल; एकमेकांस एकमेकांचें बोलणें ऐकूं जाण्यास पंचाईत पडेल; तेव्हां सभागृह मोठें न करतां सभासदांचीच संख्या लहान करावी. एका-दृष्टीनें हें ह्मणणें अगदीं वावगें दिसत नाहीं. हल्लीं कामन्स सभेचे ६७० सभासद आहेत. ही अवजड संख्या कमी करतां येण्यासारखी आहे.

आज पुष्कळ वर्षे ऑरेंज सोसैटी नामक मंडळ्या ग्रेटब्रिटन, आयर्लंद, आणि बऱ्याच वसाहती यांतून उत्पन्न होत होत्या. ह्या मंडळ्या प्रथम उत्तर आयर्लंदांत उत्पन्न झाल्या, आणि त्यांचा उद्देश, आयर्लंदांत क्याथलिक लोकांस राजकीय व धर्मविषयक स्वातंत्र्य मिळावें एतदर्थ ज्या मंडळ्या उत्पन्न झालेल्या होत्या त्यांस चिरडून टाकावें, हा होता. या मंडळ्यांनीं आरेंज हें नांव विल्यम आव् आरेंज, जो तिसरा विल्यम ह्मणून इंग्लंदचा राजा झाला होता, त्याच्या नांवावरून घेतलें होतें. तें घराणें जसें जेम्सच्या घराण्याच्या विरुद्ध होतें तसे हे लोक क्याथलिक लोकांविरुद्ध होते. आय-लंदांत १७९८ चा दंगा होण्याच्यापूर्वींच ह्या मंडळ्या स्थापन झाल्या होत्या व तो दंगा मोडला तरी या कायमच राहिल्या; इतकेंच नव्हे तर उलट वाढत गेल्या. त्या आपले मठ किंवा लॉज जिकडे तिकडे स्थापूं लागल्या, आणि त्यांच्यावर ग्रांडमास्टर किंवा अधिपति नेमूं लागल्या. चवथ्या जार्जाच्या वेळीं ही चळवळ वाढतच होती, व ती आपल्यास राजनिष्ठ ह्मणवीत असल्यामुळें पुष्कळ सरदार, कांहीं बिपश व कांहीं राजकीय घराण्यांतील पुरुष यांचाहि तीस आश्रय मिळालेला होता. त्या वेळीं डयूक आव् यॉर्क हा गादीचा अगदीं नजीकचा वारस असून तो या मंडळ्यांचा पेट्रन किंवा आश्रयदाता बनलेला होता, आणि त्यास सगळ्याच मंडळाचा ग्रांडमास्टर होण्याबद्दल आव्हान आलेलें होतें; आणि तें त्यानें कबूलही केलें होतें; पण त्यास कोणी सांगितलें कीं, ही सगळी चळवळ गुप्त असल्यामुळें बेकायदेशीर आहे. पुढें हा डयूक जेव्हां मेला आणि विल्यम् डयूक आव् क्लारेन्स, हा

गादीवर बसणार असें जेव्हां ठरल्यासारखें झालें तेव्हां या मंडळ्यांनीं ड्यूक आव् कंबर्लंदचा आश्रय करण्याची खटपट आरंभिली, व तो त्यांचा ग्रांड-मास्टर होण्यास कबूल झाला.

ड्यूक आव् कंबर्लंद हा अगदीं अस्सल प्रतीचा टोरी होता; त्याला सर्व सुधारणेची अगदीं ओकारी असे. लोकांमध्यें तो केवळ अप्रियच होता, असें नाहीं तर ज्यास ज्यास ह्मणून राजकीय स्वातंत्र्य, धर्मविषयक औदार्य, आणि शिक्षणाचा प्रसार हीं प्रिय असतील ते सर्व त्याचा अगदीं द्वेष करीत. विलियम राजानें सुधारणेस आपलें आनुकूल्य दाखविल्यामुळें ह्या ऑरेंज मंडळ्यांस विशेषच चेव आलेला होता. त्यांचा असा समज झाला होता कीं विल्यमाच्या मागून ड्यूक आव् कंबर्लंद गादीवर बसणार. त्यामुळें त्यांची संख्या जास्तच वाढत चालली, आणि शेवटीं ती तीन लाखांवर गेली. त्यांनीं मग फौजेंतील लोकांस आपल्यांत ओढण्याचा प्रयत्न चालविला, आणि बरेच शिपाई गुप्तपणें या मंडळ्यांचे सभासद बनले.

या सुमारास ह्या लोकांमध्यें अशी कांहीं विलक्षण समजूत पसरली होती कीं ती ऐकून हंसूं आल्यावांचून रहावयाचें नाहीं. त्यांच्या कोणीं असें मनांत भरवून दिलें कीं ड्यूक आव् वेलिंग्टन हा इंग्लंदची गादी बळकावण्याची खटपट करीत आहे, आणि हें अरिष्ट टाळील तर ड्यूक आव् कंबर्लंदच टाळील. आतां ड्यूक आव् वेलिंग्टनबद्दल अशी दुष्ट व विपरीत कल्पना मनांत आणण्यास किती मूर्खपणा अंगीं असला पाहिजे तो पहा. लार्ड जान रसेलनें एके ठिकाणीं असें लिहून ठेविलें आहे कीं मी जेव्हां एल्बा बेटांत नेपोलियनला त्यानें गादी सोडल्यावर भेटावयास गेलों होतों, तेव्हां त्याला देखील असें खात्रीनें वाटत होतें कीं ड्यूक एके दिवशीं इंग्लंदची गादी बळकावील. आतां ज्यानें स्वतः फ्रान्सची गादी केवळ आंगच्या शौर्यावर मिळविली होती त्याला वेलिंग्टनबद्दल असें वाटणें अस्वाभाविक नव्हतें. पण ज्याचें डोकें ठिकाणावरून ढळलेलें नाहीं

अशा इंग्रजांस ड्यूकासारख्या सरळ, राजनिष्ठ आणि नापस्वार्थी माणसाबद्दल असें कसें वाटावें हें मात्र मोठें आश्चर्यकारक होय.

ह्या आरेंज मंडळाच्या मुख्य चालकांपैकीं कर्नल फेअरमन ह्मणून एकजण होता; आणि ह्यास ड्यूक आव् कंबर्लंदाचा मोठा आधार होता. आतां ह्या ड्यूकाच्या मनांत गादी बळकावण्याचें होतें किंवा नाहीं हें खात्रीनें सांगतां येत नाहीं. पण लोकांचा समज अशा प्रकारचा व्हावा अशी त्याची कृति होती, ह्यांत बिलकूल संशय नाहीं. हा सगळा प्रश्न जोसेफ ह्यूम या प्रसिद्ध सुधारकानें १८३५ च्या सेशनांत कामन्स सभेपुढें आणिला, आणि त्याची चवकशी करण्याकरितां एक कमिटी बसविली. त्या कमिटीला असें आढळून आलें कीं कर्नल फेअरमन हा राजाविरुद्ध गुप्त कट करीत होता, ह्यांत बिलकूल संशय नाहीं, मग त्यास कंबर्लंदची संमति असो वा नसो. तेव्हां १८३६ च्या सेशनांत ह्यूमनें तो विषय पुनः पार्लमेंतापुढें आणिला, आणि त्यास कामन्ससभेचा सरकारी अग्रणी लार्ड जान रसेल याचा इतका पाठिंबा मिळाला कीं आरेंज मंडळाची कृति निषिद्ध आहे असें जाहीर करण्याबद्दल राजास विनंति करण्याचा ठराव सर्वानुमतें पसार केला. नंतर ड्यूक आव् कंबर्लंदनें असें जाहीर केलें कीं कर्नल फेअरमननें केलेल्या पुष्कळ गोष्टी आपणास न सांगतां किंवा विचारतां केलेल्या आहेत, आणि आपल्या मनांत राजद्रोहात्मक हेतु मुळींच नाहीं. फेअरमन अगदीं आयत्या वेळेस नाहींसा झाला, आणि ह्या मंडळाचा दुसरा एक एजन्ट कायद्याच्या जाळ्यांत सांपडण्याच्या बेतांत आला असतां अकस्मात् मेल्यामुळें बचावला. नंतर मग कंबर्लंदानें असें जाहीर केलें कीं आपणच होऊन हें मंडळ मोडण्याबद्दल आज्ञा केली आहे. इकडे राजानें कामन्स सभेच्या विनंतीस उत्तर देतांना असें ह्मटलें कीं ह्या बाबतींत माझें मत अगदीं तुमच्यासारखें आहे, आणि अशा रीतीनें हा सर्व कट लयास गेला, आणि नंतर मग सरकारानें त्या बाबतींत कांहीं जास्त हालचाल केली नाहीं.

हल्लीं एक ऑरेंज नांवाची चळवळ अस्तित्वांत आहे. पण ती इतर राजकीय मंडळ्यांप्रमाणें उघड उघड स्थापन झालेली असून तिचें करणें कायद्यास सोडून बिलकूल नाहीं. ही जी बेकायदेशीर चळवळ होती ती उजेडांत आल्याबरोबर लागलीच करपून गेली. तशांतला प्रस्तुत चळवळीचा प्रकार नाहीं आहे.

---

## प्रकरण छत्तिसावें.

# अखेरचीं वर्षें.

---

चवथ्या विल्यमाच्या कारकीर्दींत पुष्कळ मोठालीं माणसें निजधामास गेलीं. ज्या विल्यम विलबर्फोर्सनें गुलामगिरी व गुलामांचा व्यापार ह्यांच्या विरुद्ध इतकी चळवळ केली होती तो ह्याच राज्यांत आटोपला. मरणापूर्वी प्रकृतीच्या नादुरुस्तीमुळें त्याला कित्येक वर्षें पार्लमेंतीय कारकीर्द सोडून द्यावी लागली होती; तरी त्यानें ज्या चळवळीला आपलें आयुष्य अर्पिलें होतें तिला मदत करण्यास व तिच्याशीं सहानुभूति दाखविण्यास त्यानें मरेपावेतों कमी केलें नाहीं. त्याचें नांव इंग्लिश इतिहासांत चिरस्मरणीय राहणार आहे. अर्वाचीन तत्त्ववेत्त्यांपैकीं एक अत्यंत मोठा तत्त्ववेत्ता जेरेमी बेन्थाम १८३५ च्या जून महिन्यांत मरण पावला. महत्तम संख्येचें महत्तम सुख हें जें त्याचें महत्तत्त्व त्याच्या विरुद्ध पुष्कळ टीका झालेली आहे, पण तें तत्त्व एकंदरींत पुष्कळ अंशीं ग्राह्य आहे; आणि राजकीय व सामाजिक सरकारांनीं तें ध्यानांत ठेविल्यास त्यापासून पुष्कळ हित होणार आहे. तद्वतच त्या एकंदर तत्त्वमीमांसेचें सार जें उपयुक्तता ( तत्त्व Utilitarianism ) त्याच्या विरुद्धहि असेच आक्षेप आलेले आहेत; आणि आपल्या मरणानंतर आपणास न पुरतां आपलें सर्व शरीर शास्त्रज्ञांच्या हवालीं करावें असें जें त्यानें लिहून ठेविलें होतें, त्यामुळें त्याची थट्टा उडविण्यास आक्षेपकांस बरेंच फावलें आहे. तथापि तेंहि तत्त्व व्यवहारांत एकंदरींत फार उपयोगाचें आहे.

सर जेम्स म्याकिंटाश ह्याचीही उदात्त कारकीर्द ह्याच राज्यांत अस्तास गेली. म्याकिंटाश हा इतिहासकार, तत्त्वज्ञ आणि राजकारणी असून मेकालेप्रमाणें त्यानेंहि हिंदुस्थान व इंग्लंद या दोन्ही देशांत मोठालीं कामें केलेलीं होतीं. मेकालेप्रमाणें त्याचींही भाषणें पार्लमेंतांत फार लक्षपूर्वक ऐकत असत, जरी त्याचा एकंदर स्वभाव व एकंदर सामर्थ्य हीं पार्लमेंता-

पेक्षां अभ्यास गृहासच ज्यास्त शोभण्यासारखीं होतीं. दुसरा एक मोठा माणूस ह्या कारकीर्दींत निवर्तला. त्याचें नांव टामस राबर्ट माल्थस. त्याच्याहि ह्मणण्याचा एका काळीं लोक विपरीत अर्थ करीत असत. पुष्कळ वाचकांची त्याच्या मताबद्दल अशी चुकीची समजूत झाली होती कीं ह्याच्या मतें लढाया, रोग, आणि सांथी ह्यांच्या योगानें लोकवस्ती पातळ होत असल्यामुळें त्या स्वताच चांगल्या आहेत, व ह्मणून सरकारानें त्यांस उत्तेजन द्यावें. पण त्याच्या ह्मणण्याचा अर्थ अगदींच निराळा होता. त्याचें ह्मणणें असें होतें कीं पूर्वींची स्थिति अशी असे. हल्लीं ती सुधारली आहे; करितां लोकसंख्या बेताबाहेर वाढवून दारिद्र्यास जर उत्तेजन देणें इष्ट नसेल तर मनुष्यानें नीतीनें आणि विचारानें वागून लोकसंख्या बेताबाहेर जाऊं न देण्याबद्दल खबरदारी घेतली पाहिजे. आणखी एक बडा तत्त्वज्ञ ह्या राज्यांत गमावला, त्याचें नांव जेम्स मिल्ल हें होय. ह्यानें हिंदुस्थानचा इतिहास लिहिलेला असून नीति वगैरे विषयावरहि ग्रंथ लिहिलेले आहेत. जान स्टुअर्ट मिल्ल याचाच पुत्र होय. दुसरा एक या सर्वांपेक्षां निराळ्याच तऱ्हेचा माणूस ह्याच कारकीर्दींत निवर्तला. विल्यम कॉब्रेटचें नांव वाचकांपुढें आधीं आलेलेंच आहे. तो स्विफ्टप्रमाणेंच साधें पण जोरदार इंग्लिश लिहित असे. मोठा इंजिनेर टेल्फर्ड आणि जरा विक्षिप्त पण खरोखरीच फार बुद्धिवान वैद्य डा. आबरनेथी हेहि ह्याच राज्यांत निवर्तले.

काव्य, कादंबरी, आणि कला ह्यांनाहि ह्याच अमदानींत मोठालीं नुकसानें सोसावीं लागलीं. वाल्टर स्काटच्या मरणाचा आधीं उल्लेख आलाच आहे. त्याला ओळखणारा व त्याच्याकडून स्वागत करून घेणारा ग्रंथकार जेम्स हॉग हा त्याच्यानंतर तीन वर्षांनीं ह्मणजे १८३५ सालीं निवर्तला. जार्ज क्रॅब हाहि ह्याच राज्यांत गमावला. हा गरीबांचा कवि होता. गरीबांचे जीवनार्थकलह, त्यांचीं दुःखें आणि त्यांना कधीं कधीं प्राप्त होणारीं अल्पसुखें ह्यांचें त्यानें पद्यामध्यें, डिकन्सनें जसें गद्यामध्यें तसेंच हुबेहूब वर्णन केलेलें आहे; आणि कोठें कोठें त्याच्या कवितेंत प्रसिद्ध कवि कीट्स व वर्डस्वर्थ ह्यांच्या कवितांतील देखील द्रव दृष्टीस पडतो. बर्कचा ह्याला

चांगला आश्रय होता. हानामूर ही १८३३त निवर्तली. तिची कीर्ति आलीकडे अंमळ कमी झाली आहे, आणि तिच्या उत्तम ग्रंथांचे देखील हल्लीं वाचक बेताचेच असतील. तथापि तिनें आपल्या वर्तनानें आणि आपल्या निरनिराळ्या विषयांवरील ग्रंथांनीं आपलें नांव इतिहासांत कायमचें करून ठेविलें आहे. लहानपणीं ती जान्सन, बर्क, गोल्डस्मिथ, आणि रेनोल्डस ह्यांच्या सहवासांत राहिलेली होती आणि मेकाले तर लहान होता तेव्हांपासून तिच्या ओळखीचा झालेला होता. ती नीतिविषयक निबंध लिहो, कादंबरी लिहो, किंवा नाटक लिहो, त्यांच्यांत तिचा नेहमी कांहीं तरी हेतु असे. तिचा उद्देश वाचकांस सदुपदेश करावा असा नेहमी असे; आणि आपल्याला देवानें दिलेल्या बुद्धीचा उपयोग लोकांचें ज्ञान आणि नीति ह्यांची वृद्धि करण्याच्या कामीं करावा असें तीस वाटे. वर्डस्वर्थ ज्याला 'देवासारख्या कपाळाचा व डोळ्यांचा' ह्मणून ह्मणे तो साम्युएल टेलर कालरिज १८३४ त निवर्तला. हा क्रॅब किंवा हानामूर ह्यांच्याहून जास्त दर्जाच्या बुद्धीचा माणूस होता. तो कवि होता, तत्वज्ञ होता, शिक्षक होता गुणदोषविवेचक होता; आणि त्यानें यांपैकीं कोणतेंही एकच काम जरी केलें असतें तरी देखील तो कीर्तीस चढला असता त्याला बहुतेक पहिल्या प्रतीच्या विलक्षण बुद्धीचा माणूस ह्मणण्यास हरकत नाहीं. कामें तो जर इतकीं करण्यास झटण्याच्या ऐवजीं कोणत्या तरी एकाच कामांत गढून राहता तर त्याचें नांव हल्लींपेक्षां ज्यास्त वर लागलें असतें. त्याचें तत्त्वज्ञ या दृष्टीनें जें वजन हल्लीं बहुधा कमी व्हावयास लागलें आहे; आणि त्याची कीर्ति आतां कवि ह्मणूनच राहिलेली आहे; तथापि त्यानें तज्ज्ञांच्या कित्येक पंथास स्फूर्ति आणून दिली असेल. लेसिंग व गटे ह्यांच्या स्फूर्तीवरून जर्मनीमध्यें जो विचारी टीकाकारांचा वर्ग उत्पन्न होत होता त्याच्याकडे इंग्रजांचें लक्ष्य ह्यानेंच प्रथम लावून दिलें. पृथ्वीवरील अर्वाचीन वाङ्मयामध्यें शेक्सपियरचा पहिला नंबर आहे, हें जर्मन लोकांची त्याच्या ग्रंथावरील टीका इंग्लिशांच्या नजरेस आणून त्यांच्या लक्षांत जें आणून दिलें तें ह्यानेंच होय.

कालरिजच्या मागून लवकरच चार्लस लँब हा निवर्तला; त्याची त्याच्याशीं निकट मैत्री असल्यामुळें कदाचित् एकाचें मरण दुसऱ्याच्या इतक्या लवकर मरणास कारणहि झालें असेल. लँब हा अत्यन्त गोड असा निबंधलेखक व पत्रलेखक होता; त्याचा नाजूक विनोद, विनोदपर व्याजोक्ति, आणि सुंदर शब्दयोजना ह्यांच्यावरून खरें कवित्व त्याच्यामध्यें दिसून येतें. शेक्सपियरच्या नाटकांना त्यानें दिलेलें गद्यस्वरूप प्रसिद्धच आहे.

ह्या राज्यांत मोठमोठाले धर्मव्याख्यानकारहि बरेच निवर्तले. रोलंद हिल हा त्यांजपैकीं एक होता. तो पाहिजे त्या ठिकाणीं व्याख्यान देण्यास तयार असे; श्रोते जमले ह्मणजे झालें; मग तें सार्वजनिक देऊळ असो, किंवा खाजगी देऊळ असो, प्लाटफार्म उभा केलेलें आंगण असो, किंवा निवळ उघडें मैदान असो. दुसरा राबर्ट हॉल हा होय; हाहि फार रसाळ उपदेशक होता. तिसरा आडाम क्लार्क हा होय. हीं सर्व माणसें ह्याच कारकीर्दीत प्रथम उदयास आलीं असें नाहीं, तर त्यांचें बहुतेक नांवाजण्यासारखें काम आधींच होऊन गेलें होतें. पण तीं ह्या कारकीर्दीत मेलीं, ह्मणून त्यांचा एथें उल्लेख केला आहे.

नाट्यकला निपुण प्रसिद्ध मिसेस सिडन्स हिचीहि कीर्ति चवथा विल्यम गादीवर बसण्याच्या अगोदरच होऊन गेली होती, आणि तिनें तो धंदा देखील अगोदर कित्येक वर्षें सोडिला होता. आतां ती रंगभूमीवर धर्मार्थ खेळ असला तर कधीं कधीं येत असे; पण ती ह्या कारकीर्दीत निवर्तली, ह्मणून तिचा उल्लेख एथें केला आहे. नंतर दोन वर्षांनीं प्रसिद्ध नाटकी एडमंड कीन हा मरण पावला. ह्याचीहि कारकीर्द अगोदरच संपलेली होती. रंगभूमीवर संपादिलेल्या कीर्तीचा अंदाज करावयाचा तो दंतकथेवरूनच करावा लागतो. कवि, कादंबरीकार, इतिहासकार, तत्त्वज्ञ, चितारी, मूर्तिकार, हे आपली कृति नेहमीं आपल्यामागें ठेवीत असतात, आणि त्यामुळें पुढील पिढ्यांस त्यांच्याबद्दल अंदाज करण्यास साधन असतें. वक्त्याचे देखील हावभाव आणि कंठमाधुर्य, हीं जरी गमावलीं तरी त्याच्या भाषणांचे कसेबसे रिपोर्ट उपलब्ध असतात. पण नाटक्याचें किंवा नाटकिणीचें तसें

कांहींच नसतें. तथापि ग्यारिकच्या पश्चात् करुणपर्यवसायी नाटकाचा अभिनय मिसेस सिन्डस आणि एडमंड कीन हीं फार उत्तम करीत, असें ह्मणण्यास कांहींच हरकत दिसत नाहीं. ह्या दोघांचीं नांवें घेतलीं ह्मणजे चार्लस माम्थूस नांवाच्या पितापुत्राच्या जोडीचीहि सहज आठवण होते. पैकीं बाप हा घरगुती नाटकांचा जणूं काय स्थापकच होता, आणि मुलगा हा आलीकडील हास्यप्रचुर नाटकांतील उत्तम सोंगाड्यांपैकींच एक होता.

आतांपर्यंत आपण वाङ्मय, कला, तत्त्वज्ञान, धर्म आणि शास्त्र ह्यांच्यांतील मावळणाऱ्या ताऱ्यांचें व तारांचें तेवढेंच वर्णन केलें आहे; ह्मणून आतां ह्या कारकीर्दीच्या अखेरच्या वर्षांत उदयास येणाऱ्या पहिल्या प्रतीच्या एका ताऱ्याचा उल्लेख करून आतांपर्यंत रेखाटलेल्या चित्रास जरासें आकर्षण स्वरूप देऊं या. १८३६ च्या प्रारंभींच " स्केचिस् बाय् बॉझ " हें पुस्तक प्रसिद्ध झालें; आणि त्याच वर्षी जरा मागाहून " पिक्-विक् पेपर्स "चा पहिला अंक निघाला. तेव्हां लोकांच्या लक्ष्यांत आलें कीं अगदीं अस्सल प्रतीच्या विलक्षण बुद्धीचा एक नवा माणूस जगतांत उत्पन्न झाला आहे, आणि प्रस्तुत कारकीर्द संपण्याच्या पूर्वींच पहिल्या प्रतीचा कादंबरीकार हें जें त्या तरुण ग्रंथकारास ( चार्लस डिकेन्स यास ) तज्ज्ञांनीं नांव दिलें तें नेहमीं कायम राहणार आहे. इंग्रजी कादंबरी लेखनाच्या इतिहासांत पिक्विक्पेपर्सनीं नवीन शकाचा आरंभ केला असें ह्मणतां येईल. ह्या ग्रंथाच्या संबंधानें दुसरा एक असा चमत्कार झाला कीं तेणेंकरून जगास आणखी एक कादंबरीकार लाधला. डिकेन्सच्या पुस्तकास चित्रें जोडण्यास एक तरुण चितारी तयार झाला, पण तें डिकन्सनें कबूल केलें नाहीं. तेव्हां त्या तरुणास वाटलें कीं आपली धंद्याची दिशा चुकली आहे. ह्मणून त्यानें ग्रंथलेखनाचें काम हातीं घेतलें. तो " व्हानिटी फेअर" या कादंबरीचा कर्ता ह्मणून नेहमीं प्रसिद्ध राहणार आहे. थ्याकरेच्या ग्रंथांपैकीं एकहि ग्रंथ चवथ्या विल्यमाच्या कारकीर्दींत निर्माण झाला नाहीं, तथापि ज्या गोष्टीमुळें पेन्सिल टाकून पेन हातीं घेण्याची त्यास स्फूर्ति झाली ती या कारकीर्दींत घडल्यामुळें त्याचा एथें उल्लेख केला आहे.

ह्या कारकीर्दीच्या अखेरीस अर्वाचीन कालपैकीं एक अत्यंत धीट व विलक्षण असा तोतया निवर्तला. राणीच्या राज्यांत प्रसिद्धीस आलेला जो टिशबर्न वारस तो देखील जी बाई प्रिन्सेस आलिव्हिया आव् कंबर्लंद हें नांव धारणकरून या वेळीं पुढें आली, व डयूक आव् कंबर्लंदाची मुलगी असें आपणास ह्मणवूं लागली, तिच्यापुढें अगदीं फिक्का पडतो. ही स्त्री विल्यम नांवाच्या एक घररंगाऱ्याची मुलगी असून तिचें तिच्या चुलत्याच्या हाताखालीं शिक्षण झालेलें होतें. तिचें लहानपणींच सीरीस नांवाच्या एका कुशल चिताऱ्याशीं लग्न झालेलें होतें; व त्याची राजदरबारीं नेमणूक झालेली होती, त्यावरून कदाचित् ही महत्वाकांक्षा तीस आतां उत्पन्न झाली असावी. तिच्या नवऱ्याचें व तिचें चांगलेंसें जमेना, ह्मणून तिनें त्याच्याशीं फारकत करून घेतली. नंतर ती कांहीं दिवस नाटकांत शिरली, पुढें चितारीण झाली, व तिलाहि त्या कामावर राजदरबारीं नेमणूक मिळाली. नंतर ती कादंबऱ्या लिहावयास लागली, तिनें कांहीं कविता रचून प्रसिद्ध केल्या, आणखी एक संगीत नाटक रचण्याचीही खटपट केली. नंतर तिचा चुलता जो रेव्हरंड जेम्स विलमट तो जुनियसच्या पत्रांचा लेखक होय असें सिद्ध करण्याकरितां एक ग्रंथ लिहून ती प्रसिद्धीस आली. आणि शेवटीं तिनें असें प्रसिद्ध केलें कीं, माझ्या आईचें डयूक आव् कंबर्लंदशीं गुप्त रीतीनें लग्न झालेलें असून मी त्याची कायदेशीर मुलगी आहें. ती राजकुलांतील माणसांस असेंहि ह्मणाली कीं माझा खटला ऐकून घ्यावा, ह्मणजे माझ्या ह्मणण्याच्या सत्यतेबद्दल तुमची खात्री होईल. तिनें लोकांच्या मनांत आपल्याबद्दल इतकें भरवून दिलें कीं कामन्स सभेचा एक सभासद तिच्या ह्मणण्याची चवकशी करण्याकरितां कमिटी नेमावी अशी सूचना करण्यास तयार झाला. पण सर राबर्ट पीलनें असें कळविलें कीं तिनें पोलंदच्या राज्यालाहि आपला हक्क अशाच रीतीनें दाखविलेला आहे, आणि हे दोन्ही हक्क ज्याअर्थी जुळत नाहींत त्याअर्थी आपल्याला ह्या भानगडींत पडण्याचें कारण दिसत नाहीं; आणि सभेला तें ह्मणणें पसंत पडलें. तथापि ती खरी राजघराण्यांतील

आहे असेंहि मानणारे, इतकेंच नाहीं तर तिचीं दोन्हीहि ह्मणणीं खरीं आहेत असेंहि मानणारे पुष्कळ लोक होतेच. पण पुढें तिचें आयुष्य गरिबींतच गेलें, आणि शेवटीं ती दिवाणी तुरुंगांत मरण पावली. तथापि तिचें नांव बरेच दिवस लोकांच्या स्मरणांतून गेलें नाहीं.

ही प्रिन्सेस आलिव्हिया मेल्यानंतर लवकरच दुसरी एक विलक्षण व्यक्ति निवर्तली. तिचें नांव जेम्स नॉरिस असें होतें. त्या गृहस्थास लहानपणीं चांगलें शिक्षण मिळालेलें असून तो प्राणिशास्त्रांत चांगला तरबेज होत होता. तो शरीरानें देखणा असून रीतीभातींनींहि सभ्य होता. लहानपणींच त्याचीं कुटुंबीय माणसें निवर्तल्यामुळें तो बऱ्याच इस्टेटीचा पूर्ण मालक झालेला होता. पण त्याची वृत्ति एकाएकीं आळशी, तटस्थ आणि लाजाळू अशी झाली. तो आपल्या इस्टेटीकडे ढुंकून देखील पाहीनासा झाला, आणि वर्षेच्या वर्षें उत्पन्नाची चवकशी करीनासा झाला; ब्यांकेंतून शेराचें व्याज घेईनासा झाला आणि त्याबद्दल त्यास पत्रें आलीं असतां तीं उघडीनासाहि झाली. त्यानें हजामत करण्याचेंहि सोडून दिलें, आणि कपड्यांच्या चिंध्या झाल्या तरी बदलीनासा झाला. तो दिवसाचा बहुधा निजून असे, आणि मध्यरात्रीं जेवी. नंतर फिरावयास बाहेर पडे, व उजाडण्याच्या अगोदर घरीं परत येई. तो नोकरांशीं देखील फारसा बोलेना, आणि इतर कोणाशीं बोलण्याचा प्रसंग आलाच तर दरवाज्या आडून किंवा पडद्याआडून बोले. बरें, तो कांहीं विशेष अभ्यासांत किंवा इतर कामांत गुंतला होता असेंहि दिसत नाहीं. तर केवळ एकांतवासाचाच पूर्ण उपभोग घेत होता. त्याच्या आधारानें कादंबरीकारांना कादंबऱ्या लिहिण्यास मात्र फावलें आहे. तो प्रस्तुत कारकीर्द संपण्याच्या अगोदर कांहीं दिवस निवर्तला.

१८३७ च्या प्रारंभीं चवथ्या जार्जानें फशीं पाडलेली मिसेस फिट्स हर्बर्ट ही बाई ब्रायटन मुक्कामीं ८० वर्षांच्यावर वयाची होऊन निवर्तली. ही फार प्रामाणिक व मायाळू अशी असून सर्वांना प्रिय होती.

इकडे चवथ्या विल्यमची कारकीर्द संपावयाच्या बेतांत येऊं लागली होती. तो आलीकडे वरचेवर बराच आजारी पडावयास लागलेला होता, आणि प्रत्येक वेळीं तो इतका थके कीं, तो पुनः उठेल असें कोणास वाटत नसे. तथापि तो पुनः पुनः बरा होई, आणि तो निभावेल अशी त्याच्या आप्तांस आशा उत्पन्न करी. आलीकडे तो वरचेवर अशी प्रार्थना करूं लागला होता कीं, प्रिन्सेस व्हिक्टोरिया वयांत येई तों पावेतों देवानें आपल्यास जिवंत ठेवावें. बहुतेक शेवट-पर्यंत राजवाड्यांत भोजनसमारंभ वगैरे नेहमीप्रमाणें चालविले होते. राजा आजारी आहे ही गोष्ट तो मरावयाच्या अगोदर थोडे दिवसपर्यंत प्रसिद्ध केली नव्हती. नंतर देखील त्याच्या आजारीपणाबद्दल विशेष बातमी देत नसत. हें सर्व राजाच्याच सांगण्यावरून चाललेलें होतें. त्याला असें वाटलें असावें कीं आपण मेलों तर राज्याचें मोठें नुकसान होणार आहे. तो शेवटपर्यंत राज्याचा कारभार पहात होता. इकडे सभोंवतालच्या लोकांस तो आतां लवकरच मरणार, ही गोष्ट कळून चुकलीच होती, आणि पुढें काय करावयाचें ह्या विचारासही ते लागले. सर राबर्ट पीलचें मत असें होतें कीं नव्या राणीनें लार्ड मेल्बर्न यासच मुख्य प्रधानकीवर ठेवावें. त्या वेळीं कांहीं लोकांस अशी भीति पडली होती कीं बेलज्यमचा राजा लिओपोल्ड हा कदाचित् इंग्लंडास येईल व राणी कदाचित् त्याच्याच मतानें फार वागेल. ह्यावेळीं राणीचा स्वभाव किंवा तिचि योग्यता याबद्दल कोणास कांहीं माहीत नव्हतें. याचें कारण तिच्या आईनें तीस अगदीं एकांतवासांत ठेविलें होतें हें होय. आणि जार्ज व विल्यम यांच्या दरबारच्या एकंदर स्थितीकडे पाहतां तिनें केलें तें गैर केलें असें कोणीही ह्मणणार नाहीं.

राजा आजारी असतां तो बरा व्हावा एतदर्थ ज्या देवळांतून प्रार्थना करावयाच्या त्याच्याबद्दल एक विलक्षण वाद उत्पन्न झाला. प्रार्थना एकदम सुरू कराव्या अशी राजास उत्कट इच्छा झाली; ह्मणून प्रिव्हीकौन्सिलनें घाईघाईनें जमून तसा एकदम हुकूम सोडिला. पण लंदनच्या बिशपानें

त्यावर असा आक्षेप घेतला कीं, ह्या कामीं प्रिव्हीकौन्सिल आम्हांस हुकूम करणार कोण ? आम्हीं प्रार्थना करण्यास नाहीं म्हणत नाहीं, पण त्याबद्दल आम्हांस हुकूम करावयाचाच असेल तर तो क्यांटर्बरीच्या आर्चबिशपानें किंवा धर्मसंस्थानाचा मुख्य या नात्यानें खुद्द राजानें केला पाहिजे. शेवटीं आर्चबिशपानें तसा हुकूम सोडिला, आणि मग प्रार्थना सुरू झाल्या.

ता. १९ जून रोजीं राजा अगदींच थकलेला दिसूं लागला, आणि तो जगण्याची अगदींच निराशा होऊन त्यास योग्य ती धर्मदीक्षा दिली. शेवटीं ता. २० जून १८३७ रोजीं ही कारकीर्द संपली. त्या दिवशीं पहांटेस दोन वाजण्याच्या अंमळ अगोदर विल्यम राजा निवर्तला. त्यास शांतपणें व स्वस्थपणें मरण आलें. ह्या राजाचे आंगचे गुणदोष कांहींहि असोत, आन राणीच्या मागून राजकीय कामांत त्याच्या इतकी फायद्याची कारकीर्द दुसऱ्या कोणाची झाली नाहीं ही गोष्ट नाकबूल करतां येत नाहीं. कारण लोकप्रतिनिधि निवडण्याच्या कामांत आणि अतएव राज्याचा कारभार हांकलण्याच्या कामांत लोकमतास जो खरा आधार सांपडला तो याच्याच कारकीर्दींत होय. पार्लमेंतीय सुधारणेचें बिल आणि इतर सुधारणांचीं जीं बिलें याच्या कारकीर्दींत पास झालीं तेणेंकरून राज्यकारभारास एक प्रकारचें नवेंच धोरण प्राप्त झालें, आणि त्याचे हितकारक परिणाम सारखे वाढतच गेले. ह्या कारकीर्दींबरोबरच राजाच्या स्वैच्छिक सत्तेचें तत्त्व पूर्णपणें लयास गेलें. राजा स्वतः मोठा होता असें नाहीं, पण त्याच्या अल्प कारकीर्दींत बऱ्याच मोठाल्या गोष्टी झाल्या; आणि त्या बनवून आणण्याच्या कामीं त्याचें प्रमुखत्व होतें असें जरी मुळींच नाहीं, तरी त्यानें त्यांस दुराग्रहपूर्वक विरोधहि केला नाहीं हेंही विसरतां कामा नये. तात्पर्य, स्वतः प्रकाश न घेतां तो इकडून तिकडे लावून देण्याच्या खिडकीच्या तावदानाची त्याची स्थिति होती; पण त्याच्या पूर्वींच्या एक दोन राजांच्यासंबंधानें इतकेंही म्हणतां येत नाहीं. तेव्हां तो त्यांच्यापेक्षां बरा असें साहजिकरीत्या ठरतें.

---

